काव्यसंग्रह. ५५.

वामनपंडितकृत

# यथार्थदीपिका.

आतां हे यथार्थदीपिका। यथार्थ गीतार्थ त्याची दीपिका।
कलियुगतमांत प्रकाशिका। गीतार्थाची प्रगटली. ॥ ११४५ ॥
भीड कोणाची नाहीं। विरुद्ध अर्थ नावडे कांहीं।
संमत वेदां आणि व्यासादिकांही। मूलग्रंथातें तें बोलणें. ॥ ११४६ ॥

यथार्थदीपिका, अध्याय ११

## भाग तिसरा.

अध्याय १०–१४.

हा

बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए.

यांनीं टीपा देऊन तयार केला,

तो

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०६.

किंमत २। रुपये.

## विषयानुक्रम.



**दुरुस्तीः**—पृष्ठ १५२, ओंवी ४०३, चरण १, 'विषम' ऐवजीं 'विषय' वाचावें.

# वामनपंडितकृत यथार्थदीपिका.

## भाग तिसरा.

### अध्याय दहावा.

जय जय सकळविभूतिनायक! । जय जय अद्वैतविभूतिदायक! । जय जय अशेषविभूतिविषविधायक! । पाहि पाहि. ॥ १ ॥ आता प्रार्थू श्रीरंगा । कीं जी तूंचि गीता अमृतगंगा । तूतें तुझ्याचि अर्पितों तरंगा । मी काय जाणें तुजविण? ॥ २ ॥ गंगेस अर्पावें गंगाजळ । तों तें गंगाचि केवळ । सूर्य जों पाहावा निर्मळ । तों तो दिसे तेजे तयाच्याच. ॥ ३ ॥ ज्ञानभक्तिवैराग्याची खाणी । श्रीमद्भगवद्गीता तुझीच वाणी । तुझ्याच शब्दे तूतें जी चक्रपाणी! । मंगलाचरणींही स्तवीतसें. ॥ ४ ॥ ह्मणी ग्रथासी विघ्न बाधी । म्हणुनी विघ्नहर इतरदेवता वंदूं आधीं । तेही तुझेंचि रूप अद्वैतबोधीं । कीं गंगातीरींचे वि[1]हिरे सजळ त्याच गंगेनें. ॥ ५ ॥ परि ज्या विहिरियांत वदन । प्रक्षाळावे त्यांत धुतां नये वसन । वस्त्रांसि योग्य जीवन । तों स्नान न घडे तयांत. ॥ ६ ॥ एवं च इत्यादि सर्व विहिरे । टाकूनियां बरे बरे । जरी एकाच गंगाजळीं शिरे । तरी कोण कार्य त्याचें न होणार? ॥ ७ ॥ तूंचि देवता सकळ । विहिरे मात्र गंगेनें सजळ । परि सोडोनि गंगा केवळ । स्नान करणें अविधि विहिरियांत. ॥ ८ ॥ तूतेंचि यजिती अन्य उपासक । परि ते ऐसे अविधिपूर्वक । हें पूर्वाध्यायांत तूंचि श्रीवत्सांक । बोलिलासी. ॥ ९ ॥ या गीतेंत वारंवार । देवा! तू बोलिलासि हा विचार । तेचि गीता वाखाणिता देव इतर । प्रार्थितां लाज मज कैसी वाटेना? ॥ १० ॥ वाखाणावी ऐसी गीता । आणि तोंडींच वंदावी क्षुद्रदेवता । तेव्हां गीतार्थ काय बिबला अनंता! । परोपदेशार्थ पांडित्य! ॥ ११ ॥ सर्वां देवास आपणास अद्वैत । सत्य, परंतु मुक्तिप्रद नव्हे अन्यदैवत । ऐसें बोलसी तूं भगवंत । या गीताशास्त्रीं प्रतिपदीं. ॥ १२ ॥ आतां ज्ञान जालियावरी । तूंचि सर्वदेवता म्हणूनि जरी । विघ्नहर देवता प्रार्थू तरी । घट पट काय तूं नव्हसी? ॥ १३ ॥

---

१. पाण्याचे झरे.

ज्ञानाश्रयें धनार्थी । ब्रह्मभावें धनवंतातें प्रार्थी । प्रमाण देती एतदर्थी । अद्वैत. ॥ १४ ॥ लोळे धनवंताचे पायीं । कीं तूं परब्रह्म सर्वाठायीं । साधी अशा उपायीं । धन साधनापासुनी. ॥ १५ ॥ या न्यायें देवाधिदेवा! । तुज सोडोनि इतरा देवा । प्रार्थूनि मंगलाचरणीं सेवा । विघ्नपरिहारार्थ करणें तयाची. ॥ १६ ॥ प्रसन्न ज्याला पृथ्वीपती । तो राजद्वारीं द्वारपाळाप्रति । मार्ग दे म्हणूनि तूंचि क्षितिपती । कां गौरव ऐसें देईल? ॥ १७ ॥ ठसावलें अद्वैत । तरी उपास्य तूंचि परमदैवत । ऐसें कळलें निश्चित । या गीता सच्छास्त्रीं. ॥ १८ ॥ नवमाध्यायपर्यंत । हेंचि वदलासि अनंत । आतां याही विभूतिअध्यायांत । हेचि आरंभीं बोलसी. ॥ १९ ॥ म्हणूनि तूतें केलें नमन । आता त्वद्रूप जे श्रोते जन । सारासार जाणते मात्सर्यहीन । गीतार्थ त्यांप्रति वर्णितों. ॥ २० ॥ पूर्वाध्यायात जो एकचि भवभंजन । तोचि मुख्यत्वें बोलिला स्वभजन । तें ऐकता जाला अर्जुन । अतिप्रीतीकरूनी. ॥ २१ ॥ देखोनि येविषयीं प्रींती । संतुष्ट जाला श्रीपती । म्हणूनि त्याच अर्जुनाप्रती । हा श्लोक बोलतो श्रीभगवान्. ॥ २२ ॥

श्रीभगवानुवाच—**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

म्हणे श्रीभगवान् षड्गुण । कीं, 'अगा महाबाहो! तुझें व्हावें परम कल्याण । या इच्छेंकरूनि मागुती विवरण । बोलतों आईक तें. ॥ २३ ॥ अगा! सर्वांत थोर मी भगवंत । हे गुह्य गोष्टी अत्यंत । जे अनधिकारी असंत । न वाटे गोड हे त्यातें. ॥ २४ ॥ ज्यास पित्ताचा ज्वर । त्यास कडु वाटे साखर । तैसा जोंपर्यंत पापाचा भर । तों थोरपण माझें रुचेना. ॥ २५ ॥ **'न मां दुष्कृतिनो मूढाः'** या श्लोकेंकरूनी । पापी मूढ मज न भजती म्हणोनी । सप्तमाध्यायांत तुज बोललों यावरूनी । समज तूं की माझें परत्व तैशातें नावडे. ॥ २६ ॥ तैसियास माझें परत्व । मीचि सर्वेश्वर मुक्ति देणार, हें तत्त्व । कां मी सांगों? ज्याला महत्त्व । साधारण माझें वाटतें. ॥ २७ ॥ प्रसिद्ध अद्वैतवाणी । सर्व देव सारिखे हे कहाणी । जो तो सांगे मी चक्रपाणी । थोर म्हणतां खवळती. ॥ २८ ॥ तूंही असतास तैसा । तरी न सागतों तुज रहस्यार्थ ऐसा । तुझिया मनीं माझ्या परत्वाचा ठसा । जों जों उमटे तों तों पावतोसि प्रीतीतें. ॥ २९ ॥ हा भाव हृदयीं धरूनी । **'प्रीयमाणाय'** म्हणूनी । तू प्रीतीतें पावतोसि ऐसिया पांचा अक्षरीं करूनी ।

पुन्हा हेंचि निरूपीन म्हणतसें. ॥ ३० ॥ आणि बोलों पाहतों जया वचना। तें साधारण मानिसी झणी अर्जुना! । कीं या श्रवणाची प्रीति माझ्या मना। म्हणूनी पुन्हा बोलतों ऐसें झणी मानिसी. ॥ ३१ ॥ तरी तुज या श्रवणीं प्रीती । आणि मज हे गोष्टी मुख्यत्वे न वाटती । आणि तुझ्याही हिताची गोष्टी नसती । तरी कां पुन्हा मी बोलतों? ॥ ३२ ॥ हें परम अत्यंत वाटतें मजला । म्हणूनि हें परमवचन मागुती सांगतों तुजला । आणि हा रहस्य-अर्थ जों जो समजला । तों तों स्वहित अत्यंत. ॥ ३३ ॥ म्हणुनी **'हितकाम्यया'** । म्हणजे तुझिया हिताचे इच्छेनें धनजया! । सांगतो पुन्हा पंडुतनया! । स्वमहिमाच पुढिल्या श्लोकापासुनी.' ॥ ३४ ॥ सकळ देवा ऋषींचा उद्भव । ज्यापासूनि तो देवाधिदेव । तें हेतुपूर्वक परत्व आपलें देव । बोलतसे आतां या श्लोकीं. ॥ ३५ ॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

अगा! मी निर्गुण ब्रह्म । अनादि मायानदीचा मजपासूनी उगम । होय तें माझें सगुणत्व सर्वांहूनि जें प्रथम । तो प्रभव माझा. ॥ ३६ ॥ प्रकर्षें जो भव । सगुणत्वाचा आविर्भाव तो प्रभव । त्यातें न जाणती कोणीच कीं उद्भव । मजपासूनि सर्वांचा. ॥ ३७ ॥ म्हणूनि माझा प्रभव नेणती सुरगण । अथवा महर्षि जे अत्यंत निपुण । की सर्वां देवां सर्वां ऋषींचा आपण । मी आदि अनादि ईश्वर. ॥ ३८ ॥ मी आदि सर्वां देवां महर्षींचा यास्तव । माझिया प्रभवातें न जाणती ऋषि देव । कीं ज्यापासूनी ज्या संततीचा उद्भव । आदि तया संतानाची वडील तो. ॥ ३९ ॥ परि तो जेव्हां उपजला । उत्पत्ति नव्हती तेव्हां याला । म्हणूनि त्यास नाहीं कळला । प्रभव त्या वडिलाचा. ॥ ४० ॥ आतां शास्त्रदृष्टीकरूनी[१] । ईश्वरप्रादुर्भाव कळला म्हणूनी । तें कळणें नव्हे यावरूनी । कीं मी आदि त्यांची हा हेतु बोलिला. ॥ ४१ ॥ प्रभव माझा या लागीं बोलती । कीं मी आदि त्यांची म्हणे श्रीपती । यावरूनि अवतारप्रादुर्भावाविषयीं अर्जुनाप्रती । न बोले हा श्लोक. ॥ ४२ ॥ एवं ईश्वर अनादी । त्याचा प्रादुर्भाव न जाणती देवादी । यास हेतु कीं तो त्यांची आदी । संतति न देखे जन्मदिन पूर्वजाचा. ॥ ४३ ॥ आतां प्रभवशब्द जन्म । तो दोष परिहरील उत्तरश्लोकीं सर्वोत्तम । आणि जो अज जगत्कारण

---

१. जन्म.

पुरुषोत्तम । तोचि महाईश्वर हा इत्यर्थ या श्लोकीं. ॥ ४४ ॥ वेदीं पुराणीं हा इत्यर्थ । म्हणूनि बोलतो हाही अर्थ । आणि या जाणण्याचें फळही समर्थ । बोलतसे आता या श्लोकी. ॥ ४५ ॥

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

अगा! मी अज अनादि महेश्वर । ऐसें मातें जाणतो जो नर । तो मनुष्यांत परम चतुर । सुटतो सर्व पापापासूनी. ॥ ४६ ॥ श्लोकांत इतकाचि अर्थ । परि पदोपदीं दाटला भावार्थ । जो समजला पार्थ । भगवत्सन्निधानेंकरूनीं. ॥ ४७ ॥ पूर्वश्लोकीं म्हणे, 'माझा प्रभव । मजपासूनि जाले ते नेणती महर्षि देव । प्रभव म्हणिजे जन्म आणि येथें स्वयमेव । मी अज' ऐसें म्हणतसें. ॥ ४८ ॥ आणि प्रलयानंतर ईश्वरत्व । ब्रह्मी न दिसे हें तत्त्व । प्रगटतां मागुती शुद्ध सत्त्व । ईश्वरत्व प्रगटले. ॥४९॥ तरी तोचि त्याचा प्रभव म्हणिजे जन्म । ऐसें असोनि या श्लोकी मी अज म्हणे सर्वोत्तम । तरी अजत्व हें त्याचें परम । कशावरूनी? ॥ ५० ॥ ऐशा संदेहाचें स्थळ । म्हणूनि अजत्वीं हें बोले मेघनीळ । की मी अनादि सर्वादिमूळ । या अनादित्वें साधितों अजत्व. ॥ ५१ ॥ भाव ऐसा की, 'धनंजया! । ब्रह्मीं प्रगटते प्रथम माया । तेव्हां मायाशबलता[1] ईश्वरा अव्यया । प्रगट होणें मज घडे. ॥ ५२ ॥ तोचि जन्म मज म्हणावा । तरी प्रतिसृष्टीच्या आदिकाळीं या प्रादुर्भावा । देखतां उपाधि हा माझा गणावा । अनादि म्हणोनी. ॥ ५३ ॥ अनादित्व जेव्हा सिद्ध जाले । तेव्हां अजत्व माझें साधलें । तेव्हां प्रभव म्हणूनि या बोलें । जन्म मजला न म्हणवे. ॥ ५४ ॥ अत एव **'नासदासीन्नो सदासीत्'** ऐशा श्रुती । प्रलयीं ईश्वरोपाधि नाहीं म्हणती । तरी योगनिद्रा माझी ते वाखाणिती । वेद ऋषि व्यासादिक. ॥५५॥ कीं ब्रह्मीं माझा उपाधी । लय पावतो तो न म्हणवे योगसमाधी । कीं योगीं प्रत्यय स्वात्मबोधीं । प्रत्यग्वृत्तीस[2] उरतसे. ॥ ५६ ॥ प्रलयीं ते प्रतीति नसे । तेव्हां मायाशास ठाव न दिसे । वटबीजांत वट वसे । तैसी माया अद्वितीयपणें लय पावते. ॥ ५७ ॥ तेव्हा योगप्रतीति नाहीं । म्हणूनी सुषुप्ति म्हणावी जरी काहीं । तरी न म्हणवे निद्राही । कीं तो तमोलीन नव्हे उपाधि माझा. ॥५८॥ एवं च तो योग न म्हणवे । अथवा निद्राही न गणवे । आणि योगनिद्राही बोलवे । एका अंशेंकरूनी. ॥ ५९ ॥ कीं सत्त्वयोगीं ब्रह्ममय । तरी त्यात्र

---

१. मायेच्या योगाने विचित्ररूप पावून. २. प्रत्यक्=आंत उलटलेली.

ब्रह्मीं सत्त्वाचा लय । आणि तेथूनी मागुती उदय । सत्त्वयोगांतूनि निघे जे रीती. ॥ ६० ॥ आतां प्रलयानंतर नसे चिच्छक्तीस चित्प्रत्यय । निद्रेसमान भाव होय । निद्राचि म्हणावी तरी नसे तमीं लय । उपाधीलीन निर्धर्मी चित्स्वरूपीं. ॥ ६१ ॥ म्हणूनि योगनिद्रा । ते समयीं मज जगतरंगाच्या समुद्रा । वेद ऋषि म्हणती अगा सुभद्रा! । कीं जागा होतो उपाधि माझा मागुती. ॥ ६२ ॥ एवं च एक उपाधि नासता । आणि दुसरा उपाधि उपजता । तरी जन्म मज म्हणों येता । अगा अर्जुना! ॥ ६३ ॥ ब्रह्म अनादि जैसें । ईश्वरोपाधीचें अनादित्व तैसें । कीं जधींचे किरण तधींचे मृगजळ ऐसें । अनादि अनादित्व हें माझें. ॥ ६४ ॥ म्हणूनि पूर्वश्लोकी माझा प्रभव । तो म्हणावा प्रादुर्भाव । धरूनि पोटीं इत्यादि भाव । म्हणूनि म्हणे अगा! अज मी अनादि मी. ॥ ६५ ॥ अज अनादि मी यास्तव । मजपासूनि जन्मले ऋषि देव । ते माझा प्रभव नेणती कीं मजपासूनि सर्व । उपजती मी अज मी अनादि.॥६६॥ एवं च जो अज अनादि । ज्यापासूनि देव महर्षि जो सर्वांचा आदि । तोचि महेश्वर ऐसें वेदवेदादि । सर्व म्हणती. ॥ ६७ ॥ ऐसें माझें अजत्व । आणि त्यास हेतु ऐसें माझें अनादित्व । त्यामुळें माझें महेश्वरत्व । जो जाणे. ॥ ६८ ॥ असंमूढ तो म्हणावा । मनुष्यांत थोर तो गणावा । आणि सर्व पापापासूनि सुटला जाणावा । तो पुरुष. ॥ ६९ ॥ मूर्ख अज्ञ म्हणावा मूढ । बहुत अविवेकी म्हणावा संमूढ । अत्यत विवेकी तो असंमूढ । कीं अतिमूढत्व गेलें जयाचें.॥७०॥ एव अविद्यायुक्त भलता मूढ । परि मज सर्वांत थोर मानूनि भजे तो नव्हे संमूढ । कीं अविद्याग्रथि सदृढ । सुटणार त्याची. ॥ ७१ ॥ युक्त अविवेंकरूनी । आणि न भजे माझें परत्व जाणोनी । तो कधीं न पावे ज्ञान म्हणोनी । संमूढ अविवेकी म्हणावा. ॥ ७२ ॥ जो मज भजों लागला । असमूढ म्हणावें त्याला । कीं ज्ञान होणार ज्याला । कळतां माझें अजत्व अनादित्व महेश्वरत्व. ॥ ७३ ॥ अगा! मज मानूनि साधारण । करितां वेदांताचें श्रवण । गुरुमुखे कळली जरी आत्मखूण । तरी व्यर्थ होतें तें ज्ञान. ॥ ७४ ॥ **'श्रुत्वाप्येनं वेद न चैव'** म्हणोनी । द्वितीयाध्यायांत या चरणेंकरूनी । आत्मा आइकोनि वेगळा जडापासूनी । न जाणती म्हणजे गमाविती न थारतां चित्त त्यांत. ॥ ७५ ॥ चित्त चित्स्वरूपीं न थारे । तों दीप विज्ञत्री पूर्वसंस्काराचें वारे । न जळती पापपुण्याचे थारे । चित्तीं संचिताचे एकाग्रतेवांचूनी. ॥ ७६ ॥ आणि सर्वदा अकर्तात्मपण । न स्फुरे कर्मी उपजे मीपण । त्यास करीच लेप क्रियमाण । पापपुण्य जोडे नवेंही तयातें. ॥ ७७ ॥ इतकिया अनर्थास मूळ । न कळणें

माझें अजत्व अनादित्व प्रांजळ । आणि जो हें जाणे केवळ । तो सुटे सर्व पापापासूनी. ॥ ७८ ॥ कीं सर्व पापे म्हणजे । पुण्यही पापचि जाणिजे । कीं पुण्यफळरूपही भोग जे जे । तेही हेतु जन्ममरणाचे. ॥ ७९ ॥ एवं च सर्वांहूनी आपलें उत्तमत्व । कळतां प्रसादे आपल्या कळे तत्त्व । त्यास क्रियमाण पापपुण्याचें अलिप्तत्व । आणि नाश त्याच्या सचिताचा. ॥ ८० ॥ कीं भक्तांचा योगक्षेम । मी वाहतों पुरुषोत्तम । योग म्हणिजे देऊनि आत्मज्ञान उत्तम । क्षेम जतन करणें तयाचें. ॥ ८१ ॥ तें ज्ञान जेव्हां जतन जालें । चित्त चिन्मय होता सचित त्याचे जळालें । अकर्तात्मस्मृतीनें नाहीं लिपलें । क्रियमाण पाप पुण्य. ॥ ८२ ॥ तो तेव्हा सर्व पापापासूनी । सुटलाच जाणावा म्हणोनी । बोले पोटीं हा अर्थ धरूनी । की **'सर्वपापैः प्रमुच्यते.'** ॥ ८३ ॥ सर्व शब्दाचा साकल्य अर्थ । ऐसा सूचवी समर्थ । अन्यथा सर्व शब्द होतो व्यर्थ । की अज्ञ न सुटे सचितक्रियमाणापासूनी. ॥ ८४ ॥ सचित क्रियमाण । पाप आणि पुण्य जाण । दोन्ही पापचि ऐसी खूण । वेदांतसूत्रीं प्रसिद्ध. ॥ ८५ ॥

ब्रह्मसूत्र—**तदधिगमे उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ।**

सूत्रार्थ—त्याचें होतां ज्ञान पूर्ण[1] । उत्तर अघ म्हणिजे पुढील जें क्रियमाण । आणि पूर्व अघ म्हणिजे सचित पापपुण्य जाण । सुटका दोहींपासूनी दोंपरी. ॥ ८६ ॥ की पुढें क्रियमाणरूप । त्याचा अकर्त्रात्मपणें नव्हे लेप । आणि पूर्वील पापपुण्यरूप बधक पाप । विनाश त्याचा होय होतां चित्त चिन्मय. ॥ ८७ ॥ ऐसा सर्वा पापांपासूनि तोच सुटे । कीं अविद्याबंध ज्याचा तुटे । जन्ममरणाची वार्ता खुटे । ऐसियाची तेधवां. ॥ ८८ ॥ या इतकियास कारण । अज अनादि महेश्वर एक नारायण । जो ऐसें जाणे सुजाण । फळ तो पावे. ॥ ८९ ॥ सर्व शब्द म्हणतां पाप मात्र । संचित पापपुण्य उरले विचित्र । तेव्हां सर्व शब्द कमलनेत्र । व्यर्थ बोलिला. ॥ ९० ॥ उगाच पापापासूनी । तो सुटतो म्हणोनी । जरी बोलता तरी त्याहीवरूनी । समजताच नाश पापमात्राचा. ॥ ९१ ॥ सर्व शब्दें ऐसा अर्थ । बोले येथें समर्थ । ऐसा अर्थ न बोलतां व्यर्थ । सर्व शब्दें ये स्थळीं होणार. ॥ ९२ ॥ एवं विष्णुभजनाविण । मोक्ष नाहीं ऐसें आपण । गीतेंत बोले ब्रह्म सगुण । तें भजनपरत्व समजोनि करितां हें फळ. ॥ ९३ ॥ एवं अ-

१. पूर्ण, सगळा.

जत्वें अनादित्वें महेश्वरत्वें आपण । सर्वांत थोर देव ऋषितें करितों निर्माण । हें बोलिला सर्वज्ञ जगत्कल्याण । सर्वेश्वरत्व आपलें ऐसें येथवरी. ॥ ९४ ॥ हें आदिकाळींचें स्वकर्तृत्व । बोलोनि दाविलें स्वश्रेष्ठत्व । आतां स्थितिकाळींही आपलें सर्वेश्वरत्व । सर्व प्रेरकत्वें बोलतो. ॥ ९५ ॥ आणि गायत्री सर्वां वेदांची जननी । ते बुद्धिप्रेरकास ध्यावें म्हणूनि । म्हणते तरी उपास्य सर्वांचा यावरूनी । बुद्धिप्रेरक आपण ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ९६ ॥

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवो भावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥**

अगा अर्जुना! जनाची बुद्धि । इच्छी आपुली सुखाची सिद्धी । त्या बुद्धीची समृद्धी । मजपासूनी. ॥ ९७ ॥ कीं आपले हो बरे । आपलें वाईट न हो कोण्याप्रकारे । बुद्धि म्हणोनि नाव खरे । याच निश्चयाचे. ॥ ९८ ॥ मग जो जों होय शाहणा । तों तो समजे स्वहितखुणा । मुख्य मोक्षापेक्षा उपजे आपणा । स्वरूपनियतनिश्चयरूपिणी ते बुद्धी. ॥ ९९ ॥ जे ऐसी मुख्य बुद्धी । तीची मजपासूनीच सिद्धी । एवं च आपले बरे हो म्हणूनियां निश्चयाची समृद्धी । ते बुद्धि सर्वांसही. ॥ १०० ॥ ऐसी जे बुद्धि गणावी । ते मजपासूनीच सर्वांस जाणावी । प्रस्तुती बुद्धि ते म्हणावी । की मोक्षापेक्षेनें जिज्ञासा ज्ञानाची. ॥ १०१ ॥ बुद्धि देऊनि देतो ज्ञान । ऐसें बोलतो ज्ञानघन । कीं मोक्षप्रद जगजीवन । आपण एकचि हा भाव. ॥ १०२ ॥ बुद्धि जनांस मजपासूनी । होतसे अर्जुना! म्हणोनी । आरंभीं प्रथमपदे वदोनी । त्यापुढेंचि ज्ञान मजपासूनी म्हणतसे. ॥ १०३ ॥ मजपासुनी बुद्धि जे मोक्षापेक्षा । होतसे मज भजतां ते मुमुक्षा । मजचिपासूनी त्या दक्षा । ज्ञानही होतसे हा अर्थ. ॥ १०४ ॥ आतां ज्ञान म्हणिजे जाणणें । प्रथम आपणास आपण ओळखणें । जडनिषेधें देखणें । आपण आपणा. ॥ १०५ ॥ हे आवरण अज्ञाननाशन । जाले जडव्यतिरेकें आत्मज्ञान । परतु जडद्वैतनिरसन । जालें पाहिजे अन्वयें करूनी. ॥ १०६ ॥ व्यतिरेकें नासे जे आवरण । तें प्रथम अविद्यास्फुरण । न कळणें स्वस्वरूपलक्षण । कोण आपण म्हणोनीं. ॥ १०७ ॥ जैसा न कळतां दोर । दोरीं उपजे सर्प थोर । सर्पभय उपजे घोर । दोर न कळणें मूळ त्याचें. ॥ १०८ ॥ परि तें आपल्या मूळ कारणाहूनी । जडभ्रांति अज्ञान प्रबळ म्हणोनी । संमोह शब्दें करूनी । जड द्वैत बोलावें. ॥ १०९ ॥ कीं बाल्य तारुण्याचें मूळ । आणि बाल्यापरीस तारुण्य जैसें प्रबळ । तैसें जडभ्रांती मोहाचें अधिक बळ । आवरणाहूनी. ॥ ११० ॥ आत्मा न कळे हें अज्ञानावरण ।

मोह शब्दें त्याचें करावें विवरण । त्याहूनी जें जडद्वैत दारुण । संमोह म्हणावें तें यास्तव. ॥ १११ ॥ कीं दोर न कळे हा मोह । परि सर्प भासता होय संमोह । भयकंपयुक्त देह । होय देखतां मिथ्या सर्पातें. ॥ ११२ ॥ ज्या रज्ज्वज्ञानें रज्जु न कळे । त्या मोहें देह सभय होऊनि चळे । सर्प देखतां भय पळे । संमोह या भावें म्हणावें तयातें. ॥ ११३ ॥ तो जडसर्पसंमोह नासे तरी । कीं आत्मरज्जु कळे जरी । म्हणूनी आधींच म्हणे हरी । तें ज्ञान मजपासूनि म्हणोनी. ॥ ११४ ॥ हें व्यतिरेकज्ञान । जडनिषेधे आत्मदर्शन । जालें अनात्मत्वभावें जडनिरसन । परि तें द्वैतरूपे वेगळें दिसतसे. ॥ ११५ ॥ दसोडीच्या[1] रूपें तंतु कळे । तथापि बाळकास पटीं ततु नाढळे । तोचि तंतु पटीं पटान्वयें डोळे । पाहों लागती दाखवितां. ॥ ११६ ॥ तो संमोहाचा निरास । असमोह म्हणावें त्यास । तोही मजचिपासूनि म्हणे जगन्निवास । तिसरिया पदें प्रथमचरणीं या श्लोकीं. ॥ ११७ ॥ एवं व्यतिरेकअन्वय द्विविध । जाला जरी मजपासूनि बोध । तथापि पूर्वसस्कारे संबंध । सत्त्वास रजतमाचा होतसे. ॥ ११८ ॥ रजतमें जों अशांत । शातीतें न पावे सत्त्व तोंपर्यंत । म्हणूनि दुसरिया चरणीं भगवंत । शांतीही मजपासूनीच म्हणतसे. ॥ ११९ ॥ कीं क्षमा सत्य दम शम । मजचि पासूनि होती हा नियम । कीं मोक्षदाता मीच एक पुरुषोत्तम । भाव ऐसा सूचवी. ॥ १२० ॥ क्षमा, पराचा अपराध सोसणें। सत्य, यथार्थ बोलणें । दम इद्रियांचें आटोपणें । निस्पृह जितेंद्रिय असत्य कां बोलेल? ॥ १२१ ॥ स्वस्वरूपीं चित्ताचा उपरम । तो मुख्यत्वें म्हणावा शम । ऐसा अर्धश्लोकें पुरुषोत्तम । स्वभजनफळें बोलिला. ॥ १२२ ॥ उत्तरार्धे साधारण । फळें पावती करूनि कर्में त्रिगुण । त्यांचें स्वकृतकर्मफळविवरण । मजचिपासुनी म्हणतसे. ॥ १२३ ॥ पुण्याचें फळ सुख । पापाचे फळ दुःख । त्या भोगाकारणें आणीक आणिक । जन्म घेणें तेंही मजपासूनी. ॥ १२४ ॥ भोगाकारणें देहोद्भव । भोग सरतां मरण तों त्याचा अभाव । तेथें भय अभय दोन्ही भाव । मजचिपासुनी. ॥ १२५ ॥ हेतु कांहीं दुःखाचा । देखतां उद्भव होतसे भयाचा । परिहार देखतां तयाचा । अभय होय. ॥ १२६ ॥ हे दोन्ही मजचिपासुनी । एवं च सर्वेही मजपासूनि म्हणोनी । मीच एक सर्वांचा ईश्वर यावरूनी । समज अर्जुना! हा भाव पूर्वानुसंधानें. ॥ १२७ ॥ एवं या श्लोकाच्या पूर्वार्धीं । बोलिलास भजनफळसमृद्धी । साधारण कर्मकर्ता

१. दशीच्या.

याचि उत्तरार्धीं । फळप्राप्ति आपणाचपासुनी बोलिला. ॥ १२८ ॥ आतां सिंहावलोकनरीती । आणखीं स्वभजनफल श्रीपती । या श्लोकीं अर्जुनाप्रती । बोलतसे जे पूर्वश्लोकीं बोलतां राहिलें. ॥ १२९ ॥

**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

हिंसा म्हणिजे परपीडा । ते माझ्या भक्तापासुनी न घडे अगा! सुघडा! । ज्यांस सर्वभूतीं दिसतसे मी उघडा । ते पीडा न करिती कोणासही. ॥१३०॥ ऐसी सद्वृत्ती ते अहिंसा । माझ्या भक्ताच्या मनीं तिचा ठसा । जे मजपासुनीच त्याच्या मानसा । अहिसा बाणतसे. ॥ १३१ ॥ काया वाचा मनसा । न घडे कधीं जयास हिसा । हृदयांत त्याच्या दृढ ठसा । ऐसा मजच्चिपासूनी. ॥१३२॥ सर्वभूतीं मज अनता । जे पाहती तत्त्वता । ज्यांस स्वदेहपरदेहसाम्यसमता । कां परपीडा ते करतील? ॥ १३३ ॥ एव च ऐसी समता । मजच्चिपासून गा पांडुसुता! । जे भजोनि मज अनंता । सर्वदा तुष्ट. ॥ १३४ ॥ अंतरीं असंतुष्टि । ते विषयभोगे अपेक्षिती पुष्टी । ते साधाया करिती कष्टी । इतर जीवातें. ॥ १३५ ॥ तरीच माझ्या भक्तांस सर्व सृष्टी । मद्रूप दिसतां अत्यंत तुष्टी । ते कां करितील कष्टी । कोणासही? ॥ १३६ ॥ ज्यांस यथायोग्य सर्वभूतीं । मद्भावें पूजा घडती । कायिक वाचिक मानसिक तपें जोडती । सहजें तयांतचि. ॥ १३७ ॥ हें त्रिविध तप । सप्तदशीं वर्णिलें अध्यात्मदीप । तें तपही म्हणे निजानंदस्वरूप । मजपासूनि होतसे म्हणोनी. ॥ १३८ ॥ ऐसें तप मजपासुनि सापडे । त्याची बुद्धि सर्वदा परहिताकडे । म्हणूनि त्यांस भूतकृपेकरूनि घडे । दान तेंही मजपासुनी. ॥ १३९ ॥ कीं मी त्यांच्या बुद्धीतें । सन्मार्गी प्रेरूनी देतों सर्वसिद्धीतें । यापरि मजपासूनि समृद्धींतें । पावती मद्भक्त. ॥ १४० ॥ एवं च दानही तयां घडे । कीं बुद्धि लागली भूतदयेकडे । ज्यांच्या ब्रह्मविद्यादानें उघडे । कवाड मोक्षप्राप्तीचें. ॥ १४१ ॥ ब्रह्मविद्येनें करिती धन्य । त्यांस तुच्छ पदार्थ अन्य । देती धन आणि धान्य । नवल काय तयाचें? ॥ १४२ ॥ ऐसे अहिसादि गुण । त्यांचें यश जगीं होय पूर्ण । तेंही म्हणे कमलेक्षण । मजच्चिपासुनी म्हणोनी. ॥ १४३ ॥ एवं स्वभक्तास अहिसादि गुण । आपण देतों आणि आपण । त्यांच्या कीर्तीनें ही परिपूर्ण । करीतसें सर्व लोक. ॥ १४४ ॥ स्वभक्तकीर्तिघोषें । त्यांच्या अनुभवउद्गाररसपीयूषें । कर्ण जनांचे अशेषें । आपण तृप्त करितो हा अर्थ.

॥ १४५ ॥ जैसा वृक्ष पुष्पित। त्याचा सुवास असे फिरत। सहज वायुगुणें असे भरत। घ्राणीं जनांच्या. ॥ १४६ ॥ तैसा सहज आपला गुण। की स्वभक्तकीर्तीने विश्व संपूर्ण। सुखी करीतसें ऐसे विवरण। येथें श्रीकृष्ण सूचवी. ॥ १४७ ॥ कीं भूलोकीं त्यांची प्रसिद्धी। तैसीच ब्रह्मलोकी ही यशसमृद्धी। कीं सनकादिभक्ताचि भक्ति सुखसिद्धी। कौतुके ब्रह्मलोकीही वर्णिती. ॥ १४८ ॥ पाताळी सर्वज्ञ शेष। करी धन्य ते म्हणूनी कीर्तिघोष। एवं पाताळापासूनि सत्यलोकपर्यंत अशेष। भक्त वर्णिती भक्ति त्यांची. ॥ १४९ ॥ ऐसे त्याचे यश। मजचिपासूनी म्हणे हृषीकेश। ऐसा या 'यश'शब्दे निर्देश। सिंहावलोकनें पूर्वोक्त भक्ताचा. ॥ १५० ॥ सिंहे पुढें पुढें जावें। आणि परतोनि मागें पाहावे। या रीती देवाविदेवे। 'यश'शब्दपर्यंत वर्णिले भक्त. ॥ १५१ ॥ आता सिंहावलोकनरीती। 'अयश'शब्देकरूनि मागुती। अभक्त साधारण जनाची फलश्रुती। बोलतसे. ॥ १५२ ॥ कीं अयश म्हणजे अपकीर्ती। पापे पापकर्मी प्रवृत्ती। ते जनमुखीं सरस्वती। बोले तेंही कुत्सित फळ मजचिपासूनी. ॥ १५३ ॥ हे भूताचे भाव। वेगळे वेगळे ते म्हणे माधव। मजचिपासूनि की सहज स्वभाव। ईश्वरत्वाचा अनादी. ॥ १५४ ॥ ऐसा सर्वा ईश्वराचा ईश्वर। मीच भक्तवत्सल रमावर। म्हणूनि मजपासूनि हे सर्व प्रकार। उत्पन्न होती भूतांचे. ॥ १५५ ॥ या पाच श्लोकवरी। आपले सर्वेश्वरत्व हरी। बोलिला अत एव म्हणतो याउपरी। कीं मीच सेव्य सर्वा सिद्धांचा. ॥ १५६ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

अगा! सृष्टीच्या आदिकाळीं। ब्रह्मा उपजला नाभिकमळीं। त्याच्या मनीं सृष्टीची उकळी। म्हणोनि प्रथम पुत्र मानस उपजले. ॥ १५७ ॥ त्यात सातजण महाऋषी जाले। चौघे सनकादिक उपजले। चतुर्दश मनु उद्भवले। सृष्टि करावया. ॥ १५८ ॥ देव आणि ब्राह्मणादि वर्ण। आणि नाना जातीनीं हें विश्व पूर्ण। त्या सप्तऋषि मनूचे संतान संपूर्ण। हे अगा! अर्जुना! या लोकी. ॥ १५९ ॥ हे सर्वेही माझे भक्त। माझेचि ठायीं मनोभाव ज्यांचा अनुरक्त। त्यांत सनकादि चौघे अतिविरक्त। सृष्टि करणें न माने तयांतें. ॥ १६० ॥ तथापि त्यांच्या बधूंची संतती। ते त्यांचीही होय की म्हणून श्रीपती। या सर्वांची हे संतति म्हणे अर्जुनाप्रती। या भावें. ॥ १६१ ॥ तत्त्वता

पाहतां विचार । सनकादि चौघे विरक्त फार । ज्यांस अनेक जन्म संस्कार । स्त्रीसंतानादि कांहीं नलगे म्हणोनी. ॥ १६२ ॥ पूर्वकल्पीं अनेक जन्म । न जिंकितां इंद्रियग्राम । काम अनावर म्हणूनी श्रम । पावले अपार. ॥ १६३ ॥ तारुण्यमदाचें बळ । काम करी व्याकुळ । म्हणूनि या जन्मी ते समानशील । बालरूपेंचि राहिले. ॥ १६४ ॥ तारुण्य देहीं येवों न देती । देहीं कामचि न प्रवेशे ये रीति । बाळचि होउनि ते सुमती । राहिले भयें कामाच्या. ॥ १६५ ॥ रोग होऊं द्यावा । मग तो औषधें हरावा । त्याहूनि उपाय बरवा । कीं रोगचि निघों न देईजे स्वदेहीं. ॥ १६६ ॥ ऐसा काम देहीं भरावा । मग तो विवेकें परिहरावा । याहूनि उपाय हा बरवा । कीं कामचि निघो नेदी स्वदेहीं. ॥ १६७ ॥ ऐसे सनकादि चौघे भक्त । सृष्टिकर्तृत्व मानूनि अयुक्त । सप्त-ऋषि मनु यासारिखे आसक्त । नाहीं जाले संतान उत्पन्न करावया. ॥ १६८ ॥ ऐसें असोनि मनु ऋषि सप्त आसक्त । आणि हे समान लेखिले भक्त । की प्रारब्ध दुर्निवार म्हणूनि युक्त । जाले सृष्टिकर्मात ॥ १६९ ॥ ज्ञान भक्ति वैराग्य । या सर्वांसही हे सर्व सभाग्य । परतु प्रारब्धे केले भोग्य । संतानामुळें स्त्रीसंगादिक. ॥ १७० ॥ एव च हे सकळ । माझे भक्त केवळ । म्हणूनि म्हणे मेघनीळ । दृष्टि त्यांचिया भावाकडे देउनी. ॥ १७१ ॥ एव हे सृष्टिकर्ते याचें मूळ । ब्रह्मा तोही आपला बाळ । आणि हे सर्व ही सुमंगळ । आपलेच भक्त. ॥ १७२ ॥ ऐसें बोलता म्हणे श्रीपती । कीं जगीं हे यांचीच संतती । संतति द्विप्रकार श्रुति बोलती । त्यातही एक संतति प्रसिद्ध. ॥ १७३ ॥ दुसरी शिष्यप्रशिष्यद्वारा । क्रमेंचि आली ब्रह्मविद्या अमृतधारा । ब्रह्मयापासूनि परपरा । चालली ते या भगवंताचपासूनी. ॥ १७४ ॥ कीं ब्रह्मयाचे पुत्र मानस । संतति त्यांची हे प्रजा म्हणतसे जगन्निवास । उपदेश प्रथम ज्या ब्रह्मयास । तो यांचा गुरु कृतार्थ आपणाचपासुनि. ॥ १७५ ॥ त्याणें स्वपुत्रास केला उपदेश । त्यांच्या मुखें त्यांच्या शिष्यांच्या हृदयांत प्रवेश । ब्रह्मा करी ऐसी परंपरा हृषीकेश । भूमंडळीं संत हे संतति त्यांची ऐसीही सूचवी. ॥ १७६ ॥ एवं च ब्रह्मा स्वपुत्र । आणि शिष्यही कृपापात्र । त्याचे मानसपुत्र पवित्र । शिष्य त्याचे. ॥ १७७ ॥ त्यापासुनी ब्रह्मविद्या । जगीं प्रगटली आद्या । जीं करितां नासे अविद्या । संतमुखें या लोकीं. ॥ १७८ ॥ एवं च विश्वकर्ता आपण । आणि जगद्गुरुही स्वयें मी नारायण । जगीं द्विविध संतति जाली निर्माण । परंपरेनें आपणाचपासूनी. ॥ १७९ ॥ पाहें जगीं प्रजा म्हणजे संतती । या स्वभक्तांची म्हणे जगत्पती । ते विविध

म्हणूनि संतति ये रीति। येथें अर्थ. ॥ १८० ॥ एवं पूर्वश्लोकपर्यंत। सर्वेश्वरत्व आपले भगवंत। बोलता जे जीवन्मुक्त संत। त्यास उपास्य मीच हें बोलिला या श्लोकीं. ॥ १८१ ॥ ते जे हे वेद प्रसिद्ध सिद्ध। ते स्वोपासकचि ऐसें करितां सिद्ध। विभूति जे ईश्वरत्वीं समृद्ध। ही रूपे ते विभूतीचीं. ॥ १८२ ॥ आतां विश्व सर्व स्वये हरी। प्रत्यक्षही योग ऐश्वर देह त्याचाच परी। विशेष ज्ञान सामर्थ्य जेथवरी। तेथवरी त्याची विभूति हा विशेष. ॥ १८३ ॥ ऐसियास विशेष आपण। परि हें अद्वैत ज्ञान असाधारण। कीं हें निर्गुण ज्ञानाहुनी सगुण। धर्म्य ज्ञान योगा ऐश्वराचें श्रेष्ठ राजविद्योक्त. ॥ १८४ ॥ त्या योग ऐश्वरामध्यें ही विभूती। आपल्या त्या विशेषें वर्तती। त्या विभूतीचें आणि योगाचें ज्ञान अती। श्रेष्ठ जें ज्ञान बोलिलें सगुण भक्तीचें. ॥ १८५ ॥ कीं अष्टादशीं **'ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा'** या श्लोकेंकरूनी। **'समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां'** म्हणोनी। ब्रह्मभूतही भक्ति सर्वभूतीं पावतो म्हणेल यावरूनी। ब्रह्मभूतासही लभ्य भक्तीतें हें ज्ञान विभूतियोगाचें. ॥ १८६ ॥ परि हें ज्ञान दुर्लभ। या ज्ञाने अद्वयज्ञान बिबणें सुलभ। म्हणोनि बोलों पाहतो श्रीवल्लभ। फळ विभूतिसहित या योगज्ञानाचें या श्लोकीं. ॥ १८७ ॥

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः।**
**सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

अर्जुना! पूर्वश्लोकोक्त। जे बोलिलो भक्त। जे ज्ञानी आणि अनुरक्त। चरणीं आपुल्या. ॥ १८८ ॥ हे सकळही विभूती। आणि जे पूर्वाध्यायांत योगस्थिती। **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनि तुजप्रती। मी बोलिलों. ॥ १८९ ॥ तो योग आणि हे विभूती। सगुण सर्वेश्वराच्या मूर्ति। तें सगुणब्रह्म भलत्यास म्हणती। उपासक आपल्या उपास्यांते. ॥ १९० ॥ आणि योग ऐसा कीं सर्व ईश्वर। हे युक्तीनेंही बोलो जाणती चतुर। परि तत्त्वतां अनुभवचमत्कार। न जाणती. ॥ १९१ ॥ मज वेगळें देवतांतर। त्यासी म्हणती सर्वेश्वर। त्याच्याच विभूति आणि त्याचाच योग म्हणूनी सादर। वर्णिती. ॥ १९२ ॥ त्यांस जाले जड चैतन्य ज्ञान। तऱ्ही न पावती समाधान। की माझें न करितां अनन्यभजन। मोक्ष नाहीं. ॥ १९३ ॥ की पंगु काशीच्या मार्गी पडे। तरी काशीदर्शन त्यासी न घडे। जों माझें पदद्वंद भक्तीने न जोडे। न साधे मोक्ष त्या मोक्षमार्गीही. ॥ १९४ ॥ म्हणूनी पार्था! पूर्वश्लोकोक्त। विभूति

बोलिलों समर्थ भक्त । त्या माझ्याच विभूति म्हणूनी जाणे सयुक्त । जो कोण्ही. ॥ १९५ ॥ आणि पूर्वाध्यायांत । **'मत्स्थानि सर्वभूतानि'** इत्यादि मी भगवंत । **'पश्य मे योगमैश्वरं'** येथपर्यंत । जो योग बोलिलो. ॥ १९६ ॥ तो योग आणि हे विभूती । माझीच म्हणूनी जो सुमती । जाणेल तो अत्यंत प्रीती । धरील माझीच निश्चित. ॥ १९७ ॥ की ज्याच्या ऐशा विभूति । आणि ज्याची ऐशी ऐश्वर्यस्थिती । तो एकचि उपास्य श्रीपती । सभाग्याचा म्हणूनि जो जाणे. ॥ १९८ ॥ त्याची आत्मज्ञानाची स्थिती । अनायासें बाणे अचळ योगरीती । जे स्थिति बाणावया श्रमती । भक्ति टाकून निर्गुणोपासक. ॥ १९९ ॥ योग आणि विभूती । दोहींचा धर्ना मीच श्रीपती । म्हणूनि जे जाणती । ते उत्तमोत्तम मद्भक्त. ॥ २०० ॥ येथें **'एतां विभूतिं योगं च मम'** । म्हणूनि या 'मम'शब्दें सर्वोत्तम । हा अर्थ सूचवी कीं मीच सगुणब्रह्म । या विभूति हा योग आणिकाचा म्हणती तें न घडे ॥ २०१ ॥ **'एतां विभूतिं योगं च यो वेत्ति । सोऽविकंपेन योगेन युज्यते'** म्हणे श्रीपति । इतुकेंचि बोलता तरी होती । अर्थसिद्धि न म्हणताही 'मम'शब्द. ॥ २०२ ॥ आतां शास्त्रदृष्टीच करूनी । विभूति माझ्याच म्हणूनी । जाणों शकती परंतु भक्तासही आत्मज्ञानावाचुनी । योग माझा कळेना. ॥ २०३ ॥ या भावें म्हणे हरी । की योग तत्त्वता जाणे जरी । अविकंपयोगें तरी । तो स्वचित्ते स्वस्वरूपीं योजतो. ॥ २०४ ॥ स्वस्वरूपीं चित्त योजिती । ऐसे अभक्तही दिसती । परि चित्तवृत्ति चंचलगती । बाणों नेदी योगातें. ॥ २०५ ॥ व्यतिरेकअन्वयबोध । जरी जाला करितां तत्त्वशोध । तरी चित्स्वरूपीं चित्तनिरोध । अचळ होतां जीवन्मुक्ती. ॥ २०६ ॥ चित्त जाणे चित्स्वरूप । परि योजितां होतसे सकंप । तो अनायासें योग अविकंप । बाणे या विभूति आणि हा योग जाणतां. ॥ २०७ ॥ परि तत्त्वज्ञानें तत्त्वतां । हा योग माझा कळे गा! पांडुसुता! । तो जरी अपक्वज्ञानी जाणता । व्यतिरेकअन्वयबोधा. ॥ २०८ ॥ तरी जाणोनि माझिया योगातें । जो पूर्वाध्यायांत बोलिलों तूतें । पावोनि अविकंपयोगातें । पक्व ज्ञानी जीवन्मुक्त तो होतसे. ॥ २०९ ॥ माझ्या भक्तीवांचूनी । योग सकंप होतो म्हणूनी । माझ्या भक्तीकरूनी । अविकपयोग त्याचा होतसे. ॥ २१० ॥ तो भक्तियोग सांपडे तरी । कीं माझ्याच विभूति पूर्वोक्त म्हणूनी जाणे जरी । कीं विभूति माझ्याच म्हणोनि जाणतां अंतरीं । बोध होय माझ्या सर्वेश्वरत्वाचा. ॥ २११ ॥ जें जें उत्तम आणि थोरपण । तें ते ईश्वरसामर्थ्यलक्षण । त्या त्यास

म्हणती विचक्षण । विभूति ईश्वराच्या म्हणोनी. ॥ २१२ ॥ एवं ब्रह्मादि देवगण । आणि ऋषि मानव समर्थ निपुण । ज्याच्या विभूति तो जगत्कारण । नारायण पिता विधात्याचा. ॥ २१३ ॥ तो पिता गुरु ब्रह्मयाचा । हे ब्रह्मादि कोणी न जाणती प्रादुर्भाव त्याचा । सर्वांहूनी अधिक उपाधि जयाचा । शुद्ध सत्त्व मायारूपें प्रकटे तो. ॥ २१४ ॥ सृष्टिप्रवाह आणि विद्याप्रवाह । दोहींचा उगम आणि त्यापासूनी निर्वाह । तो हा श्रीकृष्ण एकचि निःसंदेह । ब्रह्मादि संत या विभूति तयाच्या. ॥ २१५ ॥ ऐशा पूर्वोक्तप्रकारे ज्या सुमती । जाणे योग आणि विभूति । त्यास कळतें कीं सर्वेश्वर जगत्पती । एकचि श्रीकृष्ण. ॥ २१६ ॥ ऐशा पूर्वोक्ता विभूती । जाणतां बाणे माझी सर्वोत्तमत्वस्थिती । तो जिज्ञासूही अनन्या अव्यभिचारिणी भक्ति सुमती । करूं लागे. ॥ २१७ ॥ त्यास मी गुरुरूपेंकरूनी । तत्त्व सांगतों प्रगट होऊनी । मग तो तत्त्व जाणतो त्यावरूनी । पूर्वाध्यायांत बोलिलो तो योग. ॥ २१८ ॥ तो योग ऐश्वर ज्यास कळला । तो अविकंपयोग मजमाजीं योजिला । कीं भक्तांचा योगक्षेम वाहणें मला । लागतसे हें पूर्वाध्यायांत बोलिलों. ॥ २१९ ॥ भक्तांस आत्मज्ञान देतों । हा योग त्यांचा वाहतों । आणि योग ऐश्वर तत्त्वता दावितों । त्याणें अविकपयोग बाणतो वाहतों हे क्षेम. ॥ २२० ॥ इत्यादि भावे देव म्हणे । कीं विभूति जो जाणे । त्यासि अविकपयोग बाणे । निःसंशय. ॥ २२१ ॥ कीं चित्त चित्स्वरूपीं न पावे कप । तो योग जाणावा अविकंप । तेव्हा सकळ दुष्प्रवाहाचा संप । जाला त्याचा. ॥ २२२ ॥ अष्टाग योग योगी । करिती कष्टती ज्यालागीं । ते योगस्थिति बाणते उगी । अनायासें तयासी. ॥ २२३ ॥ या प्रकारे हरी । अर्जुनातें बोलिला परी । संशय त्याच्या अतरीं । कांहीं देखिला. ॥ २२४ ॥ कीं हा उपदेशकाळ अर्जुनाचा । महिमा ऐकिला विभूतियोगज्ञानाचा । परंतु अद्यापि अविकपयोगाचा । अनुभव नसे. ॥ २२५ ॥ जो हे विभूतीचा हा योग जाणे । त्यासी अविकंपयोग बाणे । म्हणूनि जें श्रीकृष्ण म्हणे । येथें भरंवसा पूर्ण अर्जुनास वाटेना. ॥ २२६ ॥ कीं विभूतीचा आणि योगाचा । बहुवार वर्णिते श्रीकृष्णजीची वाचा । परि अविकंपयोग बाणेल हा शब्द साचा । न वाटला अर्जुनातें. ॥ २२७ ॥ कीं क्षुधितास घडे भोजन । तेव्हां अन्नदाता याचें वंचन । खरे वाटेल तोंवरी मन । असे संदेहें माखलें. ॥ २२८ ॥ म्हणूनि अर्जुनास या शब्दाचा निश्चय । बाणे ऐसें बोलतो अव्यय । कीं येथें नाही संशय । अर्जुना कदापी. ॥ २२९ ॥ एवं च

महिमा मात्र । नाहीं बोलिला कमलनेत्र । **'नात्र संशयः'** म्हणूनि देवकीपुत्र । तत्त्व हें ऐसें बोलिला. ॥ २३० ॥ कीं ब्रह्मा आणि त्याचे मानससुत । आणि परपरेनें जे संतानरूप संत । या विभूति ज्याच्या तो हा भगवंत । ऐसें जाणतां बाणे सर्वेश्वरत्व कृष्णाचें. ॥ २३१ ॥ की अज अनादि एक सर्वेश्वर । ज्यापासूनि हा सर्व पसर । तो हा श्रीकृष्ण ज्याचे अवतार । मुक्ति या इतुकिया दृढ निश्चयें. ॥ २३२ ॥ **'यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम्'** या श्लोकीं । याच अध्यायात बोलिला कीं । अज अनादि-पणे माते जाणे या लोकी । तो सुटे सर्वा पापा संचिता क्रियमाणापासूनी. ॥ २३३ ॥ ज्यास वाटे हा सर्वेश्वर । तोचि मोक्षमार्गी चतुर । होतां याच्या भजनीं तत्पर । हा गुरुरूपे ज्ञान उपदेशितो. ॥ २३४ ॥ मग तो भगवद्रूप चराचर । जैसीं रामकृष्णरूपे तैसीं पाहे सादर । तेव्हा कळतां योग ऐश्वर । परमभागवत तो होय. ॥ २३५ ॥ यापरि विभूति आणि योग जाणे । त्यास भगवत्प्रसादे अविकंपयोग बाणे । ऐसी ही गोष्टी सत्य म्हणूनि कृष्ण म्हणे । कीं संशय येथें असेना. ॥ २३६ ॥ या भावें म्हणे अव्यय । कीं येथें नसे कांहीं संशय । परंतु हा भाव धनंजय । समजला नाहीं. ॥ २३७ ॥ कीं ब्रह्मा आणि त्याचे मानससुत । सज्जन आणि गुणवंत भाग्यवंत संत । या विभूति ज्याच्या तो भगवंत । तेव्हां सकळ सृष्टि याजपासूनी. ॥ २३८ ॥ ऐसें विभूतिज्ञानें कळे । तेव्हा याच्याच सेवेसि मन वळे । हा भाव विशद नाकळे । अर्जुनातें. ॥ २३९ ॥ म्हणूनि उत्तमश्लोक । त्याच्या भावाकडे करूनि अवलोक । हा भाव स्पष्ट कळावा म्हणूनि हा श्लोक । बोलतसे या उपरी. ॥ २४० ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

अगा! मीच सर्वांचा प्रभव । प्रभव म्हणिजे प्रकर्षे संभव । कीं अलंकाराचा उद्भव । सुवर्णचि कीं. ॥ २४१ ॥ एवं जगाचीं कारणें दोनी । एक उपादान एक निमित्त म्हणोनी । त्यात अलकाराचें उपादान सुवर्ण ये रीती करूनी । मी जगाचें उपादान 'प्रभव'शब्दें बोलिला. ॥ २४२ ॥ आता सोनार निमित्तकारण । तैसा जगाचा निमित्तकारणही आपण । म्हणूनि या श्लोकीं द्वितीय चरण । या अर्थें बोलतसे. ॥ २४३ ॥ **'मत्तः सर्वं प्रवर्तते'** म्हणे हरी । कीं मजपासूनि सर्वेही **'प्रवर्तते'** हे गोष्टी दुसरी । प्रथम मी सर्वांचा

प्रभव म्हणोनी त्यावरी । पुनरुक्ति परिहरूनी सर्वेही मजपासूनी म्हणतसे. ॥ २४४ ॥ की निर्गुण स्वरूपें करूनी । सुवर्णालंकारन्यायें उपादान होउनी । तोचि मायाशबलित साक्षित्वे सर्व कल्पूनी । निमित्तकारण होतसे. ॥ २४५ ॥ आपण निर्गुण स्वरूप । या अनुभवसत्त्वे पद्मनाभरूप । होऊनि आपला सृष्टिकारकत्वप्रताप । चतुर्मुखरूपे नाभिकमळी निर्मितो. ॥ २४६ ॥ तो माझा मानसपुत्र । त्याचे मानस पुत्र महर्षि सनकादि मनु पवित्र । ज्याचें संतान हें चित्रविचित्र । जग समस्त ही. ॥ २४७ ॥ एव मीच विश्व सारे । आणि मजचि पासूनि याप्रकारे । ऐसें खरे मानूनि आदरे । भक्तियुक्त बुध मज भजती. ॥ २४८ ॥ ऐसे मानूनि भजती बुध । म्हणता ऐसें न मानूनि न भजती अबुध । ऐसें सूचवी की टाकुनी दुध । शुभ्रत्वसाम्यें पिती तक्रा निःसारातें. ॥ २४९ ॥ मी ईश्वरचि स्वयमेव । जालों असें सर्व देव । वेद धरूनी हा भाव । भलता देव मीच म्हणूनि श्रेष्ठत्वें वर्णिती. ॥ २५० ॥ त्यावरूनि जो ज्याचा उपास्य देव । तो त्यातेंचि मानितो जगाचा प्रभव । आणि त्याचपासूनि मानितो सभव । सर्वांचा. ॥ २५१ ॥ ते अबुध जन । न करिती माझें भजन । मी सर्वाचा प्रभव आणि सर्व मजपासून । ऐसें न मानिती. ॥ २५२ ॥ ऐसे ते अबुध । म्हणूनि तद्विलक्षण बुध । त्यांस बहुत जन्म होतसे हा बोध । की मीच प्रभव आणि सर्व मज एकाच-पासुनी. ॥ २५३ ॥ **'न मे विदुः सुरगणाः प्रभवं'** या श्लोकेकरूनी । **'अहमादिर्हि देवानां'** म्हणोनी । पूर्वी या प्रसंगीच ऐसें बोलोनी । या श्लोकीं यास्तवच बुध मज भजती म्हणतसे. ॥ २५४ ॥ एवं ऐसें जाणोनि भजती ते बुध । तेव्हा ऐसें नेणोनि न भजती ते अबुध । कीं बुध होउनीही न करिती हा शोध । अबुधचि ते लेखावे. ॥ २५५ ॥ मीच सर्वाचा प्रभव । मजपासूनि सर्वाचा उद्भव । तेव्हा मीच देवाधिदेव । ऐसें मानूनि बुध तेचि भजती अगा! माते. ॥ २५६ ॥ म्हणूनि ते भक्तिभावें समन्वित । द्विविध जगत्कारण मीच भगवत । ऐसे मानूनि निश्चित । भजती मातें. ॥ २५७ ॥ एवं ब्रह्मा आणि त्याचे मानस सुत । इत्यादि माझ्याच विभूति निश्चित । ऐसें जाणती जगत्कारण भगवंत । मीच मानूनि मज भजती. ॥ २५८ ॥ हें विभूतिज्ञानाचे फळ । श्रेष्ठत्वें माझेचि भजन आवडे निर्मळ । या भजनें कळे माझा योग अकळ । जो पूर्वाध्यायात बोलिलों. ॥ २५९ ॥ **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनी । पूर्वाध्यायात बोलिलों तो ज्ञानावांचुनी । न कळे तेंही ज्ञान माझ्या प्रसादेकरूनी । ते पावती. ॥ २६० ॥ हें यापुढें तृतीय श्लोकीं

हरी । बोलेल दों श्लोकीं तोंवरी । हे आपणास भजती कोणेपरी । तें आधीं बोलतसे. ॥ २६१ ॥ यांत पहिल्या श्लोकीं भजनप्रकार । दुसरियांत आपला कृपा करायाचा विचार । बोलेल आतां भजनरीति सर्वेश्वर । बोलतसे ऐसें या श्लोकीं. ॥ २६२ ॥

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ।**
**कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥**

माझेचि ठायीं त्यांचें चित्त । प्राण त्यांचे मद्गत । मातेंचि बोधिती सतत । परस्परे एक एकातें. ॥ २६३ ॥ चैतन्य सर्वत्र निःसंदेह । तथापि चित्ते सचेतन देह । माझे ठायीं त्यांचा ऐसा स्नेह । कीं जिंती भजनसुखें ते माझ्या. ॥ २६४ ॥ म्हणतां ते मच्चित्त । अर्थ ऐसा दाखवी भगवंत । कीं सचेतन देह जीवंत । ते भजनें माझियाच मानिती. ॥ २६५ ॥ जेव्हां हरपे प्रिय पदार्थ । जिणें तेव्हां वाटे व्यर्थ । माझ्या भजनावांचूनि कृतार्थ । न मानिती जीवन देहाचें. ॥ २६६ ॥ चैतन्य असोनि सर्वगत । चित्त नसे ज्या देहांत । त्यास म्हणती शैव[1] मृत । लोक सारे. ॥ २६७ ॥ ऐशा माझ्या भजनाविण । कदाचित् लोटे जरी क्षण । तेव्हां मानिती अवलक्षण । शवप्राय शरीर आपलें. ॥ २६८ ॥ ज्यासि ऐसी माझी आवडी । कां व्यर्थ जाईल त्याची घैंडी[2]? । या भावार्थाचें कवाड उघडी । मच्चित्त ऐसें बोलतां. ॥ २६९ ॥ आतां देहीं असे प्राण । तोंवरी न घडे शवपण । भजन न घडे एक क्षण । तरी प्राण तो असे शरीरांत. ॥ २७० ॥ म्हणूनि म्हणावें तेव्हाही ते जिती । तरी त्यांचे प्राणही मजमार्जी असती । कीं माझ्या आवडींचि निघती रिघती । प्राण त्याचे. ॥ २७१ ॥ माझी पडे विस्मृती । प्राणगति ज्यांच्या वाहती । तेव्हां म्हणावें कीं नसती । मजमध्यें ते प्राण. ॥ २७२ ॥ जे अखंड मातें भजती । त्यांचे प्राण मजमध्येंचि वाहाती । ते मद्गत प्राण ये रीती । अगा अर्जुना! हा अर्थ. ॥ २७३ ॥ विस्मृती जाली देशधडी । भजनावांचूनि लोटेना घडी[3] । ऐसी निरंतर माझी आवडी । अगा अर्जुना! तयाते. ॥ २७४ ॥ भजनावांचूनि लोटे क्षण । तेव्हां निघों पाहे त्यांचा प्राण । जिणे माझ्या भजनाविण । व्यर्थ वाटे ऐसा हा भाव. ॥ २७५ ॥ प्रथमचरणीं ऐसी हरी । बोले त्यांच्या भजन-रीतीची वैखरी । भजन ऐसें वर्णिलें परी । हे सत्संगावांचूनि असाध्य. ॥ २७६ ॥ म्हणूनि त्यांची सत्संगती । दुसरिया चरणापासुनी संतांचा पती ।

---

१. वांचतात. २. प्रेत. ३. घटिका.

वर्णितो कीं अगा! ते बोधिती। परस्पर एक एकातें. ॥ २७७ ॥ एकास पडतां विस्मृती। एक त्यास देती स्मृती। भजनमाहात्म्य बोधिती। परस्परें ऐसें. ॥ २७८ ॥ ते मच्चित्त मद्गतप्राण। परस्परे बोधिती सुजाण। हें सर्व आवडीचेंच लक्षण। परी भजनरीती अद्यापि नाहीं वर्णिल्या. ॥ २७९ ॥ तें उत्तरार्धें बोले श्रीपती। कीं ते नित्य मातें कथिती। म्हणिजे कथा माझ्याच सांगती। बोधिती परस्परें. ॥ २८० ॥ नित्य मातें कथिती। आणि परस्परे बोधिती। ऐसें म्हणतां सूचवी श्रीपती। श्रवण कीर्त्तन दोनीही. ॥ २८१ ॥ एक कथा करिती। एक त्या श्रवणद्वारा मनीं धरिती। त्या श्रवणें कीर्तनें संतोष पावती। आणि रमती तदनुरूप. ॥ २८२ ॥ रमणें म्हणिजे क्रीडणें। शरीर माझ्या आकारें करणें। माझे अभिनय दाखवणें। हेंच रमणें तयांचें. ॥ २८३ ॥ गाती नाचती उडती। विविध माझे अभिनय दाविती। ज्या ज्या प्रसंगीं मी जे जे रीती। रमलों दाविती ते भाव. ॥ २८४ ॥ रामें वधिला रावण। म्हणतां मांडिती तैसें ठाण। कीं ते समयीं मनाचें उठाण। तैसेंचि त्यांचे. ॥ २८५ ॥ गातां गोपाळचरित्र। तदाकार मन होय पवित्र। तें ठाणें चित्रविचित्र। शरीरेंही दाविती. ॥ २८६ ॥ मांडिती त्रिभंगी ठाण। वेणु अधरीं दाविती सुजाण। कीं तेव्हां त्याच्या मनाचें उठाण। अंतरीं तैसेंचि. ॥ २८७ ॥ रासक्रीडा निरूपिती। कोणी कृष्ण कोणी गोपी होती। हात गळां घालुनी नाचती। मडलाकार परस्परें. ॥ २८८ ॥ प्रेमें होती असावध। वर्णिती क्रीडा विविध। कुवलयापीड[1] हस्तीचा वध। वीररसें दाविती. ॥ २८९ ॥ मांजीं[2] वेष्टुनि अंबर। माथां सावरिती केशभार। उचलूनि सव्य सुदर कर। दांपूनि[3] बोलती महामात्रातें[4]. ॥ २९० ॥ कीं अरे! अरे! महामात्रा! लौकरी। वाट सोडीं जाणें राजमंदिरीं। हस्ती न काढिसी वाटेंतूनि जरी। तुज हस्तीसहित यमसदनातें पाठवूं. ॥ २९१ ॥ हस्ती येतां अंगावरी। भुजदंडें हाणूनी चहू पायांभीतरी। निघोनी मुरगळुनी सोंड करीं। पुच्छाकडे निघालो ऐसें मानिती. ॥ २९२ ॥ पुच्छ धरूनी वोढिला गज। ऐसें मनीं आठवे सहज। तदाकारें शरीर निज। चेष्टविती. ॥ २९३ ॥ पाठीकडे एकास धरिती। पुच्छ ओढिजे ऐसें ओढिती। मनी ठसावलीं कर्में दीसती। वधप्रसंगीं कुवलयापीडाचिया. ॥ २९४ ॥ पाडोनी तोंडघसीं द्विरद[5]।

---

१. कंसाचा या नावाचा गज, जो कृष्णानें मारिला. २. कंबरेस. ३. दटावून. ४. महातास. ५. हत्ती.

उपडोनि दाविती दोन्ही रँद । त्याचें रक्त आणि त्याचा मद । शरीरीं सिंपणें सिपूनी दाविती. ॥ २९५ ॥ रंगभूमींत लोटती । नवरस रीति तेव्हां भाविती । प्रेमरसीं निमग्न यादव जाले ऐसें मानिती । स्वयें बुडोनी प्रेमांत. ॥ २९६ ॥ कथा माझ्या नित्य करिती । संतोषती आणि रमती । ऐसें बोलतां श्रीपती । इत्यादि रमणें त्यांचें सूचवितो. ॥ २९७ ॥ हे श्रीगीता सूत्रप्राय । श्रीभागवत याच गीतेचा विशद अभिप्राय । तेथें बहुतां स्थळीं हें प्रमेय । की भक्तभाव दाविती हरीचे. ॥ २९८ ॥ ॥ एकादशस्कंधीं श्रोता उद्धव । त्याप्रति पूजाक्रम सांगोनि शेवटीं माधव । म्हणे मज गावें वर्णावें आणि माझे भाव । दाखवावे श्रोतयांतें. ॥ २९९ ॥

**'उपगायन्गृणन्नृत्यन्कर्माण्यभिनयन्मम ।**
**मत्कथाः श्रावयञ्शृण्वन्मौहूर्तक्षणिको भवेत् ॥'**

उपगायन् म्हणिजे गात । गृणन् म्हणिजे अर्थ निरूपित । नृत्यन् म्हणिजे नाचत । **'कर्माण्यभिनयन्मम'** अर्थ याचा ये रीती. ॥ ३०० ॥ कीं अभिनय माझ्या कर्माचा । दाखवावा ऐसी भगवंताची वाचा । अर्थ विशद याचा । ये रीती. ॥ ३०१ ॥ कीं भगवतें जें जैसें चरित्र केलें । तैसें स्वशरीरें ठाण मांडूनि दाखविलें । त्यास संस्कृत भाषेंत बोलिले । अभिनय म्हणोनी. ॥ ३०२ ॥ एव गात निरूपित नाचत । अभिनय माझ्या कर्माचे दावित । माझ्या कथा ऐकवीत । स्वयेही आइकाव्या. ॥ ३०३ ॥ कीं कथा करूनि स्वयें सुज्ञ । आणि श्रोतेही कथा कर्ते अभिज्ञ । तरी त्यास कथाश्रवण करवूनि जे रसज्ञ । त्याणें श्रवण करावें. ॥ ३०४ ॥ एवं अभिनय भगवत्कर्माचा । दाखवावा हा शास्त्रार्थ साचा । श्रीभागवतीं भगवंताची वाचा । येविषयीं ऐसी वर्णिली. ॥ ३०५ ॥ स्थळस्थळीं श्रीशुक । ऐसें बोलिला ते श्लोक । येथें आणितां अनेक । ग्रंथ वाढेल बहु फार. ॥ ३०६ ॥ प्रस्तुतीं कथाप्रसंगीं श्रीपती । म्हणे तुष्यंति आणि रमती । रमणाचा भावार्थ ये रीति । कथानुसंधानें वर्णिला. ॥ ३०७ ॥ आणि **'कथयंतश्च मां नित्यं'** म्हणोनी । येथें या 'नित्य'शब्देंकरूनी । सर्वदा करावें ऐसें यावरूनी । सूचवी भगवंत. ॥ ३०८ ॥ आणि **'बोधयंतः परस्परं'** म्हणोनी । 'परस्पर'शब्दें श्रवणही सूचवूनी । कथानिरूपण कीर्तन श्रवण यावरूनी । सर्वदा करणें भागवत धर्म हा मुख्य. ॥ ३०९ ॥ ऐशा श्लोकीं त्यांची प्रीती । आणि त्यांच्या भज-



१. दांत. २. तालमींत.

नरीती । बोलोनि आतां **श्री**पती । आपण कृपा काय करितो तें बोलतो या श्लोकीं. ॥ ३१० ॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥**

ऐसे जे सदा भजनी योजले युक्त । नित्य मत्कथा कीर्तन श्रवणनिष्ठ भक्त । प्रीतिपूर्वक भजती अनुरक्त । मी बुद्धियोग त्यातें देतसें. ॥ ३११ ॥ देतों त्यांस त्या बुद्धियोगाते । कीं ज्या बुद्धियोगे पावती ते मातें । कीं प्रीतिपूर्वक तयातें । सर्वदा भजन माझें घडतसे. ॥ ३१२ ॥ मागें पंचमाध्यायांत । बोलिला ऐसें भगवंत । कीं ईश्वर न करवी सुकृत दुष्कृत । कोणा हातीं. ॥ ३१३ ॥ तरी सुकृत पुण्य दुष्कृत पाप दोन्ही । करावया लावी बुद्धीते प्रेरूनी । येथें म्हणतो मी बुद्धि देतो यावरूनी । पापपुण्य मागुती करवणें लागतें. ॥ ३१४ ॥ हा पूर्वापरविरोध । परिहारायाकारणे स्वये **स्वयं**बोध । **'भजतां प्रीतिपूर्वकं'** म्हणतां हा बाध । निवारितसे. ॥ ३१५ ॥ कीं सुमति आणि कुमती । आपण दोहीची न करवी प्रवृत्ती । तथापि पाहतां आपली रीती । कल्पवृक्षासारिखी. ॥ ३१६ ॥ कीं चतुर्थाध्यायात स्वमुखेंकरूनी । **'ये यथा मां प्रपद्यंते'** म्हणोनी । **तांस्तथैव भजाम्यहं'** ऐसें बोलिला यावरूनी । कल्पवृक्षस्वभाव आपला वर्णिला. ॥ ३१७ ॥ कीं जैसे जे भजती । मी त्यांस फळें देतो तैसे रीती । म्हणूनि म्हणतो प्रस्तुतीं । **'भजतां प्रीतिपूर्वकं'** म्हणोनी. ॥ ३१८ ॥ कीं पुढें करूनी प्रीती । श्रवण कीर्तनें नित्य भजती । मी बुद्धि देतों त्यांप्रती । कल्पवृक्षस्वभावें. ॥ ३१९ ॥ कीं ज्या निमित्तें ज्यास जो भजतो । तें निमित्त मनीं आधीं पुढें करितो । निमित्तावांचूनि कोण प्रवर्ततो । कोणे गोष्टींत ? ॥ ३२० ॥ प्रथम निमित्ताचा उद्देश । मग तदर्थ प्रयत्नलेश । येथें प्रीतिपूर्वक भजती म्हणे हृषीकेश । या भावेंकरूनी. ॥ ३२१ ॥ कीं पुढें करूनि प्रीती । मग मातें ते भजती । कीं प्रीति माझी मागती । कांहीं न मागती आणिक. ॥ ३२२ ॥ कीं तुझ्या प्रीतीचा जिव्हाळा । तो दे गा! आम्हांस घननीळा! । ऐसिया भक्तांवरी कळवळा । कैसा नये मज दयाळु कल्पवृक्षासी. ॥ ३२३ ॥ कल्पवृक्ष कल्पिलें देतो । परि दयाळु न म्हणवे तो । मी परमदयाळु परि मज धरणें लागतो । स्वभाव अगा! कल्पवृक्षाचा. ॥ ३२४ ॥ कीं कृपा करूं भजल्याविण । तरी मज लागेल विषमपण । म्हणूनि दयाळु मी आपण । कल्पद्रुमस्वभाव जालों

दाटुनी. ॥ ३२५ ॥ त्यांत कोणी मागती काम्यफळ । कोणी मोक्ष मागती केवळ । परंतु प्रेम मागती ते विरळ । ते हे जे प्रीतिपूर्वक मज भजती म्हणतसे. ॥ ३२६ ॥ भजनही करिती प्रीतीनें । परंतु प्रीतीचें तत्त्व झांकले अज्ञानें । कीं रज्जु न कळतां सर्पभानें । झांकला रज्जु असोनि उघडाच. ॥ ३२७ ॥ भलत्यास मुख्य आपली प्रीती । आपणाच कारणें सर्वही आवडती । तो मीच आत्मा जो वेद उपदेशिती । **'तत्त्वमसि'** म्हणूनी. ॥ ३२८ ॥ तो सर्वांहूनी आत्मा प्रिय । तोचि आत्मा मी अद्वय । तोचि जाणावा ऐसा निर्णय । वेदीं उपनिषदीं बृहदारण्यकीं. ॥ ३२९ ॥ मैत्रेयी स्त्री याज्ञवल्क्य पती । तो आत्मतत्त्व सांगे तीप्रती । तेव्हां म्हणे कीं सर्वांची प्रीती । ज्या प्रिया आत्मयाकारणें. ॥ ३३० ॥ तो आत्मा पाहावा । तो आत्मा आइकावा । मनन निदिध्यासें बरवा । अनुभवावा तो आत्मा. ॥३३१॥ तेथें याज्ञवल्क्य पती । म्हणे ऐसें मैत्रेयीप्रती । कीं पतीस पत्नीची प्रीती । आपणाच कारणें. ॥ ३३२ ॥ पतीकारणे पती । प्रिय न मानी सती । आपणास उभय लोक साधती । म्हणूनि आत्मनिमित्त प्रीति त्याचीही. ॥ ३३३ ॥ पुत्र गृह वित्त । सकळही प्रिय आपणाच निमित्त । तो आत्मा जाणावा चित्त । चिन्मय करूनियां. ॥ ३३४ ॥ एवं प्रिय आत्मा ऐसा । परंतु कोणी नेणती कीं आहे कैसा । देहचि आत्मा म्हणूनि वळसा । ज्यास त्यास प्रीतीचा. ॥ ३३५ ॥ अनादिजन्ममरण । यास हेंचि कारण । कीं देहीं वाटे आत्मपण । म्हणूनी प्रीति देहाची. ॥ ३३६ ॥ यास अविद्यामूळ । कीं अनर्थ न कळतां आत्मा केवळ । आत्मविद्या माझी निर्मळ । ते त्या अविद्येतें नाशिते. ॥ ३३७ ॥ माझ्या भजनें ते माझी शक्ति विद्या । प्राप्त होतां नाशी ते अविद्या । म्हणूनि भजावें मज आद्या । आधीं जगदीश्वरातें. ॥ ३३८ ॥ त्यांत बहुतेक मागती मुक्ती । विरळे सुज्ञ मागती भक्ती । ज्यांस मुक्तीहूनिही गोड अनुरक्ती । माझिया चरणांची. ॥ ३३९ ॥ ते हे जे प्रीतिपूर्वक । म्हणतो भजती अत्यंत सविवेक । कीं प्रीतीचें गुह्य जें आत्यंतिक । तें दे म्हणूनि मज भजती. ॥ ३४० ॥ कीं माझें भजन लागतां गोड । त्याचें पुरलें मुक्तीचेंही कोड । कीं आत्मप्रीतीकारणें न कळतां रोड । अंग वाटे त्या प्रीतीचें. ॥ ३४१ ॥ म्हणती भगवंताची ही प्रीती । भलते स्वकल्याणाकारणें धरिती । सकाम काम्य फळार्थही भजती । प्रीतीने या परमेश्वरातें. ॥ ३४२ ॥ त्याहूनि शाहाणे सुमती । मुक्तीकारणें प्रीती करिती । आपल्या अभीष्टाकारणें भजती । प्रीतीनें लोक रायासही. ॥ ३४३ ॥ ते रायाची नव्हे आवडी ।

मोक्षार्थ भजणें हेही आपलीच गोडी । ते आपली गोडी सोडी । ऐसा तों असेचना. ॥ ३४४ ॥ एवं आवडी जाल्या दोनी । एक आपली एक देवाची म्हणोनी । तेव्हां जीवेश्वर अद्वैतानुभवें करूनी । जे प्रीतिभक्ति ते अनन्या जाणावी. ॥ ३४५ ॥ त्या प्रीतीकारणें । ज्यांस माझें भजन करणें । ते प्रीतिपूर्वक भजती म्हणूनि बोलणें । या अभिप्रायें करूनी. ॥ ३४६ ॥ हे अद्यापि जिज्ञासु म्हणावे । मुख्य प्रीति न जाणती ऐसे जाणावे । पुढें आत्मज्ञानी होतां मग गणावे । जाणते आत्मप्रीतीचे. ॥ ३४७ ॥ यालागीं प्रीतिपूर्वक म्हणूनी । म्हणे हा भाव हृदयीं धरूनी । कीं प्रीति पुढें करूनी । प्रीतिप्राप्तीकारणें मज भजती. ॥ ३४८ ॥ ते मुक्तीतेंही न इच्छिती । निर्निमित्त माझी इच्छिती प्रीति । ते प्रीती अद्वैतबोधे सुमती । जाणती अविद्यानाशांतीं. ॥ ३४९ ॥ म्हणूनि प्रीति कळावया । मी त्यास बुद्धियोग देतों धनंजया ! । म्हणे भगवंत गहन अर्थ ऐसिया । बुद्धियोग शब्दाचा ये रीती. ॥ ३५० ॥ कीं असेंचि दृष्टि स्पर्शली रज्जूस । तरी रज्जू न कळतां जाला सर्पाचा भास । तो रज्जु कळता होतो निरास । लटकिया भुजंगाचा. ॥ ३५१ ॥ शेवटीं पाहतां आपली । जे दृष्टि रज्जूतें स्पर्शली । ते आपली दृष्टि आपणाते प्राप्त जाली । दृष्टियोग त्या रज्ज्ववलोकनातें म्हणावें. ॥ ३५२ ॥ ये रीति आत्मा जाणावा । तो बुद्धियोग याप्रकारें म्हणावा । दृष्टियोगासम वाखाणावा । बुद्धियोगही. ॥ ३५३ ॥ कीं चैतन्यातें स्पर्शली बुद्धी । तेव्हां देहात्मभासादिकासि बोद्धव्यसिद्धी । मग अनादि अविद्या योगप्रसिद्धी । नानायोनीत होऊं लागली. ॥ ३५४ ॥ परंतु जों आत्मा न कळे आपला । तों ते बुद्धि नाहींच सांपडली याला । जे स्पर्शली असे आत्मयाला । दृष्टि जैसी सर्पाभासकाळीं रज्जूतें. ॥ ३५५ ॥ रज्जूस स्पर्शली दृष्टी । परि देखते मिथ्यासर्पसृष्टि । सर्प मानूनि द्रष्टा होतो कष्टी । तोंवरी योग होय आपल्या दृष्टीचा. ॥ ३५६ ॥ होतां सर्पभ्रमनिरास । ते दृष्टि सांपडे जे स्पर्शली आहे रज्जूस । तैसा बुद्धियोग ज्ञानियास । प्राप्त होतो प्रसादें श्रीकृष्णाच्या. ॥ ३५७ ॥ म्हणूनि तोचि बोलतो या बोला । कीं मी बुद्धियोग देतों त्याला । जे बुद्धि स्पर्शली असे आत्मयाला । योग तीचा म्हणिजे प्राप्ति तियेची. ॥ ३५८ ॥ स्पर्शली आत्म्यातें आयती । असते जे त्यांची मती । तिचा योग होतो जातां भ्रांती । अनादि अज्ञानाची. ॥ ३५९ ॥ बुद्धियोग ऐसा देतों म्हणे । कीं भगवद्रूप त्यांतें बाणे । ही गोष्टी अर्जुनही जाणे । नवमीं **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनि दाविता. ॥ ३६० ॥ योगी बुद्धियोग देतो म्हणोनी । म्हणतां बोले खुणेतें सुचवूनी । कीं त्या

बुद्धियोगातें देतों कीं जेणें करूनी । ते मातें पावती. ॥ ३६१ ॥ कीं चराचर सकळ । भगवद्रूप केवळ । त्याज्य मायाभास तोही सुमंगळ । भगवद्देह रामकृष्णादिदेहासारिखा. ॥ ३६२ ॥ विश्व ऐसें पाहणे । याचेंचि नांव मज पावणें । कीं विश्वाकार होणें । हा योग माझा शरीर माझेंचि. ॥ ३६३ ॥ नवमाध्यायांत **'मत्स्थानि सर्वभूतानि'** । येथूनि **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । येथपर्यंत तुज बोलिलो त्यावरूनी । विश्वयोग माझा तूं पाहसी. ॥ ३६४ ॥ तो योग माझा मद्रूप । योग रजतरूप मी शुक्तिस्वरूप । शुक्तिच तो शुक्तीचा प्रताप । कीं रजताकारें आपणास दाखविते. ॥ ३६५ ॥ एवं बुद्धियोग शब्दे हरी । आत्मसाक्षात्कार बोलोनि त्यावरी । मातें पावती ऐसी वैखरी । योग आपला ओळखती या भावें बोलिला. ॥ ३६६ ॥ **'एतां विभूतिं योगं च'** या श्लोकें करूनी । बोलिला जो भाव अंतरीं धरूनी । कीं अविकंपयोगे करूनी । योजिती जे जाणती या विभूतीतें आणि योगातें. ॥३६७॥ त्यांत विभूतीतें म्हणे उगेंच जाणती । आणि योगातें तत्त्वता जाणती म्हणे श्रीपती । त्या दों गोष्टींचा विशद अर्थ ये रीतीं । येथपर्यंत बोलिला. ॥ ३६८ ॥ कीं ब्रह्मादि माझ्या विभूती । म्हणूनि शास्त्रश्रवणेंही जाणती । आणि मच्चित्त मतद्गप्राण होउनी भजती । अज अनादित्व माझें जाणोनी. ॥ ३६९ ॥ मग मी बुद्धियोग देतों त्यांप्रती । तेव्हां ते मज पावती म्हणिजे योग माझा जाणती । तत्त्वतां योग जाणती ते ये रीती । या क्रमें करूनि हा भाव. ॥ ३७० ॥ अध्यायारंभीं तृतीय श्लोकीं । जें उत्तमश्लोक बोलिला कीं । मी अनादि महेश्वर सर्वलोकीं । जो मज ऐसें जाणे तो सुटे सर्व पापांपासूनी. ॥ ३७१ ॥ सकळ पाप संचित क्रियमाण । त्यापासूनि सुटतो तो सुजाण । कीं या क्रमें करूनि मी ब्रह्म सगुण । मज ये रीती पावे ऐसें करीतसें. ॥ ३७२ ॥ प्रकरण तेंचि येथपर्यंत । अनुसंधानें बोलिला भगवंत । कीं मज थोर जाणोनि भजतां निश्चित । अघटितघटना योग तो जाणती. ॥ ३७३ ॥ तो तत्त्वज्ञानेंचि जाणे । तेव्हां अविकंपयोग बाणे । ऐसें श्रीकृष्ण मागें ज्या भावें म्हणे । विशद अर्थ त्याचा ये रीती. ॥ ३७४ ॥ आतां बुद्धियोग मीं देतों त्यांतें । ऐसें या श्लोकीं बोलिले भगवंतें । बुद्धियोगशब्दांत सूचविलें रूपद्वयातें । ब्रह्मविद्येच्या. ॥ ३७५ ॥ आणि तें बुद्धिविद्येचें रूपद्वय । त्याशी अविद्येचें रूपद्वय । तें हेंही अव्यय । अर्थास्तव सूचवीं परंतु धनंजय समजला नाहीं. ॥ ३७६ ॥ म्हणूनि उत्तर श्लोक । बोलों पाहतो उत्तमश्लोक । पूर्वापर विचारावलोक । करावा सज्जनीं येथूनी. ॥ ३७७ ॥

आणि प्रीतिपूर्वक ते भजती । कीं भक्तिमात्रचि मज मागती । म्हणोनि सूचवी कीं अनायासें अविकंपयोगस्थिती । त्यांची बाणे ऐसी कृपा मीहीं करीतसें. ॥ ३७८ ॥ जे मोक्षचि मागती । त्यांसही मीच ज्ञान देतों श्रीपती । परि कृपापात्र हेचि होती । इत्यादि विशद बोलतो आतां या श्लोकीं. ॥३७९॥

**तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥**

अगा! त्यांचीच मज अत्यंत अनुकंपा । अनुकंपा म्हणजे कृपा । अविकंपयोग त्यांतेंचि सोपा । ऐसी कृपा मी करितसें ज्यांवरी. ॥ ३८० ॥ म्हणोनि त्याचेंचि दों प्रकारचें अज्ञान । मी नाशितों भवभंजन । या भावें बोलतो या श्लोकीं वचन । **'तेषामेव'** म्हणोनी. ॥ ३८१ ॥ **'तेषामेव'** म्हणिजे त्यांचेंचि तम । आणि अज्ञानजनित जड भ्रम । त्यांचाच मी नाशितों पुरुषोत्तम । अत्यंत अनुकंपेंकरूनी. ॥ ३८२ ॥ कीं माझ्याच विभूतीतें आणि योगातें । जे जाणती आणि मोक्षार्थ भजती मातें । आत्मज्ञान मी काय त्यांतें । देत नाहीं? ॥ ३८३ ॥ परि ते मोक्षाचे ठायीं तत्पर । माझी प्रीति न मागती ते नर । म्हणोनि मी सर्वेश्वर । ज्ञान मात्र त्यातें देतसें. ॥ ३८४ ॥ परि अनुकंपार्थ भक्तांतें । ज्या कृपेनें ज्ञान देणें घडतें मातें । त्या कृपेनें त्यातें । देत नसें मी ज्ञान. ॥ ३८५ ॥ कीं ते अव्यक्तोपासक योगानिमित्त । अत्यंत श्रमती श्रमतां चित्त । या भक्ताचें सर्वस्व वित्त । मीच अर्जुना! ॥ ३८६ ॥ म्हणोनि त्या मुमुक्षूस मोक्षाकारणें । मज लागतें तत्त्वज्ञान देणें । परंतु अविकंपयोगें मजसीं योजणें । बहुत कष्टें तयांसी. ॥ ३८७ ॥ आतां या प्रस्तुती । भक्त बोलिलों तुजप्रती । ज्यांस एकचि मागणें माझी प्रीति । म्यां काय द्यावें तयांतें? ॥ ३८८ ॥ जिहीं वमनतुल्य टाकिली भुक्ती । भक्तिसुखें नलगे म्हणती मुक्ती । माझी प्रीतीच मागती । जीस भक्ति म्हणावें अर्जुना! ॥ ३८९ ॥ आत्मत्वेंचि कळते अनन्य प्रीती । म्हणोनि मी ज्ञान देतों या रीती । परि ते आपणांनिमित्त न भजती । भजती माझ्याच प्रीतीकारणें. ॥ ३९० ॥ मुमुक्षु भजती आपल्या मोक्षानिमित्त । यांचें मजचि कारणें भुकेलें चित्त । माझी प्रीतीच मागती सुव्रत । काय द्यावें मी तयांतें? ॥ ३९१ ॥ आत्मत्वें माझी अतिप्रीती । म्यां द्यावीच कीं त्यांप्रती । हे तों कल्पवृक्षस्वभावरीती । माझी सर्वांसारखी यांसही. ॥ ३९२ ॥ परंतु जिहीं मोक्षही । आपणानिमित्त अपेक्षिला नाहीं । मी त्यांस देईन जें कांहीं । त्यानें

उतराई होऊं न शकें. ॥ ३९३ ॥ ऐसा अति सुमंगल अमौल्य । गुण माझ्या भक्तांचा अतुल्य । कीं ज्या गुणे केला निर्माल्य । कैवल्य मोक्ष त्यांवरूनी. ॥ ३९४ ॥ ऐसा त्यांचा देखोनि गुण । मी परम सानुकप होतो अनंतगुण । त्या अनुकंपेंकरूनि त्याचेंचि अज्ञानतमावरण । आणि अज्ञानजनित जडभ्रम नाशितों. ॥ ३९५ ॥ इतराची देखोनि मुमुक्षा । ज्ञान देऊनि पुरवितों अपेक्षा । परि भक्त मागती त्यास एकचि भक्त्यपेक्षा । अनुकंपार्थ देतसें द्विविधा बोधातें. ॥ ३९६ ॥ **'तेषामेव'** म्हणोनि । या वचनीं 'एव'शब्देंकरुनी । इतरांस ऐसा दयाळु होउनी । ज्ञान देत नसें जैसा त्यातेंचि देतों हा भाव. ॥ ३९७ ॥ आतां कैसें द्विविध अनादि अज्ञान । आणि कैसें त्याचे नाशक द्विविध ज्ञान । कोण्या दृष्टांते अज्ञान नाशितो भवभंजन । हे त्याच्या वचनी पहावें. ॥ ३९८ ॥ **'अज्ञानजं तमः'** म्हणोनी । अज्ञानाचें द्विविधरूप या वचनीं । **'ज्ञानदीपेन भास्वता'** या दों दृष्टांतेंकरूनी । द्विविध ज्ञान अज्ञाननाशक बोलतो. ॥ ३९९ ॥ श्लोकवृत्तानुरूप पदें । मुखांतूनि काढिलीं गोविंदें । परंतु अनुभवक्रमें विशदे । वाखाणावीं पदें योजुनी. ॥ ४०० ॥ ऐसें वाखाणावें कीं पुरुषोत्तम । अज्ञान आधी नाशीन म्हणतो तें तम । तम आवरण आणि त्यापासूनि जडभ्रम । तें अज्ञानजनित मग नाशितो म्हणावें. ॥ ४०१ ॥ आवरणतमनाशास दृष्टांत । **'ज्ञानदीपेन'** म्हणे भगवंत । तें ज्ञान नाशी जडभ्रम अज्ञानजनित । तें या **'ज्ञानदीपेन भास्वता'** या दृष्टांतें बोलतो. ॥ ४०२ ॥ तम म्हणजे अंधकार । तमीं आपणास जाणतो परि न देखे नर । तेथें दीप लागता स्वशरीर । पाहों लागे दीपें तमाचा नाश ये रीती. ॥ ४०३ ॥ ऐसें मूळाज्ञानावरण । मज मी नेणें म्हणतों असोनि आत्मस्फुरण । जडव्यतिरेक ज्ञानदीपें आपणा आपण । पाहे प्रत्यग्वृत्तीनें तोचि नाश आवरण तमाचा. ॥ ४०४ ॥ आतां आत्मा देह विलक्षण । कळला जरी सच्चिदानंदलक्षण । तरी जड निराळे अवलक्षण । द्वैत धरूनि असे उरलेंचि. ॥ ४०५ ॥ तेव्हां ज्या सत्तेनें जे दिसे । तें विचारितां तेंचि असे । रज्जूकरितां सर्प भासे । न दिसे न असे त्याविणें अन्वयबोध हा ऐसा. ॥ ४०६ ॥ करितां जड पटाचा ऐसा शोध । जडपटप्रकाशक तंतुबोध । होतां जड पट दिसोनि नाहीं ऐसा बाध । जाला जड प्रपंच पट असण्याचा. ॥ ४०७ ॥ एवं प्रपंच सारा पट । चित्स्वरूप तंतूच होय निपट । या ज्ञानास दृष्टांत उत्कट । **'भास्वता'** म्हणोनि बोलतसे. ॥ ४०८ ॥ **'ज्ञानदीपेन भास्वता'** म्हणजे ज्ञानसूर्येंकरूनी । की अन्वयज्ञान विश्वप्रकाशक

म्हणोनी । ज्ञानसूर्य म्हणे हा भाव धरूनी । श्रीवत्सांकित हृदयकमळांत. ॥ ४०९ ॥ रज्जु न कळता होय साप । परि त्या अज्ञानापरीस अधिक याचा प्रताप । मनी भय शरीरीं कंप । सर्प करी तैसें न करी अज्ञानरज्जूचे. ॥ ४१० ॥ मायानदी सोपी उगमीं । भयानकत्व नाना नद्यांच्या संगमी । तैसें नेणें म्हणतो मज मी । याहूनि दुःख देहादिक जड प्रपचाचे. ॥ ४११ यालागीं आवरणनाशक ज्ञानदीप । विक्षेपनाशकाचा सूर्यासम प्रताप । कीं अंधकारीं पाहाया आपलें रूप । दीपचि पुरे. ॥ ४१२ ॥ परंतु पाहावा प्रपंच सारा । दीप न नाशी त्या अंधकारा । म्हणोनि बोलणें लागले जगदाधारा । अन्वयबोधास दृष्टांतें सूर्याचिया. ॥ ४१३ ॥ ऐसें द्विविध अज्ञान । मी नाशितो भवभंजन । देऊनि दों प्रकारीचे ज्ञान । दों दृष्टातें करूनी. ॥ ४१४ ॥ येथें इतर टीकाकार । न वाखाणिती अज्ञान द्विप्रकार । जैसा तैसा अर्थ निर्धार । करूनि गेले. ॥ ४१५ ॥ अज्ञानजनित तम । ज्ञानदीपें नाशितों म्हणतो पुरुषोत्तम । 'भास्वता' म्हणजे प्रकाशवंत उत्तम । त्या ज्ञानदीपें म्हणोनि वाखाणिती. ॥ ४१६ ॥ 'तम'शब्दे म्हणूनि संसार म्हणती । जो आत्मज्ञानियास न उपजतो ऐसें योजिती । दाटूनि डोळे वटारिती । पीळ घालूनि आपल्या कंठातें. ॥ ४१७ ॥ तरी अज्ञान नाशिल्याविण । अज्ञानजनिताचें कैसें होतें संहरण?। ऐसें पूसतां मागुती आणिती विवरण । कीं अज्ञाननाशेचि नाशतो म्हणतो म्हणावे. ॥ ४१८ ॥ तरी अज्ञान नाशितो हाचि अर्थ । ये स्थळीं का न वर्णावा समर्थ? । 'तम'शब्दे संसार वाखाणूनी व्यर्थ । अर्थास्तव मग अज्ञाननाशक कां बोलावा? ॥ ४१९ ॥ आणि ज्ञानदीपेकरूनी । नाशितो तम म्हणोनि । मागुती 'भास्वता' म्हणोनि या वचनी । विशेष काय सांपडला.? ॥ ४२० ॥ ज्ञानास दृष्टात दीपाचा । तो दीप म्हणतां प्रकाशवंत साचा । मागुती प्रकाशवंत म्हणावा प्रकाश त्याचा । कां अधिक शब्द थोडिया अर्थी योजावे.? ॥ ४२१ ॥ मिळाली अणीस अणी । ते समयी गीता उपदेशी चक्रपाणी । थोडिया अर्थास अधिक सुशब्द वाणी । कां त्याची योजील? ॥ ४२२ ॥ हें असो सकळ । अर्थ यथार्थदीपिकेत जाला प्रांजळ । आतां क्लिष्टकल्पित अर्थ कां कुशल । अंगीकारिती? ॥ ४२३ ॥ व्यतिरेकें ज्ञानदीपें नाशितो तम । हें आवरण अज्ञानापासूनि उगम । जडभ्राति अज्ञानापासूनि त्यातें पुरुषोत्तम । 'भास्वता' म्हणजे अन्वयज्ञानसूर्यें नाशितों म्हणतसे. ॥ ४२४ ॥ नाशितों द्विविध आवरण विक्षेप अज्ञान । त्यांस दो दृष्टांतें द्विप्रकार तें व्यतिरेक अन्वयज्ञान । ऐसें अबाधित होतां समाधान ।

कोण इतर अर्थ बाधित मानील? ॥ ४२५ ॥ आतां म्हणतो मी अज्ञान नाशितों म्हणोनि । तरि तो नाशितो कोठे स्वयें असोनी? । ऐसी शंका उपजेल हें समजोनि । **'आत्मभावस्थो'** म्हणतसे. ॥ ४२६ ॥ आत्मा बुद्धि तिचा भाव । तेथें असोनि मी देव । नाशितों म्हणूनि स्वयमेव । तोचि म्हणतो. ॥ ४२७ ॥ बुद्धीचा भाव वृत्ती । तीमाजि जे आत्मप्रत्ययस्फूर्ती । तेचि अर्जुना! अमूर्त मूर्ती । माझी सर्वात्मयाची. ॥ ४२८ ॥ तेथूनि नाशितों द्विविध अज्ञान । देऊनि द्विप्रकार दों दृष्टातें ज्ञान । त्यांचेंचि नाशितों म्हणतो भवभंजन । जे प्रीतिपूर्वक भजती म्हणोनि पूर्वी वर्णिले. ॥ ४२९ ॥ ऐसी दशमीं एकादश श्लोकीं । टीका जे भक्तीपुढें मुक्ति करी फिकी । आणि उपास्य या तिहीं लोकीं । एकचि भगवान् श्रीकृष्ण हें जेथें. ॥ ४३० ॥ या अकरा श्लोकीं धनंजय । ऐकता जाला हा निर्णय । कीं सगुणब्रह्म सर्वेश्वर कृष्ण हा निश्चय । आदि सर्वा देवा ऋषींचाही एक हा. ॥ ४३१ ॥**'न मे विदुः सुरगणाः प्रभवं'** या श्लोकीं । ऐसें श्रीकृष्ण बोलिला कीं । माझा ईश्वरत्वप्रादुर्भाव या लोकीं । न जाणती देव महर्षि सर्वही. ॥ ४३२ ॥ की अज अनादि । आणि त्यां सकळांचा मी आदि । म्हणोनि नेणती पुत्रपौत्र ब्रह्मादी । प्रादुर्भाव समय माझा मूळ पुरुषाचा. ॥ ४३३ ॥ तरी जेव्हां सर्वा देवां ऋषीचेंहीं कारण । हाचि एक नारायण । तेव्हां सेव्य याचेच चरण । तत्त्वविचारे सर्वांसही. ॥ ४३४ ॥ ऐसें अर्जुन समजला । विभूति आणि योगाचा महिमा ऐकिला । कीं विभूति आणि योगातें जो जाणे त्याला । अविकंपयोगीं योजणें यासि अनायासें. ॥ ४३५ ॥ तरी विभूति याच्या विस्तारें । ऐकाव्या आणि आदरें । योगही ऐकावा पुन्हा ऐसें पांडुकुमारे । धरिले मनांत. ॥ ४३६ ॥ परि दोन्ही श्रवण तेव्हां सफळ होती । कीं कृष्ण तत्त्वतां वाटे जगत्पती । कीं या अध्यायांत या प्रकरणीं आधीं मजप्रती । **'यो मामजमनादिं च'** या श्लोकीं हेंचि बोलिला. ॥ ४३७ ॥ तरी कृष्णचि सर्वेश्वर ऐसा । बहुतां प्रकारें बैसला ठसा । तो अत्यंत भक्तिभावे जगन्निवासा । निवेदितसे अर्जुन. ॥ ४३८ ॥

**अर्जुन** उवाच—**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**

**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**

**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

अर्जुन म्हणे जे परम । प्रकृतिपुरुषापर तें ब्रह्म । जें पूर्ण ज्यास म्हणती निगम । ब्रह्म तें तूचि. ॥ ४३९ ॥ कीं सर्वही जरी ब्रह्मचि असे । परि न जाणती कोणी ऐसें । ज्यास त्यास अज्ञानस्वप्न दिसे । मी कोण ऐसें कळेना. ॥ ४४० ॥ जरी ज्ञान होतां कळले । तरी तें तुवांचि दीधलें । तैसें तुझ्या उपाधीस कोणी नाहीं बोधिले । ब्रह्मात्मत्व तुझें स्वतःसिद्ध. ॥ ४४१ ॥ प्रकृतीहूनि पर । आपण ऐसें निरंतर । तूचि अनुभविसी सर्वेश्वर । तूचि परब्रह्म देवा! यालागीं. ॥ ४४२ ॥ एव जें सगुण । त्यातेंचि म्हणावें निर्गुण । कीं निर्गुण स्वयें आपण । अखंड बोध ऐसा सगुणींच. ॥ ४४३ ॥ एवं लक्षूनि सगुण । त्याचा अखंडानंदानुभव पाहूनि पूर्ण । म्हणे तूंचि परब्रह्म निर्गुण । देवाधिदेवा! ॥ ४४४ ॥ ऐसा सगुणही तूं नित्य निर्गुण । म्हणोनि वर्णूनि आतां तूंचि सगुण । म्हणूनि वर्णितों निपुण । गुरु शिष्य साच त्याच भगवंताचा. ॥ ४४५ ॥ **'परं धाम पवित्रं परमं भवान्'** म्हणोनि । या सगुण विशेषणें-करूनी । सगुण मोक्षस्थानही तूचि हें मनी धरूनी । बोलतसे. ॥ ४४६ ॥ सायुज्यमुक्तीचें स्थळ । तूचि म्हणोनि बोलिला ब्रह्म केवळ । आतां ज्ञानी सगुणभक्त कुशल । त्यांचें परंधाम पवित्र परम वैकुंठ तूंचि म्हणतसे. ॥ ४४७ ॥ 'धाम'शब्दें अधिष्ठान । बोलतो म्हणावा अर्जुन । तरी 'परं ब्रह्म' म्हणतां तें वचन । याचि अर्थी योजिले. ॥ ४४८ ॥ पर म्हणजे प्रकृतिकारणाहूनि पर । जैसा सर्पाभासापरता दोर । तें परब्रह्म तूं कीं ज्यांत चराचर । त्याहूनि परता रज्जु सर्पापरता जे रीती. ॥ ४४९ ॥ म्हणतां ऐसें परब्रह्म । जालेंचि अधिष्ठानरूपें धाम । निर्गुणोपासक आत्माराम । पावती जया धामातें. ॥ ४५० ॥ आणि तें न पवित्र अथवा न अपवित्र । निर्गुणोपासकां म्हणावें पवित्र । म्हणोनि वैकुंठ शुद्धसत्त्वरूप विचित्र । तें परं धाम पवित्र तूंचि ऐसें म्हणतसे. ॥ ४५१ ॥ कैवल्य पावती आत्माराम । तें 'परं ब्रह्म'शब्दें सूचविले धाम । ज्ञानियां भक्तां वैकुंठधाम । तेंही तूंचि म्हणोनियां 'परं धाम'शब्दें सूचवितो. ॥ ४५२ ॥ रज तम विकार अपवित्र । जेथें नसती कीं शुद्ध सत्त्व जें पवित्र । त्याची रचना जेथें स्वानंदमात्र । अखंडत्वें स्फुरतसे. ॥ ४५३ ॥ पवित्र पदार्थ आणीकही असती । परंतु तेथें रज तम दिसती । कीं प्राकृता आकृति तमाची प्रकृती । आणि भासे रजोगुण कार्या इंद्रियांतें. ॥ ४५४ ॥ म्हणोनि हें पवित्र परम । कीं जेथें धुंडितां न सांपडती रज तम । ऐसें परं धाम पवित्र उत्तम । वैकुंठनगर तूं हा अर्थ. ॥ ४५५ ॥ आतां परं धाम । जरी वैकुंठाचेंचि नाम । तरी काय अधिष्ठानरूप धाम । जगाचें सगुणपणें

नव्हेसी? ॥ ४५६ ॥ ऐसें आक्षेपाचें स्थान । म्हणोनि म्हणतो अर्जुन । कीं तूं पुरुष जगज्जीवन । जगदीश्वरा! ॥ ४५७ ॥ पिंडब्रह्मांडें हीं पुरें सकळ । यात वास ज्याचा तो तू पुरुष केवळ । नाना तरंगीं वसे जैसें जळ । ऐसा सर्वांपुरीं वससी पुरुष तूं. ॥ ४५८ ॥ परि पुरें शरीरें त्यांत । जीवही वसती अनंत । तरी तूं तैसा न होसी भगवंत । म्हणूनि शाश्वत तूं म्हणतसे. ॥ ४५९ ॥ कीं पुरें शरीरें त्या पुरीं । अविद्येनें निद्रा करी । स्वप्न प्रपंच परोपरी । साच मानूनि अनुभवितो. ॥ ४६० ॥ 'पुरुष'शब्दें तोही जीव । परि या अर्थेंकरूनी ज्यास जीवभाव । त्या सर्वांस अशाश्वतपण तू देव । शाश्वत वससी या पुरामाजी. ॥ ४६१ ॥ आणि जीव ते अनेक । फळे शरीरें धरिती लौकिक । तूं पुरुष अलौकिक । म्हणूनि तूं दिव्य म्हणतसें. ॥ ४६२ ॥ तूं ऐसा म्हणोनी । म्हणती सर्वही मुनी । ऐसें दुसऱ्या श्लोकेकरूनी । भक्तीनें गुंफिली सुमनशब्दमाळा अर्पील. ॥ ४६३ ॥ या श्लोकीं पाहतां श्लोक सगळा । भगवत्सर्वोत्कर्षाचा जिव्हाळा । अर्जुनाच्या प्रेमाचा कळवळा । एकचि प्रगट दिसतसे. ॥ ४६४ ॥ व्यासादि सर्व मुनी । वारंवार बोलिले निश्चय करूनी । कीं पूर्ण ब्रह्म हा श्रीकृष्णचि म्हणोनी । तेही आठवलें अर्जुनातें. ॥ ४६५ ॥ स्वमुखेही करुणार्णव । बोलिला स्वाचित्यवैभव । तें आइकतां पांडव । तांडव करीत होता हृदयांत. ॥ ४६६ ॥ परतु गीताश्रवण । करावया पसरले दोनी श्रवण । चित्त भगवद्गुणप्रवीण । मौन वाचे. ॥ ४६७ ॥ तों प्रश्नाचा अवसर । देखता जाला चतुर । बोलतां आधीं प्रेमें अधीर । तूं थोर तूं थोर हेचि म्हणूं लागला. ॥ ४६८ ॥ थोर तूचि एक सर्वेश्वरा! । म्हणूनि ऐसाच मुखांतूनि श्लोक सारा । निघाला या श्लोकीं शब्द दुसरा । असेचना. ॥ ४६९ ॥ बाप प्रेमाचे लक्षण । बाप अर्जुन बोलका सुलक्षण । बाप स्तुतिपात्र कमलेक्षण । ईश्वरेश्वर देवाधिदेव श्रीकृष्ण. ॥ ४७० ॥ जितकी करावी स्तुती । तितकी अवघी आरती । श्रेष्ठता हरीची त्याही परती । भागले वेद आणि [1]चतुःपंचषट्सहस्रमुख. ॥ ४७१ ॥ एका मुखाचा बापुडा । अर्जुन बोलों जातां जाला वेडा । होऊनि प्रेमा वरपडा । श्लोकभरी हेंचि समग्र बोलतसे. ॥ ४७२ ॥ त्यांत श्लोक चरणा द्वयवरी । स्वयेंचि ऐसा वर्णिला श्रीहरी । तृतीयापासूनि ऋषींची वैखरी । स्मरोनि तूं ऐसा म्हणोनि देवा बोलतसे. ॥ ४७३ ॥ '**आहुस्त्वामृषयः सर्वे**' ऐसें बोलिला पुढिलिया श्लोकीं । आणीक ऐसेंही पुढिलिया श्लोकीं बोलेल की । तुझी ही वाणी नेटकी । या गोष्टी बोलतां आइकतों. ॥ ४७४ ॥

---

१. चतुर्मुख, पंचमुख, षण्मुख आणि सहस्रमुख=ब्रह्मा, शिव, षडानन आणि शेष.

त्यांत या अध्यायाचे आरंभापासूनी । जें बोलिला स्वमुखेकरूनी । त्याचा मथितार्थ या चतुर्थचरणीं सूचवूनी । अनुवाद अर्जुन करीतसे. ॥ ४७५ ॥

चतुर्थ चरण—**आदिदेवमजं विभुम्** ।

अजी तूं! आदिदेव । तू अज देवाधिदेव । तू विभु समर्थ ऐसें स्वयमेव । वदसी मातें. ॥ ४७६ ॥ सर्वांचा आदि आणि सर्वांचा देव । ऐसा एक तूंचि देवाधिदेव ।' **न मे विदुः सुरगणाः**' या श्लोकीं स्वयमेव । '**अहमादिर्हि देवानां**' म्हणोनि बोलिलासी. ॥ ४७७ ॥ तरी जो सर्वांचा आदी । तोचि देव त्याचा अनादी । तू स्व आदि म्हणोनि ब्रह्मादी । तुज भजती देव आपला मानुनी. ॥ ४७८ ॥ आणि तू अज म्हणजे जन्मरहित । आणि विभु कीं सर्वलोकमहेश्वर तूं अच्युत । '**यो मामजमनादिं च**' या श्लोकांत । **वेत्ति लोकमहेश्वरम्**' म्हणोनि तूंचि वदलासि. ॥ ४७९ ॥ की जो सर्वांचा आदि आणि देव । तो जन्मरहित देवाधिदेव । आणि सर्वलोकमहेश्वर तो स्वयमेव । म्हणोनि तूं आदिदेव अज अनादि विभु यापरी. ॥ ४८० ॥ ऐसें समग्र श्लोकभरी । कृष्णसर्वेश्वरत्व वर्णिलें या उपरी । ऋषि ये रीती बोलती तूतें हरी । तूंही स्वयें बोलसी हें प्रमेय उत्तरश्लोकाचें. ॥ ४८१ ॥ भूत भविष्य वर्तमान । ज्यांस कालत्रयाचें ज्ञान । ऋषि म्हणोनि अभिधान । तयां ज्ञानियांचें. ॥ ४८२ ॥ तरी सर्वही ऋषीश्वर । तूतेंचि म्हणती सर्वेश्वर । त्याही ऋषींत प्रसिद्ध अत्यंत थोर । त्यांत **नारद** देवऋषी. ॥ ४८३ ॥ तरी तो देवऋषि **नारद** । सर्व शास्त्रीं अनुभवीं विशारद । तोही ऐसेंचि म्हणतो कीं वरद । सर्वां वरदांचाही सर्वेश्वर **कृष्ण** हाचि. ॥ ४८४ ॥ तैसाचि ऋषि नामें **अ**सित । तैसाच **दे**वल परम विख्यात । किंबहुना श्री**स**त्यवतीसुत । **वे**दव्यास जो वेत्ता सर्वां **वे**दांचा. ॥ ४८५ ॥ जो उचलूनि भुज । म्हणतो कीं आदिदेव अज । विभु परंब्रह्म परंधाम सहज । तो हा चतुर्भुज श्री**कृ**ष्ण. ॥ ४८६ ॥ ऐसें बोलिला **अ**र्जुन । जो **व्या**सनंदन**पां**डूचा नंदन । ज्यास प्रत्यक्ष वारंवार दर्शन । स्वपितामह **वे**दव्यासाचें. ॥ ४८७ ॥ हें वचन स्वयें त्या **अ**र्जुनाचें । आणि हें शास्त्र **भा**रत पंचम **वे**द नाम ज्याचें । आणि हें जगद्वद्य **उ**पनिषत्सार साचें । श्री**भ**गवद्गीता पाठ सर्वत्र लोकासी. ॥ ४८८ ॥ तेथें ऐसा निर्णय । आदिदेव जगत्कारण अद्वय । तो हा श्री**कृ**ष्णचि ऐसा निश्चय । इतकियापरी या **गी**तेंत. ॥ ४८९ ॥ इतर पुराणीं **व्या**सवैखरी । सन्मार्गीं लावावया अनधिकारी । ज्यास त्यास थोर म्हणे परी । सिद्धांत ऐसा **व्या**साचा. ॥ ४९० ॥ आणि शंका इतरां पुराणीं । कीं मतकर्ते आपणांस इष्ट तैसी स्ववाणी । पुरा-

णश्लोकीं मेळवूनि घाणी । केली सकळ पुस्तकाची. ॥ ४९१ ॥ पुरातन श्लोक काढिती । स्वकृत श्लोक घालिती । सभेत पुस्तकें काढूनि दाविती । प्रमाणें स्वकल्पितें. ॥ ४९२ ॥ वेद आणि हे भगवद्गीता । सर्वत्र पाठ पुण्यवंतां । म्हणोनि येथें काढितां घालितां । न फावे कुमत तस्करांतें. ॥ ४९३ ॥ येथें व्यासाचा सिद्धांत । अर्जुन बोले आइके भगवंत । तरी अनेक जन्मींचे भाग्यवंत । ते हृदयांत दृढ धरोत हे गोष्टी. ॥ ४९४ ॥ जो हे गोष्टी धरी मनी । सिद्धि त्याची काय बोलावी म्हणूनी । **'यो मामजमनादिं च वेत्ति'** या श्लोके करूनी । स्वयें स्वामीच बोलिला. ॥ ४९५ ॥ कीं अज अनादि सर्वलोकमहेश्वर । मी म्हणोनि मातें जाणे जो नर । तो सुटे सर्वां पापांपासूनि मत्पर । सर्व पापें म्हणिजे बंधकें कर्में समस्तें. ॥ ४९६ ॥ सर्वां वेदाचें रहस्य जाणे । तो वेदव्यास ऐसें म्हणे । त्यासारखें कोण हें जाणे । रहस्य तत्त्व वेदाचें? ॥ ४९७ ॥ स्मृतिकर्ते ऋषि सकळ । व्यास वेदार्थवेत्ता केवळ । आणि भगवद्वाक्यावरूनि प्राजळ । सिद्धांत ऐसा गीतेचा. ॥ ४९८ ॥ हे सिद्धाताची सीमा । कीं सर्व महिमासीमा कृष्णमहिमा । आतां येविषयीं निगमागमा । पुनरुक्तिरूपें कां शिणवावे? ॥ ४९९ ॥ एव तूं सर्वेश्वर । ब्रह्मादि ईश्वरांचा ईश्वर । ऐसें बोलती ऋषीश्वर । आणि वेदार्थवेत्ता श्रीव्यास. ॥ ५०० ॥ आणि तूं स्वयें देव । म्हणसी इतर देव मी देवाधिदेव । तूंच हे स्वयमेव । बोलसी प्रत्यक्षही. ॥ ५०१ ॥ ऐसें या श्लोकीं बोलिला । तों कांहीं संदेहाचा ठाव देखिला । कीं महिमाच वर्णितो आपला । निश्चय कांहीं नाहीं बोलिलों. ॥ ५०२ ॥ ऐकोनि इतकेही निर्णय । अनधिकारियास येविषयीं न बाणे निश्चय । पाषाण अंतरीं ओला न होय । असोनिही अमृतसागरी सर्वदा. ॥ ५०३ ॥ हे शिकले शब्द शुक । पक्षीही बोलेल काय त्याचे कौतुक । हें अतरीं ठसावें ज्यास भूक । असेल परम स्वहिताची. ॥ ५०४ ॥ तरी धरूनि स्वहिताची मती । विभूति याच्या आणि योग याचा मागुती । मज पुसणें असे या सर्वेश्वराप्रती । यथार्थ मानूनि हें सर्व. ॥ ५०५ ॥ धरोनि ऐसा भाव । आपला अंतर्भाव पांडव । जाळावया जनसंदेहखाडव । बोलतसे हा श्लोक. ॥ ५०६ ॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**

केशवा! हें सकळ । जें ऋषि बोलती आणि तूही स्वयें केवळ । स्वमहिमा जो वदसी निर्मळ । हें समूळ मानितों मी सत्य. ॥ ५०७ ॥ ऐसी ऋषींची वाणी । आणि जें बोलिला चक्रपाणी । सर्व सत्य मानितों अंतःकरणीं ।

म्हणोनि अर्धश्लोके **अर्जुन** बोलिला. ॥ ९०८ ॥ आतां त्या सर्वां शब्दांत । याच अध्यायांत । एक गोष्टी बोलिला **भगवंत** । ते युक्तिसिद्ध अत्यंत **अर्जु**-नातें बिंबली. ॥ ९०९ ॥ की सकलजगत्कारण । प्रथम माया प्रगटतां ब्रह्म होतें सगुण । त्याची अभिव्यक्ति[1] कोणी सुरगण । आणि ऋषीही न जाणती. ॥ ९१० ॥ की बापाचा जन्मदिवस । जैसा नाहीं दिसत पुत्रास । तैसी ईश्वराची अभिव्यक्ति कोणास । ठाउकी नसे. ॥ ९११ ॥ **'न मे विदुः सुरगणाः'** । या अर्धश्लोके **श्रीकृष्ण** बोलिला कीं सुरगणा । आणि महर्षींसही **अर्जुना** । प्रादुर्भावकाळ[2] माझा विदित नाहीं. ॥ ९१२ ॥ आणि **'अहमादिर्हि देवानां'** म्हणोनी । ऐसें बोलिला या उत्तरार्धेंकरूनी । कीं मी आदि देवां ऋषींचाही म्हणूनि त्रिभुवनीं । कोणी माझ्या अभिव्यक्तीतें नेणती. ॥ ९१३ ॥ जे ऐसी गोष्टी **अर्जुनें** ऐकिली । ते सर्वां गोष्टींची किल्ली । ते आपणास दृढ बिंबली । ऐसें बोलोनि दाखवितो उत्तरार्धें. ॥ ९१४ ॥

**नहि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥**

**भगवंता!** तुझी व्यक्ती । म्हणिजे तुझी अभिव्यक्ती । निर्गुणीं सगुणत्व होणें हे प्रसक्ती[3] । न जाणती देव अथवा दानव. ॥ ९१५ ॥ म्हणता न जाणती देव । त्यांत आले ऋषीही विप्र भूदेव । ऐसें तू बोलिलासि स्वयमेव । **'न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः'** म्हणोनी. ॥ ९१६ ॥ देव ऋषि न जाणती सर्व । हे दैवी संपत्तीचे देव । तैसेच दैवीसंपत्तीचे मानव । न जाणती ऐसेंही सिद्ध जालें. ॥ ९१७ ॥ तरी याहूनि विपरीत । आसुरी संपत्तीचेच अत्यंत । दैवी संपत्तीचे न जाणती तद्विपरीत । जाणत असतील शंका ऐसी घडों शके. ॥ ९१८ ॥ कीं भूचरां जें अगम्य । तें गगनचरां सुगम्य । देव न जाणती सौम्य[4] । तरी दानव क्रूर तद्विपरीत जाणती. ॥ ९१९ ॥ ऐसें संशयाचें स्थळ । म्हणोनि म्हणतो **अर्जुन** कुशळ । कीं तुझी अभिव्यक्ति विश्वाचें मूळ । दानवही न जाणती. ॥ ९२० ॥ आधीं ब्रह्मादि देव । मग ऋषींचा उद्भव । त्यापासूनि संभव । दानवादिकांचा. ॥ ९२१ ॥ ते देव ते ऋषि नेणती । तेन्हां दानव बापडे काय जाणती । या भावें **श्रीपती**प्रती । दानवही न जाणती म्हणे **पार्थ.** ॥ ९२२ ॥ एवं च तू सर्वांचा आदी । ऐसिया तुझा प्रादुर्भाव जो अनादी । ते व्यक्ति अभिव्यक्ति तुझी ब्रह्मादी । न जाणती पुत्र जन्मदिन जैसा बापाचा. ॥ ९२३ ॥ आतां यानंतरे श्लोक । तो कां बोलेल **पुण्यश्लोक** । त्याचें निमित्त सुज्ञलोक । आइकोत आधीं. ॥ ९२४ ॥ आपला प्रादुर्भाव । न जाणती

---

१. स्वरूप. २. प्रगटण्याचा काळ. ३. प्रसग. ४. सात्त्विक, भोळे

ऋषि देव । म्हणोनि या अध्यायांतचि मागें देवाधिदेव । बोलिला होता. ॥ ९२५ ॥ यांत सकळां कारणांचे कारण । आपण ब्रह्म सगुण । ऐसें सूचवी ते खूण । बाणली दृढ हृदयांत अर्जुनाच्या. ॥ ९२६ ॥ त्याचा प्रस्तुतीं अनुवाद । पार्थें केला विशद । कीं तूं सगुणत्वें स्वच्छद । प्रगटतोसि ते व्यक्ति तुझी कोणी न जाणती. ॥ ९२७ ॥ कीं तूं सकळांचें मूळ । तुज ते कैसे जाणती सकळ । या भावें बोलता कांहीं संशयाकुल । चित्त जाले. ॥ ९२८ ॥ कीं कोणासही नाही कळला । तरी प्रादुर्भाव जाला कैसा कळों आला? । संदेह पडतांच दूर जाला । कीं आपला प्रादुर्भाव आपणचि जाणतो. ॥ ९२९ ॥ यात निर्गुणत्वीं निर्धर्मता । तेथेंचि सगुणत्वी सधर्मता । स्पर्शोनि बुद्धीकरूनि तत्त्वता । बोलतसे हा श्लोक. ॥ ९३० ॥

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

जी तूं स्वयें आपणासि आपण । जाणसी की सर्वज्ञ सर्वांचें कारण । निर्धर्मी निर्गुणीं हेंही स्फुरण । नसे हें ज्ञान योगें मायेच्या. ॥ ९३१ ॥ तूं निखळ चित्स्वरूप निर्गुण । तेथें जें आपणास जाणणें आपण । हा मायागुणवृत्तियोगे स्फुरण । प्रभव प्रादुर्भाव हाचि मायेचा. ॥ ९३२ ॥ अकस्मात् किरणीं प्रगटे । त्या जळाभासाचा प्रादुर्भाव न कधीं खुंटे । लीन होउनी स्वयेंचि उमटे । प्रतिदिनीं. ॥ ९३३ ॥ तैसी सृष्टीच्या आदिकाळीं । माया प्रगटे केवळीं । तरंग चित्समुद्रजळीं । वृत्तिरूप ती करी. ॥ ९३४ ॥ आपण ब्रह्म निर्गुण । आपण सर्वज्ञ सगुण । ऐसें आपणास आपण । जाणसी सुजाण त्याच मायेंकरूनी. ॥ ९३५ ॥ ते माया तुझी शक्ती । तुझी शक्तीच तुझी व्यक्ती । त्या शुद्ध मायेची अभिव्यक्ती । तोचि अनादि प्रादुर्भाव सगुणाचा. ॥ ९३६ ॥ ते तुझी चिच्छक्ति माया देवा! । जैसी आमुची बुद्धि देवाधिदेवा! । ते मायेंकरूनि आपल्या निर्गुणत्वभावा । तूं जाणसी. ॥ ९३७ ॥ **'आत्मनात्मानं वेत्थ त्वं'** म्हणोनी । अर्जुन म्हणे ये रीती समजोनी । कीं आत्मा बुद्धि माया तीकरूनी । **'आत्मानं वेत्थ'** म्हणजे आपणातें जाणसी. ॥ ९३८ ॥ परंतु या गोष्टीचा करितां शोध । कांहीं प्राप्त होतो विरोध । कीं आपणास आपण जाणणें हा बोध । ब्रह्मस्वरूप माया न म्हणवे. ॥ ९३९ ॥ माया म्हणतां होते दुसरी । आपणास आपण जाणणें ते सत्ता खरी । ते सत्ता चित्स्वरूपचि परी । प्रत्यय सधर्मता वृत्ति मायेची. ॥ ९४० ॥ आतां मायाही अंगीकारावी । आणि जाणणें हे सत्ताच स्वस्वरूपीं उरवावी । तेव्हां माया दावूनि उडवावी ।

नाहींच म्हणोनी. ॥ ९४१ ॥ तरी माया म्हणूनी । 'माया'शब्दें अक्षरे दोन्ही । ते माया असोनि नाही या अर्थेंकरूनी । दैवी माया नाम तीचें प्रसिद्ध. ॥९४२॥ 'मा' म्हणिजे नाहीं । 'या' म्हणिजे ऐसी नसोनि भासे जे कांहीं । ते ते कीं मृगजळ न दिसे कोणासही । किरणावांचूनि स्वयें जैसें. ॥ ९४३ ॥ मृगजळ दृष्टीं पडे । परि किरणावाचूनि कांही न सांपडे । कांही नसोनि उद्भव तों घडे । प्रतिदिवशीं किरणांत. ॥ ९४४ ॥ अत एव आपण निर्गुण । ऐशा अखंडाद्वैतानुभवें सगुण । कीं द्वैत धरूनि तो मायागुण । प्रगटेच ना. ॥ ९४५ ॥ या कारणें मायेंकरूनी । आपणास जाणसी ऐसें बोलणें म्हणोनी । स्वयमेव म्हणूनि आधींच या वचनीं । परिहरिले बाध सकळही. ॥ ९४६ ॥ कीं माया ही वेगळी नसे । आणि वेगळी न दिसोनिही भासे । आहेसी तरी स्वयेंच जाणसी ऐसें । अनुभवी तूतें समजती. ॥ ९४७ ॥ की तूं चित्समुद्रबोधस्वरूप । तेथें प्रत्यय धर्म तो माया तरगरूप । दृष्टी न पाहे तरी दीप । प्रत्ययरहित प्रकाशरूपे राजतो प्रकाशतो. ॥ ९४८ ॥ सुषुप्तींत कैचा प्रत्यय? । परि आनद मात्र उरतो अद्वय । तोचि पुन्हा बुद्धीस घेऊन निश्चय । सुषुप्तिसुखाचा करीतसे. ॥ ९४९ ॥ सुषुप्तींत सुखस्वरूपत्व ज्याला । देहादि सर्वं द्रष्टृत्वही त्याला । एवं प्रत्यय मायायोगें बोला । त्याच निर्धर्मा प्रत्ययप्रकाशकातें. ॥ ९५० ॥ सुषुप्तींत सत्त्वतमीं । प्रलयानंतर ईश्वरोपाधि ब्रह्मीं । योगनिद्रे उपरि जागृति पुरुषोत्तमी । जैसी सुषुप्त्युपरि जागृति जनातें. ॥ ९५१ ॥ एव ऐसी ही शुद्ध माया । आपण निर्गुण म्हणोनि देवराया! । अखंडानुभवीं असतां अज अव्यया । स्वयमेव जाणसी का न म्हणावे? ॥ ९५२ ॥ स्वयें जरी निर्धर्म । अनुभवमायायोगें सधर्म । तरी स्वयमेव तूचि की वर्म । सांपडले अद्वितीयत्वाचें. ॥ ९५३ ॥ कीं जळीं जळच असतां कैचा । तरग बुद्बुदांचा आकार साचा? । चित्स्वरूपीं विचार वृत्तीचा । इतकाचि. ॥ ९५४ ॥ आकाश जैसा तैसाच केवळ । असोनि पात्रानुरूप त्रिकोण चतुष्कोण वर्तुळ । कीं यथापूर्व असोनि नानाकार भासे जळ । वाफे नानाकार पावूनी. ॥ ९५५ ॥ एवं मायावाच्यांश असे । परि पाहता वेगळी न दिसे । माया सत्यत्वें पदार्थ वेगळा गवसे । तरी दुसरा ऐसें म्हणावें. ॥ ९५६ ॥ याकारणें अर्जुन स्ववचनीं । दाखवी हे प्रकार दोन्ही । स्वयमेव ऐसे आधीं म्हणोनी । मायोपाधींकरूनि जाणसीही बोलिला. ॥ ९५७ ॥ माया आणि स्वरूप । व्यतिरेकें या दोहींचें वेगळे रूप । आणि दोहींचे ऐक्यान्वय अध्यात्मदीप । जाणे तोचि. अनुभवी जाणावा. ॥ ९५८ ॥ बुद्धीनें आत्मप्रत्यय । तेथें बुद्धि वेगळी स्वरूप

वेगळें हा अतर्क्य निश्चय । अनुभवातीत अनुभवें जाणे तोचि होय । आत्मवेत्ता. ॥ ९५९ ॥ दीप दृष्टीतें दिसे । न पाहता तैसाच असे । परंतु पाहणें हा धर्म न वसे । दृष्टीवेगळा दीपातें. ॥ ९६० ॥ निर्गुणास जाणे बुद्धी । निर्गुणेचि तिची तीस बोद्धव्यसिद्धी । परि निजानुभव समृद्धी । हाही धर्म निर्धर्मी लागेना. ॥ ९६१ ॥ असो हें बोलणें अपार । ग्रंथ वाढतो बहु फार । एवं प्रकरणानुरूप जाला निर्धार । की आपणास आपणचि तूं जाणसी. ॥ ९६२ ॥ कीं मायेचा नव्हता प्रादुर्भाव । निर्गुणीं नसे ईश्वरत्वाचा अनुभव । तूं आपणा आपण जाणसी देवाधिदेव । तोचि प्रादुर्भाव तुझा तू जाणसी. ॥ ९६३ ॥ ऐसी हे माया अनादी । तीकरूनि तूं निर्मिसी ब्रह्मादी । म्हणोनि तूं अनादि सर्वांचा आदी । जो जाणसी प्रादुर्भाव सर्वा तत्त्वांचा. ॥ ९६४ ॥ तैसी तुझी व्यक्ती । कोणी न जाणती प्रथम अभिव्यक्ती । पुत्र पौत्र मूळपुरुषाची उत्पत्ती । न जाणती नवल काय? ॥ ९६५ ॥ पूर्वश्लोकीं ये रीती । बोलोनि या श्लोकीं म्हणे स्वामीप्रती । कीं तूतें तूंचि जगत्पती । जाणसी म्हणोनी. ॥ ९६६ ॥ याकारणें तू पुरुषोत्तम । सर्वांचें मूळ सर्वां पुरुषांहूनि उत्तम । कीं सर्वां भूताचा उगम । तुझ्या कल्पनेपासूनी. ॥ ९६७ ॥ म्हणोनि म्हणे तूं **'भूतभावन'** । कीं भूतें भाविसी कल्पिसी जगज्जीवन । आणि तूंचि भूतेश म्हणे अर्जुन । कीं भूतें कल्पूनि तूंचि वर्तविसी. ॥ ९६८ ॥ आधीं कल्पिलीं पंच भूतें । मग देव मनुष्यादि शरीरें केलीं बहुतें । म्हणोनि म्हणावें देवा! तूतें । देवदेव म्हणोनी. ॥ ९६९ ॥ कीं ब्रह्मादि देवगण । तेही सृष्ट्यादिकर्ते निपुण । परंतु आयत्या मातीचे डेरे रांजण । करिती जैसे कुंभार. ॥ ९७० ॥ परि ते न करूं शकती माती । तैसीं भूतें देव न करूं शकती । त्या भूतांतें तूचि कल्पिसी श्रीपती । म्हणोनि ते देव तूं देवदेव देवाधिदेवा! ॥ ९७१ ॥ तत्त्वरीतीं करूनी । तूं देवाधिदेव म्हणोनी । अर्जुन म्हणे तों मनीं । कांही शंकला. ॥ ९७२ ॥ की हा सर्वांचा आदि म्हणोनी । थोर म्हणावा इतक्याचि वरूनी । परंतु पुत्र पौत्र मूळपुरुषाहीहुनी । सभाग्य दिसती. ॥ ९७३ ॥ तरी हे देव लोकपाळ । एक एक लोक पाळिती विशाळ । ऐशांचाही देव हा गोपाळ । कैसा म्हणावा? ॥ ९७४ ॥ तों आठवला श्लोक । **'यो मामजमनादिं च'** या श्लोकीं उत्तमश्लोक । म्हणे कीं सर्वलोकमहेश्वर मी एक । ऐसें जाणे तो सुटे सर्वां पापापासूनी. ॥ ९७५ ॥ म्हणोनि म्हणतो की तो तूं जगत्पती । ते देव एका एका लोकाचे पती । हे एका ब्रह्मांडांत ऐसे किती । असंख्यात ब्रह्मांडें पती त्यांचा तूं एक. ॥ ९७६ ॥ ऐसें जें

जे वदे अर्जुन । त्या त्यास प्रमाण भगवद्वचन । तरीच म्हणे की ऋषि आणि तूंही भवभंजन । ऐसेंच बोलसी. ॥ ९७७ ॥ ऐसा सर्वोत्कर्षरीतीं । ज्या कारणें विनविला श्रीपती । ते गोष्टी आतां त्याप्रती । बोलतसे या श्लोकीं. ॥ ९७८ ॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

आतां देवा ! तुझ्या विभूती । ज्या विभूतींकरूनि जगत्पती ! । असती व्यापूनि हे लोक नानारीती , त्या विभूति मजप्रति सांगाव्या. ॥ ९७९ ॥ तूं सर्वजगत्पती । आणि तुझ्याच सकळा विभूती । तरी त्या सांगावयास तूंचि संतांचा पती । योग्य होसी. ॥ ९८० ॥ इतरांस कैशा आणि किती । काय कळती तूझ्या विभूती । तूं सर्वा विभूतींचा पती । देवदेव म्हणूनि आधीच वदलों यालागीं. ॥ ९८१ ॥ सप्तमाध्यायात । कांहीं विभूति बोलिलाच भगवंत । म्हणोनि म्हणतो बुद्धिमत । की अशेषें साग म्हणोनी. ॥ ९८२ ॥ ऐसा प्रश्न केला । तों कांहीं मनीं शंकला । कीं विभूति याच्या जाणूनि याला । प्रेमें भजतां ज्ञान हा देव देतसे. ॥ ९८३ ॥ तें तरी आपणास ज्ञान । देऊनि नाशिलें अज्ञान । आतां कां विभूति पुसतोसि ? ऐसें वचन । ह्मणी बोलेल. ॥ ९८४ ॥ विभूतिज्ञानाचा तों महिमा । ऐकतां आपणास उपजला प्रेमा । कीं प्रार्थूनियां पुरुषोत्तमा । विभूति पुसों. ॥ ९८५ ॥ तरी आत्मत्वें सकळ । पाहता हाचि केवळ । परंतु सगुणत्वाचे अंश निर्मळ । याचे जगीं विभूतिरूपें पाहावे. ॥ ९८६ ॥ याकारणें विभूती । किमर्थ पुससी म्हणे जों श्रीपती । तों आधींच अर्जुन त्याप्रती । बोलतसे हा श्लोक. ॥ ९८७ ॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिंत्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥**

योगाघटित सामर्थ्य ईश्वराचें । जें **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनि साचें । नवमीं अर्जुनास दाविलें तें योगैश्वर्य ज्याचे । तो तूं योगी म्हणे या श्लोकीं अर्जुन. ॥ ९८८ ॥ कीं अगा योगिया! तूतें चिंतित । मी असेन कीं मूर्तिमत भासेन भगवंत । परि ऐसें चिंतित असतां अत्यंत । सामर्थ्य तुझें म्यां कोठें कोठे पाहावें? ॥ ९८९ ॥ सदा सर्वदा योगरूप । तूं दिससी पटीं जैसा ततु चित्स्वरूप । परंतु तुझे सामर्थ्य विशेष प्रताप । तूंचि म्हणोनि म्यां कोठे कोठे चितावें? ॥ ९९० ॥ सर्वत्र योगरूपें चिंतित । विशेषें विभूतिरूपें तूं भगवंत । त्या तूतें म्यां प्रेमें अत्यंत । कोणे कोणे भावीं चि-

तावें? ॥ ५९१ ॥ अगा योगिया! मी तूतें। चिंतित असतां चित्तें। कोण कोणत्या भावाचे ठायीं शरणागतें। तूं चितावास भगवता!? ॥ ५९२ ॥ ऐसें म्हणे अर्जुन। या 'योगि'शब्दांत हा भाव गहन। कीं चिंतित असोनि चिंतन। विभूतिरूपे म्यां कोठे कोठे करावें? ॥ ५९३ ॥ योगरूपें चिंतित असोनी। विभूतिरूपें गुण विशेष देखोनी। ज्या भावाच्या ठायीं म्यां चिंतावें ते कोण कोण म्हणोनी। 'योगि'शब्दे हा भाव दाखविला. ॥ ५९४ ॥ पुसों जातां विभूति। शकित जाली अर्जुनाची मती। की म्हणेल श्रीपती। योग सोडूनि काय पाहसी विशेषें विभूतीतें? ॥ ५९५ ॥ म्हणोनि म्हणे जी! योगिया!। तूज योगरूपें चिंतित असोनिही अद्वया। विभूतिविशेष गुण मानूनिया। म्यां विभूतिरूपें कोठे कोठे चितावास? ॥ ५९६ ॥ यात योगाचें नाम नसे। परि योगिया म्हणतों दिसे। आणि 'विभूति'शब्दही या श्लोकीं न गवसे। परि कोठे कोठे चिंतावास म्हणतां तो अर्थ. ॥ ५९७ ॥ येथें दोन्ही शब्द पांडव। न बोलोनि बोलिला अर्थास्तव। म्हणोनि विशेष शब्द आणि विशेष भाव। बोलतसे या श्लोकीं. ॥ ५९८ ॥

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्॥ १८॥**

जो जनार्दना! योग आपला। आणि विभूति विस्तरे सांगें मागुती मला। कीं श्रवण केलें तरी नाहीं पुरला। सोहळा या अमृताचा. ॥ ५९९ ॥ कीं योगिया! योगरूपें तूतें। चिंतित असोनिही विभूतीतें। चितावें म्हणोनि मातें। सादर प्रेमा उपजला. ॥ ६०० ॥ पूर्वश्लोकीं हा भाव। माझा समजलाच साक्षी देव। म्हणोनि म्हणतो पांडव। कीं योगातें आणि विभूतीतें मज सांग. ॥ ६०१ ॥ कीं पुढें करूनि अद्वैत योगरीती। त्यात मेळवूनि सांग विभूती। अन्यथा झणी माझी मती। योग विसरूनि विभूतीच चिंतील. ॥ ६०२ ॥ कीं योगाविण। करिता विभूतीचें स्मरण। पडेल अद्वैतविस्मरण। अनर्थ तेव्हां. ॥ ६०३ ॥ कीं तू जनार्दन। काळरूपें करिसी जनांचें अर्दन[1]। भेद जन्ममरणबंधन। मग तू जनार्दन काळ आर्दिसीच. ॥ ६०४ ॥ यालागीं योग आपला। आणि विभूतीही पुन्हा सांग मजला। एव पूर्वील उपदेश आपणातें समजला। पुन्हा साग म्हणतां हें सूचवी. ॥ ६०५ ॥ पूर्वीं बोलिलासि संक्षेप। आतां सांग विस्तारें त्याचेंचि रूप। म्हणोनि जग-

१. नाश.

दाकारें योगस्वरूप । प्रार्थिला ऐसा. ॥ १०६ ॥ प्रश्न ऐसा ऐकूनी । योगविश्वात्मकत्व आधीं उपपादूनी । विभूति सांगेल याचें उत्तर देउनी । परम संतोषे या श्लोकीं श्रीभगवान्. ॥ १०७ ॥

**श्रीभगवानुवाच—हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥**

श्रीभगवान् षड्गुण । 'हत'शब्दें येविषयीं हर्षपूर्ण । बहु बरे सांगेन आणि आपण । बहु संतोषलों ऐसें 'हत'शब्दें सूचवी. ॥ १०८ ॥ की आपला आत्मा आणि विभूती । हीं सर्व दिव्य अलौकिके तुजप्रती । कुरुश्रेष्ठा! सांगेन म्हणोन श्रीपती । बोलतसे. ॥ १०९ ॥ योग आणि विभूती । दोन्ही मज साग ये रीती । प्रश्न केला त्यात श्रीपती । कुरुश्रेष्ठा विभूती । स्पष्ट म्हणतसे सांगेन. ॥ ११० ॥ आणि कुरुश्रेष्ठा! म्हणोनी । कृपेनें अर्जुनातें आळवूनी । योगही सांगेन ऐसें सूचवूनी । दोन्ही सांगेन म्हणोनि प्रतिज्ञा करितसे. ॥ १११ ॥ योगिया! तूज चिंतित असोनीं । म्हणजे विश्वयोग तुझा तूचि म्हणोनी । मी सदा तुज चिंतित असोनि मनीं । विभूतिरूपें कैसा चितू? हा प्रश्न. ॥११२॥ कीं भगवद्रूप सर्वदा सर्वेही पहावें । त्यांत ज्यातें गुणे विशेष देखावें । त्यासही भगवद्रूपें पाहूनि विशेषे मानावे । विभूति म्हणोनि, तरी त्या विभूति कोणत्या? ॥ ११३ ॥ यालागीं योग आणि विभूतीही उत्तमश्लोका! । साग म्हणोनि स्पष्ट बोलिला दुसरिया श्लोका । त्यात प्रत्युत्तरश्लोकीं विभूतीच एका । सागेन म्हणतो श्रीकृष्ण केवी घडे? ॥ ११४ ॥ आणि कोठे स्पष्ट कोठे अर्थास्तव । योगही बोलेल देव । तेंही तोचि देवाधिदेव । टीकामुखेंही बोलेल. ॥ ११५ ॥ तरी या श्लोकीं प्रतिज्ञा करितो । प्रश्न अनुमोदूनि सागेन म्हणतो। त्यांत विभूतीच सागेन ऐसें तो । इतकेचि कां म्हणेल? ॥ ११६ ॥ आतां शब्द थोडे अर्थ फार । हा श्रीगीताश्लोकाच्या चमत्कार । म्हणूनि कुरुश्रेष्ठा! म्हणतां सूचवी उत्तर । कीं योग सांगतचि विभूति सागेन. ॥ ११७ ॥ कुरु म्हणजे कौरवकुळ । योगरूपे भगवद्रूपचि केवळ । हा योग त्यांत विभूति आपली केवळ । तो तूं कुरुश्रेष्ठ अर्जुन ये रीती. ॥ ११८ ॥ **'पांडवानां धनंजयः'** म्हणोनी । पुढे ऐसेंचि बोलेल योग आपला सूचवूनी । की विभूतियोगीं दृष्टि देउनी । बोलणे याचि रीतीचें. ॥ ११९ ॥ सप्तमीं आणि या दशमीं । योगपूर्वक विभूति बोलतो स्वामी । पचदशींही विभूति बोलेल अंतर्यामीं । त्या योगावेगळ्या म्हणाव्या. ॥ १२० ॥ **'रसोऽहमप्सु कौंतेय'** । इत्यादि सप्तमीं विभूतीचा निर्णय । की उदकीं रस आणि विभूतीमय । प्रकाश

**शशिसू**र्यात मी असें. ॥ **६२१** ॥ प्रणव सर्वां वेदीं मी असें । इत्यादि सप्तमीं अमुकियात अमुके जैसें । विभूति म्हणे तैसें । याही दशमांत. ॥ ६२२ ॥ कीं उदक योग आणि रस विभूती । **शशिसूर्य** योग आणि विभूती ज्योती । तैसे **पां**डव योग **ध**नंजय **सु**भद्रापती । विभूति मूर्ति त्यांत **भ**गवंताची. ॥ ६२३ ॥ ऐसें **न** म्हणेल पचदशात । त्या नुसत्या विभूति बोलेल **भ**गवंत । की **चं**द्र होऊनि औषधीते असे पाळित । **वै**श्वानर होऊनि पचवितों अन्नातें. ॥ ६२४ ॥ या दों अध्यायांत । **वि**ष्णु मी **आ**दित्यांत । **वा**सुदेव मी **या**द-वांत । **पां**डवांमध्ये **ध**नंजय मी. ॥ ६२५ ॥ तैसी या श्लोकीं प्रतिज्ञा करितो । प्रश्नानुरूप विभूति स्पष्ट सांगेन म्हणतो । आणि विभूति सागता अर्थास्तव तो । योगही सांगेल. ॥ ६२६ ॥ तैसाच **कु**रुश्रेष्ठा! या वचनीं । अर्थास्तव योगही सागेन म्हणोनी । **कु**रुश्रेष्ठा! या नामें आळवूनी । योगी विभूति स्प-र्शवूनि सांगेन म्हणतसे. ॥ ६२७ ॥ आणि विभूति पूजार्ह स्थळ । तेथें पूजादि स्पष्ट दिसतो भाव केवळ । योग सर्वत्र साधारण निवळ । **भ**गवद्रूप म्हणोनि पाहतचि असावें. ॥ ६२८ ॥ आणि आरंभीं मध्यें अतीं । स्पष्ट योगही बोलेल **श्री**पती । तैसा या श्लोकीं **अ**र्जुनाप्रति । योग विभूतींत मेळ-वूनि म्हणतो सागेन. ॥ ६२९ ॥ **'आत्मविभूतयः'** म्हणोनी । आत्मा आणि विभूति या व्युत्पत्तीकरूनी । आत्मा देहासही म्हणावे यावरूनी । आपला योगचि देह आपला हा अर्थ. ॥ ६३० ॥ देह आपला चराचर । चराचराचे अघटितघटनायोग ऐश्वर । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनि **यो**गेश्वर । नवमीं बोलिला. ॥ ६३१ ॥ मजमाजि भूतें सकळ । मी त्या भूतीं नसें केवळ । कीं माळेच्या आश्रयें दिसे व्याळ । परि माळ सर्पी कधींच नसे. ॥ ६३२ ॥ तरी वस्तुतः माळचि असे । व्याळ नसेचि यद्यपि दिसे । तरी भूतसमुदायही तुजमाजि तसे । **पा**र्था! ऐसें म्हणसी तरी भूतेंही नसती मजमाजीं. ॥ ६३३ ॥ तरी दिसते तें काय आहे? । **अ**र्जुना! म्हणसी तरी योग मज **ई**श्वराचा पाहे । एवं योगैश्वर्य **अ**र्जुनमनी राहे । कीं रचना अघ-टितघटना विश्व **भ**गवद्रूप म्हणावें. ॥ ६३४ ॥ एवं आत्मविभूती । सांगेन म्हणे **श्री**पती । कीं आत्मा देह तो योग आणि तुजप्रती । विभूतीही सागेन. ॥ ६३५ ॥ एवं जें श्रेष्ठ ज्यात । तें विभूति त्या योगांत । परि यास नसे अत । की अनंत विभूति अनंत योग आपला. ॥ ६३६ ॥ विभूतीस नसे अंत । तेव्हा त्या विभूति ज्यात त्यात । त्यास कैचा अत कीं अनंत । योग आपला ? ॥ ६३७ ॥ एव विभूति आणि योग मिळोनी । सर्व आपला प्रपंच-

विस्तार म्हणोनी । माझ्या विस्तारास अत नाहीं ऐसें बोलोनी । मुख्य मुख्य विभूति सागेन म्हणतसे. ॥ १३८ ॥ सांगतां मुख्य मुख्य विभूती । त्या ज्या ज्यांत ये रीती । म्हणेल तो योग त्या प्रसंगीं तुजप्रती । सांगेन म्हणतसे. ॥ १३९ ॥ आतां प्रश्नानुक्रमें देव । उत्तर देतो देवाधिदेव । **'विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च'** या श्लोकें पांडव । पुसता जाला प्रथम योगातें. ॥ १४० ॥ मग पुसता जाला विभूती । म्हणोनि आधीं जगत्पती । चैतन्य जड दो परी ख्याती । दोन्ही मिळोनि विभूति आणि योग आपलाचि. ॥ १४१ ॥ पूर्वार्धीं जडचैतन्यभेद । दावूनि बोलेल आपणासि अभेद । उत्तरार्धे जडप्रपच गोविद । आपणचि म्हणोनि विभूतीसह योग बोलतो या श्लोकीं. ॥ १४२ ॥

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**

अर्जुना! सर्वा भूतांचा आशय । कीं आपलें बरें हो आणि वाईट न हो हा निश्चय । त्या आशयांत मीच आत्मा निःसंशय । जो मीपणें राहु चंद्राकृति जैसा स्फुरतसे. ॥ १४३ ॥ अगा अर्जुना! तुझी आण । तो मीच आत्मा सर्वांचा जाण । त्या आशयावेगळा निवडूनि पाहती सुजाण । राहुवेगळा चंद्र जैसा. ॥ १४४ ॥ राहू न दिसे चंद्रावांचूनी । परि चंद्र त्या राहुयोगेंकरूनी । जनदृष्टी हतप्रभ[1] होऊनी । दिसे तें श्यामत्व त्याच राहूचें. ॥ १४५ ॥ तैसें अहंस्फुरण । तेंच वाईट त्यांत अमृतकिरण । चैतन्य आहे निवारण । अविद्येनें अहरूप बुद्धि ते वाटतसे. ॥ १४६ ॥ खड्ग उष्णांत चंचळ । त्याच्या निर्मळपणीं चळे झळझळ । उष्ण न हालतां डळमळ । निर्मळ खड्गीं दिसे उष्णाची. ॥ १४७ ॥ तैसें सत्त्व अंतःकरण । निर्मळ जैसा दर्पण । त्यात चैतन्य निर्गुण । अहंप्रत्ययरूप तयातें वाटतसे. ॥ १४८ ॥ त्या मीपणीं आशय । मज सुखचि हो हा निश्चय । परि चित्स्वरूप सर्वभूतीं अद्वय । जें त्या आशयांत सर्वांच्या. ॥ १४९ ॥ ते आशय सर्व माया । माया तितकी योग माझा धनजया! । त्या योगीं जीव तितके त्यांवरी दया । करावी विभूति अशरूप त्या माझ्या हा भाव. ॥ १५० ॥ सावधानपणें करूनिया । विभूति माझ्या पाहें धनंजया! । म्हणोनि गुडाकेश नामें तया । आळवी येथें. ॥ १५१ ॥ गुडाका म्हणजे निद्रा तिला । जो स्ववश करील त्या पुरुषाला । गुडाकेश म्हणावें कीं ज्याला । निद्रा म्हणिजे स्वहितविस्मृति असेना. ॥ १५२ ॥ हे निद्रा झोंप न म्हणावी । निद्रा स्वहितविस्मृति गणावी ।

---

१. प्रभारहित.

'**गु**डाकेश'पदवी वर्णावी । त्याची ज्यास विस्मरण नाहीं स्वहिताचें. ॥ ६५३ ॥ तरी **अर्जुन** परम चतुर । स्वहिताविषयीं तत्पर । म्हणोनि ये स्थळीं म्हणे **सर्वे**श्वर । '**गु**डाकेशा !' म्हणोनी. ॥ ६५४ ॥ की 'सावधान **धनं**जया ! । या माझ्या विभूतीवरी करीं दया । सुख दे पाहूनि त्यांच्या आशया । कीं असें मी त्यांच्या त्या त्या आशयात. ॥६५५॥ आशयांत आत्मा असे तो मी' । हें याच भावें म्हणे जगाचा स्वामी । की 'आशय ज्याचा ज्या कामीं । तो पूर्ण करी मज त्या आशयात लक्षूनी. ॥ ६५६ ॥ अगा ! जो भुकेला । आशय त्याचाच की अन्न मिळो मला । तूं अन्न देतां सुख त्याला । जो मद्रूप अंश माझ्या आशयांत. ॥ ६५७ ॥ उदकाकारणे तृषित । तो उदकचि इच्छी निश्चित । त्या आशयांत मीच **भ**गवंत । तृप्त होतसें जळपानें. ॥ ६५८ ॥ भोक्तृत्व चिदशावाचुनी । न घडे हे त्रयोदशीं पंचदशीं स्पष्ट करूनी । **'पुरुषः सुख-दुःखानां भोक्तृत्वे हेतुः'** म्हणोनी । आणि **'ममैवांशो जीवलोके'** ऐसें बोलेल. ॥ ६५९ ॥ इत्यादि सर्व काम । ज्या आशयांत तेथें मी **आ**त्माराम । चिदशरूप माझे धाम । आशयच सर्वा भूताचा.' ॥ ६६० ॥ इत्यादि कोटि कोटि भाव । 'आशय' शब्दांत दावी **दे**व । 'ते आशय पुरवितां मी **दे**वाधिदेव । सुखी होतों सावधान राहें ये विषयीं.' ॥ ६६१ ॥ म्हणूनि त्यास '**गु**डाकेश' । म्हणे ये स्थळीं हृषीकेश । त्या भावार्थकोटींतूनि लेश । सूचनार्थ वर्णिला ये स्थळीं. ॥ ६६२ ॥ या अर्धश्लोकीं ऐसा निर्णय । कीं 'सर्वभूतें आणि त्यांचे आशय । हे माया तेव्हां योग आपला निःसंशय । त्यात मी आत्मा विभूति जीवत्वें.' ॥ ६६३ ॥ आतां उत्तरार्धी **दे**व । 'योग माझा माया मी स्वयमेव' । म्हणोनि ऐसें बोलतो **दे**वाधिदेव । की योग विश्व तें आपण हें साधे. ॥ ६६४ ॥ भूतांस योगपण । साधिता नवमाध्यायात आपण । बोलिला कीं 'निर्गुणीं विश्व त्रिगुण । नसोनि असे हा योग. ॥ ६६५ ॥ नसोनि असे हा योग ऐसें द्वैत । कळतांच होतें अद्वैत । परि ऐसें दिसोनि नसणें अत्यत । दों प्रकारीं समजावें. ॥ ६६६ ॥ कीं स्वये प्रकाशे सुवर्ण । अलकार न प्रकाशे त्याविण । जितकें मिथ्या त्याची हे एकचि खूण । खूण दुसरीही ऐसी याच्या ओळखीची. ॥ ६६७ ॥ कीं कनकीं अलंकाराचे काळ तिन्ही । आदि मध्य अंत म्हणोनी । त्यांत दो काळीं नसेच मध्यें दिसोनि । नसे सुवर्णावेगळा. ॥ ६६८ ॥ या दों मिथ्यात्वप्रकारांत । योग सागतां नवमांत । भूतें मजमाजी परि मी नसें भूतात । तींही न मजमध्यें हा एक प्रकार निवडिला. ॥ ६६९ ॥ सर्प रज्जूंत असे ।

कीं असे ऐसा त्या रज्जूकरितांचि दिसे । परि रज्जु सर्पांत न वसे । कीं नसेच सर्प रज्जूत.' ॥ ६७० ॥ नवमाध्यायांत **'मत्स्थानि सर्वभूतानि । न चाहं तेष्ववस्थितः'** म्हणोनी । **'न च मत्स्थानि भूतानि'** याहीवरूनी । प्रपंच असोनि नाहीं हें सिद्ध केलें. ॥ ६७१ ॥ 'म्यां अव्यक्त मूर्तीनें । केवळ चिन्मात्र वस्तुस्फूर्तीनें । हें व्यापिलें पाहें म्हणतां स्वप्रकाश अर्जुनें । चैतन्यच असे परप्रकाश्य जड नसे हें देखिलें. ॥ ६७२ ॥ आतां कालत्रयांतही कनक । एकेच काळीं मुकुटादिक । तेव्हां आदि मध्य अंत ऐसा हा त्रिक । सोनेंचि दाखवी अलंकाराचा. ॥ ६७३ ॥ या प्रकारीं अलंकार । नसोनि दिसे जो आकार । तो सुवर्णाचा योग हा दुसरा प्रकार । तत्त्व कळायाचा बोलतसे उत्तरार्धें.' ॥ ६७४ ॥

**अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥**

'अगा! मी सर्वां भूताचा आदी । मध्य अंत मी स्वयें अनादी । जैसा पाहतां कटककुंडलादि । आदि मध्य अंत सोनेंचि. ॥ ६७५ ॥ एवं च विश्व नसे । मीच असें जें नसोनि दिसे । परंतु चित्स्वरूप मी त्यांत न गवसें । लक्षण ऐसें. ॥ ६७६ ॥ चित्स्वरूप यथास्थित । आणि प्रपंचरूपें असे भासत । त्या केवळपणास पाहतां अत्यंत । माया म्हणावें लागतें. ॥ ६७७ ॥ म्हणोनि म्हणावी माया । जीस वेद म्हणती योगमाया । म्हणोनि विश्वाकार धनंजया ! । योग माझा तूं पाहें हा भाव. ॥ ६७८ ॥ योग माझा हा नानाकारें । नवमीं बोलिलों एका प्रकारें । पुन्हा योगही सांग विस्तारें । म्हणोनि प्रश्न तुझा. ॥ ६७९ ॥ तरी हा प्रकार दुसरा । योगविस्तार एकसरा । तूं याही विचारदृष्टीं पाहें बरा । कीं जें आदि अंतीं मध्येंही तेंचि कीं. ॥ ६८० ॥ अलंकाराचा आदि आणि अंत । सोनें तेव्हां मध्येंही तेंचि निश्चित । तैसा जगासि आदि अंत मी भगवंत । तेव्हां मध्येंही मीच योगरूपें ऐसें मज पाहें.' ॥ ६८१ ॥ एवं च पूर्वार्धीं योगविभूती । बोलिला तें सिद्ध करूनि श्रीपती । आतां त्यांतही विशेष विभूति त्याप्रती । योगपूर्वक बोलतो. ॥ ६८२ ॥ किमर्थ पुढिल्या श्लोकाची प्रवृत्ती । हें प्रथम बोलणें टीकेची रीती । आतां विभूतीपुढें विभूती । श्लोकप्रवृत्तिपुढें बोलणें लागेना. ॥ ६८३ ॥ अध्यायपर्यंत । प्रतिश्लोकीं हेंचि निमित्त । कीं अर्जुनें प्रश्न केला त्यावरूनि भगवंत । योग दावूनि विभूति बोलतो प्रथम त्यांत हा श्लोक. ॥ ६८४ ॥

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥**

'आदित्य इंद्रादि देव । त्यांत वामनरूपे विष्णु स्वयमेव । ते आदित्यही मी देवाधिदेव । योगमूर्ति परि वामनरूपे विभूति मी. ॥ ६८५ ॥ की देवांत त्या माझी गणना । आणि ते इद्रियाभिमानी अर्जुना! । त्यांत उपेद्रनामें वामना । दैवतपण पायाचे. ॥ ६८६ ॥ की ज्या इद्रियांचा जो विषय । त्याप्रति नेऊनि पावविती पाय । त्या पायांचे दैवत तोचि होय । जो गतिप्रद सर्वा जीवांचा. ॥ ६८७ ॥ पाहतां अर्जुना! अगा! । गतिप्रदत्व माझ्याच आले विभागा । की स्वर्गा आणि अपवर्गा । कोण देणार मजविणे? ॥ ६८८ ॥ पाहावया संतांचे चरण । सूर्यचि नेत्रासि कारण । करिता कुत्सितपदार्थनिरीक्षण । काय दुसरा तेथे येतसे? ॥ ६८९ ॥ तैसा स्वर्गापवर्गगती । मी देणार जगत्पती । तेथें विपयादि प्राप्तीच्या गतीप्रती । कोण दुसरा योग्य होतो? ॥ ६९० ॥ एव च देवांत वामन । विभूति माझी जगत्पावन । आता ज्योति जितकिया थोर लहान । त्या योग त्यांत सूर्य मी विभूती. ॥ ६९१ ॥ की किरण ज्या सूर्याचे । प्रकाशक लोकत्रयाचे । म्हणोनि तो अशुमान्' ऐसें स्ववाचे । म्हणे श्रीकृष्ण. ॥ ६९२ ॥ 'आता देवतांत मरुद्गण । एका उणें पन्नास त्यांत सुलक्षण । मरीचिनामक तो विभूतिरूपे आपण । वरकड योगरूपे मीच असें. ॥ ६९३ ॥ नक्षत्रांत चंद्रमा । तो मी विभूतिरूपे कुरुकुलोत्तमा! । नक्षत्रे मीच योगरूपे परि महिमा । त्यांत विशेष म्हणोनि तें विभूतिरूप.' ॥ ६९४ ॥

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥**

'योगरूपे मीच सकळ निगम । परि गानरूपे वेद साम । कीर्तनप्रिय मी पुरुषोत्तम । माझे विभूतिरूप मी मानितो ॥ ६९५ ॥ म्हणोनि सामवेद मी वेदां सर्वांत । आणि इंद्र मी देवात । योगरूपे मीच देवही परि त्यांत । विभूतिरूपे मी इंद्र राजा त्या देवांचा. ॥ ६९६ ॥ मी इद्रियांत मन । कीं तीं इद्रियें त्या मनाअधीन । योगरूपे इद्रियेंही मीच जगज्जीवन । परि विभूतिरूपे त्यांत मी मन असें. ॥ ६९७ ॥ भूतें चराचरे अर्जुना! । त्यांत मी असें चेतना । चेतना चिच्छक्ति कुंतीनदना! । सत्त्ववृत्ती. ॥ ६९८ ॥ चित्त बुद्धि मनवृत्ती । त्या चेतनेच्याच अगा! होती । ते चेतना मी की सर्वाभूताची प्रवृत्ती । चेत-

नेअधीन. ॥ ६९९ ॥ योगरूपे माझीच मूर्ती । सर्वभूतें परि जीवनकळास्फूर्ती । चेतनेकरितां म्हणोनि तिची हे कीर्ति । की विभूतिरूपे ते मी असें.'॥ ७०० ॥

**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥**

'**रुद्र** जे का अकरा । त्यात **शंकर** मी **पांडु**कुमरा! । मीच योगरूपें तो वृंद सारा । परि विभूतिरूपे **शंकर** मी त्यांत. ॥ ७०१ ॥ यक्ष आणि राक्षस । अध्यक्षपण यांचे **कुबेरास** । तो वित्तेश मी विभूतिरूपे आणि त्यास । योगरूप माझे तू जाण. ॥ ७०२ ॥ **वसु** देवांचा गण । त्यांत पावक अग्नि आपण । ते **वसू**ही मीच कवण । योगरीति मजवेगळा वाटेल. ॥ ७०३ ॥ नाना शिखरे ऐसे पर्वत । योगरूपे मीच **भ**गवत । परि विभूतिरूपे त्यांत । कनकाद्रि **मेरु** मी आहें.' ॥ ७०४ ॥

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ! बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥**

'पुरोहित सर्वांस असती । ते योगरूपें मीच योगमायापती । परि विभूति-रूपे मी **बृ**हस्पती । पुरोहित देवांचा पुरोहिता सर्वांत. ॥ ७०५ ॥ जगीं उदंड सेनानायक । ते योगरूपें मीच असे **जग**न्नायक । परि देवांचा सेनाधिपति स्वामी **का**र्तिक । विभूतिरूपे असे तो मीच. ॥ ७०६ ॥ प्रवाहरूपे न वाहे सागर । म्हणोनि तो म्हणावा सरोवर । योगरूपें सरोवरे सर्व मी **ई**श्वर । त्यांत समुद्र विभूतिरूपें मी असें.' ॥ ७०७ ॥

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥**

'महर्षि सर्व योगरूपे मीच असें । परि **भृगु** मी विभूतिरूपे त्यांत वसें । आणि वाचा चतुर्विधा मीच उल्लसें । परि एकाक्षर ॐकार विभूतिरूप. ॥ ७०८ ॥ सकळ यज्ञ मी **अर्जुना**! । कीं सर्व योग माझा जो मजवेगळा असेना.। परि जपयज्ञासम कोणी दिसेना । विभूतिरूपे मी जपयज्ञ तो. ॥ ७०९ ॥ अगा! उपाधि जीवांचा । शब्दरूप चारी वाचा । त्यांत थोर चाळा अहंपणाचा । की मी माझे मज अमुकें पाहिजे. ॥ ७१० ॥ अखंड कल्पनेच्या घडामोडी । ते पश्यती वाचा न राहे घडी । जपकाळीं तिची उडी । मंत्रावरी पडतसे. ॥ ७११ ॥ कल्पना संसाराचें मूळ । जीकरितां चिदंश केवळ । जीवत्व पावला कीं सत्त्वसागरीं कल्लोळ । सर्वदा राजस तामस कल्पनेचे.

॥ ७१२ ॥ **ना**रायणाचा मंत्र जेधवां । पश्यतीमध्यें आठवे तेधवां । चिद्दशा केवळ पावे विसांवा । संसारकल्पनेपासुनी. ॥ ७१३ ॥ मत्ररूप जाली कल्पना । ते चित्स्फूर्ति मत्राग्नींत होमिली **अर्जुना**! । तेव्हा कैवल्यचि फळ यजमाना । जपयज्ञाचिया. ॥ ७१४ ॥ माझिया नामाचे मत्र । वैखरीस येता करिती पवित्र । पश्यतीस जप होतां तावन्मात्र । मत्ररूप उपाधिच होतो जीवाचा. ॥ ७१५ ॥ पश्यती मत्र म्हणे । बुद्धि आत्मप्रत्ययें तितकेचि जाणें । तेव्हां समाधिलक्षणखुणे । जवळि जीवोपाधि पावला. ॥ ७१६ ॥ की मंत्राचेही स्फुरण राहे । बुद्धि स्वात्मस्वरूपातेचि पाहे । तोही अनुभव होत आहे । क्षण अर्धक्षण परि अविद्येनें ओळखेना. ॥ ७१७ ॥ हाच राजा ऐसें न वाटे । तथापि तो जरी घडिघडी भेटे । तरी लौकरीच दरिद्रपण फिटे । की हा राजाधिराज कनवाळू. ॥ ७१८ ॥ काय बोलोनि बहुत । जपयज्ञासम यज्ञ नाही निश्चित । इतर यज्ञ मीच योगैश्वर्यशरीर **भ**गवत । परि तारक विभूतिरूप जपयज्ञ मी. ॥ ७१९ ॥ आतां स्थावर म्हणजे स्वयें अचल । वृक्ष पर्वत पाषाण सकळ । त्यात मी **हि**माचळ । स्थावर योगरूप विभूतिरूप हें त्यांत.' ॥ ७२० ॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥**

'स्थावरातही नुसते द्रुम । त्यांत अश्वत्थ मी उत्तम । योगरूप वृक्ष त्यांत परम । विभूतिरूप अश्वत्थ. ॥ ७२१ ॥ देव होऊनि ऋषीची पदवी । ऐसे देवर्षि त्यांत **ना**रद गोसावी । विभूतिरूप माझे भावी । योगरूपे मीच इतरही देवर्षी. ॥ ७२२ ॥ **चि**त्ररथ गंधर्वांत उत्तम । तो मी की तो विभूतिरूप परम । योगरूप ते गधर्व आणि स्थावर जगम । आणि तो **चि**त्ररथ सर्व मी असें. ॥ ७२३ ॥ आतां बहु जन्मांचे अतीं । **ज**डभरतादि उपजतचि सिद्ध असती । त्या सिद्धात **क**पिलमुनि माझी विभूती । आणि इतर सिद्ध योगरूप. ॥ ७२४ ॥

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥**

'अगा! **अर्जुना**! अश्वजाति । त्यांत **उच्चैः**श्रवा माझी विभूति । अमृत मथितां **क्षी**राब्धीत उत्पत्ति । ज्याची तो मी इतर योगरूपे मीच ते. ॥७२५॥ गजेंद्र थोर थोर त्यांत । मी **अर्जुना**! **ऐ**रावत । योगरूपे सर्व गज मीच **भग**-

वत । परि विभूतिरूपें ऐरावत मी. ॥ ७२६ ॥ मी नरांत नराधिप । राजे माझे विभूतिरूप । योगरूपे जड सर्व मी चित्स्वरूप । नर नराधिप सर्व मी.' ॥ ७२७ ॥

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥**

'**वज्र** मी आयुधां सर्वांत । **काम**धेनु सर्वां गाईंत । योगरूपे आयुधे गाई मीच **भ**गवत । विभूतिरूप **वज्र का**मधेनूही. ॥ ७२८ ॥ सुरत कामनारूप मदन । सर्वांच्या मनी करी मथन । धीरां गृहस्थांचे देही असोनि मन । क्षोभवू न शके तो त्यांचे. ॥ ७२९ ॥ ऋतुकाळी स्वस्त्रियांशीं गमन । तेही करिती की जालें पाहिजे धर्मसंतान । अगा! तो **कं**दर्प म्हणावा प्रजन । की संताननिमित्तकचि जो आहे. ॥ ७३० ॥ तो **कं**दर्प मी आहें । माझे विभूतिरूप तोचि पाहे । योगरूपे वेगळा न राहे । तोही **काम** मी असें बाप **का**माचा. ॥ ७३१ ॥ बरे अथवा वाईट । सर्वही मीच निपट । वाइटाचें फळ वाईट उत्कट । शासन विधिनिषेधांचें यास्तव. ॥ ७३२ ॥ ते वाईट पदार्थ अमगळ । परि योगरूप माझेचि सकळ । त्यांतही सामर्थ्यादिकें प्रबळ । माझी विभूति तें जाणावे. ॥ ७३३ ॥ आतां जितके सर्पजाती । त्यांत **वा**सुकी माझी विभूती । वस्तुतः सर्व सर्प मीच योगमूर्ती । आणि ते विभूतीही मीच.' ॥ ७३४ ॥

**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥**

'सर्पांवेगळ्या नागजाती । त्यांत **अ**नंत, शेष मी विभूतीं । विश्व समग्र मी योगमूर्ती । ते नाग मीच विभूतिविशेष मी **शे**ष. ॥ ७३५ ॥ आतां जलचरांचे गण । मीच योगमूर्ति परि त्यांत **व**रुण । रसाधिपति तो मी आपण । की माझी विभूति तो. ॥ ७३६ ॥ **अ**र्यमा नामें विख्यात । पितर तो मी सर्वां पितरांत. । ते पितरही योगमूर्ति मीच **भ**गवंत । **अ**र्यमाही विभूतिरूपे मी असें. ॥ ७३७ ॥ मन इंद्रियसंयम । जे मना इंद्रियांचा निग्रह परम । करिती त्यांत मी **पु**रुषोत्तम । **य**म त्यांचा अगा ! असें. ॥ ७३८ ॥ योगरूपे अगा **अ**र्जुना! मी । ते पुरुषही जे ऐसे संयमी । परि विशेषगुणें मी जगत्स्वामी । तो **य**मचि मी असें म्हणनसें.' ॥ ७३९ ॥

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥**

'**प्र**ह्लाद मी दैत्यांत । विभूतिरूपे असें **भ**गवत । योगरूपे पाहतां अत्यत । ते दैत्यही मीच आणि विभूति **प्र**ह्लादही. ॥ ७४० ॥ आतां चालकात मी काळ । चालक म्हणजे पशु चाळी जैसा पशुपाळ । तैसेंच गृह ग्राम देश समग्र भूपाळ । चालक गृहग्रामादिकांचे. ॥ ७४१ ॥ त्यांस जो श्रेष्ठ बळी । तो त्यांतें शासनें चाळी । गृहपाळ गृहचि चाळी पाळी । ग्रामपाळ चाळी ग्रामातें. ॥ ७४२ ॥ ऐसे देशपाळ भूपाळ । यां सकळांही चाळकात काळ । चालक सर्वांचा विशाळ । तो मी असें. ॥ ७४३ ॥ काळ जैसा चाळी । तैसे चळती पाळकही बळी । सप्त द्वीपे चाळिती त्यांते गिळी । आणि चाळी चहूकडे तो मी काळ. ॥ ७४४ ॥ ज्यांत जे चाळिती पाळिती । ते तेही मीच योगमूर्ती । आणि तो काळही मीच परि विभूती । म्हणावे त्या काळाते. ॥ ७४५ ॥ आतां मृग पशु वनचर । त्यांत मृगेद्र सिह मी **प**रमेश्वर । सर्व मृग मीच योगशरीर । आणि मृगेद्रही विभूति त्यांत मीचि एक ॥ ७४६ ॥ आतां पक्षियांत । मी **ग**रुड **वि**नतासुत । ते पक्षीही योगमूर्ति मीच **भ**गवत । विभूतिविशेषे मी **ग**रुडही.' ॥ ७४७ ॥

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥**

'अगा! जितकियांस आहे प्लवन[१] । उड्डाणवेगे गमन । त्या सर्वांत मी पवन । विभूतिरूपे आणि योगरूपे ते तों सर्व. ॥ ७४८ ॥ शस्त्रधारी वीर जे जे । त्यांत श्री**रा**मरूप विभूति विराजे । सर्व मीच ते धनुर्धर राजे । योगशरीर माझे सकळही. ॥ ७४९ ॥ श्री**रा**मरूप पूर्णावतार । परि योगरूपे पाहतां चराचर । सर्वही समयोग मायापसर । स्वकल्पना उभयरूपी. ॥ ७५० ॥ ऐसें स्वमुखें स्फुट करी । येथें दृष्टि द्यावी बरी । नवमाध्यायांत टीकावैखरी । योगेश्वरप्रकरणी ऐसीच. ॥ ७५१ ॥ असो तो अत्यत विस्तार । आतां झषांत[२] म्हणे मी मकर । झषही मत्स्य मकरही मत्स्य परि अतर । असें कांहीं जो करी. ॥ ७५२ ॥ योगरूपे मीच ईश्वर । मकर आणि जलचर । परतु विभूति माझी मकर । बळादिगुणविशिष्ट म्हणोनी. ॥ ७५३ ॥ आता नदी जळे वाहती । त्यांत **भा**गीरथी माझी विभूती । सकळ नद्या मीच योगमूर्ती । विशेषे विभूति-

१. उडणे. २. जलचरात.

रूपें गंगा जाह्नवीही.' ॥ ७५४ ॥ ऐसा योग आधीं । बोलोनि अद्वैत बोधी । तेथें विभूतीसी अद्वैत साधी । प्रतिपदीं सूचवूनि योगातें. ॥ ७५५ ॥ परंतु झणी विभूतीचकडे । अर्जुनाची दृष्टि जडे । आणि झणीं विसर पडे । सर्वात्मयोगाचा. ॥ ७५६ ॥ म्हणोनि कालत्रयांत तें कारण । कार्यास त्यास कधीं नये भिन्नपण । हे अघटितघटनायोगलक्षण । कालत्रयविद्यमानत्वें मागे बोलिलं. ॥ ७५७॥ 'अहमादिश्च मध्यं च' या अर्धश्लोकीं । ऐसें उत्तमश्लोक बोलिला कीं । ही सर्व भूतें अनेकें एकी । देखे अर्जुना! सागरीं जैसे तरंग.' ॥ ७५८ ॥ परंतु अनादिकल्पकोटी । ऐशाच जाल्या होणारही सृष्टी । येथें या प्रसंगीं न पडे दृष्टी । अर्जुनाची. ॥ ७५९ ॥ तरी प्रतिकल्प ऐशाच योगरूपा सृष्टि होती । त्यांत आदि अंत मध्यकाळ जाणावें विभूती । म्हणोनि योग सूचवूनि जगत्पती । विभूति सांगतो या श्लोकीं. ॥ ७६० ॥

**सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥**

'भूतभविष्यवर्तमानी । प्रपंचसृष्टि जाल्या होणार आतां होती म्हणोनि । अनेक सर्ग अनादित्वें करूनी । हे अर्जुना! ॥ ७६१ ॥ त्यांत सर्गी सकळांत । जे आदि जो अंत । आणि मध्य हे तिन्ही मीच भगवंत । तेव्हां मीच ते सर्ग मीच त्रिकाळही. ॥ ७६२ ॥ हें पूर्वींच तुज सांगितलें । कीं जे आदि ज्याची उत्पत्तीहूनि पहिलें । आणि अंतही कीं नाशानंतर उरलें । तेंचि मध्ये त्याचें रूपही.' ॥ ७६३ ॥ या भावें म्हणे मी सर्गां सर्वांचा आदि अंत । मध्य म्हणतां 'मध्यं चैवाहमर्जुन' ऐसें म्हणे अनंत । 'चैव'शब्दें निषेधी द्वैत । मध्यकाळीं नसोनि जे भासे. ॥ ७६४ ॥ 'मध्यं च' म्हणोनि या 'च'-कारें । मध्यही 'अहमेव' म्हणोनि या प्रकारें । 'मध्येंही जें दिसे नानाकारें । तें अहमेव म्हणजे मीच निर्धारें अर्जुना! ॥ ७६५ ॥ आदि अंतीं सुवर्ण । मध्यें साकार अलंकारपण । परि तेंही सुवर्णचि म्हणतां खूण । द्वैताभासनिषेधांची. ॥ ७६६ ॥ आदि अंतीं सागर । मध्यें तरंगाचे आकार । तेव्हांही सागर एव च म्हणतां चमत्कार । तरंग द्वैतनिषेधाचा. ॥ ७६७ ॥ ताम्रादि धातु आणि माती । त्यांचीं पात्रें मृत्तिकेच्या घटादिजाती । इतकियांस जें ज्यास आदि अंतीं । तेचि पात्रादि घटादिरूपें मध्येंही.' ॥ ७६८ ॥ इत्यादि दृष्टांतकोटी । मनीं समजे किरीटी । ऐसा भाव दावोनि पोटीं । 'मध्यं चैवाहमर्जुन' म्हणतसे. ॥ ७६९ ॥ एवं अघटितघटनाचातुर्य । ऐसें आपलें योगै-

श्वर्य । कीं कारण आदि अतीं तेचि कार्य । मध्येही हा योग आपला. ॥ ७७० ॥ या योगांत या तिन्ही विभूती । कीं 'आदि अत मध्यही मीच' म्हणे मायापती । 'परि अध्यात्मविद्येवांचूनि या रीती । न कळती ते विद्या मीच सर्वा विद्यांत. ॥ ७७१ ॥ अगा! कोण विद्या मी नव्हे म्हणसी । कीं चित्समुद्रीं तरगा त्याणेचि जाणसी । त्याही मी योगमूर्ति परि त्या विद्यांसी । नये महिमा अध्यात्मविद्येचा.' ॥ ७७२ ॥ अध्यात्मशब्दाचा अर्थ । अष्टमाध्यायात वदला स्वयें समर्थ । अनुभवे तोचि सिद्ध होतां व्यर्थ । अन्य अर्थ का बोलावे? ॥ ७७३ ॥ **'स्वभावोऽध्यात्ममुच्यते'** म्हणोनी । स्वभावशब्द अध्यात्मशब्द यावरूनी । कीं स्वभाव म्हणजे आपला भाव ज्ञानी । आपल्यास जाणती तें अध्यात्म. ॥ ७७४ ॥ 'मज सभाग्य भजती । ते अध्यात्म जाणती । हें सत्य मी म्हणोनि **श्री**पती । अष्टमीं अर्थ सांगे कीं अध्यात्म म्हणजे स्वभाव. ॥ ७७५ ॥ एव आपण कोण हे न जाणे । आणि सर्वविद्या जाणतों म्हणे । त्यास भ्रांत म्हणती शाहणे । जो न जाणे आपण आपणा. ॥ ७७६ ॥ जाति ते आहे द्विजाती । कोण म्हणतां सागे आडजाती । त्यास भ्रांत सर्वथा म्हणती । विवेकी लोक. ॥ ७७७ ॥ जाणे सर्व विद्येचिया घडामोडी । आणि सर्व शास्त्रेंही बडबडी । मी विद्यावत म्हणोनी खडबडी । घडी घडी देहाभिमानें. ॥ ७७८ ॥ आत्मा देहावेगळा । हेंही शास्त्रे करी गोळा । परि आपणास आपण पाहतो जो डोळा । तो उघडा असोनिही ज्याचा झांकला असे. ॥ ७७९ ॥ स्पर्शली रज्जूस दृष्टी । आणि सर्प मानूनि होतो कष्टी । तैसा ज्या बुद्धीनें मी जडशरीरसृष्टी । आत्मा स्पर्शोनि म्हणतो तें कळेना. ॥ ७८० ॥ एव अध्यात्मशब्दार्थ । कीं आपला भाव अनुभवणें तोचि यथार्थ । सकळही विद्यायोग त्यांत विभूति म्हणे समर्थ । अध्यात्मविद्या. ॥ ७८१ ॥ अध्यात्मावांचूनि अन्य विद्या । त्या सर्वेही अविद्या । तथापि योगरूपे मज आद्या । पाहसी तै विद्या मीच असें तेव्हांही. ॥ ७८२ ॥ परि अध्यात्मविद्या विभूती । जिणे कळे आत्मस्थिती । तेव्हां सकळ विद्याही वाटती । रूपे मज योगमूर्तीचीं. ॥ ७८३ ॥ लोखडाची बेडी । लोखडाचेचि शस्त्र तोडी । लोहयोगचि बेडीही परतु खोडी । वाईट बेडीच्या बरे शस्त्र. ॥ ७८४ ॥ विभूति ते अध्यात्मविद्या मी परी । प्राप्त होय गुरुरूपे मी भेटें जरी । आणि ते उपदेश करिती तरी । सफळ भेट संतांची.' ॥ ७८५ ॥ तेव्हां शिष्य प्रश्न करी । बोधी गुरुरूपे हरी । स्वहिताकारणें निघे शिष्य वैखरी । तो तरावा म्हणोनि गुरु बोले. ॥ ७८६ ॥ ऐसें प्रकृष्ट जे वेत्ते वदती ।

जयापजय मूळ राग द्वेप ज्यांमध्ये नसती । वाद ज्या गुरुशिष्यांत ये रीती । ते योग मी विभूति माझी तो वाद. ॥ ७८७ ॥ की स्तनीं लागतां वत्समुख । कामधेनूस वाटे सुख । अनुभवदुग्ध विश्वतोमुख । वे घटघटा शिष्यवर्य ये रीती. ॥ ७८८ ॥ ऐसें प्रकर्षे बोलती । ते गुरुशिष्यही मीच **वि**श्वपती । परि श्रेष्ठत्वें दोघेचि दिसती । त्या अध्यात्मवादांत. ॥ ७८९ ॥ की गुरूची बोधकशक्ती । वादरूपे दाविते अनुभवव्यक्ती । आणि शिष्याची ग्राहकशक्ती अभिव्यक्ती । वादरूपे करीतसे. ॥ ७९० ॥ एव गुरु तोचि बोद्धृ जाणे । शिष्य तोचि की ज्यास बाणे । या उभयश्रेष्ठत्वखुणे । वाद त्यांचाच प्रकट दाखवी. ॥ ७९१ ॥ म्हणोनि ऐसें प्रवदती । त्यात वाद तो माझी विभूती' । म्हणोनि अध्यात्मप्रकरणीं **श्री**पती । म्हणे की **'वादः प्रवदतामहं'** म्हणोनी. ॥७९२॥ इतर वक्ते आणि वाद इतर । मीच योगमूर्ति **स**र्वेश्वर । परि ऐसा उत्तम वाद परस्पर । तो विभूति माझी.' ॥ ७९३ ॥ पूर्वार्धी योग वर्णिला । तिसरिया चरणी अध्यात्म बोलिला । गुरुशिष्यसंवाद निरूपिला । चतुर्थ चरणी. ॥ ७९४ ॥ सांगीतला सर्वात्मयोग । त्यास अध्यात्मविद्येचा उपयोग । त्या विद्येचा तेव्हा होय संयोग । की प्रश्न उपदेशरूप वाद गुरुशिष्यांचा. ॥ ७९५ ॥ सर्वत्र परस्पर संगती । विभूतीस असे ये रीती । परि ग्रथविस्तार अती । होतो आणि तत्त्वार्थ ऐसाही निवडतो. ॥ ७९६ ॥ कीं **रु**द्रांत मी **शं**कर । म्हणतां तेथें त्याचा सखा **कु**बेर । आणि **व**सूत पावक **वै**श्वानर । तो नेत्र त्या **शं**कराचा. ॥७९७॥ इत्यादि ग्रथ मागील । ऐसेच पुढीलही बोलेल बोल । **वृ**ष्णींत मी **वा**सुदेव जेथें म्हणेल । तेथें **पां**डवांत **ध**नजय सखा आपला. ॥ ७९८ ॥ **शं**करापुढें सखा **कु**बेर जैसा । **वा**सुदेवापुढे सखा **ध**नजय तैसा । शोध करितां ऐसा । ग्रंथ वाढतो. ॥ ७९९ ॥ टीका ग्रथ संक्षेपाचा विस्तार । त्याचाही विस्तार करिती वाचणार । ये रीती सूचविला चमत्कार । योजोत चतुर योजेल तेथवरी. ॥ ८०० ॥ एव च सर्वात्मयोगाच पुढे **ह**री । अध्यात्मविद्या निरूपण करी । त्यापुढे गुरुशिष्यवैखरी । संवादरूपे वर्णिली. ॥ ८०१ ॥ की हा योग तेव्हां जाणे । जेव्हां अध्यात्मविद्या बाणे । ते अध्यात्मविद्या पावती शहाणे । गुरुशिष्यवाद विभूति प्रगटतां. ॥ ८०२ ॥

**अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।**

अक्षरांत मी अकार । कीं **वि**ष्णुवाचक हें अक्षर । सर्वा सुरांत **वि**ष्णु जैसा सर्वेश्वर । तैसा अकार अक्षरां सर्वांत. ॥ ८०३ ॥ वरकड अक्षरे सकळ । मी योगशरीरचि केवळ । परि मी जैसा सर्वां देवांचें मूळ । **वे**दमूळ **ओं**कार

तन्मूळही हा अकार. ॥ ८०४ ॥ अकार **विष्णु** आणि । अकारच सर्व वाणी । म्हणोनि **वेद** बहुधा वर्णी । अकार मी विभूति माझी तो. ॥ ८०५ ॥ क म्हणतां त्यात अकार । ज्या अकारावांचूनि म्हणवेना ककार । जैसा आत्मस्वरू-पावांचूनि कांहीं आकार । बुद्धीस इंद्रियास न कळे. ॥ ८०६ ॥ आतां पदें अनेक । दोन तीन चार मिळोनि पद एक । त्यांत त्या पदाचा होतो विवेक । व्याकरणीं म्हणती त्यातें समास. ॥ ८०७ ॥ अनेक त्या समासांचीं नांवें । त्यांत द्वंद्वसमास ज्याला म्हणावें । त्या सर्वां समासांत त्यास गणावें । विभूति म्हणोनि तो मी म्हणे श्रीकृष्ण. ॥ ८०८ ॥ एका पदीं दोघे असती । **रामकृष्णौ** जीवेश्वरौ इत्यादि रीती । इत्यादि पदाच्या समासास म्हणती । द्वंद्व म्हणोनी. ॥ ८०९ ॥ कीं तत्त्वदृष्टीं एक पद । व्यवहारें करावे दोन भेद । त्या दों पदाचा अभेद । दिसे म्हणतां पद एक. ॥ ८१० ॥ पद परपद परा-त्पर । त्यात व्यवहार जीवेश्वर । आणि जडचैतन्यव्यवहार । परमपद एकचि मागुती. ॥ ८११ ॥ एक पदीं पदे दोनी । व्यवहार नव्हतां एकचि म्हणोनी । व्यवहारकाळीं दोन्ही दिसोनी । एक म्हणोनि हा भाव. ॥ ८१२ ॥ ब्रह्म एक परात्पर । तेथें व्यवहार जीवेश्वर । पद एक त्यांत बोलावे दोन्ही प्रकार । जे रीती. ॥ ८१३ ॥ ऐसा सिद्ध होतो तत्त्वार्थ । या समासीं म्हणोनि समर्थ । ज्या दृष्टांतीं साधे परमार्थ । ते दृष्टांतही मी विभूति ऐसें सूचवी. ॥ ८१४ ॥ आतां मागे ऐसें बोलिला **अनंत** । कीं चालक काळ मी सर्वां चालकांत । उपजवी चाळी पाळी करी अंत । तो काळ सकळां चाळकात मी जाण. ॥ ८१५ ॥ तरी चाळकत्वें काळचक्र फिरे । हें प्रलयकाळीं न उरे । संहार करोनि तोही सरे । योगनिद्रा जेव्हां ईश्वराची. ॥ ८१६ ॥ ते काळीं तेव्हां कांहींच नसे । म्हणोनि बोलती **वेद** ऐसे । कीं प्रलयाचें शेष जें उरतसे । तेंही काळचि हे तात्पर्य तेव्हां म्हणतां **वेदांचें**. ॥ ८१७ ॥ श्रुति म्हणे **'नासदासीन्नो सदासीत्तदानीं'** । कीं **'तदानीं'** म्हणजे ते समयीं कांहींच नसे म्हणोनी । अधिष्ठान आणिक येथें न वदे **वेद** यावरूनी । अधिष्ठान काळचि मूळ कालत्रयाचा. ॥ ८१८ ॥ **श्रुति** प्रपंचाचे आधीं वदे ये रीती । आणि अतीं ऐसे बोले **श्रुति** । कीं तें एकचि त्यावांचूनि नसती । कार्य कारणें किमपिही. ॥ ८१९ ॥ कांहीं नसती म्हणे ज्याविण । तें ब्रह्म म्हणोनि म्हणावे निर्गुण । तरी **'तदानीं'** म्हणजे ते काळीं म्हणोनि **वेद** आपण । काळ दुसरा बोलतो ऐसें साधतें. ॥ ८२० ॥ यालागीं सर्वज्ञा ईश्व-राची वाचा । एथें निर्णय बोले साचा । ते काळीं कांहीं नव्हतें म्हणे याचा ।

अर्थ ऐसा. ॥ ८२१ ॥ की ज्यावाचूनि काहीं नव्हते । काळचि म्हणावे त्यातें । त्या काळीं म्हणोनि कांहीं प्रलयशेष बोलिले असतें । तरी त्या काळीं म्हणतां काळ दुसरा साधतो. ॥ ८२२ ॥ **'तदानीं'** म्हणजे त्या काळांत । कांहीं नव्हतें अत्यत । म्हणजे काळचि होता ज्यांत । दुसरे नव्हते किमपिही. ॥८२३॥ एव प्रलयशेष जें केवळ । त्यातेचि म्हणावे महाकाळ । ज्या काळी रज्जूत व्याळ । भासे कालत्रयाचा. ॥ ८२४ ॥ विभूतियोग त्रिकाळरूप । त्याचे मूळ जे प्रलय शेषस्वरूप । होय जाय कालत्रयाचे माप । ते अमोप काळ मी उत्तरार्धे म्हणतसे. ॥ ८२५ ॥

**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

अगा! ज्या काळास नाहीं क्षय । की पूर्वी बोलिलों त्या काळाचा क्षय होय । या काळीं म्हणोनि अक्षय । तो मीच. ॥ ८२६ ॥ की लहान थोर मापे सकळ । त्यांतही आकाशचि असे पोकळ । ते मापे नाशतां उरे केवळ । अक्षयाकाश जे रीती. ॥ ८२७ ॥ ज्या त्या मापात अवकाश । परि घट नाशतां न दिसे घटाकाश । तैसा सृष्टिस्थितिसहारनाश । तेव्हां सृष्टयादि कालत्रय असेना. ॥ ८२८ ॥ परि होतां घटाचा नाश । जरी न दिसे घटावृत[1] आकाश । तरी अक्षयरूपे उरला थोर अवकाश । तोचि अवकाश त्या घटमठाचा ॥ ८२९ ॥ तथापि होता घटनाश । नाशला दिसे घटाकाश । तैसा घटनाशे थोर अवकाश । न नासे अक्षय तो म्हणावा. ॥ ८३० ॥ ऐसा सरतां सृष्टिनाशें सृष्टिकाळ । सरतां स्थितिनाशे स्थितिकाळ । सरता संहारनाशें संहारकाळ । उरे अक्षय काळ तो म्हणावा. ॥ ८३१ ॥ त्या काळी कांहीं इतर । नसे म्हणोनि **'अहमेवाक्षयः कालः'** म्हणे **श्री**धर । बीजयोगाचें आणि विभूतीचें निरतर । दुसरे तेथें नाहीं हें सूचवी. ॥ ८३२ ॥ सर्वत्र योग बोलोनि त्यांत । अमुक तें विभूति मी म्हणे **भ**गवत । येथें स्वयेंचि तेव्हां काळ उरतो अनत । म्हणोनि उगाच अक्षयकाळ म्हणतसे. ॥ ८३३ ॥ तरी आतांही तो असे । परि त्रिकाळरूपे विश्वरूप भासे । ऐसें बोलोनि दाखवीतसे । चतुर्थ चरण. ॥ ८३४ ॥

**'धाताहं विश्वतोमुखः'।**

जो जें धरितो त्या पदार्थाचा धर्ता । जो धर्ता तो म्हणावा धाता । **'धाताहं विश्वतोमुखः'** म्हणे **वि**श्वभर्ता । की धरितों कालत्रयरूप हें विश्व.

---

१, घटांत असलेलें.

॥ ८३५ ॥ विश्वतोमुख काळ तीन्ही । कोठे उत्पत्ति कोठे स्थिति कोठे सहार म्हणोनी । तो काळ मीच धरितो जो यातें गिळूनि । प्रलयशेष अतीं उरतसे. ॥ ८३६ ॥ तो मीच केवळ । अक्षय प्रलयशेष काळ । सर्वात्मयोगांचें आणि सर्वा विभूतींचे मूळ । अक्षय काळरूपे मज जाण. ॥ ८३७ ॥ आता विश्वतोमुखाचें स्पष्ट निरूपण । आणि इतरां विभूतींचेही विवरण । प्रसगे **न**रास सांगतो **ना**रायण । या श्लोकी. ॥ ८३८ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥**

अगा! मृत्यु जो सर्वातें संहारी । तो मृत्यु मीच असें **ह**री । आणि उद्भव ज्यांस होणार याउपरी । त्याचा उद्भवकाळ त्यांहूनि पूर्वीच मी असें. ॥८३९॥ एव मृत्यु संहारकाळ । उद्भवसृष्टिकाळ । दोन्ही मी म्हणता स्थितिकाळ । मध्यभागीं आलाच तोही. ॥ ८४० ॥ **'विश्वतोमुख' पां**डुसुता! । काळ ऐसा त्याचा धर्ता । धाता विश्वतोमुख म्हणोनि तत्त्वता । पूर्वश्लोकीं या भावें बोलिलों हा भाव. ॥ ८४१ ॥ आतां नारीमाजी विभूती । कीर्ति श्री वाचा स्मृती । त्या चान्ही आणि मेधा धृती । आणि क्षमा ऐशा या सात ॥ ८४२ ॥ कीर्ति भली म्हणोनि प्रसिद्धी । श्री म्हणजे धनधान्यसौंदर्यादिकांची समृद्धी । वाचा संतास संमत वक्तृत्वसिद्धी । स्मृति स्मरण उत्तम गोष्टींचें. ॥ ८४३ ॥ मेधा प्रज्ञा[१] तीक्ष्ण । धृति धारणालक्षण[२] । की जें उत्तम सुलक्षण । धारणा हे बुद्धीत त्याची. ॥ ८४४ ॥ क्षमा म्हणावी ऐसी । की शक्त होऊनि अपराध सोसी । या मी म्हणे **अर्जु**नासी । विभूतिरूपे. ॥ ८४५ ॥ योगरूपे **ध**नंजया! । मीच आहें सर्व क्रिया । त्यांत विभूतिरूपे इतकिया । माझीं रूपें तू जाण. ८४६

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

अगा! **सा**मवेद माझी विभूती । म्हणोनि बोलिलों तुजप्रती । तशाही **सा**मवेद ऋचांत अती । श्रेष्ठ विभूति **बृ**हत्साम म्हणोनी. ॥ ८४७ ॥ आणि **वे**दमत्र सकळ । योगशरीर मीच केवळ । त्यांतही **गा**यत्रीमत्र निर्मळ । विभूतिरूप मी असे. ॥ ८४८ ॥ अगा! **चै**त्रादि मास अशेष । मीच योगशरीर परि **मा**र्गशीर्ष । मी विभूतिरूपे असें ज्यात उत्कर्ष । लाभ माझे प्राप्तीचा **गो**पीतें. ॥ ८४९ ॥ **मा**र्गशीर्ष प्रथम हेमतीं । **गो**पी **का**त्यायनीतें पूजिती ।

---

१ ज्ञान, शहाणपण. २. ग्रहण करण्याचें लक्षण.

त्या मज पावल्या म्हणोनि विभूती । कीं कर्म सफळ या मासांत. ॥ ८५० ॥ ऋतूंत मी **व**संत । विभूतिरूपें मी **भ**गवत । योगरूपें तो मीच **अ**नत । इतर ऋतु आणि **व**संतही ॥ ८५१ ॥ विविधा कुसुमांचा आकार । आणि जे फळांची खाणी पुष्पांचा आगर । ऐसा **व**संत कुसुमाकर । म्हणोनि विभूति तो माझी. ॥ ८५२ ॥ आतां वाईटही पदार्थ । परतु बहुतात तो समर्थ । फळ वाईट परि विभूति माझी यथार्थ । ऐसेंही सूचवूनि बोलतो या श्लोकीं. ॥८५३॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥**

अगा! एक एकास वचिती । पुढें करूनि कपटरीती । त्यात मी द्यूत की माझी विभूती । तया सर्वां कपटकर्त्यांत. ॥ ८५४ ॥ योगरूपें सर्व कपट । मीच की सर्व मीच निपट । परि द्यूतांत कपट उत्कट । विभूतीरूप तें माझें. ॥ ८५५ ॥ तेजस्वी जे जे असती । त्यांत तेज तितकी माझी विभूती । पाहता योगैश्वर्यस्थिती । तेज तेजस्वी मीच असें. ॥ ८५६ ॥ तेज म्हणावें सुदरत्व । तेज म्हणावें धनाढ्यत्व । तेज म्हणावें चतुरत्व । तेज पांडित्य शौर्य औदार्य इत्यादि. ॥८५७॥ आतां पुरुषार्थ सिद्धि जय । तो विभूतिरूपें मी हा निश्चय । जे जया पावती तेही मी अद्वय । योगरूपें. ॥ ८५८ ॥ आतां व्यवसाय म्हणजे कार्योद्यम । तो त्या व्यवसायकर्त्यांत मी पुरुषोत्तम । तेही मीच सर्व योगरूपें सर्वोत्तम । आणि व्यवसाय विभूतिही त्यांत. ॥ ८५९ ॥ जे सत्त्वयुक्त सात्त्विक नर । त्यांचें सत्त्व मी ईश्वर । तेही मीच योगशरीर । आणि विभूति तें सत्त्व. ॥ ८६० ॥

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

**वृ**ष्णी म्हणजे **या**दव । त्यांत **व**सुदेवसुत मी **वा**सुदेव । योगरूपें मीच **दे**वाधिदेव । **या**दव आणि जग सारें. ॥ ८६१ ॥ परि **या**दव देवांश जीव । तेथें अविद्यास्वभाव । मी विद्याशबलित **दे**वाधिदेव । म्हणोनि ईश्वरत्वें विभूति मी. ॥ ८६२ ॥ परतु जैसें कल्पितो चराचर । तैसेच कल्पितों अवतार । जैसें विश्व नानाकार । अवतारदेह तैसेच. ॥८६३॥ कल्पूनि राज्य राजभुवन । त्यांत प्रजा राजा प्रधान । राजा समर्थ सुदर करी शासन । कल्पना मात्र ते सर्व. ॥ ८६४ ॥ कल्पनाच राजा उत्तम । कल्पनाच प्रधानादि मध्यम । कल्पनाच शासनार्ह अधम । सर्वही तोचि कल्पक. ॥ ८६५ ॥ उत्तमत्वें सुवर्ण-

सिंहासनीं । सुवर्णप्रतिमा मांडूनी । द्वारपाळ सेवक पुढें उभे सुवर्णाचेच म्हणोनी । सोनें उणे काय म्हणवेल ? ॥८६६॥ योग विश्व आणि विशिष्ट विभूती। तथापि सर्वत्र सम अद्वैतस्थिती । जेथें जग आणि जगत्पती । रूपें समचि ईश्वराचीं. ॥ ८६७ ॥ अर्जुना! समजें ये रीती । आपला योग आणि विभूती । स्पष्ट येथें जगत्पती । बोलिला ऐसें. ॥ ८६८ ॥ यादव जैसे तैसेचि सकळ । यादवांत आपण विभूति मेघश्यामळ । तैसें जग आणि जगीं अवतार सुमंगल। तत्त्वदृष्टी अमंगळ कांहीं असेना. ॥ ८६९ ॥ मी पांडवांत ऐसा धनंजय । जो मज वासुदेवाचा सखा विजय । योगरीती मीच जगन्मय । तूं धनंजय आणि पांडवही ॥ ८७० ॥ आतां मुनींतही मी व्यास । कीं माझी विभूति म्हणावें त्यास । योगे इतर मुनीही मी जगन्निवास । व्यास तो अवतारचि आपला. ॥ ८७१ ॥ ऐसेंचि जितके कवी । त्यांत मी शुक्र जो नांवेही कवी । योगें सर्वांस मद्रूपपदवी । त्यांत विभूतिरूपें मी शुक्र. ॥ ८७२ ॥

**दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥**

निग्रहास म्हणावें दम । शासनावांचूनि न वळे लोक अधम । म्हणोनि दंडकर्त्यां समर्थांत मी पुरुषोत्तम । दंडरूपें असें ते माझी विभूती. ॥ ८७३ ॥ दंडकर्ते सकळ । योगरूपें मीच केवळ । परि दंडसामर्थ्य ज्यांत प्रबळ । विभूतिरूप तें माझें. ॥ ८७४ ॥ आतां ऐसेंच जे जय इच्छिती । आणि ज्या नीतीनें जय पावती । ती नीति मी जगत्पती । साम अथवा दान दंड भेद. ॥ ८७५ ॥ आतां गुह्येंही बहु फार । त्यांत परेचें मौन गुह्य थोर । जेथूनि मनासह शब्दविकार । घेऊनि वाचा मागें परतती. ॥ ८७६ ॥ आतां ज्ञानवंत। त्यांत आत्मज्ञान मी भगवंत । ते ज्ञानी मीच परि थोरपण त्यांस अत्यंत । ज्या ज्ञानें तें विभूतिरूप मी आहें. ॥ ८७७ ॥

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ! ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥**

जें बीज सर्व भूतांचें । जैसें मृषा जळाचें बीज उष्ण साचें। तें मी कारण प्रपंचाचें । अगा अर्जुना ! ॥ ८७८ ॥ मृगजळाचें बीज किरण । अलंकाराचें बीज जैसें सुवर्ण । सर्वां भूतांचें बीज आपण । ऐसें अर्जुना ! ॥ ८७९ ॥ तरंगाचें बीज सागर । तैसें मजपासूनि चराचर। तो तरंगचि नव्हे विना नीर। जाला म्हणावा. ॥ ८८० ॥ तैसें मज विना । चर अचररूप कांहींच उपजेना।

बीजावांचूनि **अ**र्जुना! । अकुर होईल काय वडे? ॥ ८८१ ॥ एवं बीजचि अकुर । तेव्हा मीच चराचर । योगविभूती दोहींचें निरतर । हेचि रूप पाहें हा भाव. ॥८८२॥ एव मी बीजचि म्हणतां चराचर । अतरहि तया बीजाचा पसर । काय सांगेल म्हणोनि **स**र्वेश्वर । हेंचि बोलतो या श्लोकीं. ॥ ८८३ ॥

**नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

**अ**र्जुना! हें योगरूप माझे निज । म्हणोनि अत नाहीं मज । तैसा माझ्या विभूतींसही सहज । अनादिसिद्ध अत नसे. ॥ ८८४ ॥ **'नांतोऽस्ति मम'** म्हणोनी । म्हणे अत नाही मज यावरूनी । योगरूप आपण ऐसें सूचवूनी । **'विभूतीनां'** म्हणजे त्यांसही. ॥ ८८५ ॥ प्रश्न योगाचा आणि विभूतीचा । तदनुरूप निरोपूनि संक्षेप दोहींचा । अत नसे म्हणोनि **गो**विदाचा । उभय-विस्तार न बोलवे म्हणतसे. ॥ ८८६ ॥ आतां जरी नाहीं अत । तरी मी श्रोता सादर अत्यत । आणि तू वक्ता दयाळू **भ**गवत । जो मी आइकें तों सांग. ॥ ८८७ ॥ **अर्जुन** ऐसें बोलेन म्हणोनी । संकल्प करीं जों मनी । तों **प**रतपा! या नामें आळवूनी । सूचवी याचे उत्तर. ॥ ८८८ ॥ की पर जे शत्रु त्यांस ताप । करणार ऐसा तुझा प्रताप । आणि युद्धकाळ म्हणोनि हा संक्षेप । विभूतिविस्ताराचाच तूज बोलिलो. ॥८८९॥ धनुष्यास लावूनि बाण । जो तो पाहे मांडूनि ठाण । की हे दोघे सुजाण । काय सप्रेम बोलती डोलती. ॥ ८९० ॥ म्हणोनि माझा जो योगविभूतिविस्तार । त्याचाच हा संक्षेपप्रकार । तूज बोलिलों आतां विलब फार । करितां नये **प**रतपा! ॥ ८९१ ॥ इत्यादि गूढभावें । **प**रतपा! या नांवें । आळवूनि उत्तरार्धे **दे**वें । हाचि सक्षेप विस्ताराचा दाविला. ॥ ८९२ ॥ तो म्हणे झणी **अ**र्जुनास वाटेल ऐसें । की उरल्या विभूतींतें भावू तरी कैसें? । तरी विभूतींचें रहस्य कळे ऐसें । बोलों म्हणोनि बोलतसे या श्लोकीं. ॥ ८९३ ॥

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥**

अगा! जो जो पदार्थ । सामर्थ्ययुक्त समर्थ । देखसी तो जाण यथार्थ । अंश माझ्या तेजाचा. ॥ ८९४ ॥ मी विश्वाचें बीज । सर्व सामर्थ्य माझेंचि सहज । जेथें जें विशेष तेज । ते विभूत्यश माझ्या तेजाचे ॥ ८९५ ॥ अथवा जेथें जें श्री असे । धन कनक अथवा सौदर्य दिसे । तो माझ्याच

तेजाचा अंश तेथें वसे । जाण माझी विभूती ॥ ८९६ ॥ अथवा जे ऊर्जित । कोण्या तरी गोष्टीनें तेजोवंत । तो माझ्याच तेजाचा अंश निश्चित । जाण गा! तू ॥ ८९७ ॥ अगा! ज्या घरीं जो पाहसी दीप । तो अंश अग्नीचाच अग्निप्रताप । जें जें उत्तम तें तें रूप । माझेंचि पाहें ॥ ८९८ ॥ मजवांचूनि उत्तम गुण । कोठेंच नाही बरें जाण । ज्याचें जैसें तप तदनुगुण । अंश माझा तप सरे तो असे त्यापाशीं. ॥ ८९९ ॥ देव हें बोलणें ऐसें गोफांटी । तो अर्जुन लाळ घोटी । साकरेकारणें ओष्ठ चाटी । पुरे म्हणतां बाळ जैसा. ॥ ९०० ॥ तरी यास नाही अंत । म्हणोनि बोलोनि अनंत । अध्याय समाप्त भगवंत । करीतसे या श्लोकीं. ॥ ९०१ ॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन! ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥**

अथवा अर्जुना! जरी बहुत । हें तू आइकोनि जाणसी निश्चित । तरी कां येणें पुरेल की अंत । पावसी काय तू याचा ? ॥ ९०२ ॥ अगा! एका ब्रह्मांडांत । तें न सांगवे न ऐकवे अत्यंत । जे एका अंशाचे ठायीं मी भगवंत । असें व्यापूनि जग हें. ॥ ९०३ ॥ ऐसीं ब्रह्मांडें अनंतें । म्यां व्यापिलीं अनंतें । आईकसी युगे अनंतें । तरी न सरे अथवा न सांपडे अंतही ॥९०४॥ म्हणोनि बहुत हे ऐकोनी । काय विशेष म्हणोनी । की ज्ञाते न या गीतावचनीं । अर्थ ऐसा. ॥ ९०५ ॥ ऐशा ब्रह्मांडकोटि अनंत । योगविभूति ज्याची तो अनंत । त्यास करूनि वदनें अनंत । टीका श्रीचरणी समर्पिनों ॥ ९०६ ॥ ऐसा विभूतिअध्याय । विशेषें वर्णील कोण काय । जो स्वयें योगविभूति विश्वकाय । तो अनंतत्वें बोलतो. ॥ ९०७ ॥ अमृतसागर अनंत । त्याचा न सांपडे अंत । परि आत्मसिद्धि अत्यन्त । पितां अंजुळी भरूनही. ॥ ९०८ ॥ ऐसा वाचितां अध्याय दशम । सहज चित्ताचा होय उपशम । त्याची मऱ्हाटी टीका सुगम । कठिण अर्थ दाखवी सोपासा. ॥ ९०९ ॥ ऐसी श्रीमद्भगवद्गीतेची टीका । नाम जीचें यथार्थदीपिका । तूज समर्पित हो शेषपर्यंका! । श्रीवत्सांका! वामन म्हणे. ॥ ९१० ॥

---

## अध्याय अकरावा.

जय जय देवाधिदेव! । जय जय विश्वरूप वासुदेव! । जय जय वसुदेवनंदन यदुदेव! । श्रीकृष्ण ॥ १ ॥ जय जय नरसारथ्यनिपुण! । जय श्रीमद्भा-

रायण! । जय सकलकारणकारण! । **विश्वमूर्ते!** ॥ २ ॥ जगन्मंगला! तुझे चरण । नित्य आमचें मगलाचरण । आतां विश्वरूपाध्यायविवरण । करितों प्रसादे तूझिया. ॥ ३ ॥ राजविद्या राजगुह्य । नवमीं सांगोनि योगगुह्य । जें प्रत्यक्ष इद्रियां गम्य बाह्य । हें स्वावतारमूर्तिसम बोलिले. ॥ ४ ॥ जड तितकें चित्स्वरूप । जडाभास आपलेचि योगैश्वर्यरूप । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनि विश्वरूप । **भ**गवद्रूप **पा**र्थातें दाविलें. ॥ ५ ॥ तों **अ**र्जुनाची बुद्धी । जेथें पावे तेथें स्वरूपसिद्धी । अनुभवी जडीं चित्समृद्धी । अमृत सेवी तरगीं अमृतसिधूच्या. ॥ ६ ॥ वस्तुतः बुद्धि पावे जेथें । जडपटींच तंतु अनुभवी तेथें । बुद्धि न पावतां अकळ देखोनि येथें । शका **पा**र्थे मानिली. ॥ ७ ॥ की सकळ चिदात्मा स्वयें आपण । परि जेथें बुद्धि न पावे तेथें नये निजखूण । तेव्हां प्रतीति नये तेथेंही निर्धर्म आपण । असें म्हणोनि कैसें भावावें? ॥ ८ ॥ ऐसा जो तो प्रश्न करी । तोंचि **'यथाकाश'** या श्लोकें **ह**री । संदेह त्याचा परिहरी । द्विविधवायुदृष्टांतें आकाशीं. ॥ ९ ॥ की सर्वत्र आकाशीं समीर । आणि आकाशीच वायु महान् म्हणिजे थोर । तैसीं सर्वभूतें चराचर । मजमधे म्हणूनि तू आपणात अवधारीं. ॥ १० ॥ भाव ऐसा कीं वारा । सर्वत्र असोनिही न कळे शरीरा । आणि जो महान् म्हणिजे थोर चचल तो बरा । अगीं प्रतीतीस येतसे. ॥ ११ ॥ ऐसीं भूतें आपणांत । अवधारीं म्हणे **भ**गवत । की तू आत्मा त्यांत । भूतें पाहें ये रीती. ॥ १२ ॥ कीं आकाशामाजि जो स्थिर । तो अनुभवा नये समीर । आणि आकाशींच तो जो शरीर । जाणे चचल होऊनि लागतां. ॥ १३ ॥ तैसी बुद्धि पावली जेथें । कळलीं भूतें चित्स्वरूपींच तेथें । स्थिर वायु न कळे तोही येथें । आकाशीच की अगा! आहे. ॥ १४ ॥ तैसीं भूतें सकळ । निर्धर्मा आत्मयांत असती अकळ । गगनीं असोनि वारा निश्चळ । न लागे अंकळ तो जैसा. ॥ १५ ॥ की प्रत्यय मायावृत्ती । प्रत्यय प्रकाशी निर्धर्मचित्स्फूर्ति । काष्ठादि कांहीं एक जाळितांचि दीप्ती । दृष्टी दिसे अग्नीची. ॥ १६ ॥ काष्ठादिकां प्रकाशी अनळ । तथापि त्या काष्ठा एकाविणे न दिसे केवळ । मायावृत्ति प्रकाशी आत्मा निष्कळ । तथापि प्रत्ययधर्म मायेचा. ॥ १७ ॥ वर्तुळीं गगन वर्तुळ दिसे । चतुष्कोणीं चतुष्कोणचि गवसे । तैसी प्रत्ययरूपें वाटतसे । ज्ञानसत्ता. ॥ १८ ॥ त्या चित्स्वरूपीं नसे प्रत्यय । म्हणोनि त्या प्रकाशेंचि तें आपण ऐसा चिन्मय । ईश्वरोपाधि आणि अनुभवीं निश्चय । म्हणोनि या प्रकाशीं जीवबुद्धीस तें आपण म्हणोनी. ॥ १९ ॥ जरी निर्धर्मी प्रत्यय असे । तरी जीवेश्वरप्रत्यय

निरसते कैसे? । आणि चित्प्रत्ययावरी ठसे । प्रत्यय दुसरे कैसे उमटते मी ईश्वर मी जीव म्हणोनी? ॥ २० ॥ चित्स्वरूप आपण । एतत्प्रत्ययस्वरूप असे निर्गुण । तरी मज मी नेणें हें अविद्यावरण । त्या चित्स्वरूपें प्रकाशिले न म्हणावे. ॥ २१ ॥ कीं मज मी नेणें म्हणतसे । जें चैतन्य या आवरणी समरसे । तें आपण चैतन्य म्हणतां न दिसे । जैसें दिसे चिन्मात्र. ॥ २२ ॥ जैसें स्फुरे प्रकट चित्स्वरूप । तैसें न स्फुरे त्याचें चिदात्मप्रत्ययरूप । एव च तें स्वयें अरूप । रूप दावी अविद्येचे आणि विद्येचे. ॥ २३ ॥ अविद्यायोगें देहात्मपण । विद्येकरितां चिदात्मखूण । त्याचें दोहीमध्यें प्रकाशकपण । सारिखे प्रत्यया येतें जें स्वयें. ॥ २४ ॥ निर्गुण आपणास आपण जाणे । तरी वेदबुद्धीकरूनि अनुभव का म्हणे? । आणि बुद्धीस केंवि बाणे । ब्रह्मीं ब्रह्माकारता? ॥ २५ ॥ श्रुति **'दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या'** म्हणोनी । म्हणे अनुभव बुद्धीकरूनी । कोणी निर्धर्मत्व न समजोनी । गोष्टी ऐशा बोलती. ॥ २६ ॥ एवं चित्स्वरूप निर्धर्म । प्रत्यय चिच्छक्तियोगे सधर्म । मनी धरितां हे वर्म । जेथें बुद्धि तेथें प्रत्यय चित्स्वरूपाचा. ॥ २७ ॥ प्रथम कारणा कनकाची स्फूर्ती । मग स्फुरे कनकमूर्ती । परतु जसजसी कारणा सुवर्णावरती । दृष्टि फिरे तसतसा प्रत्यय कार्याचा. ॥ २८ ॥ कनकी न पावतां दृष्टी । उरली जे कनकमूर्तिसृष्टी । ते कनकी असे कीं नसे म्हणूनि कष्टी । कां होणें लागे सर्व कनक हें कळतां. ॥ २९ ॥ या गोष्टीनें अर्जुन । तेथेचि पावला समाधान । कीं आपल्या देहीं जेथें न पावे मन । प्रत्यय नये त्या अगाचा. ॥ ३० ॥ स्वदेहीं न पावे स्वमन जेथें । आत्मप्रत्यय आणि अगप्रत्यय न ये तेथें । तथापि असे काय संशय येथें । की असे आत्मयातचि तें अग. ॥ ३१ ॥ अर्जुनास मानली हे गोष्टी । परि असोसी[1] राहिली की सकळ सृष्टी । आपणांत कैसी आहे हें स्वदृष्टी । पाहावी मग ध्यावी तैसीच. ॥ ३२ ॥ की सत्यलोकी चतुराननां । दिसत असेल अवघी रचना । त्या लोकास आणि त्याच्या नयना । प्रकाशक आत्माच आपला परि या दृष्टीते न दिसे. ॥ ३३ ॥ या दृष्टीं जें देखिलें । तेंचि मनीं राहे रेखिलें । विश्व आत्मयांत अनुभवें लेखिलें । परि कैसें आहे कळेना. ॥ ३४ ॥ आणि दृष्टीस दिसती । तेही न कळती बरे रीती । की नवग्रह थोर मूर्तिमत असती । दिसती लहान गोळेच तेजाचे. ॥ ३५ ॥ तरी हें सकळ । स्वदृष्टी पाहावें निवळ । येविषयी कल्पवृक्ष घननीळ । प्रार्थावा. ॥ ३६ ॥ तों प्रसंगापुढें प्रसंग । एक एकाहूनि अतरग । बोलता जाला

१ उत्कट इच्छा

**श्रीरंग** । तों योगविभूति पूर्वाध्यायांत आइकिल्या. ॥ ३७ ॥ पुरे करितां विभूती । यांस अंत नाहीं म्हणे **श्री**पती । आणि न बोलतां मौनरीती । उगा राहिला. ॥ ३८ ॥ तों तें आठवे **अर्जुना** । कीं विश्वरूपें या **जगज्जीवना** । पाहूं त्यांत थोर विभूतिरचना । या **ब्रह्मांडीं**च सर्व दृष्टी पडेल. ॥ ३९ ॥ म्हणोनि आतां **अर्जुन** । अपेक्षूनि विश्वरूपाचें दर्शन । प्रार्थूं म्हणे हा **भ**वभंजन । कीं विश्वरूप दावीं म्हणोनी. ॥ ४० ॥ परंतु तत्त्व उपदेशिलें तें न कळूनी । विश्वरूपचि पाहेन म्हणतोसि काय म्हणूनी । ह्मणीं मज म्हणेल **दे**व ऐसा शकूनी । ऐसें बोलों म्हणतसे. ॥ ४१ ॥ कीं आइकिलें जें ऐकावें । आणि जालें जे व्हावें । परंतु विश्वरूप पाहावें । ऐसें वाटतें. ॥ ४२ ॥ हें यथार्थ बोलतां हा **सर्वेश्वर** । देखोनि माझा अधिकार । दावो अथवा न दावो तो प्रकार । प्रश्न तों करूंच याप्रती. ॥ ४३ ॥ आणि जालों कृतार्थ आपण । त्याची संक्षेपरूपें निवेदूं खूण । मग विश्वरूप हा करुण । दाखवो अथवा न दाखवो. ॥ ४४ ॥ ऐसें धरूनि मनीं । श्लोकचतुष्टयेंकरूनी । विनवूं पाहतो येथूनी । आतां **अर्जुन**. ॥ ४५ ॥

**अर्जुन** उवाच—**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

**अर्जुन** बोलता जाला । कीं माझ्या अनुग्रहाकारणें मला । **दे**वा! जो तूं उपदेश केला । त्याणें गेला मोह माझा. ॥ ४६ ॥ माझिया अनुग्रहार्थ । वचन बोलिलास जें समर्थ । त्याची संज्ञा म्हणे **पार्थ** । अध्यात्म म्हणोनी. ॥ ४७ ॥ अध्यात्म म्हणजे स्वभाव । स्वभाव म्हणजे आपला भाव । हा अर्थ अष्टमीं तूं स्वयमेव । **दे**वाधिदेव बोलिलासी. ॥ ४८ ॥ नव्हे जडभाग जो तें क्षर । तें क्षर विलक्षण अक्षर । **'अक्षरं ब्रह्म'** म्हणोनि तूं **सर्वेश्वर** । वदलासी. ॥ ४९ ॥ या व्यतिरेकें आपली खूण । कळे हाही स्वभाव कीं हें प्रथम अध्यात्मलक्षण । तें स्वरूप केंव्हडें म्हणोनि करितां ईक्षण । दिसे अनंतपणें बुद्धीकरूनी. ॥ ५० ॥ कीं बुद्धिवृत्ति जों जों पसरे । तो तों तिला चित्स्वरूप स्फुरे । तिचेंच तें पसरणें सरे । तें पुढें उरे अनंतत्वें. ॥ ५१ ॥ तों **ब्रह्मांड**कोटींची रचना । त्या एकावांचूनि कांहीं दिसेना । तेव्हां कांहीं त्यावीण असेना । पट जैसा तंतूविणें. ॥ ५२ ॥ तंतूविणें वस्त्र न दिसे । तेव्हां तंतूचि असे पट नसे । जड चैतन्य ऐसें समरसे । अन्वयबोधेंकरूनी. ॥ ५३ ॥ व्यतिरेकें जडाचा जाणता । कळला हेंही अध्यात्म तत्त्वता । परंतु परम अध्यात्मसंज्ञित

अनता! । वचन तुझे अन्वय. ॥ ५४ ॥ कीं सर्वभूतीं भाव आपला । तरंगीं समुद्र जैसा कळला । परम अध्यात्मसंज्ञित मला । अन्वयबोधक वचन तुझे वाटतें. ॥ ५५ ॥ परम शब्दे करूनी । अन्वय अध्यात्म व्यतिरेक अध्यात्माहुनी । थोर मानूनि मनीं । परम शब्द येथें योजिला. ॥ ५६ ॥ प्रथम मी जड देह । व्यतिरेके नासला हा मोह । तो स्वदेहासहित भूतसमूह । आत्माच जाला अन्वयें. ॥ ५७ ॥ व्यापूनि सचराचर । आपणचि उरलों निरतर । हा भाव आपला अनत विस्तार । अध्यात्मवचने तुझिया समजलों. ॥ ५८ ॥ स्वभाव शब्दे तू अनत । अध्यात्मार्थ वदसी तो ऐसा निश्चित । परि व्यतिरेक अन्वय म्हणोनि त्यांत । दोन रूपें. ॥ ५९ ॥ मज मी नेणे हें आवरण । व्यतिरेक या अज्ञाननाशाचे कारण । परि जडभ्रमाचें नव्हे जों निवारण । अद्वैतपण आपलें बिंबेना. ॥ ६० ॥ जेणें बिंबे अद्वैत । तेचि अध्यात्मज्ञान श्रेष्ठ अत्यत । परि व्यतिरेक न कळे तों हें निश्चित । न कळे म्हणोनि अध्यात्मव्यतिरेकही. ॥ ६१ ॥ अकारादि सोळा स्वरनामकें अक्षरे । आणि ककारादि पचवीस अक्षरीं सारे । विश्वलेख न आटले परि जों परस्परे । जोडाक्षरे न कळती तों न म्हणवे लेखक. ॥ ६२ ॥ ओनामा एकाक्षरी । लिहीं वाची बरे प्रकारीं । परि ककारास यकार लागतां कोणे परी । उच्चारावें हें न कळे. ॥ ६३ ॥ अक्षरमात्री निपुण । न कळे काना मात्रा वेलांटीची खूण । शुद्ध पुस्तकीं काढी अशुद्धपण । काना मात्रा वेलांटी पुसूं लागे. ॥ ६४ ॥ कळला व्यतिरेक मात्र । जडप्रपंच न कळे विचित्र । म्हणे हें काय जड अपवित्र । सकळ मिथ्या कीं सर्व नश्वर म्हणोनी. ॥ ६५ ॥ असे त्या नश्वरांत नित्य । हें तो त्यासही मान्य करणें लागले अगत्य । कीं सर्वगत आत्मा सत्य । शब्दज्ञानें समजोनि बोलतो. ॥ ६६ ॥ नश्वरीं ते अविनाशी पहावें कैसें । म्हणोनि पुसणार पुसे जेधवां ऐसें । तेव्हां अध चांचपों लागे तैसें । बोलणें त्याचें अयुक्त. ॥ ६७ ॥ आत्मा दिसे सर्वगत । तरी अधिष्ठान तेचि विवर्तरूपे दिसे निश्चित । ते न कळोनि उगाच अत्यत । शब्दब्रह्म चाळी व्यर्थ तो. ॥ ६८ ॥ मिथ्यात्व नश्वरत्वेंचि मानी । त्यासि काय वाद वाढवूनी । नश्वरीं नित्य कैसें देखतोसि म्हणोनी । इतकें मात्र बळकट पुसावे. ॥ ६९ ॥ एवं व्यतिरेक अध्यात्म निश्चित । परि अन्वय कळतां बाणे अत्यंत । कीं अधिष्ठानास विवर्तास सर्वसंमत । अन्वयांतही व्यतिरेक वेगळेपणेंचि जो सर्वदा. ॥ ७० ॥ हेमीं अलंकार भासे । तो नग नाहींच म्हणोनि तें त्यांत नसे । नवमीं शब्द भगवताचे ऐसे । विशद वर्णिले. ॥ ७१ ॥ 'मत्स्थानि सर्व-

**भूतानि'** । हें बोलोनि **'न चाहं तेष्ववस्थितः'** म्हणोनी । म्हणे मजमाजि भूतें परि मी भूतीं नसें यावरूनी । व्यतिरेक सर्वदा विवर्ताधिष्ठानासी. ॥ ७२ ॥ कळावा व्यतिरेक ऐसा । तो अन्वयज्ञानावांचूनि कळतो कैसा? । परि अन्वय न कळे तो चिदात्मरसा । आधींच जिव्हा बुद्धीची चाखेना. ॥ ७३ ॥ हें म्हणोनि जड चैतन्य निवडे । यासही व्यतिरेक नाम घडे । ओनामा सांगतां जैसे खडे । मांडूनि गुरु आधीं दाखवितो. ॥ ७४ ॥ हे प्रथम बोधाची रीती । यासही व्यतिरेक म्हणती । हेही अध्यात्म परि जडा जडैक्य अन्वयरीती । परम अध्यात्म जाणावें. ॥ ७५ ॥ म्हणूनि अध्यात्म विशेषण । परम म्हणूनि बोले निपुण । कीं अष्टमी जगद्गुरुही त्यास आपण । **'अक्षरं ब्रह्म परमं'** म्हणूनि उपदेशी. ॥ ७६ ॥ की जें नव्हे क्षर । ते म्हणावे अक्षर । एव जड नव्हे ते ब्रह्म ऐसें चतुर । सन्मुख कृपाकटाक्षे समजला. ॥ ७७ ॥ एवं जडा शरीरा क्षराते जाणे । तो आत्मा ऐसें अर्जुनास बाणे । तो पावला अन्वयबोधाचे खुणे । यापुढेचि परम शब्देंकरूनी. ॥ ७८ ॥ कीं अलकारी परम हेम । पटांत ततु परम । तरगी जळचि परम उत्तम । रज्जु परम सर्पात. ॥ ७९ ॥ स्वयें न प्रकाशे ते अधम । त्या अधमाते प्रकाशिते परम । एव जडप्रकाशक उत्तम । परम शब्दे क्षरी अक्षरही ओळखिले. ॥ ८० ॥ तो परप्रकाश्य नसे पट । त्याचा प्रकाशक ततूचि निपट । घटीं मातीच असे परम की तो घट । कांहीं नसे मातीवेगळा. ॥ ८१ ॥ तरग होती जाती क्षर । त्यांत जळचि असे अक्षर । तें त्याचें प्रकाशक परम नीर । तैसें ब्रह्म परम जडदेहीं. ॥ ८२ ॥ चित्स्वरूप कळतां एक देह । फिटला अनत ब्रह्मांडांचा संदेह । क्षरी जडीं अनादर अक्षरीं स्नेह । आयताच आत्मत्वें प्रगटला. ॥ ८३ ॥ एव परमशब्दे धनजय । जड तरंगा देखे चित्समुद्रमय । परम शब्दे येथें तोचि निश्चय । मनीं म्हणूनि अध्यात्म विशेषण बोलिला. ॥८४॥ हा बोध जाला अष्टमी । तो मायाभास प्रपचब्रह्मी । देखे तोही जाला नवमी । भगवद्रूप. ॥ ८५ ॥ **'मया ततमिदं सर्वं'** या श्लोकापासूनी । मी अव्यक्त चिन्मूर्तीने हें व्यापिलें म्हणोनी । जें अष्टमीं परम शब्दे करूनी । बोलिला तैसा व्याप्य मायाभास दाविला. ॥ ८६ ॥ की मी तंतूनें हा विश्वपट । मी मृत्स्वरूपे[1] हा घट । व्यापिला म्हणोनि निपट । आकार मिथ्याभास दाविला. ॥ ८७ ॥ मग म्हणे, **'मत्स्थानि सर्वभूतानि'** । कीं भूताभास ये रीतीकरूनी । मजमाजि आहे परि मी त्यांत नसें म्हणोनी ।

१. मातीच्या स्वरूपाने

**'न चाहं तेष्ववस्थितः'** ऐसें म्हणे. ॥ ८८ ॥ म्हणजे मी नसें या भूताभासात । कीं हेमीं अलंकार नाहींच जो त्यांत । सोनें नाहीं म्हणावे तैसा मी अनंत । भूते नाहींतचि म्हणोनि त्यांत मी नाहीं. ॥ ८९ ॥ तरी आहेत मजमध्ये म्हणूनी । कां प्रथम वदलासि स्वमुखेकरूनी । ऐसें म्हणसी तरी तुज आकार भासती यावरूनी । आहेत म्हणतो परि वस्तुता नाहींत भूतेही. ॥ ९० ॥ **'न च मत्स्थानि भूतानि'** । म्हणे शेवटीं या भावे करूनी । म्हणोनि भूतांस भूतपणें न मानूनी । माझा योग म्हणोनि तू पाहें. ॥ ९१ ॥ **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनी । हीं सर्वभूते पाहें माझा योग मानूनी । योग तो भगवद्रूप यावरूनी । विश्व भगवद्रूप **अर्जुन** समजला. ॥ ९२ ॥ हें अन्वयज्ञानापरीस । गुह्य सांपडलें अत्यंत सुरस । प्रपंच मायाभास मानावा विरस । तो भगवद्रूप गोड वाटों लागला. ॥ ९३ ॥ हें राजविद्याराजगुह्य । कीं जे जाणती इंद्रियें बाह्य । तेंही भगवद्रूप ऐसें गुह्य । हेंही अध्यात्मसंज्ञित समजलो म्हणतसे. ॥ ९४ ॥ कीं विना अध्यात्मबोध । न कळे या रहस्याचा शोध । म्हणोनि बोलतां आपला तत्त्वावबोध । **अर्जुन** गुह्यशब्दें हेंहीं सूचवी. ॥ ९५ ॥ अध्यात्मसंज्ञित वचन । व्यतिरेके तुझे म्हणे **अर्जुन** । ते परम अन्वयरूपे आणि गहन । गुह्य भगवद्रूप भूतें पाहणें. ॥ ९६ ॥ ऐशा वचनें करूनी । मोह माझा गेला ऐसें वदूनी । या अनुभवास हेतु आणिक तोही कळला म्हणोनी । बोलतसे आतां हा श्लोक. ॥ ९७ ॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

उद्भव आणि नाश भूतांचा । दोन्हीं कळलीं ऐसी तुझी वाचा । म्यां आइकिली कीं सर्वात्मबोध साचा । सृष्टिसंहार कळतां विशेषे बिंबतो. ॥ ९८ ॥ कीं सृष्टि कळतां आदि कळे । संहार कळतां अंत आकळे । सर्वात्मबोधीं बुद्धि बळे । स्थितिकाळीं तेधवां. ॥ ९९ ॥ अलंकारां सर्वांचि आदि कनक । आणि अंतही तेचि एक । तेव्हां मध्यभागीं प्रकार अनेक । सोनेंचि असे. ॥ १०० ॥ तैसें भूतांचि आदि परब्रह्म । तेंचि अंतीं उरे परम । म्हणोनि म्हणती निगमागम । ब्रह्मचि जग म्हणोनी. ॥ १०१ ॥ ती प्रमाणें अपार । मागे वर्णिलीं वारंवार । पुन्हा विशेषवचनीं विस्तार । होणार ग्रंथाचा. ॥ १०२ ॥ असो तें आतां **अर्जुन** । म्हणे ऐसें अध्यात्मज्ञान । ज्या वचनीं तें कमलपत्राक्षवचन । तुजपासूनि ऐकिले. ॥ १०३ ॥ आणि तुझे

माहात्म्य जें अव्यय । अनादि आणि कधीं नव्हे ज्याचा व्यय । तोही म्हणे धनंजय । महिमा तुझा आइकिला. ॥ १०४ ॥ देवा! कोणी अनधिकारी । आइकोनिही यापरी । साच न मानिती हे गोष्टी खरी । परि मज सत्य वाटतें म्हणतो या श्लोकीं. ॥ १०५ ॥

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर! ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम! ॥ ३ ॥**

अर्जुन म्हणे पुरुषोत्तमा! । हें ऐसेंचि होय म्हणजे यथार्थ तुझा महिमा । कीं इतर देवतामाहात्म्यही निगमागमा । बोलावें लागतें. ॥ १०६ ॥ परि ऐसेंचि हें म्हणोनी । तेथें न म्हणवे यावरूनी । कीं सर्व तूचि या तत्त्वदृष्टीकरूनी । भजनी रुचि अनधिकारिया दाविती. ॥ १०७ ॥ कटक कुंडल किरीट यांचें । सुवर्ण कारण म्हणणें साचें । माहात्म्य हें सुवर्णाचें । होय ऐसेंचि म्हणोनि म्हणवेल. ॥ १०८ ॥ आतां कुंडल सर्वा अलंकारांचें । कारण म्हणणें नव्हे साचें । सारविचारवेत्ते न म्हणती त्याचे । हें ऐसेंचि महत्व होय म्हणोनि. ॥ १०९ ॥ कीं कुंडलचि आधीं कैचे? । सोनेंचि आहे साचें । परि सुवर्णी दृष्टि देऊनि त्याचे । महत्व घडों शके ऐसें बोलती. ॥ ११० ॥ कुंडलाच्या केल्या मुद्रिका म्हणोनी । म्हणो ये त्याचिया पूर्वरूपाते स्मरोनी । परि याही प्रकारेंकरूनी । हे ऐसेंचि होय म्हणवेना. ॥ १११ ॥ कीं कुंडल कासयाचें होतें? । म्हणतां कनकीं कारणत्व जातें । सुवर्णाच्या मुद्रिका म्हणतां म्हणों येतें । हें ऐसेंचि होय म्हणोनी. ॥ ११२ ॥ तरी जगत्कारणत्व निर्गुणीं । तेथेंचि मायायोगें सगुणीं । त्यावेगळें ऋषि देवतागणीं । कारणत्व न साधे सर्वथा. ॥ ११३ ॥ त्यांसही सर्वोत्कर्षे वेद । बोलति देखोनि कार्यकारणअभेद । अनधिकारिया उपासकांचा खेद । हरिती माहात्म्य त्यांचें वर्णुनी. ॥ ११४ ॥ त्याचें करितां श्रवण । हें ऐसेंचि होय म्हणूनि कवण । सार जाणता म्हणेल ऐसी खूण । हें ऐसेंचि होय म्हणतां अर्जुन सूचवी. ॥ ११५ ॥ कीं जगत्कारणत्व निगम । ज्या शुद्धसत्त्वोपाधीचें परम । बोलती तो हा पुरुषोत्तम । स्वमुखें निवडोनि बोलिला. ॥ ११६ ॥ कीं मी आदि देवा ऋषीची । म्हणोनि ते माझ्या प्रादुर्भावाची । खूण नेणती इत्यादि साची । जगत्कारणता आपुली बोलिला. ॥ ११७ ॥ तरीच या अर्थी दृष्टि देऊनी । परमेश्वरा! पुरुषोत्तमा! म्हणोनी । अर्जुन या दों नामें करूनी । विनवी येथें या श्लोकीं. ॥ ११८ ॥ भाव ऐसा कीं अत एव । परमेश्वर तूं स्वयमेव । पुरुषोत्तम तूचि देवाधिदेव । ब्रह्मादि अशेषा पुरुषांहुनी. ॥ ११९ ॥ म्हणोनी अगा

ईश्वरा! परमा! । म्यां तुजपासूनि तुझा महिमा । आइकिला जी! पुरुषोत्तमा! । परमेश्वरा! हे ऐसेचि होय म्हणे या श्लोकी. ॥ १२० ॥ अर्थ त्याचा जाला ये रीती । आतां जें अपेक्षूनि ऐसी स्वामीप्रती । पूर्वं उपदेशस्थिती । बोलिला तें प्रार्थितां. ॥ १२१ ॥ की पाहो इच्छितों तुझ्या रूपाते । जे ऐश्वररूप पाहे म्हणसी मातें । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनि आपणातें । अघटित घटनायोगरूपे वदलासी. ॥ १२२ ॥ योगचि तुझे रूप । कीं तू अधिष्ठान चित्स्वरूप । रज्जूंत दिसतो जो सर्प । तो रज्जुच असे. ॥ १२३ ॥ **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । नवमीं भगवद्वाक्य त्यावरूनी । योग विश्वाकार ते रूपचि समजोनी । रूप ऐश्वर पाहो इच्छितों म्हणतसे. ॥ १२४ ॥ आतां नवमीं म्हणतां योग पाहे । अनुभवें आत्मप्रकाशेंचि देखिला आहे । पुन्हा पाहों इच्छितो म्हणणें न साहे । तरी जैसें पाहो इच्छितों हे पाहणें ते नव्हे. ॥ १२५ ॥ की इद्रिये आणि विषय । प्रपच दोन्ही मिळोनि होय । दोहींस बुद्धि देखे चिन्मय । तरग जलमय जे रीति. ॥ १२६ ॥ तरी चित्स्वरूपाते जाणे बुद्धी । तीस जडही तेचि ऐसी बोधसिद्धी । परतु विश्वाकाराच्या समृद्धी । कळती इद्रियातेचि. ॥ १२७ ॥ ओळखतां घटीं एकांत माती । तैशा मानिल्या घटादिजाती । जडही चित्स्वरूप ये रीती । कळलें जरी बुद्धीते. ॥ १२८ ॥ परि एका पटाची आकृती । तैशाच नसती इतर जाती । ज्या दृष्टि न दिसती । तत्त्व कळोनि त्याचें रूप न कळे. ॥ १२९ ॥ तैसा प्रपच सकळ । कळला भगवद्रूप केवळ । परि कोठे कैसा आहे हें निवळ । पाहावें अपेक्षा हे मनी. ॥ १३० ॥ तरी ते दृष्टि पाहावे । पाहो इच्छितों म्हणे या भावे । परि एक पाहणे स्वभावे । एक पाहणे यथाप्रकार. ॥ १३१ ॥ खाटे एवढी उडे गगनीं । ते वीतभर वावडी दिसे नयनीं । नवग्रह नक्षत्रे दुरूनी । अवयवही न दिसती गोळे[१]तेजाचे. ॥ १३२ ॥ आणि दृष्टि चाले जिकडे । तिकडीलचि कांहीं रचना दिसे तिकडे । वरकड न दिसे आणि कांहीं आड पडे । तेव्हां पलीकडील कांहीं दिसेना. ॥ १३३ ॥ तरी ऐसें पाहणेंही व्यर्थ । पाहावे सर्व आणि यथार्थ । की हा विश्वरूपे समर्थ । जसा आपणाते पाहतो. ॥ १३४ ॥ प्रपचयोग याचा । हा त्यास कल्पूनि साक्षी त्याचा । जे रीती पाहात बोलतो वाचा । योग माझा पाहे म्हणोनी. ॥ १३५ ॥ तैसाच विश्वाकारे । हा दृष्टि पाहावा यथा प्रकारे । म्हणोनि बोलोनि इतकिया विचारे । मग पाहों इच्छितों म्हणतसे. ॥ १३६ ॥ की आपणाते तू जैसा । विश्वरूपें बोलसी तैसा । परमेश्वरा! पाहूं इच्छितों म्हणोनि ऐसा । प्रार्थितसे.

१ ना० यथा०

॥ १३७ ॥ कीं विश्वसाक्षी तू आपणातें । जैसा विश्वरूपें पाहूनि मातें । कीं योग माझा पाहें म्हणसी त्या रूपाते । परमेश्वरा! पाहों इच्छितों. ॥ १३८ ॥ ऐसें बोलोनि शकला । कीं हा अधिकार आहे की नाहीं मला । या भावें आतां सर्वोत्तमाला । मागुती प्रार्थितो या श्लोकीं. ॥ १३९ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो! ।**
**योगेश्वर! ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

देवा! वाटतें ऐसें मजला । परि माझा अधिकार ठाउका तुजला । जरी मज अधिकार असला । तरी दावीं त्या विश्वरूपा आपणाते. ॥ १४० ॥ म्यां या अधिकारे करूनी । पाहों ये म्हणोनी । प्रभु! समर्था! मानिसी मनीं । तरी योगेश्वरा! आपणातें दावीं. ॥ १४१ ॥ योग अघटितघटना । प्रपचरूप तुझी रचना । त्या योगाचा जगज्जीवना! । ईश्वर तू. ॥ १४२ ॥ जो जें कल्पी अतःकरणीं । तो त्या कल्पनेचा धनी । की न कल्पिसी तू चक्रपाणी । नव्हेच ते. ॥ १४३ ॥ कीं जें तू कल्पिसील । तेच देवा! उपजेल । ज्यास पाळिसी ते असेल । नासेल ज्याते नाशिसी. ॥ १४४ ॥ ऐसा योग चराचर । त्याचा तू ईश्वर । म्हणूनि तू योगेश्वर । आणि तूचि तो योगही. ॥ १४५ ॥ कीं तू स्वयें चित्स्वरूप । साक्षी सगुणत्विही अरूप । जें कल्पिसी ते तुझे रूप । विश्वरूप तूं ये रीती. ॥ १४६ ॥ जें कल्पिसी तो योग । तेव्हां योग तुझा जग । ते तुझे रूप सिद्ध होतां मग । योगेश्वर म्हणतांचि तू योगही. ॥ १४७ ॥ म्हणोनि योगेश्वरा! माते । दावीं म्हणे आपणातें । जगाच्या नश्वरत्वींही ज्या रूपाते । अव्यय म्हणावें. ॥ १४८ ॥ कीं सृष्टि स्थिति सहार । होय जाय वारवार । हा योगचि रूप ज्याचें तो तू योगेश्वर । हें तों नाशाते पावेना. ॥ १४९ ॥ योग उद्भवरूप सृष्टिकाळीं । योग जगदाकार स्थितिकाळीं । योग अभावरूप लयकाळीं । योग निद्रायोग तो. ॥ १५० ॥ की योगमाया पुनःपुन्हा । प्रगटते हें खुटेना । एव स्थितिकाळीं अपेक्षा अर्जुना! । ऐश्वरयोगरूप दृष्टि पाहायाची. ॥ १५१ ॥ आणि **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । जैसा आपणाते बोलतोस पाहूनी । तैसा तूं पाहावास म्यां हें स्ववचनीं । अर्जुन बोलिला. ॥ १५२ ॥ तरी हा स्थितिकाळ । त्यांत या युद्धीं क्षय मांडिला विशाळ । हा सकल्प मनीं विश्वपाळ । करूनि असे ते दावील. ॥ १५३ ॥ परि जितके योगमायाविलास । तें रूप भगवंताचें म्हणोनि त्यास । अखडत्वें लक्षूनि भासाभास । अव्ययरूपें दावीं

ऐसें म्हणतसे. ॥ १५४ ॥ अर्जुन ऐसे बोलिला, । मग काय उत्तर देव देता जाला, । त्या करुणासमुद्राचिया बोला । संजय अतरप्रेमें बोलतसे. ॥ १५५ ॥ हस्त धरितांचि पाणिग्रहणीं । धनीन सर्वस्वाची गृहिणी । मग तो पति कोणे गोष्टीची वाणी । न करील तैसा भगवत अर्जुनाते. ॥ १५६ ॥ शिष्यत्वास जाला पार्थ पात्र । गुरु जाला जगद्दात्र । विश्वरूप दावीं म्हणे मात्र । तों पाहेच म्हणतो श्रीभगवान्. ॥ १५७ ॥

श्रीभगवानुवाच—**पश्य मे पार्थ! रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥**

म्हणे षड्गुणवत भगवत । पाहे पार्था! माझीं रूपे शत शत । आणि सहस्र म्हणजे असख्यात । दिव्य नानाविधे नानावर्णे नाना आकृती. ॥१५८॥ या श्लोकी प्रथम । 'पश्य' म्हणे सर्वोत्तम । मग 'पार्था!' म्हणे यांत परम । आदरे शब्द मानिला ऐसे सूचवी. ॥ १५९ ॥ आधींच म्हणे 'पाहे' । मग म्हणे 'पार्था!' की आधीं 'पार्था' म्हणणें न साहे । प्रथम 'पार्था!' म्हणतां झणीं संदेह राहे । कीं पाहें म्हणेल अथवा म्हणेना. ॥ १६० ॥ आतां रूपे शत शत । आणि सहस्र असंख्यात । तरी ती कैसीं पाहे म्हणतो हे मनांत । अर्जुनास वाटे तो वदतसे हा श्लोक. ॥ १६१ ॥

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत! ॥ ६ ॥**

पाहें द्वादश आदित्यांते । पाहें अष्टवसूतें । पाहें अकराही रुद्रातें । दोघां अश्विनीकुमारांही. ॥ १६२ ॥ जे एका उणे पन्नास । पाहें त्या मरुद्गणांस । आणि पूर्वी नाहीं देखिलीं त्या आश्चर्यांस । बहुतां प्रकारांस तू पाहें. ॥ १६३ ॥ अग्नि जाळी खांडव । तेव्हा इंद्रादिकांसी भांडला पांडव । तेव्हां या देवीं युद्धीं तांडव । तेही आश्चर्य पाहे म्हणे श्रीपती. ॥ १६४ ॥ ते अर्जुनें देखिले असती । म्हणोनि जीं या वेगळी देखिलीं नसती । तीही आश्चर्यें पाहे म्हणे श्रीपती । या भावें करूनी. ॥ १६५ ॥ ऐसीं वेगळीं नामें घेउनी । पाहें म्हणे भिन्न भिन्न वचनीं । तों समग्र पाहें म्हणेल कीं न म्हणेल ऐसें मनीं । झणी पार्थ मानी म्हणोनि बोलतो हा श्लोक. ॥ १६६ ॥

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश! यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥**

अगा! समग्रही जग पाहें । चराचरसहित जें आहे । चर चाले अचर

उगेंचि राहे । द्विविध देहांसहित सकळ लोक. ॥ १६७ ॥ म्हणसी कोठे पाहू सकळही । तरी येथे याचि माझिया देही । पाहे आणि जे कांहीं । पाहों इच्छिसी. ॥ १६८ ॥ येथें गुडाकेशा! या नामेंकरूनी । अर्जुनाते संबोधुनी । पाहता घाबिरा नको होऊ म्हणोनी हें पाहणे सोपे नव्हे ऐसें सूचवी. ॥ १६९ ॥ की गुडाका निद्रा तीस वश । जो करी तो म्हणावा गुडाकेश । यात गूढभाव हृषीकेश । सूचवी. ॥ १७० ॥ की निद्रा भ्राति विस्मृती । नव्हे तीअधीन ज्यास स्मृती । तरी पाहतां माझी विश्वाकृती । भिऊ नको भयानक देखता. ॥ १७१ ॥ बागुलाचे रूप कैसें । मातेस पुसे बाळ ऐसें । परि देखतां तें भयानक जैसे । रडो लागे. ॥ १७२ ॥ तैसें माझे रूप विकराळ । कीं ज्यास म्हणावें महाकाळ । भयानक अतिविशाळ । भिसी झणी हें सौम्यरूप विसरोनी. ॥ १७३ ॥ गुडाकेशा! पाहे । परि जैसे गुडाकेश नाम आहे । तैसाच या स्मृतीनें राहे । की हे भयानक परि मज भय असेना. ॥ १७४ ॥ आतां ते विकराळ हें तो सौम्य । मज दिसते जे रूप रम्य । ऐसें म्हणसी तरी ते अगम्य । या कर्मजनित देहदृष्टी दिसेना. ॥ १७५ ॥ तेव्हां हें तू देखसी । ते दिव्यदृष्टी जेव्हां पाहसी । म्हणोनि प्रसंगे गोष्टी ऐसी । बोलतसे या श्लोकी. ॥ १७६ ॥

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥**

अगा! हे तुझे डोळे। कर्मजनित रक्तमांसाचे गोळे । या दृष्टींत ते न आकळे । रूप माझे. ॥ १७७ ॥ या स्वदृष्टीनेंचि कैशी । ते योगमूर्ति माझी पाहों शकसी । म्हणोनि दिव्यदृष्टि देतो ऐसी । की पाहू इच्छितोसि तैसा पाहसी मजलागी. ॥ १७८ ॥ म्हणोनि करूनि कृपादृष्टी । देतों म्हणे दिव्यदृष्टी । मग तू पाहें सर्व सृष्टी । योग ऐश्वर तोचि माझा. ॥ १७९ ॥ प्रश्न ऐसा की पाहो इच्छितो रूप ऐश्वर । उत्तर ऐसें कीं पाहे योग ऐश्वर । एव योगचि विश्वरूप ऐसें योगेश्वर । स्पष्ट करी ये स्थळीं. ॥ १८० ॥ ऐसें बोलोनि जगन्मय । काय करिता जाला अद्वय । ते आतां सांगतो संजय । धृतराष्ट्र रायाते. ॥ १८१ ॥

**संजय** उवाच—**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

**संजय** म्हणे गया! । तूज दिव्यदृष्टि देतों म्हणोनियां । **पार्थास** ऐसें बोलोनिया । तदनतर दाविता जाला रूप ऐश्वर. ॥ १८२ ॥ पूर्वी **'पश्य मे**

**पार्थ! रूपाणि'** । म्हणोनि बोलिला **च**क्रपाणी । कीं पाहें माझीं रूपे ऐसी उगेच वदे वाणी । परि दाखविता जाला ये स्थळीं. ॥ १८३ ॥ **'एवमुक्त्वा ततो'** म्हणोनी । **सं**जय म्हणे अर्थ ऐसा या वचनीं । की ऐसें बोलून या उपरि दाविता जाला यावरूनी । पूर्वी दावी म्हणसी तरी बरे पाहें हा अंगीकार मात्र. ॥ १८४ ॥ म्हणती कोणी टीकाकार । कीं तेथेंचि दाविता जाला विश्वाकार । परि न देखे **पां**डुकुमार । मग दिव्यदृष्टि देऊनि दाविता जाला ॥ १८५ ॥ तरी सर्वज्ञ नेणे काय हे गोष्टी । की हा पाहों न शके विना दिव्यदृष्टी । तो दावी आणि हा न देखे सृष्टी । हे बोलणें अयुक्त. ॥ १८६ ॥ विना उपनेत्र । पाहो न सकती ज्याचे नेत्र । तो पाहेन म्हणतां आधीं पाहें म्हणणें गोष्टी मात्र । उपनेत्र देऊनि दाखवणें तेचि दाखविणें. ॥ १८७ ॥ असो आतां **सं**जय म्हणे बोलिला **यो**गेश्वर । जो विश्वरूप योगाचा **ई**श्वर । आणि दाविता जाला रूप ऐश्वर । नाम ज्याचे **ह**रि म्हणोनी. ॥ १८८ ॥ काळरूपे सर्व हरी । भक्तांचें वाईट तितकें परिहरी । म्हणोनि **वे**द म्हणती **ह**री । ज्या **स**र्वेश्वरातें. ॥ १८९ ॥ तो **धृ**तराष्ट्रास वाटे ऐसें । कीं आइकावें ते रूप कैसें? । **सं**जय तो प्रेमामृतरसें । बोलतच आहे येथुनी. ॥ १९० ॥ येथून पांच श्लोक । **सं**जयमुखींचे ज्यांत कौतुक । विश्वरूपाचेंचि ऐसें अनुसंधान एक । त्यांत पहिला श्लोक हा. ॥ १९१ ॥

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥**

अनेक मुखे ज्यांत । अनेक नेत्र ज्या रूपांत । अनेकाद्भुतांचीं दर्शनें अत्यत । परोपरीचीं ज्या रूपी. ॥ १९२ ॥ अनेके आणि दिव्यें सुदरें । आभरणें ज्यांत नानाप्रकारे । आणि दिव्यें अनेकें नानाकारें । आयुधें उचलिलीं ज्या रूपीं. ॥ १९३ ॥

**दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥**

धरिलीं दिव्य सुमनें । दिव्य वस्त्रे दिव्य गधाचीं अनुलेपनें । सर्वाश्चर्यमय देव ऐसा **अर्जुनें** । देखिला. ॥ १९४ ॥ आणि रूपास त्या न दिसे अंत । ऐसा देव जो अनत । आणि मुखे जितकी विश्वांत । त्याच विश्वतोमुखाचीं. ॥ १९५ ॥ मुखे म्हणता सर्व त्याचीं । अगे सकळ त्याचींच साचीं । कीं

**'विश्वतश्चक्षु'** या श्रुतीनें प्रपंचीं । मुखे सर्वांगें सर्वांचीं **भ**गवद्रूप हा अर्थ. ॥ १९६ ॥ हें अमुकियाचें मुख ऐसें जाणे । त्यास त्याचींच सर्वांगें ऐसेंचि बाणे । म्हणोनि संक्षेपे **सं**जय म्हणे । **'विश्वतोमुख'** म्हणोनी. ॥ १९७ ॥ आतां **'एवमेतद्यथात्थ त्वं'** हे प्रश्नवाक्य **अर्जु**नाचे । की तू जैसा आपणातें बोलतोस तैशाचे । दर्शन मी इच्छितों तरी यथास्थित साचे । दृष्टीं दिसे तैसें पाहों इच्छितों. ॥ १९८ ॥ कीं कल्पूनि शुद्धसत्त्वे करूनी । जे जे रूप जैसजैसें स्वनयनीं । तू पाहतोसि तैसें पाहो इच्छितों म्हणोनी । **अर्जुन** मागें बोलिला. ॥ १९९ ॥ तरी **ई**श्वरे कल्पिली सृष्टी । तैसी न दिसे जीवदृष्टी । जे अनादि अज्ञानें कष्टी । काळचक्रीं भोवती जे जीव. ॥ २०० ॥ सूर्य न दिसे दिवांधासी । तैसा **ई**श्वराचा सत्त्वप्रकाश जीवांसी । न दिसे ते प्रकाशवंता चराचरासी । प्रकाशहीन अवलोकिती. ॥ २०१ ॥ रोग नयनीं ज्याला । शुभ्र तितुकें पिवळे दिसे त्याला । तैसा प्रकाशरूप **ई**श्वर जीवांला । दिसे प्रकाशरहित विश्वरूपे. ॥ २०२ ॥ परतु तो सर्वेश्वर । कल्पितो आपुल्या शुद्धसत्त्वें चराचर । सत्त्वेंचि रज तम आणि मिश्रसत्त्वविस्तार । कल्पीतसे. ॥ २०३ ॥ तें सत्त्व प्रकाशरूप । म्हणोनि तेजोरूप विश्वरूप । कल्पितो पाहातो सत्तास्वरूप । तैसें **सं**जय वर्णितो या श्लोकीं. ॥ २०४ ॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥**

आकाशीं उठे एकसरें । सहस्र सूर्यांचें तेज बरे । तरी त्या विश्वमूर्ति तेजासारिखें होय खरे । म्हणोनि राया! म्हणों ये. ॥ २०५ ॥ ऐसें विश्व आपले शरीर । तेजोरूप चराचर । **पार्थालागीं परमे**श्वर । दाविता जाला. ॥ २०६ ॥ अर्थ या श्लोकीं ये रीती । कीं विश्वरूपाची ऐसी ज्योती । येथें कोणी म्हणती । कीं ब्रह्म तेजस्वरूप. ॥ २०७ ॥ आणि दिव्यदृष्टि **अर्जुना**तें । जेव्हां दिधली **भ**गवतें । तेव्हां त्यानें त्या तेजातें । म्हणती ज्ञानदृष्टीं देखिलें. ॥ २०८ ॥ म्हणोनि म्हणती ब्रह्म । तेजोरूप निखिल परम । आणि ब्रह्मज्योति स्थळस्थळीं निगम । म्हणती म्हणोनि ते ऐसें बोलती. ॥ २०९ ॥ तरी हा लक्ष्यवादविरुद्ध । म्हणोनि मागेंचि जालें सिद्ध । या प्रसंगीं सत्त्वशुद्ध । प्रकाश त्याचा ये रीती. ॥ २१० ॥ **अघासुर दं**तवक्र **शिशु**पाळ । यांचें तेज **कृष्ण**रूपीं निर्मळ । मिळाले तेंही सत्त्व विमळ । **कृष्ण**शरीरीं प्रवेशलें. ॥ २११ ॥ जें सर्व लोकीं देखिले । तें इंद्रियगम्य कोणीं ब्रह्म लेखिलें । **वैकुंठ कृष्णरूपीं** रेखिलें । प्रवेश **वै**कुठीं सत्त्वाचा. ॥ २१२ ॥ ब्रह्म तों

सर्वगत। तेंचि वैकुंठींही निश्चित। तेथें सत्त्वप्रकाशरूप अत्यंत। भगवदाकार पावते. ॥ २१३ ॥ तेजें प्रवेशली उत्तमश्लोकी। तोचि प्रवेश वैकुंठलोकी। तो सत्त्वप्रकाश अवलोकी। अर्जुन विश्वरूपाचा. ॥ २१४ ॥ कीं अनेकवक्त्रनयन। अनेकाद्भुतदर्शन। अनेक दिव्याभरणयुक्त देखे अर्जुन। तें काय निर्गुण ब्रह्म मानावें. ॥ २१५ ॥ आता दिव्यदृष्टि दिधली। कीं एकसरें पाहू न शके दृष्टि पहिली। की अविद्या कर्में निर्मिली। जीस ग्रह नक्षत्रे दीसती अन्यथा. ॥ २१६ ॥ विश्व सर्व यथास्थित। या डोळां न दिसे म्हणोनि भगवत। दिव्यचक्षु देता जाला की पांडुसुत। जशाचें तसें आणि एकसरे जग पाहे. ॥ २१७ ॥ आदित्य वसु रुद्र अश्विनीकुमार। आणि अद्भुतें पाहे नाना प्रकार। परि या दृष्टीं म्हणे जगदाधार। पाहो न शकसी. ॥ २१८ ॥ म्हणोनि दिव्यचक्षु तुजला। देतों म्हणूनि देता जाला। तेव्हां नानाप्रकार त्याला। एकसरे दिसों लागले. ॥ २१९ ॥ हें नव्हे ब्रह्म निर्गुण। हें विश्व सारे त्रिगुण। परि तेजोरूप देखे की ब्रह्म सगुण। शुद्धसत्त्वें कल्पी ऐसें आपणा. ॥ २२० ॥ आम्ही ज्ञानी ऐसी स्पर्धा। ब्रह्म ज्योतिस्वरूप ऐसी जया श्रद्धा। नव्हे तेजोरूप म्हणतां शुद्धा। काय तमोरूप मानावे ते म्हणती. ॥ २२१ ॥ तरी तेज तम दोहींपलीकडे। जे तर्कें सर्वथा न सांपडे। तद्रूप होऊनि त्यांत बुडे। बुद्धि गुरुकृपेंकरूनी. ॥ २२२ ॥ तेज कल्पू शके मन। तेज देखो शकती लोचन। कल्पवेना देखवेना त्यास ते जन। तेजस्वरूप नव्हे म्हणतां रुसती. ॥ २२३ ॥ असो तें आतां धनंजय। काय देखे आणि कैसें वर्णी संजय। तें योगऐश्वररूप अव्यय। तेजोमय ऐसें म्हणतसे. ॥ २२४ ॥ म्हणे महात्मा विश्वाकृती। प्रभा तयाची ये रीती। तरी आत्मा शरीर ऐसे संस्कृती। प्रसिद्ध सर्वत्र. ॥ २२५ ॥ बुद्धि देह चित्त जीव। आत्मा आणि ईश्वर जो देवांधिदेव। इतकियाचेही संस्कृती नांव। आत्मा म्हणोनी. ॥ २२६ ॥ प्रसंगानुरूप अर्थ। येथे विश्वाकार दावी समर्थ। प्रार्थूनि पाहे हेंचि पार्थ। म्हणूनि महात्मशब्दार्थ एथें ये रीती. ॥ २२७ ॥ कीं महान् म्हणजे थोर। आत्मा म्हणजे शरीर। एव विश्वाकार सर्वेश्वर। तो महात्मा त्याची प्रभा ये रीती. ॥ २२८ ॥ जो आत्मा जडावेगळा। तो तेजोरूप म्हणती सगळा। तरी अनेकवक्त्रनयन इत्यादि आकारमाळा। त्या केवळास म्हणवेना. ॥ २२९ ॥ महात्मा म्हणजे थोर देह। तेज त्याचे तें सत्त्व निःसंदेह। परि ज्यांस लक्ष्यवादाचा स्नेह। ते आत्मा निखळ येथें वर्णिती. ॥ २३० ॥ वर्ण उज्ज्वल शुभ्र उत्तम। सत्त्वाचा म्हणती निगम। जेथें आदि-

त्यवर्ण ज्योतिरूप ब्रह्म । म्हणती तेथें सगुणब्रह्म । विश्वरूप लेखावे. ॥ २३१ ॥ ऐसा सिद्धांत येथें जाला । की नाना आकार दावितां **अर्जुना**ला । सूर्यसहस्र-प्रकाश दाविता जाला । विश्वरूपीं. ॥ २३२ ॥ ऐसा जाला निर्णय । आतां आणीक काय वर्णी **सं**जय । जे जे देखे **ध**नजय । तें तें दृष्टीं पडे **सं**जयाच्या. ॥ २३३ ॥ हाही गुरुकृपाविलास । की **सं**जयाचा गुरु **व्यास** । वृत्तांत सांगावया **धृ**तराष्ट्ररायास । **व्यासें** **सं**जय दिधला. ॥ २३४ ॥ तेव्हां **व्यासें** वर तयाला । ये रीतीचा दिधला । की सर्वही कळो दिसो तुजला । जें होईल दों सैन्यांत. ॥ २३५ ॥ **धृ**तराष्ट्राकारणे **सं**जयातें । वर जाला परतु हे भाग्य नाहीं त्यातें । की जैसें दिसे **ध**नजयाते । तैसे **सं**जय देखतो. ॥ २३६ ॥ जो नवरी पाहावयास गेला । तोचि पाटीं बैसला । ज्या कारणे पाहावयास पाठविला । तो राहिला एकीकडे. ॥ २३७ ॥ आतां विश्व अनेक । ज्या रूपांत तें रूप एक । ऐसें देखे कौतुक । ते **सं**जय सांगतो या श्लोकी.॥२३८॥

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥**

शरीर **दे**वदेवाचे । ते एकचि परि त्याचे । अनेकरूप दिसते जें जगीं साचें । वेगळे वेगळे जन म्हणे. ॥ २३९ ॥ वेगळे जनप्रतीतीकरूनी । दिसतसे हेंचि दिव्यनयनी । त्या एकाच शरीरी तो देखे म्हणोनी । **सं**जय म्हणे. ॥ २४० ॥ जे जग अनेकरूप पूर्वी देखिले । तेंच हे ऐसें **अर्जुनें** लेखिलें । परि त्या एकाशरीरीं देखे रेखिले । चित्र नवनारीगजाचें जे रीति. ॥ २४१ ॥ पाहतां गजाच्या आकाराकडे । गज सारा दृष्टीं पडे । त्यांतचि पाहतां सांपडे । स्थळस्थळीं भिन्न स्त्रीरूप. ॥ २४२ ॥ जें विश्व सर्वदा दिसे । तेचि तेजोरूप दिव्यदृष्टीं दिसतसे । परि अनेक एकी गवसे । ते समयीं. ॥ २४३ ॥ तदा म्हणजे ते काळीं । जग अनेक एकी न्याहाळी । विश्व हेंचि परि नवी नव्हाळी । तेव्हां हें की अनेक एकी तो देखे. ॥ २४४ ॥ ऐसें देखोनि आश्चर्यमय । भ्याला अत्यत **ध**नजय । म्हणोनि बोलतो **सं**जय । हा श्लोक. ॥ २४५ ॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥**

त्यानंतर तो **ध**नजय । देखोनिया रूप जगन्मय । विस्मित ऐसा जाला कीं विस्मय । प्रवेशे त्याचे चित्तांत ॥ २४६ ॥ विस्मयाविष्ट होतां यापरी । रोमांच उठले शरीरीं । भयें करी झडकरी । नमस्कार शिरसा **दे**वाते.॥२४७॥

करोनियां नमन । कृतांजलि जाला **अर्जुन** । आणि बोलता जाला तें वचन । आतां या श्लोकापासूनी. ॥ २४८ ॥ बोलेल पुढें ये रीतीकरूनी । की मी भ्यालो हे देखूनी, । प्रस्तुत कैसें कैसें देखिले दिव्यनयनीं । तें आधीं वदतसे **अर्जुन**. ॥ २४९ ॥

**अर्जुन उवाच— पश्यामि देवांस्तव देव! देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान्।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् १५**

**दे**वा! देव जितके । तुझ्या देहीं देखतो तितके, । ऐसें म्हणोनि मुख्य अमुके अमुके । म्हणोनि एक दोन नावें निवेदितो. ॥ २५० ॥ आधी म्हणे **ब्र**ह्मयाते । देखतो आणि **ईश म**हेश जो त्याते । मागुती म्हणे **क**मलासनातें । देखतो म्हणोनी. ॥ २५१ ॥ **स**त्यलोकीं **ब्र**ह्मा दिसे । **उ**रग दिव्य म्हणता **शे**ष **पा**ताळीं असे । चतुर्दश लोकरचना गवसे । आणि कमलासनस्थ म्हणता **भू**लोक हा. ॥ २५२ ॥ कीं अधिष्ठूनि कमलाच्या आसनातें । **पु**ष्करद्वीपीं असतो **ब्र**ह्मा, तयाते । देखतो, की त्या द्वीपाते । त्या पुष्कराकरिता म्हणती **पु**ष्करद्वीप. ॥ २५३ ॥ **जं**बूद्वीपापासूनी । शेवटील सातवे **पु**ष्करद्वीप म्हणोनी । पुढे **लो**कालोक पर्वत तेथुनी । वसती नसे जीवाची. ॥ २५४ ॥ पुष्कर कमलाचे अभिधान । त्या द्वीपी तें **ब्र**ह्मयाचें स्थान । **ब्र**ह्मयाचे वर्णिता ते आसन । सप्तद्वीपांसहित भूगोल सूचवी. ॥ २५५ ॥ **ब्र**ह्मा **स**त्यलोकी आणि **ई**श । **शं**कर **कै**लासवासी **म**हेश, । ऋषि सर्व आणि पांताळीं सर्पांचे ईश । **शे**ष **वा**सुकी दिव्य, तेही देखतो. ॥ २५६ ॥

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।**
**नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर! विश्वरूपम् ॥ १६ ॥**

अनेक बाहु अनेक उदरे । मुखे नेत्र अनेक जे अनेक प्रकारे । ऐसा **अ**नत तू अनत विस्तारे । दिससी; त्या तूते पाहतों. ॥ २५७ ॥ अत न दिसोनि कोणीकडे । देखतो अनतत्वे चहूकडे । दिसतोसि मज जिकडे तिकडे । परि आदि मध्य अत कोठे दिसेना. ॥ २५८ ॥ कीं अधिष्ठान जैसें अनत । तैसा साक्षित्वास नाहीं अत । साक्षित्व ईश्वराचे जेथपर्यंत । तेथपर्यंत विश्वही. ॥ २५९ ॥ एव **ब्र**ह्मांडेंही अनत । ज्यांचा साक्षी कल्पीं पाहे अत । ऐसें सूचवी, कीं अन्यथा अत । एका **ब्र**ह्मांडाचा प्रसिद्ध हें. ॥ २६० ॥ आवरणें सात तेथपर्यंत । **ब्र**ह्मांड एक, ऐसा अत; । तेव्हां **ब्र**ह्मांडकोटीच्या उतरडी अनत । दिव्यदृष्टीं **अर्जुनें** देखिल्या ॥ २६१ ॥ जैशा मडकियांच्या उतरडी । ऐशा **ब्र**ह्मांडांच्या कोडी । सृष्टिसंहारघडामोडी । एकसरें जयांच्या,

॥ २६२ ॥ ऐसें भागवती श्रुति । वेदस्तुतीच्या अतीं बोलती । की रज उडतां न मोजवती । ब्रह्मांडें इतुकी तुजमधे. ॥ २६३ ॥ दशमस्कंधी ब्रह्मस्तुती । तेथें हे विशद येचि रीती । कोणी दृष्टि या अर्थीं न देती । वाखाणिती भलतसें. ॥ २६४ ॥ त्यांत प्रतिब्रह्मांडीं ब्रह्मादि देव । वेगळे, परतु साक्षी एक देवाधिदेव । विश्वरूपे स्वयमेव, । जो अर्जुनातें दिसतसे. ॥ २६५ ॥ ऐशा अनत विस्तारा । विश्वरूपाते तूते विश्वेश्वरा! । देखतों म्हणोनि सर्वेश्वरा! । इत्यादि भावे बोलिला. ॥ २६६ ॥ ऐसीं ब्रह्मांडे अनेक । परि चक्रगदाधर सर्वत्र तूचि एक । ऐसें देखतो म्हणोनि हें कौतुक । बोलेल आता या श्लोकीं. ॥ २६७ ॥

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥**

मुकुट गदा आणि चक्र जया । तेजाची राशी ऐसा तू, तया । सर्वां ब्रह्मांडीं दीप्तिमत ऐसिया । तूते देवा! मी पाहतों. ॥ २६८ ॥ ऐसिया तूते पाहतों खरे । परि पाहों न शके देवा! बरे । की पाहतां भय एकसरे । उपजतें अत्यंत. ॥ २६९ ॥ सर्वत्र दीससी ऐसा । की पेटला महाग्नि अथवा प्रलयार्क जैसा । तेज ऐसें आणि आहेस कैसा । की प्रमाणचि याचें करवेना. ॥ २७० ॥ ऐसे वर्णूनि विश्वरूप । त्याचें प्रकाशक चित्स्वरूप । ते वर्णितो जे अध्यात्मदीप । अनुभवी अनुभविती. ॥ २७१ ॥ स्वयेंचि तू विश्व त्रिगुण । परि किरीटगदाचक्रयुक्त तो तू सगुण । त्यास भजतांच सांपडे अधिष्ठानाची खूण । म्हणोनि ते बोलूनि, आतां हें बोलतो या श्लोकीं. ॥२७२॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥**

नव्हे स्वयें जो क्षर । तो तू क्षरभागीचा जाणता अक्षर । आणि क्षरभाग मिथ्या चराचर । त्याचा परम म्हणजे प्रकाशक अधिष्ठान. ॥ २७३ ॥ अधिष्ठानसत्ता आगळी । कीं घटादिरचना नसे मातीवेगळी । तैसी जडसृष्टि निराळी । नसे अक्षरा परमा तुजवांचुनि. ॥ २७४ ॥ तत्त्वतां ऐसेंचि सकळ । परि पटीं तंतु बाळांस अकळ, । उघड असोनिही तू निष्कळ, । जाणावास गुरुमुखेंकरूनी. ॥ २७५ ॥ **'वेदितव्यं'** म्हणजे ज्ञेय । जें जाणावें गुरुमुखे अद्वय । तें तूंचि कीं अखडानदमय । शुद्ध सत्त्वोपाधि पूर्वश्लोकीं वर्णिले. ॥ २७६ ॥ तरीच विश्वरूपें दिससी । की विश्वसाक्षी कल्पक तूंचि अससी । विश्व कल्पूनि धरिसी । सागर जैसा तरंगाते. ॥ २७७ ॥ म्हणोनि हें जें

प्रत्यक्ष याचें निधान। तू, कीं तुजमाजि हें अतीं होतें लीन । किरणापासूनि जैसें मिथ्या जीवन। लीन होउनि असे त्यामध्यें. ॥ २७८ ॥ या कारणें याचा होतो क्षय। तू आदि अतीं अव्यय। जडा जगासारिखा उदय लय। तूज नाहीं. ॥ २७९ ॥ ऐसा जो तू निराकार। तो करिसी दिव्यावतार। की शाश्वत धर्म निरतर। तो धर्म रक्षिसी त्या रूपीं. ॥ २८० ॥ म्हणूनि शाश्वत जो धर्म त्याचा। गोप्ता, रक्षक तूचि नित्यधर्माचा। साकारही सनातन साचा। तो पुरुष तू ऐसें मी मानितों. ॥ २८१ ॥ म्हणोनि किरीटगदा-चक्रधर। सर्वत्र मज दिससी ईश्वर। ऐसें पूर्वश्लोकीं मी सादर। बोलिलों देखोनी. ॥ २८२ ॥ तरी अर्जुना! ऐसें कळोनि तूतें। कां दुर्निरीक्ष्य म्हणसी माते?। कीं पाहवेना तुज विश्वरूपाते। ऐसें पूर्वश्लोकीं बोलसी. ॥ २८३ ॥ म्हणोनि मागे भयानक रूप। वर्णिले तें विश्वरूप। हें अनुभवगम्य स्वरूप। ते भयानक म्हणोनी वर्णितसे पुन्हा या श्लोकीं. ॥ २८४ ॥

**अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम्।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम्॥ १९॥**

न दिसे आदि मध्य अत। जिकडे तिकडे अनत। अनंत सामर्थ्य बाहु अगणित। नेत्र ज्याचे चद्रसूर्य. ॥ २८५ ॥ यांत सूर्य नेत्र। चंद्र मन म्हणे श्रुतिस्मृतिमात्र। चद्र नेत्र म्हणणें अशास्त्र। आणि या श्लोकीं तों स्पष्ट असे. ॥ २८६ ॥ तरी ज्यास जें नेणार। त्यास **नेत्र** म्हणती शास्त्रकार। तरी नेत्र जैसा वर्तवी शरीर। मनही शरीराते वर्तवी. ॥ २८७ ॥ शरीरास सर्वत्र नेती नयन। तैसेंच शरीरास वर्तवी मन। नेत्र शब्द दोहींकडे लावून, अर्जुन। शशिसूर्य नेत्र म्हणतो, म्हणावें. ॥ २८८ ॥ की ईश्वराचा नेत्र भास्कर। ईश्वराचें मन सुधाकर। एक जनाचे नेत्र प्रकाशणार। एक प्रकाशक मनाचा. ॥ २८९ ॥ नेत्र जनाचें शरीर। वर्तविती त्याचा अभिमानी भास्कर। मनही शरीरास वर्तविणार। अभिमानी त्याचा चद्रमा. ॥ २९० ॥ जनाचा तू नियंता। चंद्रसूर्य दोहींकरूनि भगवता!। म्हणोनि चंद्रसूर्य नेत्र तुझे अनता!। त्या तूते देखतों म्हणतसे. ॥ २९१ ॥ आणि अग्नि मुख देवांचें। त्यासचि देवपण सर्वांच्या मुखांचें। तो अग्नीच मुख तुझे साचें। जो धडधडा पेटला दिसतसे. ॥ २९२ ॥ मुखीं ऐसा पेटला अनळ। आणि स्वयें तूं तेजोरूप निखळ। ज्या तेजें विश्व सकळ। काळशक्तीनें तापविसी. ॥ २९३ ॥ ऐशा तूतें देखतों। म्हणोनि देवा! न पहावे म्हणतों। आणीक याहूनिही भयानक पाहतों। म्हणोनि म्हणतो या श्लोकीं ॥ २९४ ॥

**द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥**

स्वर्ग दिसतो, दिसते धरा । या दोहींत अवकाश सारा । तो तुवां सत्त्वतेजें सर्वेश्वरा । व्यापिला सर्व. ॥ २९५ ॥ याचेही नवल नाहीं जगदीशा! । व्यापिल्या ऐशाच सर्व दिशा । त्या दिशांहीपुढें तू हृषीकेशा! । तुवां व्यापिले. ॥ २९६ ॥ हा भाव दावी या वचनी । की दिशांचा अत पचमावरणापासूनी । आकाश आवरण पांचवें म्हणोनी । अहकार महत्तत्त्व दोन्ही आवरणे त्यापुढे. ॥ २९७ ॥ आकाशाचा होय अत । दिशा म्हणाव्या तेथपर्यंत । पुढे अहकारस्फुरण संतत । आकाश उत्पन्न ज्यापासुनी. ॥ २९८ ॥ त्यापुढे महत्तत्त्व मात्र । अपेक्षा सृष्टीची त्रिगुणसूत्र । त्या पलीकडे शुद्धसत्त्व पवित्र । साक्षी सर्वगत, कारण या सर्वांचे. ॥ २९९ ॥ त्या साक्षित्वास नाहीं अत । सगुण त्या उपाधीनें म्हणावा अनत । ज्या साक्षित्वीं स्वकल्पिता अलग । कोटि ब्रह्मांडां अनताच्या. ॥ ३०० ॥ ऐसे जे सप्तावरणापलीकडे । त्यांत हे महत्तत्त्व अहकार आलीकडे । आकाशाचे आकाशपण दृष्टी पडे । आलीकडे त्याही अहकारत्वाहूनी. ॥ ३०१ ॥ की अहकारापासूनी आकाश । कल्पी सर्वसाक्षी कल्पक जगदीश । आकाशीं कल्पिला अवकाश । दशदिशा नामेंकरूनी. ॥ ३०२ ॥ तरी अनतत्वें पूर्वी वर्णूनी । एथें म्हणतो दिशा सर्व व्यापिल्या म्हणोनी । सर्व ब्रह्मांडदिशा या अभिप्रायें करूनी । सूचवी कीं अतर्क्य देखवेना हा भाव. ॥ ३०३ ॥ हे दृष्टि सर्वसाक्षी ईश्वराची । अर्जुनदृष्टींत तेचि साची । प्रवेशतां, जाली अर्जुनाची । पूर्वदृष्टीच दिव्यदृष्टी. ॥ ३०४ ॥ की त्याची ते दृष्टि नसे । तरी अर्जुनास दर्शनाचे प्रत्यय होती कैसे? । परतु चक्षुरिद्रियास गोलकद्वारा दिसे । तैसे दिव्य दृष्टीनें दिसे त्याच चक्षुरिद्रियासी. ॥ ३०५ ॥ लिगदेहीं इद्रियें वसती । परि स्थूलदेहीं विपय दिसती । देहीं त्वचा डोळे कर्ण इत्यादिकां म्हणती । 'गोलकें' म्हणोनी. ॥ ३०६ ॥ नेत्रगोलकीं रूप दिसे । परि चक्षुरिद्रियातेंचि गवसे । दिव्य दृष्टीने हे प्रकार ऐसे । दिसती अर्जुनाच्याच दृष्टीतें. ॥ ३०७ ॥ परि दों प्रहरां वखतीं । एका सूर्यास डोळे पाहों न शकती । सहस्र सूर्याहूनि अधिक दीप्ती । केवी पाहो शके दृष्टी ते? ॥ ३०८ ॥ आतां मध्याह्नभास्कर न पाहवे । तरी सुखे डोळे झांकूनि राहावे । हें तेज दृष्टीं न साहवे । आणि न राहवे डोळे झांकुनी! ॥ ३०९ ॥ म्हणोनि घाबिरा जाला । कीं प्रार्थितां एक गोष्टी चुकला । कल्पवृक्षास मागेल तितकेंचि त्याला । प्राप्त होणार. ॥ ३१० ॥

**विश्व**रूपदर्शनमात्र । मागता जाला **पांडु**पुत्र । परि भय **न** वाटो मज देखतां तें विश्वगात्र । ऐसें नाहीं प्रार्थिले. ॥ ३११ ॥ तो त्या दर्शनाचा स्वभाव । की भय वाटे देखतां प्रभाव । म्हणोनि देखोनि **पां**डव । घाबिरा जाला. ॥ ३१२ ॥ परि '**गु**डाकेशा'[1] म्हणोनि । सावध भिऊ नको या अर्थे-करूनी । **कृ**ष्णरूपे आधींच आळवूनी । बोलिला होता. ॥ ३१३ ॥ तें आठवे **अर्जु**ना । परि भय नावरे मना । आणि सकळां वीरांहूनि अ-धिक गणना । म्हणोनि सभय आणि सलज्ज. ॥ ३१४ ॥ कीं मज म्हणेल हा **सर्वे**श्वर । काय भीतोसि तू निःसीम वीर । म्हणोनि लाजला **पां**डुकुमार । तों कौतुक **वि**श्वरूपीच ऐसें देखिले. ॥ ३१५ ॥ की या **का**ळरूपाते । न भी ऐसे न देखे कोणातें । म्हणोनि या अर्धश्लोकापासूनि **वि**श्वरूपातें । म्हणतो की भिती सर्वही या रूपा. ॥ ३१६ ॥ सर्व या रूपास जैसे भिती । मीही तैसा भितों **विश्व**पती ! । बोलेल या अर्धापासूनि ये रीती । '**दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहं**' येथपर्यंत. ॥ ३१७ ॥ प्रस्तुती या अर्धश्लोकीं । **अर्जुन** ऐसें बोलतो की । हे अद्भुत उग्ररूप देखोनि त्रिलोकी । भ्याली अजी! महात्मया! परमात्मया! ॥ ३१८ ॥ लोकत्रय जाले व्यथित । देखोनि हें अद्भुतरूप उग्र अत्यंत । भिती बहुतापरी बहुत । म्हणोनि म्हणतो हा श्लोक ॥ ३१९ ॥

**अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥**

अजी! हें सुरसमुदाय नेणों किती । मातें प्रत्यक्ष दीसती । जे तुज **काळ**-रूपातें भिऊनि प्रवेशती । तुजचिमाजी. ॥ ३२० ॥ कोणी अत्यंत भ्याले । आणि कृतांजलि जाले । तूते स्तवूच लागले । की कृपा तुवां करावी. ॥ ३२१ ॥ आणि महर्षि सिद्धसमुदाय मुनी । स्वस्ति कल्याण हो म्हणोनी । पुष्कळा स्तुतिस्तोत्रेकरूनी । स्तविती तूतें. ॥ ३२२ ॥ ऐसा श्लोकाचा अर्थ । परंतु भाव न कळे तो व्यर्थ । की हे माझे रूप कोणी न देखती ऐसें समर्थ । बहुधा याच अध्यायांत बोलेल. ॥ ३२३ ॥ '**न वेदयज्ञाध्य-यनैः**' या श्लोके करूनी । आणि '**सुदुर्दर्शमिदं रूपं**'[2] या श्लोकापासूनी । '**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः**' म्हणोनी । तुवां देखिलें ऐसें कोणी न देखे म्हणेल. ॥ ३२४ ॥ '**यन्मे त्वदन्येन । न दृष्टपूर्वं**'[3] म्हणोनि हें वचन । बोलेल की या रूपाचे तुज जैसें दर्शन । ऐसें पूर्वी नाहीं

१. पुढे श्लोक ४८ पहा. २. पुढे श्लोक ५२ पहा. ३ पुढे श्लोक ४७ पहा.

कोणासही. ॥ ३२५ ॥ आणि अर्जुन येथुनी । **'वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव'** ऐसें पुढिल्या श्लोकेंकरूनी । भिती प्रवेशती स्तविती पाहती म्हणोनी । बोलतो, हें घडेना. ॥ ३२६ ॥ की भयानकपणें **अर्जुन** । देखे ज्यास **दे**वें दिधलें दिव्यनयन । आणि या दृष्टीं पाहों न शकसी ऐसें वचन । स्वमुखे बोलिला. ॥ ३२७ ॥ आणि भयानक ऐसें । देखिल्यावांचूनि भय उपजेल कैसें[१] । आणि **अर्जुन** देखतो जैसें । ऐसें कोणी न देखे म्हणेल **भ**गवत. ॥ ३२८ ॥ ऐसा वाक्यविरोध । याचा बरा करितां शोध । विशद अर्थ याचा भावार्थ-बोध । करितों येथें. ॥ ३२९ ॥ की सृष्टि स्थिति संहार । हेंच **काळा**चें रूप त्रिप्रकार । आणि स्वमुखे बोलेल याचें उत्तर । **'श्रीभगवानुवाच'** म्हणतांच **'कालोऽस्मि'**[२] म्हणोनी. ॥ ३३० ॥ तरी **का**ळास सर्व भिती । मुक्ति **का**ळभयेंचि मागती । दैवी संपत्तीचे स्वस्वरूपीं प्रवेशती । याच **का**ळभयें करूनी. ॥ ३३१ ॥ मुमुक्षु याच्याच धाकेंकरुनी । भजती सुटावया याच काळा-पासूनी । कल्याण सकळाचें हो म्हणोनी । **का**ळभयेंचि ऋषिसिद्ध दाविती भजनमार्ग. ॥ ३३२ ॥ हें विश्वरूपीं **अर्जुन** । देखे ज्यास **दे**वें दिधले दिव्य-नयन । म्हणोनि म्हणतो की दैवी संपत्तीचे जन । प्रवेशती म्हणजे चिद्रूप-स्थिति पावती. ॥ ३३३ ॥ जडपटीं चैतन्यततुप्रकाश । चित्तास बाणे तोचि 'प्रवेश' । अनुभवी ऐसें ज्यांस लेश । नसे कामाद्यसुरसंपत्तीचा. ॥३३४॥ दैवी संपत्तीचे नर । जे सर्वात्मभावीं तत्पर । ऐसे तेच म्हणावे 'सुर' । संघ समुदाय त्यांचे प्रवेशती. ॥ ३३५ ॥ 'सुर' शब्दे अक्षरे दोनी । सुशब्दे शोभनप्रकारेकरुनी । रमती म्हणजे स्वस्वरूपीं प्रवेशती म्हणोनी । सुर म्ह-णावे ते प्रथमचरणीं वर्णिले. ॥ ३३६ ॥ एवं च ज्ञाननिष्ठ जन । त्यांचा समुदाय देखे **अर्जुन** । देखोनि हे सुरसंघ प्रवेशती ऐसें वचन । या भावें बोलतसे. ॥ ३३७ ॥ आतां द्वितीय चरणीं कोणीं अत्यत । होऊनियां भय-भीत । ते कृतांजलि मुमुक्षु स्तवित । असती **का**ळभयें तें बोलिला. ॥ ३३८ ॥ आतां उत्तरार्धे करुनी । स्वस्ति हो म्हणोनी । महर्षिसिद्धमुनी । पुष्कळ स्तविती स्तुतीकरूनी ते ऐसे. ॥ ३३९ ॥ कीं **व्या**सादिक ऋषीश्वर । नाना पुराणीं तो **स**र्वेश्वर । नाना प्रकारीं वर्णिजेतो सादर । कीं जग सुटो जन्ममृत्यु**का**ळापासूनी. ॥ ३४० ॥ स्वस्ति म्हणजे निरुपद्रव । जनातें करू **दे**वाधिदेव । **का**ळचक्रापासूनि सोडवू म्हणोनि अभिनव । चरित्रें वर्णिती त्याच **का**ळरूप **ई**श्वराचीं. ॥ ३४१ ॥ त्याच्या पुष्कळा स्तुती । त्या गातां

---

१. पुढें श्लो० २२ पहा. २. पुढें श्लो० ३२ पहा.

ऐकतां लोक तरती । ते स्वयें तरोनिही दयेनें भिती । की ऐसेच भवभीत सर्वही तरोत. ॥ ३४२ ॥ **का**ळेचिकरूनि उत्पन्न होणें । **का**ळेचि कितेक काळ असणें । **का**ळेचि शेवटी नासणें । हा **का**ळ सर्वही देखती.॥ ३४३ ॥ यास देखोनि भिती । हाचि एकसरां **वि**श्वमूर्ती । **अ**र्जुन देखे म्हणोनि ये रीती । म्हणतसे कीं ऐसे भिती तुज **दे**वा! ॥ ३४४ ॥ हे सुरसंघ प्रवेशती । म्हणे या श्लोकीं येरीती । ते 'सुर'शब्दे ज्ञानी होती । की प्रवेश ज्याला **भ**गवतीं सर्वदा. ॥ ३४५ ॥ आतां 'सुर'शब्दे जे प्रसिद्ध देवगण । त्यांत मुख्यमुख्यांचें नामग्रहण । ते तुज पाहती विस्मित म्हणोनि विवरण । ऐसें करितो या श्लोकी. ॥ ३४६ ॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

**रु**द्र अकरा । **आ**दित्य सूर्य बारा । **व**सु आठ हे **स**र्वेश्वरा !। विस्मित होऊनि पाहती तूतें. ॥ ३४७ ॥ आणि जे **वि**श्वदेव । आणि **अ**श्विनीकुमार दोघे देव । आणि **म**रुत ज्यांचे नांव । विस्मित होऊनि तेही तूतें पाहती. ॥ ३४८ ॥ आणि उष्ण अन्न भक्षिती । निवालें देखोनि उपवासी जाती । ऐसे जे पितर ज्यात्याचे म्हणविती । आश्चर्य मानूनि पाहती पितर ते. ॥ ३४९ ॥ ऐसेचि **गं**धर्व । **य**क्ष आणि **अ**सुरही सर्व । तुज **का**ळरूपातें पाहती, जो गर्व । यथाकाळें हरिसी असुराचा. ॥ ३५० ॥ आणि **सि**द्धनामक देवगण । विस्मित होऊनि तेही आपण । तुज पाहती, जो तू क्षणक्षण । आयुष्य हरिसी **का**ळरूपे त्यांचेंही. ॥ ३५१ ॥ ऐसे हे सर्व पाहती । विस्मित होऊनि राहती । म्हणोनि म्हणे **वि**श्वरूपाप्रती । **अ**र्जुन. ॥ ३५२ ॥ तरी काय जैसा **अ**र्जुनातें । दिसतो तैसाचि दिसतो म्हणावे त्यातें? । तरी दिव्यदृष्टि का **पा**र्थातें । देणें लागे? ॥ ३५३ ॥ आणि ऐसें कोणी न पाहती । जैसा **अ**र्जुना! दिसतो तुजप्रती । ऐसें म्हणेल शेवटीं **श्री**पती । एवं हें देखणें तें नव्हे. ॥ ३५४ ॥ **का**ळरूपे **वि**श्वमूर्ती । दिसतो सर्वांस ये रीती । शीतोष्णादि काळास लोक पाहती । आणि भिती ज्या प्रकारें. ॥ ३५५ ॥ शीतकाळीं शीतें कांपती । उष्णकाळी उष्णास भिती । दूरदृष्टीचे लोक ये रीती । पाहती **का**ळे जन्ममरणदुःख म्हणोनी. ॥ ३५६ ॥ ऐसें हें रूप दारुण । सर्व भिती ऐसा ज्याचा सहजगुण । यालागीं भितों आपण । म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ३५७ ॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो! बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥**

ऐसें महाथोर अत्यंत । रूप तुझें ज्यांत । बहु मुखें नेत्रें बहुत । अजी! महाबाहो! ॥ ३५८ ॥ बहु बाहु बहुत मांडिया । बहुत पाय बहुत उदरें रूपीं जया । बहु दंष्ट्रा विकराळा, ऐसिया । रूपासि भिती सकळ लोक. ॥ ३५९ ॥ देखोनि ऐशा रूपा । लोक अवघे भिती जेंवि विश्वरूपा! । तैसाच मीही मायबापा! । भितों, कीं गुणचि हा या रूपाचा भयंकर. ॥ ३६० ॥ आपण भ्यालों देखोनी । तरी यास न भिती कोण म्हणोनी । भयानकत्व वर्णिले, आतां याहीहुनी । भयानकत्व वर्णितो या श्लोकें ॥ ३६१ ॥

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्तराननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो! ॥२४॥**

जे नभासही स्पर्शलें । म्हणजे त्यासही व्यापूनि उरलें । कीं नभ पंचमावरणी सरलें । ऐसीं अनंत ब्रह्मांडें ज्यामध्यें. ॥ ३६२ ॥ जळस्पर्श म्हणजे जलपान । तैसें नभस्पृश् म्हणजे गिळिलें गगन । ऐसें रूप, या भावें अर्जुन । नभस्पृश् म्हणतसे. ॥ ३६३ ॥ आणि दीप्त देदीप्यमान । अनेका वर्णी जें कां समान । कीं रक्तपीतश्यामगौराभिधान । नाना वर्णांचें. ॥ ३६४ ॥ जे वर्ण नाना योनींत दिसती । त्या वर्णांत तेजोरूप सत्त्वमूर्ती । अर्जुनास दोन्ही रीती । दिसती जैसे साक्षी ईश्वराशी. ॥ ३६५ ॥ ईश्वर आपल्या सत्त्वगुणेंकरूनी । जें कल्पी ते अत्यंत दीप्त म्हणोनी । जाणे आणि नाना वर्ण योनी । जना दिसती तेंही साक्षी जाणतो. ॥ ३६६ ॥ त्याणें दिव्यदृष्टी दिधली । तो अर्जुनास सृष्टि तैसीच भासो लागली । म्हणोनि दीप्त आणि अनेकवर्ण ही वर्णिली । अर्जुनें या श्लोकीं. ॥ ३६७ ॥ आणि सर्वांतें गिळी । सर्वत्र ही काळ बळी । अतीं गिळी सृष्टि सगळी । तोंवरी मृत्युरूपें सर्वत्र. ॥ ३६८ ॥ तीं सर्वत्र मुखें पसरलीं । ज्यांत नश्वरें शरीरें भरलीं । अन्नें जैसीं दिसती चाविलीं । मुख पसरतां मुखीं भक्षणाराच्या. ॥ ३६९ ॥ ऐसीं मृत्युरूपें पसरलीं तोंडें । अर्जुन म्हणे दिसती उदंडें । भाव कीं ऐसीं मुखें प्रचंडें । कोण न भी देखतां? ॥ ३७० ॥ आणि विशाळ थोरथोर डोळे । दीप्त जाणों तेजाचे गोळे । कोण भयें गडबडां न लोळे । देखतां ऐशा रूपातें. ॥ ३७१ ॥ देखोनि ऐशा रूपातें । व्यथा होते अंतरात्मयातें । धरूं न शके धैर्यातें । न पावें शम समाधान अजी! व्यापका! ॥ ३७२ ॥ भ्यालों

म्हणोनि येथवरी । बोलोनि आतां याउपरी । प्रसन्न होई अजी! हरी! । ऐसें प्रार्थितो या श्लोकें. ॥ ३७३ ॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश! जगन्निवास! ॥ २५ ॥**

अजी! ही तुझीं तोंडें । ज्यांत विकराळ दंष्ट्रा जीं महाप्रचंडें । नग गिळितां पसरलीं उदंडें । देखोनी कासावीस मी होतसें. ॥ ३७४ ॥ प्रलयकाळीं भूगोल । जाळी जो प्रलयानळ । तैसीं मुखे देखतां विव्हळ । कासावीस ऐसा मी आहें. ॥ ३७५ ॥ रूपास अंत नाहीं । पाहतां न जाणें दिशाही । सुखलेश तों नसेच कांहीं । कासावीस ऐसा मी आहें. ॥ ३७६ ॥ आतां अजी! देवेशा! । प्रसन्न होई जगन्निवासा! । तूच सर्वांदेवांचा ईश, कीं ऐसा । जगन्निवास जगदाकार जो दावी. ॥ ३७७ ॥ प्रसन्न होई म्हणोनी । अर्जुन म्हणे यावरूनी । वाटे की पुरे करावे येथुनी । दाखवणे या रूपाचें. ॥ ३७८ ॥ कीं प्रसन्नचि होई म्हणोनी । हे रूप दाविले, परि मनीं । भिडनि अर्जुन म्हणतो प्रसन्न होई म्हणोनि । तरी हें पुरे करावे दाखवणें हा भाव. ॥ ३७९ ॥ तो प्रसंग तों युद्धकाळ । क्षय आरंभिला विशाळ । तो संकल्प विकराळ । पूर्वींच विश्वरूपीं उपजला. ॥ ३८० ॥ आतां दिवस अष्टादश । संहरणें अक्षौहिणी अष्टादश । प्रथम दिवशीं अध्याय अष्टादश । उपदेशितसे अर्जुनातें. ॥ ३८१ ॥ त्या गीतोपदेशाचे कारण । कीं अर्जुन टाकू पाहे रण । कीं आपल्या हातें घडेल मरण । भीष्मादि वडील गुरु बधु सकळांचें. ॥३८२॥ म्हणोनि अद्वैतबोधरीती । मरणें मारणें दोन्ही नसती । व्यवहारीं धर्ममार्गीं असती । तरी क्षत्रियांस हा स्वधर्म. ॥ ३८३ ॥ म्हणोनि करितां उपदेश । प्रसंगें निरूपिले अध्याय दश । प्रसंगे प्रार्थितां जगदीश । विश्वरूप या अध्यायांत दावितो. ॥ ३८४ ॥ तरी आरंभिला जो क्षय । हा आपलाच संकल्पनिश्चय । आपण सर्वभक्षक जगन्मय । तें रूप हेंच, जें अर्जुनातें दावितो. ॥ ३८५ ॥ तरी या सकळां स्वयें । मीच मारितों हें धनंजयें । पाहावें, आणि अहंकर्तृत्वभयें । युद्ध न करी म्हणतो, ते करावें यावरी. ॥ ३८६ ॥ म्हणोनि अर्जुन । प्रसन्न होई ऐसें बोलतां वचन । दोहीं सैन्यांचें जें होणार निधन । ते प्रथमदिनींच दाविलें. ॥ ३८७ ॥ कीं प्रसन्न होई म्हणोनी । म्हणतां हें दाखवणें पुरे करावें येथूनी । याकरितां मारूनि सैन्यें दोन्हीं । त्याच पूर्वोक्त मुखीं दाविलीं. ॥ ३८८ ॥ मुखे प्रलयाग्निसमानें । जों देखोनि वर्णिलीं अर्जुनें । प्रसन्न होय म्हणतांच दिव्यनयनें । त्याच मुखीं दोन्हीं सैन्यें देखिलीं. ॥३८९॥

तें वर्णील येथूनी । शेवटीं ऐसा तू कोण म्हणोनी । पुसेल तों मुख्य मुख्य नामें घेउनी । वीर वर्णितो या श्लोकी. ॥ ३९० ॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥**

हे हे धृतराष्ट्राचे सुत । सकळही जे एकशत । सकळा पृथ्वीपाळकांसहित । तुजमाजी प्रवेशती. ॥ ३९१ ॥ हाही **भीष्म** हा **द्रोण** । हा **सूत**पुत्र **कर्ण** । आणि हे हे मुख्य योद्धे आमुचे गण । प्रवेशती ते मुखीं तुझ्या म्हणे य श्लोकीं. ॥ ३९२ ॥

**वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥**

तुझीं मुखें विशाळे । करालदंष्ट्रांकरूनि विकराळे । जीं भयानकें दिसती सकळें । या मुखीं ते प्रवेशती. ॥ ३९३ ॥ **दुर्योधनादिक** एक शत । **भीष्म द्रोण कर्ण** आणि बहुत । मुखावाटे पोटीं प्रवेशती त्यांत । कोणी दतसंधींत अडकले. ॥ ३९४ ॥ मुखीं जेव्हां प्रवेशती । तेव्हां बरेच ओळखों येती । दाढांखाली रगडताही बरे कळती । मस्तक रगडले देखतां. ॥ ३९५ ॥ पाषाणीं हाणतां नारळ । टुकडे होऊनि जाते शेकल । वेगळें नाहीं केलें तों चूर होऊनि फळ । सगळेचि आहे दिसे ऐसें. ॥ ३९६ ॥ म्हणोनि बरविया प्रकारे । चूर्ण केली तींही ओळखों येती शिरे । दतसंधींत अडकलीं शरीरें । ज्या ज्यांची. ॥ ३९७ ॥ परि मुखीं प्रवेशती । तीं अत्यत वेगें निघती । ते त्वरा कोणे रीती । हे वर्णितसे या श्लोकीं. ॥ ३९८ ॥

**यथा नदीनां बहवोऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥**

जैसीं नाना नद्यांचीं नीरे । तीव्र वेगे[१] अत्यत गभीरे । समुद्राकडे धांवती, तैसीं शरीरे । बहुतां मुखीं तुझ्या प्रवेशती. ॥ ३९९ ॥ नरलोकीं वीर जितुके । या युद्धीं मिळाले तितके । ते माझ्या दृष्टीं दिसती असके । मुखीं तुझ्या प्रवेशतां. ॥ ४०० ॥ वेग त्यांचे ऐसे । कीं नद्यांच्या जळाचे वेग जैसे । आणि तें सागरीं पाणी[३] समरसे । तैसे मुखीं तुझ्या प्रवेशती. ॥ ४०१ ॥ अत्यंत तीव्रतेनें येणे । आणि सागरी अदृश्य होणें । हा दृष्टांत या गुणें । बोले **अर्जुन** ॥ ४०२ ॥ तीं मुखें जाज्वल्यमानें । जीं प्रलयाग्निसम वर्णिलीं **अर्जुनें** । त्या

---

१. पुढें श्लो० ३१ पहा. २ कवटी, कवची, बेली ३. तद्रूप होतें, तादात्म्य पावतें.

तैशांत निघती वीर, हें नयनें। देखिलें दिव्यें नेत्रेकरूनी. ॥ ४०३ ॥ आणि मरणास भ्याले। ऐसे कोणी नाहीं देखिले। वीरमदे मुखीं निघाले। उत्साहे ऐसे दीसती. ॥ ४०४ ॥ या दोहीं गोष्टींस दृष्टांत। साजे शोभे अत्यत। त्या दृष्टाते पांडुसुत। प्रवेश वर्णितो या श्लोकीं. ॥ ४०५ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥**

अग्नि पेटला धडधडी। त्यांत पतग टाकिती उडी। आपल्या नाशाकारणें आणि आवडी। तैसे हे वीर लोकही. ॥ ४०६ ॥ रणरूपी महाकाळ। पेटला जैसा प्रलयानळ। त्यांत उत्साहें क्षत्रियकुळ। उड्या टाकिती पतग जैसे अग्नींत. ॥ ४०७ ॥ वांचल्या श्री आणि कीर्ती। मेल्या स्वर्ग ऐसी मनीं स्फूर्ती। जो तो ऐसा उत्साहमूर्ती। मरणार पुढें या युद्धांत. ॥ ४०८ ॥ ते विश्वरूपीं देखिलें। दिव्यदृष्टी ओळखिलें। अग्नि काळमूर्तीस लेखिले। पतग मानिलें वीरांसी. ॥ ४०९ ॥ प्रस्तुतीं अक्षौहिणी अठरा। काळाच्या मुखीं एकसरा। देखिल्या त्यावेगळा प्रपच सारा। काळेचि गिळिजेतो. ॥ ४१० ॥ तेही दिसों लागले बरें। कीं सर्वांस भक्षितो या प्रकारे। म्हणोनि तेही भयाच्या भरे। बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ४११ ॥

**लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ! ॥ ३० ॥**

अजी ! हे वीर सकळ। गिळिसी जाणों मुखी अन्नाचे कवळ। आणि लोकां समग्रातें जाणो तू प्रबळ। चाटितोसि, शाखा लोणचीं जन जैसे. ॥ ४१२ ॥ भक्षी क्षुधित वाढिला भात। आणि शाखांवरी चहूकडे चाळून हात। सांबारी रायतीं एक एक. मुखांत। घाली चाटी जन जे रीती. ॥ ४१३ ॥ ऐशा अक्षौहिणी अठरा। गटगटां गिळिसी एकसरा। तोंडीं लाविजे तैसा प्रपच सारा। चाटितोसि दिसे ये रीती. ॥ ४१४ ॥ म्हणोनि म्हणे कीं सर्वांतें गिळिसी। आणि सर्वा लोकांतें म्हणे चाटिसी। आणि वेदश्रुतीही ऐसी। प्रलयकाळीं वर्णिते. ॥ ४१५ ॥

**श्रुति—'यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनम् ।'**

श्रुत्यर्थ—श्रुति म्हणे ब्राह्मण। आणि क्षत्रियांचे गण। हे होती ज्यास ओदन। ओदन नांव भाताचें. ॥ ४१६ ॥ ऐसी हे श्रुती। जे ब्राह्मण क्षत्रिय म्हणे भात होती। तेचि पुढें म्हणे कीं ग्रास गिळिती। ज्या साधनें तो मृत्यु. ॥ ४१७ ॥

श्रुति—'मृत्युर्यस्योपसेचनम् ।'

**श्रुत्यर्थ**—ऐसें म्हणे **वेदवचन** । की मृत्यु ज्याचें उपसेचन । उंपसेचन म्हणिजे साधन । तें तोडीं लावितां अन्न गिळे. ॥४१८॥ मृत्यूच्या योगेंकरूनी । विश्व अवघें गिळूनी । शेवटीं त्या मृत्यूसही भक्षोनी । योगनिद्रा करीतसे. ॥ ४१९ ॥ की शाकादि तोडीं लावूनी । त्याच्या योगे अन्न भक्षूनी । शाकादि शेषही मुखीं घालोनी । जैसा जेवणार जेवण पुरे करी ऐसा. ॥४२०॥ तो महाकाळ **विश्वरूपे**करूनी । **पार्थे** देखिला दिव्यनयनीं । प्रस्तुत अठरा अक्षौहिणी गिळूनी । जग चाटितो ऐसे तो देखो. ॥ ४२१ ॥ जाज्वल्यमानें वदनें । तींहींकरूनि त्या **विश्वनिधानें** । सैन्य गिळिजेतें ऐसें **अर्जुनें** । आणि जग चाटिजेते ऐसें देखिले. ॥ ४२२ ॥ ऐसें पूर्वार्धे करूनी । रूप वर्णिलें देखोनी । उत्तरार्धी म्हणे तेजे विश्व भरूनी । उग्र तपति ज्योति तुझ्या व्यापका! ॥ ४२३ ॥ आतां **अर्जुनें** ओळखोनि चित्स्वरूप । प्रार्थिला की पाहीन **विश्वरूप** । प्रसंगे देखिला प्रताप । **महाकाळा**चा. ॥ ४२४ ॥ हा स्वयें आहे कवण । **अर्जुना**स न कळे खूण । म्हणोनि पुसतो कीं तू कोण दारुण? । सांग मी नेणें ऐसें या श्लोकीं. ॥ ४२५ ॥

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर! प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥**

अजी! हे सांग मज खूण । कीं तू आहेस कोण? । म्हणसी **विश्वरूप** दावीं म्हणोनि आपण । प्रार्थूनि मागुती कां पुसतोसी? ॥ ४२६ ॥ तरी **विश्वरूप** दावीं म्हणोनी । प्रार्थिलें तें देखत असूनी । तू कोण म्हणतो यावरूनी । भ्रांत होऊनि पुसतो म्हणेल. ॥ ४२७ ॥ तरी भ्रांतास चतुर । कोणी न देती उत्तर । म्हणोनि हा **सर्वेश्वर** । उत्तर नेदी ऐसा शंकला. ॥ ४२८ ॥ म्हणोनि म्हणे **देववरा**! । की सर्वा देवांचा स्वामी तू **सर्वेश्वरा**! । अतर्क्य हा महिमा तुझा जाणतो बरा । ज्यास मी प्रार्थूनि हें पाहतों. ॥ ४२९ ॥ परि ओळखोनि तुझे सत्स्वरूप । त्या अधिष्ठानी जें **विश्वरूप** । तें पाहेन म्हणोन प्रार्थितां, प्रताप । अत्युग्र मज तुवां दाविला. ॥ ४३० ॥ तरी हें उग्ररूप म्यां पाहावें । आणि ऐसें कासावीस म्यां व्हावें । प्रार्थिला नाहींस म्हणोनि या भावें । **'को भवानुग्ररूपो'** ऐसें म्हणतसें. ॥ ४३१ ॥ की मी पाहों इच्छिलें **विश्वरूप** । तू दीससी उग्ररूप । म्हणोनि पुसतों कीं हा प्रताप । ज्या रूपीं तो तू कोण म्हणोनी ॥ ४३२ ॥ म्हणोनि तू जो **आद्य** त्या

---

१. तोंडीं लावणे; चटणी, कोशिंबरी, वगैरे.

**आ**द्यातें। जाणों इच्छितों म्हणे त्या जगत्कारणातें । कीं सर्व तूंचि ऐसें कळोनि तूतें । कोण म्हणोनि जाणत पुसतसें. ॥ ४३३ ॥ कीं तू कारण जगाचा **आद्य** । आधींच जो प्रगटतो जगद्वद्य । प्रसंगानुरूप जो भवरोगवैद्य । प्रगटरूपे ऐसीं करितसे. ॥ ४३४ ॥ जे समयीं कार्य जैसें । ते समयीं रूप नाम तैसें । ये समयीं उग्ररूप ऐसें । तरी कोण तू हें सांग मी म्हणतों. ॥ ४३५ ॥ म्हणोनि म्हणे **दे**ववरा! । आणि तुज **आ**द्यातें जाणों इच्छितों **स**र्वेश्वरा! । ऐसें म्हणे कीं जाला जरी घाबिरा । समजूनि ऐसें बोलतो. ॥ ४३६ ॥ तरी **'नमोऽस्तु ते'** म्हणोनी । प्रसन्न होई म्हणे वदुनी । आणि **दे**ववरा! म्हणे या संबोधनें करूनी । जाणोनि पुसतों तू कोण. ॥ ४३७ ॥ आणि हे वीर गिळिसी । दोन्ही दळे चघळिसी । गिळिले तें न उंगळिसी । हे प्रवृत्ति मी तुझी नेणें. ॥ ४३८ ॥ तरी हे प्रवृत्तीही वदावी । प्रश्नांत ऐसा भाव दावी । ही आइकोनियां रूपाची पदवी । सांगतो आतां श्री**भ**गवान्. ॥ ४३९ ॥

श्री**भ**गवानुवाच—

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ३२**

म्हणे श्री**भ**गवान् षड्गुण । की **काळ** असें मी आपण । जो लोकक्षय करी दारुण । तो या काळी प्रकर्षें वाढलों. ॥ ४४० ॥ या लोकांतें संहराया । प्रवर्तलो आहे **कु**रुक्षेत्रीं या । तुजवांचूनि **ध**नजया! । नाहींसेच होतील सर्व. ॥ ४४१ ॥ तुमच्या सैन्यासमोर । प्रतिसैन्यें उभीं जीं थोर थोर । यांत **भी**ष्मादि योद्धे घोर घोर । ते नव्हतेसेच होतील तुजवीणही. ॥ ४४२ ॥ तू कोण याचें उत्तर । मी **काळ म्हणे स**र्वेश्वर । तुझी प्रवृत्ति नेणें म्हणोनि सादर । पुसें त्याचें उत्तर हे. ॥ ४४३ ॥ की **पा**र्था! तू कोण यांतें मारणार । मी या सकळांचा सहार करणार । तू न मारिसी तरी होणार । क्षय या सर्वांचा. ॥ ४४४ ॥ म्हणोनि दोन्ही दळें गिळूनी । आधीं **अ**र्जुनास दाखवूनी । प्रतिसैन्यांतील हे तुजहीवांचुनी । नाशती म्हणे. ॥४४५ ॥ कीं यांतें कैसा मारूं? हे व्यथा । **पा**र्था! वाहसी तू वृथा । तरी यांचीच काय कथा? । दोन्ही दळांचा सहर्ता मी असें. ॥ ४४६ ॥ या भावें ये रीती । तुज दाविली हे प्रवृत्ती । भाव हा सूचवी जगत्पती । तो स्पष्ट बोलतो दों श्लोकीं. ॥ ४४७ ॥

१. बाहेर काढिमी, ओकसी.

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्! ॥ ३३ ॥**

म्यां **काळ**रूपे दारुणें । हे मारूनि दाविले त्याकारणें । कीं तुवां आयतें यश या रणें । पावावें. ॥ ४४८ ॥ म्हणोनि तू ऊठ । आणि हें यश घे फुकट । शत्रु जिंकोनि उत्कट । भोगीं समृद्ध राज्यातें. ॥ ४४९ ॥ म्यां पूर्वींच मारिले । हें नव्हे म्हणसी तरी दाविलें । तथापि जीवत दीसती ते मी ठेविले । तूज यश द्यावया हा भाव. ॥ ४५० ॥ म्हणोनि म्हणतो **विश्व**गात्र । कीं तू होई निमित्तमात्र । कीं तू **स**व्यसाची म्हणोनि पात्र । होय या कीर्तीचें. ॥ ४५१ ॥ सव्य अपसव्य दोन्ही करीं । विधू जाणें शरीं । **सव्यसाची** म्हणोनि यापरी । नाम तूझे प्रसिद्ध. ॥ ४५२ ॥ धनुर्विद्या ऐसी उत्कट । मग कधीं करावी तुवां प्रगट ? । न पडतां ऐसें युद्धसकट । विद्या कधीं हे तू दाविसी ? ॥ ४५३ ॥ अगा! **स**व्यसाची! म्हणोनी । या प्रसगीं आळवी या नांवे करूनी । तों **अर्जु**न हें ऐकोनी । व्यथित जाला. ॥ ४५४ ॥ कीं **हे** मरणार आणि **दे**वें । स्वयें मारिले **का**ळस्वभावें । तरी निमित्तमात्र म्यां कां व्हावें ? । गुरु आजे सोयरे स्वगोत्र मारूनी. ॥ ४५५ ॥ ऐसें व्यथित मन **पा**र्थाचे । परतु हें प्रारब्धचि त्याचें । कीं यांस मारूनि राज्याचे । सुख भोगावें, हें चुकेना. ॥ ४५६ ॥ म्हणोनि समजोनि हा **पा**र्थभाव । हे गोष्टी दावूनि **दे**व । समाधान त्याचे **दे**वाधिदेव । करीतसे आतां या श्लोकीं. ॥ ४५७ ॥

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥**

अगा! **द्रो**णातें म्यांच मारिलें । म्यांच **भी**ष्मातें संहारिलें । **ज**यद्रथ **क**र्ण यांतेही निर्दाळिलें । स्वयें म्यांच. ॥ ४५८ ॥ तैसेच आणीक योद्धे वीर । म्यांच मारिले थोर थोर । त्या मारिल्यांतें तू मारीं सत्वर । व्यथित झणी तू होसी ? ॥ ४५९ ॥ कैसा मारूं यांला । शोक ऐसा होता तुजला । तरी म्यां मारिलें त्याला । आतां व्यथा कां तुज ? ॥ ४६० ॥ एक काळें मेला । त्याचा पुत्र जाळी त्याला । तरी काय वध पित्याचा घडला । म्हणावें तया. ॥ ४६१ ॥ तैसे हे म्यां मारूनि दाविले । स्वदृष्टीं तुवां पाहिले । शवें होऊनि राहिले । व्यथा काय मारितां तयांला ? ॥ ४६२ ॥ यालागीं युद्ध करीं । मारूं ऐसी व्यथा न धरीं । ऐसें **ज**गद्गुरु बोले, तरी अतरीं । व्यथा एक कैसा उरली **अर्जु**नाच्या. ॥ ४६३ ॥ कीं याणें मारिले जैसे । पुरते हा स्वयेंचि मारू तैसे । मी निमित्त होऊनि मारू कैसे । सहज मारतां ? ॥ ४६४ ॥ मज नलगे हा जय ।

नलगे राज्य यश अक्षय । ऐशियास येविषयीं हा जगन्मय । कां निमित्तधारी करू पाहतो ? ॥ ४६५ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देवाधिदेव । पुढे अधरस्पदन[1] करी ऐसें माधव । बोलतो चतुर्थ चरणें या. ॥ ४६६॥

चतुर्थचरण—**'युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ।'**

कीं जिकणार या वैरियातें आहेस । तूं या रणीं, म्हणोनि प्रारब्ध फळ वदे जगन्निवास । जय पावावा मारूनि यास । ऐसें तुझे प्रारब्ध हें सूचवी. ॥ ४६७ ॥ की जय अपजय । दोन्ही पूर्वकर्मे हा तों निश्चय । आणि प्रारब्धकर्माचा भोगेचि क्षय । वेद आणि वेदांतसूत्रेही बोलती. ॥ ४६८ ॥ त्याचें प्रारब्ध जाणे । तो सर्वसाक्षी ऐसें म्हणे । या अर्थास जे ज्ञाते शाहणे । ते सर्वही मानिती. ॥ ४६९ ॥ परतु अर्थ ऐसा । न स्फुरतां जैसा तैसा । वाक्यार्थ हो भलतसा । म्हणोनि अर्थ ऐसा न बोलिले कोणी. ॥ ४७० ॥ की तू आहेस जिंकणार । म्हणजे निश्चित जय पावणार । जय होईल न होईल या संशयाचा परिहार । देवें केला ऐसें बोलती. ॥ ४७१ ॥ तरी आपण मारिले । मारूनियां दाविले । याही उपरि म्हणावें तरी हें बोले । की संदेह अर्जुनातें जरी असे. ॥ ४७२ ॥ द्वितीयाध्यायांत[2] मागे धनजय । म्हणे मज नकळे की आमचा जय । अथवा यांस जय आम्हां अपजय । हें त्याचें उत्तर ऐसें योजिती. ॥ ४७३ ॥ तरी ते काळरूपे गिळिले । दाढांखालीं रगडिले । अर्जुनें स्वदृष्टीं देखिले । संशय आतां तो कैचा ? ॥ ४७४ ॥ संशयमात्र गेला । खेद इतकाच राहिला । कीं स्वयें देवें मारिले त्याला । मज निमित्तधारी कां करितो ? ॥ ४७५ ॥ यावांचूनि येथें धनजया । हेतु न उरे युद्ध न करावया । मज कां निमित्त करितो यांतें माराया । खेद ऐसा उपजावाच ये स्थळीं. ॥ ४७६ ॥ यास उत्तर न दिसे अन्यथा । प्रारब्ध न चुके हेंचि सर्वथा । म्हणोनि म्हणे कीं टाकीं व्यथा । तू जिकणार आहेस शत्रूतें.॥४७७॥ कां निमित्त करितो मला । पार्था! हे व्यथा टाकीं कीं यांला । तूं जिंकणार आहेस वैरियांला । म्हणजे प्रारब्ध ऐसेंचि तुझे असे. ॥ ४७८ ॥ अगा! ब्रह्मज्ञान जाले । आणि परिपाकासही आले । तथापि प्रारब्ध भोगणें उरलें । जीवन्मुक्तासही. ॥ ४७९ ॥ प्रारब्धे राज्य करणार । प्रारब्धेचि भीक मागणार । प्रारब्धेचि शत्रु जिकणार । अज्ञानी अथवा ज्ञानी हो. ॥ ४८० ॥ यांस तूं आहेस जेता[3] । कीं जिंकणार या शत्रूतें पांडुसुता ! । मीं मारिलें तरी तत्त्वतां । तुज मारावे लागती. ॥ ४८१ ॥ **'जेतासि रणे'** म्हणोनि । म्हणे

---

१. खालचा ओंठ स्फुरणे, लवणें. २. अध्याय २, श्लोक ६ ३ जिंकणारा.

भगवंत हा अर्थ हृदयीं धरूनी । कां मज निमित्त करितो हे व्यथा यावरूनी । हरीतसे **अर्जुनाची.** ॥ ४८२ ॥ हाचि अर्थ विशद । वदेल अष्टादशीं अतीं **गोविंद** । **'[1]स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा'** ऐसें **मुकुंद** । म्हणेल **'[2]कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत्'** ॥ ४८३ ॥ 'स्वभाव' म्हणजे पूर्वजन्मसंस्कार । त्यापासूनि उपजे कर्म हा निर्धार । त्या स्वभावजनिता पूर्वसंस्कारानुसार । या जन्मीं पूर्वजन्मकृत स्वकर्मै निबद्ध तू. ॥ ४८४ ॥ आणि म्हणतोस जें न करीं म्हणोनी । तें ऐसा मी कर्मबद्ध हें तुझे प्रारब्ध तूं न जाणोनी । आतां युद्ध न करिसी मोहेंकरूनी । तरी तें अवश होऊनि अवश्य करशील. ॥ ४८५ ॥ कीं प्रकृति प्रारब्धरूपिणी । प्रकृति, **'बुद्धिः कर्मानुसारिणी'** । ते तुज युद्धीं प्रवर्तवील ऐसें **चक्र**पाणी । **'[3]प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति'** हें आधींच बोलिला. ॥ ४८६ ॥ **'प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति'** । हें आधीं पूर्वश्लोकाचे अतीं **श्री**पती । बोलोनि त्याचे विवरण ये रीती । करील त्यापुढेंचि अष्टादशीं या श्लोकांत. ॥ ४८७ ॥ अष्टादशीं हें सविस्तर । स्वयें बोलेल **सर्वेश्वर** । तेथेंही टीकाकार इतर । जैसें तैसें वाखाणिती. ॥ ४८८ ॥ असो तें आतां । प्रस्तुतीं तू आहेस जेता । म्हणोनि या भावें **पांडुसुता** । बोलिला श्री**कृष्ण.** ॥ ४८९ ॥ की हे म्यां मारिले । ते स्वदृष्टीं तुवां पाहिले । परि तू निमित्त व्हावास यास्तव राहिले । कीं तू जेता प्रारब्धकर्मै आहेस. ॥ ४९० ॥ एव च मी यांचा हंता । हे टाकूनि आपली अहता । हता मानूनि मज **काळरूपा भगवंता** । प्रारब्धे निमित्त आपण मानीं तू. ॥ ४९१ ॥ अगा! ऐसेंचि सकळ । **सर्वही काळाचाच गोंधळ** । परि जे ऐसें जाणती कुशळ । ते कैरूनि अहंता न धरिती. ॥ ४९२ ॥ भाव इत्यादि दावी **हरी** । तो असो आतां याउपरी । हें आइकोनि **अर्जुन** काय करी । हें **धृतराष्ट्रास** सांगे **संजय.** ॥ ४९३ ॥

**संजय** उवाच—**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥**

**संजय** म्हणे **धृतराष्ट्रा!** हें वचन । जें तीं श्लोकीं बोलिला **विश्वलोचन** । तें **केशवमुखे** ऐकून **अर्जुन** । करी प्रथम नमन एक. ॥ ४९४ ॥ करोनि आधीं नमस्कार । कृतांजलि जाला जोडूनि कर । कांपतें त्याचें शरीर । बोले पुन्हा नमस्कार करूनियां. ॥ ४९५ ॥ प्रथम केला नमस्कार । तो

१. अ० १८ श्लो० ६० पहा. २. अ० १८ श्लो० ५९ पहा. ३. कर्मै आचरून.

आज्ञेचा अंगीकार । पुन्हां वंदोनि जोडोनि कर । बोलों आरंभिला अर्थ ऐसा. ॥ ४९६ ॥ परंतु जे लोक भ्याले देखिले अपार । जे मागें बोलिला **पांडु**कुमार । त्या भीतापरीस भ्याला बहु फार । म्हणोनि 'भीतभीत' ऐसें बोलिला. ॥ ४९७ ॥ कीं ते सहज अदृश्य **का**ळातें । देखोनि भ्याले म्हणावें भीत त्यांतें । आणि भीतभीत म्हणे **सं**जय तें । कीं प्रत्यक्ष **वि**श्वभक्षकरूपें हा देखे. ॥ ४९८ ॥ ऐसा भीत भीत । आणि कांपत कांपत । त्या कंपें भयें गद्गदित । कंठ ज्याचा. ॥ ४९९ ॥ गद्गदित ऐसा गळा । कीं मुखीं शब्द न निघे सगळा । तथापि धैर्यें आगळा । कीं बोलतो ऐशाशीं **अर्जुन**. ॥ ५०० ॥

**अ० उ०—स्थाने हृषीकेश! तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ३६**

'स्थान' म्हणजे स्थितिकाळ । या स्थितिकाळीं विश्व सकळ । तुझी जे कीर्ति निर्मळ । तीकरितां हर्ष आणि अनुराग पावतें. ॥ ५०१ ॥ आणि राक्षस भिती । तुझ्या प्रबळ कीर्तीनें पळती । दशदिशांप्रति ते जाती । आणि वंदिती सर्व समुदाय सिद्धांचे. ॥ ५०२ ॥ ऐसा येथें स्थितिकाळ । **अर्जु**नास दाखवी **वि**श्वपाळ । कीं पूर्वीं दाविता संहारकाळ । बहुत भ्याला. ॥ ५०३ ॥ कीं काळ स्थितीचा । देखतां, त्रास याच्या मतीचा । जावा, हा स्वस्थ व्हावा, ऐसा **ज**गत्पतीचा । अभिप्राय ॥ ५०४ ॥ प्रवर्ततांच स्थितिकाळ । कीर्ति **भग**वंताची प्रगटते विशाळ । कीं उपजतां सृष्टिकाळीं तो काळ । क्षयकाळ प्रलयसमय सर्वांतें ॥ ५०५ ॥ स्थितिकाळीं पाळी जग । तो कृपारूप **यो**गेश्वराचा **योग** । तो **अर्जु**नातें **श्री**रंग । दाविता जाला ये समयीं ॥ ५०६ ॥ स्थितिकाळींच **वि**श्वपाळ । अवतार करी सुमंगळ । त्या कीर्तीनें जग सकळ । हर्ष, अनुराग, दोन्ही पावतें. ॥ ५०७ ॥ विषयसुख सर्व नाशवंत । **भ**गवत्कीर्तीच्या सुखें भेटे **भ**गवंत । मग तें कैवल्यसुख अनंत एवं अनंतसुख । अनंतकीर्तीनें ॥ ५०८ ॥ हर्ष आणि प्रीती । विषयप्राप्तीनें जरी होती तरी दुःखचि अंतीं । व्यर्थ हर्ष आणि अनुरागही तो व्यर्थ. ॥ ५०९ ॥ हें दिव्य दृष्टीकरूनी । स्थितिकाळीं दोन्ही फळे देखे स्वनयनीं । परंतु विषयहर्षप्रीति दुःख म्हणोनी । **भ**गवत्कीर्ति हर्ष अनुरागचि वर्णितो. ॥ ५१० ॥ आणि **राक्षस**शब्दें असुर । जे विषयनिष्ठ निष्ठुर । ते विषय हर्ष अनुरागीं तत्पर । जे भिउनी पळती **भ**गवत्कीर्तीतें. ॥ ५११ ॥ विषयप्रीतिअनुराग । राक्षसांकडे लागतां, उरलें जग । पाहतां, स्थितिकाळरूपयोग । **भ**गवद्भक्तरूपचि जग तें. ॥ ५१२ ॥ कीं **रा**-

**क्षस**शब्दें असुर । आसुरी संपत्तीचे सर्व नर । असु इंद्रियें, त्या भोगींच रमती तत्पर । ते विमुख **भ**गवत्कीर्तीतें. ॥ ५१३ ॥ त्या वेगळे जे पुरुष । मुखे कानें **भ**गवत्कीर्तिपीयूष । पिती; हर्षती, अनुरज्यती निर्दोष, । तेच मनुष्य **मनुष्य** वर्णिले. ॥ ५१४ ॥ **'मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः'** या श्लोकेकरूनी । मनुष्य सर्व माझ्या मार्गी वर्तती म्हणोनी । त्यांत सर्व शब्दे जितके स्वभजनीं । मनुष्य सर्व ते तेच हें बोले चतुर्थी **भ**गवत. ॥ ५१५ ॥ एव **भ**गवताची कीर्ती । ज्यांस आवडे ते मनुष्यमूर्ती । बुद्धींत इतरांच्या स्फूर्ती । आसुरी संपत्तीचे ते जन. ॥ ५१६ ॥ ते **भ**गवत्कीर्तीतें भिती । आणि दशदिशांतें पळती । की नानायोनि पावती । सर्वा दिशात. ॥ ५१७ ॥ ऐसे विन्मुख **भ**गवत्कीर्तीतें । नाना पशुवृक्षादि जन्म त्यांतें । **राक्षस**शब्दे अभक्ता सर्वा जीवांतें । स्थावरजगमातें **अर्जुन** सूचवी. ॥ ५१८ ॥ आणि म्हणे जगत् प्रकीर्तीकरूनी । हर्षतें, अनुराग पावतें म्हणोनी । एव उरले ते **भ**गवद्भक्तचि यावरूनी । जग म्हणतां सूचवी. ॥ ५१९ ॥ की राक्षसस्वभाव । ते पावले पशुवृक्षादि भाव । त्याच्या मनुष्यदेहाचा हाचि प्रभाव । की नाना कुयोनिकर्मे तया मनुष्यदेहांचीं. ॥ ५२० ॥ एव जें जग विमुख **ह**रिभक्तीतें । तें **राक्षस**शब्दे वर्णिले **कुं**तीसुतें । उरले तेच कीं जे सादर **वि**ष्णुकीर्तीतें । जग त्या अभक्तांवेगळे, तें हेंचि. ॥ ५२१ ॥ ऐसें द्विविधही फळ । देखोनि विश्वरूपीं निवळ । जग हर्षतें, अनुराग पावतें, म्हणे ते केवळ । **ह**रिकीर्तितत्पर भक्तरूपचि वर्णिलें. ॥ ५२२ ॥ तुझ्या प्रबळ कीर्तीकरूनी । जग हर्षतें, अनुरागातें पावतें, म्हणे यावरूनी । तुझ्या कथामृतें विश्व तरतें म्हणोनी । देखोनि दिव्यदृष्टीं बोलिला. ॥ ५२३ ॥ जे राक्षसस्वभाव । ते **ह**रिकथेतें विमुख मानव । तेच जन्मजन्मीं होती दैत्य, राक्षस, दानव, । असुरकुळीं. ॥ ५२४ ॥ ज्यांस नावडे **ह**रिकथा । ते कथाप्रियांचा द्रोह करिती सर्वथा । भक्तद्रोही लागती नरकपंथा । न परतती तेथूनि कल्पांतीं. ॥ ५२५ ॥ ते प्रतिजन्म योनि आसुर । आधीं पावती वारवार । मग अधतमांत पडती पामर । जे द्रोह करिती भक्तांचा. ॥ ५२६ ॥ तें षोडशाध्यायांत **स**र्वेश्वर । बोलेल पुढें सविस्तर । जे कथाद्रोही तेचि नर । द्रोही भक्तांचे. ॥५२७॥ ते आसुरी संपत्तीचे ये रीती । राक्षस जन्मजन्मीं होती । तें **भ**गवत्कीर्तीस भिती । पळती दशदिशा. ॥५२८॥ हेंही **विश्वरूपीं अर्जुन** । देखे लाधला दिव्यदर्शन । एवं च जेथें कथा, तेथें दुर्जन । न राहती, हा अर्थ. ॥ ५२९ ॥ यालागीं **ह**रिकथा । दुःसंग भगी

---

१. अ० ४ श्लो० ११. २. अ० १६ श्लो० ४-२०.

सर्वथा । राक्षस पळती कीं जन्मांतरीं व्यथा । तिहीं मानिली हरिकथेची. ॥ ५३० ॥ ऐसे हरिकथेशीं विमुख । संत न देखती त्यांचे मुख । कीं हे सर्व सम, परि संमुख । तेचि याच्या न थारती. ॥ ५३१ ॥ ऐसे भगवत्कीर्तीनें भक्त । हर्ष अनुराग पावती कथानुरक्त । आणि कीर्तीनें भिऊनि पळती अभक्त । असुर आसुरी संपत्तीचे. ॥ ५३२ ॥ ऐसे द्विविध वर्णितां जन । जे करिती अन्यदेवताभजन । आणि सिद्धीही पावले त्यांचे कथन । चतुर्थचरणीं करीतसे. ॥ ५३३ ॥ कीं इतर देवांते भजती । तथापि हरिकथा ऐकती । मत्रादिसिद्धि पावोनिही वदिती । नारायणातें. ॥ ५३४ ॥ राक्षसांत त्यांची गणना । अर्जुनास दिव्यदृष्टीं दिसेना । की श्रेष्ठत्वे मानूनि शेषशायना । वदिताती. ॥ ५३५ ॥ हें देखोनि बोले अर्जुन । की मत्रादि अनुष्ठानें सिद्धजन । त्याचे समुदाय नमन । देवा! तूते करिताती. ॥ ५३६ ॥ समुदाय ऐसे तयां सिद्धांचे । म्हणता नानाप्रकार त्यांचे । अर्जुन येथें सूचवी स्ववाचे । ते बोलतां ग्रथ वाढतो. ॥ ५३७ ॥ आणि सर्वां सिद्धांचे समुदाय । म्हणतां **सर्वसिद्ध**शब्दीं ऐसा अभिप्राय । कीं जिहीं न वदिले तुझे पाय । ते सिद्धचि न म्हणावे. ॥ ५३८ ॥ की सिद्धि जरी पावले । जारणमारणें साधूं लागले । ते अती नरकास गेले । कोण सिद्धि त्या सिद्धीनें. ॥ ५३९ ॥ मत्रादि सिद्धि आली । सत्त्ववृत्ति शुद्ध जाली । काम्य टाकूनिया निघाली । बुद्धि मार्गी मोक्षाच्या. ॥ ५४० ॥ ते टाकूनि मत्सर । तत्त्वतां करिती विचार । कीं मोक्ष देणार सर्वेश्वर । एक वैकुंठनाथ श्रीपती. ॥ ५४१ ॥ मग ते तूतें वदिती । तुझ्या कथामृतें निवती । तेही तुझ्या कीर्तीचकरूनि ये रीती । वदिती तूतें. ॥ ५४२ ॥ तुझ्या प्रकीर्तीचकरूनी । सर्वसिद्ध तूते वदिती म्हणोनी । सर्वशब्दे ऐसेंच बोलिला नेमुनी । इतर-सिद्ध ते 'सिद्ध' न म्हणावे. ॥ ५४३ ॥ सर्वेही सिद्ध तूतें वदिती । अर्जुन म्हणे ये रीती । पाहतां मत्रादिसिद्ध दिसती । विष्णुनिंदक उदड. ॥ ५४४ ॥ तेव्हां ते सिद्धचि न म्हणावे । की नारकी[१] सिद्ध कैसे गणावे? । एव सर्वशब्दाचा अर्थ फावे । तरी कीं हरीस वदिती तेचि सिद्ध. ॥ ५४५ ॥ हरिभजनाहीविण । होतें सत्त्वयुक्त अंतःकरण । तया हरिकथाश्रवण । सत्त्वशुद्धि बरी होतसे. ॥ ५४६ ॥ ऐसें श्रीभागवतीं । एकादशस्कधीं श्रीकृष्णाप्रति । देव स्तुति करितां बोलती । या श्लोकांत. ॥ ५४७ ॥

---

१. नरकवामी.

श्रीमद्भागवतश्लोक—**शुद्धिर्नृणां न तु तथेड्य ! दुराशयानां**
**विद्याश्रुताध्ययनदानतपःक्रियाभिः ।**
**सत्त्वात्मनामृषभ ! ते यशसि प्रवृद्ध-**
**सच्छ्रद्धया श्रवणसंभृतया यथा स्यात् ॥**

देव म्हणती, 'देववरा ! । दुष्टचित्ते ज्यांची, त्यां नरा । आणि सत्त्वयुक्त चित्ते त्यांही चतुरां । शुद्धि तैसी नव्हे अन्यत्र. ॥ ५४८ ॥ जैसी श्रद्धा बरी तुझ्या कीर्तीची । शुद्धि करी मानसाची । जे वृद्धीतें पावली आणि साची । श्रवणीं धरिली ऐकतां यश तुझे. ॥ ५४९ ॥ की तारक **भ**गवत्कथा । कथेनेंचि नासे संसारव्यथा । ऐशा कथाश्रवणें सर्वथा । जे श्रद्धा वाढली. ॥ ५५० ॥ ते श्रद्धा जैसी शुद्ध करी । ऐसी कशानेंही नव्हे शुद्धि बरी । इतर पदार्थेंही शुद्धि आहे खरी । परि तैसी नव्हे, जैसी श्रद्धेनें तुझ्या कीर्तीच्या. ॥ ५५१ ॥ विद्यामत्राचा विस्तार । श्रवण **वे**दांतशास्त्राचे वारवार । अध्ययन **वे**दांचें बहुफार । दानें नाना प्रकारचीं. ॥ ५५२ ॥ तप आणि स्ववर्णाश्रमकर्म । इत्यादि शुद्धिकारक अनेक धर्म । परतु बरे चित्तशुद्धीचे वर्म । श्रद्धा तुझ्या यशाची. ॥ ५५३ ॥ कीं कथाश्रद्धेनें शुद्धि जैसी । या बहुतां प्रकारे नव्हे तैसी । की सत्त्वयुक्त चित्तेही जयाची तयांसी । शुद्धि दे श्रद्धा यशाची तूझिया.' ॥ ५५४ ॥ येथें **'सत्त्वात्मनामपि'** । ह्मणूनि **अपि**-शब्द या अर्थी पाहिजे, तथापि । श्लोकीं नसतां **व्यास**रूपी । **भ**गवत बोले सूचवूनि **अपि**शब्द. ॥ ५५५ ॥ श्लोकी पदें नसती । त्यास **अध्याहार** म्हणती । तीं पदे आणोनि वाखाणिती । येथें तों न बोलतां दिसतसे स्पष्ट **अपि**-शब्द. ॥ ५५६ ॥ **'सत्त्वात्मनामपि'** । म्हणूनि सूचवूनि ऐसें निरूपी । सत्त्वयुक्त चित्त जालें, तथापी । त्यांसही शुद्धि हे श्रद्धा. ॥ ५५७ ॥ कीं **ह**रिभक्तीवांचूनी । ज्ञान जाले, तेंही न शोभे म्हणोनी । **भा**गवतींच बोलिले यावरूनी । विना **ह**रिभक्तीही शुद्धचित्त ते तैसे. ॥ ५५८ ॥ की शुद्धचित्तावांचूनी । कोण होऊं शके ज्ञानी, । ज्ञान तें न शोभे म्हणोनी । बोलिले या श्लोकी. ॥ ५५९ ॥

श्रीभागवतश्लोक—**नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं**
**न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ।**
**कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे**
**न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥**

कर्मातीत नैष्कर्म्यज्ञान । तेंही न शोभे जें निरजन । भाव न धरी जों मन ।

अच्युतपदीं. ॥ ५६० ॥ टीका याची विशद । याचे टीकेंत पाहणें प्रतिपद । बोलणें इतकेंचि सांप्रद । कीं ज्ञानकारक सत्त्वशुद्धीही ऐसी देखिली. ॥ ५६१ ॥ शुद्ध जाले सत्त्व । ज्या शुद्धीनें, कळे तत्त्व । त्यासही देखिले अशुद्धत्व । ज्ञान तें न शोभे विना हरिभक्ती. ॥ ५६२ ॥ एव च सत्त्वात्मे म्हणजे । सत्त्वशुद्धि पावले पुरुष जे । शुद्धि त्याहूनि हे विराजे जे । प्रस्तुती कथेच्या श्रद्धेनें वर्णिली. ॥ ५६३ ॥ ऐसा पूर्वापार । न सूचतां विचार । ग्रथ लावूनि टीकाकार । गेले भलतैसा. ॥ ५६४ ॥ भावार्थ येथें ये रीती । कीं कितेक विद्यादिकेंही शुद्ध होती । सत्त्वात्मे त्यांस म्हणती । सत्त्वयुक्त आत्मा म्हणजे चित्त ज्यांचें. ॥५६५॥ सत्त्वेंकरूनी चित्त । युक्त म्हणावें यानिमित्त । की स्वहित, दूरदृष्टी अत्यत । विचारितां, श्रवण हरिकथेचें हें धरिले. ॥ ५६६ ॥ वस्तुता चित्तचि सत्त्व । त्याचें होतां शुद्धत्व । अधिकार साधे पहाया आत्मतत्त्व । रजतमातीत होउनी. ॥ ५६७ ॥ रजतममिश्रित असोनी । स्वहित साधावें निवृत्तिमार्ग अवलबुनी । चित्त ऐसें ज्यांचे युक्त सत्त्वेंकरूनी । ते सत्त्वात्मे हा अर्थ. ॥ ५६८ ॥ कीं सत्त्वात्मे जालियावरी । पुन्हा शुद्धीची ठेविली उरी[1] । तेव्हां स्वहितप्रवृत्तीही सत्त्ववृत्तीवरी । म्हणोनि सत्त्वयुक्त चित्त तें म्हणावें. ॥ ५६९ ॥ एव इतर विद्यादिप्रकारीं । स्वहिततत्परें चित्ते होतीं बरीं । परतु मुख्य शुद्धि, जेव्हां अतरीं । श्रद्धा भगवत्कीर्तीची उद्भवे. ॥ ५७० ॥ एव सत्त्वात्मे म्हणोनि जैसे भागवतीं । तैसें गीतेंत अर्जुन म्हणे; 'जी ! जगत्पती ! । तुझ्या कीर्तीकरूनि तुज वदिती । सिद्धसमुदाय सर्वेही. ॥ ५७१ ॥ येथें 'हृषीकेशा !' म्हणोनी । अर्जुन या नामेंकरूनी । समता भगवताची या त्रिविधजनीं । सूचवूनि स्तवितसे. ॥ ५७२ ॥ कीं हृषीकें इंद्रियें म्हणावीं । श्रवणकीर्तनीं कारणें जाणावीं । या इद्रियांचा धनी गोसावी । प्रकाशक तो हृषीकेश. ॥ ५७३ ॥ प्रिय ज्यांस भगवता ! तुझे यश । त्यांच्या इद्रियांस तुजकरितां प्रकाश । स्वकीर्तिश्रवणकीर्तनीं तू हृषीकेश । प्रकाशिसी त्यांतें. ॥ ५७४ ॥ ज्या असुरांच्या इंद्रियांस तुझें यश । प्रिय नव्हे, सर्वथा मानिती क्लेश । इद्रियें त्यांचींही तूचि हृषीकेश । प्रकाशिसी. ॥ ५७५ ॥ एक ब्राह्मणास देखतां पूजिती । एक ब्राह्मणास देखतां मारिती । नेत्र दोहींचे जे रीती । प्रकाशी सूर्य. ॥ ५७६ ॥ तैसेंचि मत्रादिसिद्धजन । इतर काम्य अनुष्ठानभजन । करितां तूचि जगज्जीवन । प्रकाशिसी इद्रियें तयांचीं. ॥ ५७७ ॥ जेव्हां तुझ्या कीर्तीकरूनी । तूंचि थोर ऐसें विचारुनी । तूतें वदिती आणि तुझ्या भजनीं । लागतांही तूचि

१. बाकी, अवशेष.

प्रकाशिसी इंद्रियें. ॥ ५७८ ॥ ऐसाचि बुद्धिवृत्तीचा प्रकाशक । परि संस्कारानुरूप विवेक । एव सर्वसम तूचि एक । प्रकाशक जडा जगाचा. ॥ ५७९ ॥ ऐसा या श्लोकांत । अर्जुन बोलिला सिद्धांत । की भगवत्कीर्ति आवडे तेचि भाग्यवत । इतर अभाग्य राक्षस जाणावे. ॥ ५८० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले पार्थ पुण्यश्लोक । त्याचें निमित्त आधीं अभिज्ञ लोक । पूर्वानुसंधानें ऐकोत. ॥ ५८१ ॥ पूर्वश्लोकी सिद्धजन । भगवत्कीर्तीनें भगवतासि करिती नमन । म्हणोनि बोलिला अर्जुन । देखोनि दिव्यदृष्टीं बुद्धि तयांच्या. ॥ ५८२ ॥ की मत्रादिसिद्धि पावूनी । की नश्वर फळे देखोनी । कैवल्यफळ शास्त्री देखिलें भजनीं, । जें सगुणब्रह्म, त्याचिया. ॥ ५८३ ॥ तों वेदीं पुराणीं । भगवत्कीर्ति पडली श्रवणीं । सगुण सर्वेश्वर चक्रपाणी । एकचि वाटला तयांतें. ॥ ५८४ ॥ त्यांच्या बुद्धीचे निश्चय । त्या निश्चयांत जो मुख्य निर्णय । तो देखोनि दिव्यदृष्टी धनजय । 'तुजऐशा सर्वेश्वरातें कां न वदिती?' म्हणतसे या श्लोकी. ॥ ५८५ ॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्! गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनंत! देवेश! जगन्निवास! त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

अजी! ते कां तूतें न वंदिती? । की अतुल्य महिमा तुझा जगत्पती! । जो ब्रह्मयाचाही गुरु तू श्रीपती । आणि आदिकर्ता जगाचा. ॥ ५८६ ॥ सर्वांत थोर ब्रह्मा । त्याचा गुरु आणि पिता तू पुरुषोत्तमा! । ऐसा कळला ज्यांस महिमा । ते सिद्ध कां न भजती अजी! तूतें? ॥ ५८७ ॥ तू ब्रह्मयाचा गुरु पिता । परि तूजही कोणी असेल कर्ता । तेव्हां या श्रेष्ठत्वाची वार्ता । त्याजकडे लागेल. ॥ ५८८ ॥ जरी जैसा कर्ता तयाचा । तू, म्हणोनि वदती वेदवाचा । तरी तूजही कोणी कर्ता म्हणोनि साचा । अर्थ तैसा योजेना. ॥ ५८९ ॥ तरी नव्हती कर्तृत्वाची वार्ता । योगनिद्रेत असतां विश्वभर्ता । सृष्टिकाळी पुन्हा आधींच कर्ता । प्रगटला तो आदिकर्ता म्हणावा. ॥५९०॥ तो तू आदिकर्ता । ब्रह्मयाचा गुरु, पिता, भर्ता, । म्हणोनि तूजही कर्ता असेल ही वार्ता । सर्वथा घडेना. ॥ ५९१ ॥ या भावेंकरूनी । अर्जुन म्हणे आदिकर्ता म्हणोनी । आणि म्हणे 'कां तूतें न भजती?' यावरूनी । या हेतूनें तुज वंदिती सिद्ध ते हा भाव. ॥ ५९२ ॥ 'गरीयसे ब्रह्मणोपि' म्हणोनी । गुरु, पिता, धनी, देव ब्रह्मयाचा यावरूनी । तू म्हणोनि ऐसें इतकें

१. मोक्षफळ.

सूचवूनि या वचनीं । बोले **अर्जुन.** ॥ ५९३ ॥ की **ब्रह्मयाचा** तू वडील । म्हणता गुरु, पिता, धनी, इतके अर्थ सूचवी हा बोल । आणि उगाच **ब्रह्मयाचा** वडील न म्हणे कुशळ । म्हणे **ब्रह्मयाचाही** वडील म्हणोनि. ॥ ५९४ ॥ **'ब्रह्मणोपि'** म्हणोनि । **ब्रह्मयाचाही** वडील म्हणे यावरूनी । **ब्रह्मा** सर्वांचा वडील हें मनीं धरूनी । **ब्रह्मयाचाही** वडील म्हणतसे. ॥ ५९५ ॥ **वेदीं पुराणीं** ये रीती । सिद्धांत देखोनि कां तूतें न वदिती । म्हणोनि **अर्जुन** म्हणे या अर्थी **श्रुती** । ऐसीच. ॥ ५९६ ॥

श्रुति—**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्राहिणोति तस्मै ।**
**तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥**

**श्रु**त्यर्थ—जो पूर्वीं **ब्रह्मयातें** निर्माण करितो । आणि **वेद** जो त्या **ब्रह्मयातें** देतो । जीवांच्या बुद्धीचा प्रकाशक तो । त्या **दे**वातें शरण मी मुमुक्षु भजेन. ॥ ५९७ ॥ मुमुक्षुजन ऐशा विचारे । विचारूनि ऐशा प्रकारे । म्हणती मोक्ष देणार तोचि निर्धारे । जो पिता, गुरु **ब्रह्मयाचा.** ॥ ५९८ ॥ म्हणोनी म्हणे **श्रुती** । की मुमुक्षु त्यातेंचि सेवू म्हणती । जो **ब्रह्मयाचा** पिता गुरु जगत्पती । आणि पूर्वीच निर्मितो जो **ब्रह्मयातें.** ॥ ५९९ ॥ **ब्रह्मयातें** निर्मितो म्हणोनी । इतकेचि असते तरी त्यावरूनी । शंका उपजती कीं **पूर्वीं ब्रह्मयाहूनी** । आणि त्याच्या कर्त्याहूनी कोणी असेल. ॥ ६०० ॥ ऐसी शका न पडे । आणि प्रथम **ब्रह्माच** निर्मिला ऐसें घडे । आणि प्रथम कर्ता **ब्रह्मयाचाच** सांपडे । ऐसें **पूर्व**शब्दे सिद्ध जाले. ॥ ६०१ ॥ की पूर्वीच केला **ब्रह्मा** । त्यापूर्वकर्तया सर्वोत्तमा । विचारूनि, जाणोनि ऐसा त्याचा महिमा । भजेन म्हणतो मुमुक्षु. ॥ ६०२ ॥ **पूर्व**शब्दे जे बोलिली **श्रु**ति । तेंच **आदिकर्ता** म्हणे **सुभद्रापती** । **'गरीयसे ब्रह्मणोपि'** म्हणोनि बोलोनि ये रीती । **श्रु**त्यर्थ दावी **श्रु**तीच्या **तस्मै**शब्दपर्यंत. ॥ ६०३ ॥ **तस्मै** म्हणजे त्या **ब्रह्मयाकारण** । **वेद** दिधले करूनि त्यास निर्माण । त्यास मुमुक्षु मी शरण । प्रकर्षे भजेन म्हणतो **श्रु**ति म्हणे. ॥ ६०४ ॥ **अर्जुन** म्हणे **ब्रह्मयाचा** तू वडील । वडील म्हणतां गुरु हा अर्थ कैसा घडेल? । म्हणोनि कोणी म्हणती तरी सांपडेल । ये **श्रु**तींत अर्थ इतकाही. ॥ ६०५ ॥ आतां **श्रु**त्यर्थ हा मनी धरूनी । ते सिद्ध तूतें कां न वदिती म्हणोनी । **अर्जुन** म्हणे यावरूनी । **श्रु**त्युक्त मुमुक्षु जे तेच सिद्ध. ॥ ६०६ ॥ आणि **'ब्रह्मलोक'** म्हणोनी । **ब्रह्मयाचाही** वडील ऐसें **अपि**शब्देकरूनी । सर्वांचाही गुरु तू यावरूनी । म्हणणें नलगेच मागुतीं. ॥ ६०७ ॥ हा **अर्जुनाचा** भाव जैसा । **श्रु**ति बोलते अर्थ तैसा । कीं आत्मबु-

द्धिप्रकाशक जो ऐसा । त्यातें शरण मुमुक्षु मी म्हणतो **श्रु**ति म्हणे. ॥ ६०८ ॥ कीं **आत्म**शब्दे जीव। त्याच्या बुद्धीतें जो प्रकाशी देव । तोचि हा जो **दे**वाधिदेव । उत्पन्न करूनि **वे**द उपदेशी **ब्र**ह्मयातें. ॥ ६०९ ॥ 'मी देह' म्हणणें या जीवबुद्धी । परि त्या जडा त्यांस या बोद्धव्याची कैची सिद्धी? । त्यांतें ऐसें जाणायाची समृद्धी । प्रतिबिंबांशेंकरूनि करीतसे. ॥ ६१० ॥ सर्वबुद्धिप्रकाशक। तोचि सर्वबुद्धिप्रेरक । त्यातेंचि मुमुक्षु उपासक । गुरु म्हणती, **गा**यत्रींतही प्रतिपाद्य अर्थ हा. ॥ ६११ ॥ तोच **'ममैवांशो जीवलोके'**[1] म्हणोनी । पचदशीं या श्लोकापासूनी । **'उत्क्रामंतं स्थितं वापि'**[2] येथपर्यंत स्वमुखेकरूनी । **श्री**कृष्ण हेंचि बोलेल. ॥ ६१२ ॥ **'ममैवांशो'** या श्लोकी । जडजीवलोक त्या लोकीं । जीव जाला तो म्हणेल माझाच अश कीं । जीव प्रतिबिंब, मी बिंब. ॥ ६१३ ॥ म्हणोनि हे **श्रु**ति म्हणे की जो आत्मबुद्धिप्रकाश । म्हणजे जो स्वांशें करी जीवबुद्धीतें प्रकाश । मुमुक्षु म्हणती तो भजों **ज**गदीश । पिता, गुरु **ब्र**ह्मयाचा. ॥ ६१४ ॥ एवच प्रकाशता बुद्धी । संस्कारानुरूप बोद्धव्यसिद्धी । तेंव्हां **श्रु**तिसिद्ध प्रसिद्धी । बुद्धिप्रकाशक जगद्गुरु, पिता **ब्र**ह्मयाचा म्हणोनी. ॥ ६१५ ॥ **गा**यत्रींत बुद्धिप्रेरक । हाचि आत्मा बुद्धिप्रकाशक । एव येथवरी आला विवेक । कीं **गा**यत्री प्रतिपादिते उपासना याचीच. ॥ ६१६ ॥ आणि जो गुरु, तोचि देव । म्हणजे देवचि स्वयमेव । गुरु होतो, हें **दे**वाधिदेव । **ब्र**ह्मयास वेद उपदेशितां दाखवी. ॥ ६१७ ॥ देव, गुरु, दोन्ही । मुमुक्षूस एकत्वें उपास्य म्हणोनी । **वे**दविद्या **ब्र**ह्मयातें उपदेशूनी । संप्रदाय प्रवर्तवी **श्री**कांत. ॥ ६१८ ॥ कीं **ब्र**ह्मयाचा मीच देव । मीच गुरु **दे**वाधिदेव । एव जो गुरु, तो मी स्वयमेव । प्रवर्तक गुरुशिष्यसंप्रदायाचा, ऐसें सूचवी. ॥६१९॥ तरी मुमुक्षुजन । ते पूर्वश्लोकोक्त सिद्धजन । ते ऐसें विचारूनि तूतें नमन । कां न करिती? **अर्जुन** म्हणे. ॥ ६२० ॥ एवच मोक्षाची अपेक्षा । ते म्हणावी **मुमुक्षा** । ते मुमुक्षा ज्या दक्षा । **मुमुक्ष** त्यातें म्हणावें. ॥ ६२१ ॥ ज्या ऐशिया मुमुक्षूचा देव । **रामकृ**ष्णरूपें तो हाचि **दे**वाधिदेव । जो सकळ **विश्व** स्वयमेव । ऐसें दिव्यदृष्टी दावी **पार्था**तें. ॥ ६२२ ॥ यालागीं 'अगा! महात्मया' म्हणोनी । श्लोकाच्या पूर्वार्धी या नांवें आळवूनी । उत्तरार्धी ऐशाच नांवींकरूनी । सर्वेश्वरत्व सर्वत्र **अर्जुन** दावितो. ॥ ६२३ ॥ महा म्हणिजे थोर अत्यत । आत्मा ज्याचा तो तूं **भ**गवंत । उत्तरार्धी **'अनता!'** म्हणे आधींच कीं अत । नाहीं तूतें, **महात्मा** तूं ये रीती. ॥ ६२४ ॥ एवच जो महात्मा आणि

---

१ अ० १५, श्लो० ७. २. अ० १५, श्लो० १०.

अनत । तोचि सर्व देवांचा ईश तू भगवत । म्हणोनि '**दे**वेशा!' म्हणे अत्यंत । थोर सर्वांदेवांपरीस म्हणोनी. ॥ ६२५ ॥ '**न त्वत्समोस्ति**'[1] म्हणोनि या श्लोकीं । येथेंचि **अर्जुन** ऐसें बोलेल कीं । तुजसमान नाहीं कोणी त्रिलोकीं । अधिक कैचा? ॥६२६॥ प्रस्तुत ऐसें बोलतां शकला । कीं अद्वैतरीती **ब्रह्म**त्व सर्वां देवांला । तेव्हां महात्मत्व, अनतत्व एकाच याला । मानूनि, देवेश यातेंचि कां म्हणे? ॥ ६२७ ॥ तो **वि**श्वरूपी साक्षी जगाचा । हाचि एक देखिला साचा । यावेगळा इतरांचा । प्रताप ऐसा देखेना. ॥ ६२८ ॥ जेथें तेथें यास । कल्पकत्वे, साक्षित्वे देखतां **पा**र्थास । वाटले, कीं हाच सर्व जगन्निवास । म्हणूनि, 'तू **ज**गन्निवास' म्हणतसे. ॥ ६२९ ॥ **ब्र**ह्मादि देव, **स**नकादि मुनी । अनुभवें जगीं आपण असों म्हणोनी । जाणती, परि सर्वसाक्षी सर्व कल्पूनी । जगीं असो, हे नाहीं सर्वदा. ॥ ६३० ॥ चित्स्वरूपीं अद्वैत । परि साक्षित्वे जैसा जगीं **भ**गवत । वास करूनि सर्व पाहे, सर्वदा अनत । ऐसें इतर देव देखेना. ॥ ६३१ ॥ अनुभवी देती दृष्टी । तेव्हां आपण सकळ सृष्टी । ऐसें जाणती, पावती तुष्टी, । परि सर्वसाक्षित्व सर्वदा हे असेना. ॥ ६३२ ॥ सर्व कल्पूनी सर्वदा लक्षी । तोचि **ज**गन्निवास **स**र्वसाक्षी । तदैक्यें सर्व जगन्निवास सर्वाद्वैतपक्षी । **ब्र**ह्मादि पिपीलिकांपर्यत. ॥ ६३३ ॥ साधारणत्वें सर्वांस । म्हणों येतें जगन्निवास । तैसेंच **ब्र**ह्मादिकांस । परि कळे याच्या प्रसादलब्ध ज्ञानैकरूनी. ॥ ६३४ ॥ यास स्वतःसिद्ध ज्ञान । हा विश्व करूनि साक्षित्वें वर्तमान । म्हणूनि वरकडासमान । जगन्निवास हा म्हणवेना. ॥ ६३५ ॥ तेव्हां जगन्निवास । हाचि एक **श्री**निवास । निर्मूनि जगा सर्वादेवास । जो जगीं **जगन्नि**वास नांदतसे. ॥ ६३६ ॥ म्हणोनि अगा! **ज**गन्निवासा! । तू **ज**गन्निवास म्हणूनि ऐसा । **म**हात्मा, **अ**नत, **दे**वेश, म्हणतो **श्री**निवासा! । भाव **अर्जु**नाचा ये रीती. ॥ ६३७ ॥ परि म्हणतां जगन्निवास । भेद दिसतो जगास त्यास । म्हणूनि सागराचा तरगीं, यास । तैसा जगीं वास साधितो चतुर्थचरणीं.॥६३८॥

चतुर्थ चरण—**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्** ॥

**दे**वा! तू अक्षर । तू सत्, तू असत् **स**र्वेश्वर । आणि सत् असत् दोहीं जे पर । तूंचि तेही. ॥ ६३९ ॥ जडभाग तितका क्षरतो । क्षरतो म्हणजे नाशतो । ऐसा नश्वर जड नव्हे जो, तो । अक्षर तू म्हणावास. ॥ ६४० ॥ तो तूं स्वप्रकाश चित्सागर । तुझ्या तरगा सत् असत् आणि दोहींहूनि पर । जडा तरंगा दिसती क्षर । परि अक्षर चित्समुद्रचि सकळही. ॥ ६४१ ॥ **सत्** जें

---

१. अ० ११, श्लो० ४३

इद्रियांसि गोचर । **असत्** तें इद्रियांतें अगोचर । एवं सत् पंचभौतिक चराचर । असत् मन, बुद्धि, चित्त; जी इद्रियातें न दीसती. ॥६४२॥ जैसी समुद्राविण । न कळे तरगाची खूण । तैसें चराचर आणि अतःकरण । नये प्रत्यया तुज अक्षरावांचुनी. ॥ ६४३ ॥ तेंव्हा तरगही सागर । तैसा तूंचि स्वयें चराचर । आणि मन, बुद्धि, चित्त, जें इद्रियां अगोचर । तूचि तेंही. ॥६४४॥ या दोहींपलीकडे **माया** । जे प्रधानशक्ति तुझी **दे**वराया! । तीसही सप्रकाश करावया । न दिसे कोणी तुजविण. ॥ ६४५ ॥ की सुवर्णाची जे शक्ती । नाना अलकाररूपे पावे व्यक्ती । सुवर्णावांचूनि ते कोणे युक्ती । वेगळी पहावी? ॥ ६४६ ॥ हेमीं अलकार न दिसे । तरी अलकार रूपे प्रगट असे । शक्ति ते नसे, तरी कसे । अलकार होती? ॥ ६४७ ॥ कीदुग्धांत शक्ति नाही । तरी दुग्धत्व नासोनि होय दही । अलकार होतां, तैसें न नासे काहीं । सुवर्णाचे सुवर्णत्व. ॥ ६४८ ॥ तेंव्हा सुवर्णी शक्ति आहे । तरी होऊनि भूषणे यथास्थित राहे । परि ते शक्ति कोण पाहे । सुवर्णावेगळी करूनी? ॥ ६४९ ॥ ऐसी अनादि **माया**शक्ती । प्रपच जिची अभिव्यक्ती । तेही तुजवेगळी कोणे युक्ती । करवेल? **दे**वा! ॥ ६५० ॥ प्रथम तिचा उद्भव । तेंव्हा सगुण तू **दे**वाधिदेव । मग सकळ तत्त्वे, सर्व देव, । परि तेही तुजवेगळी असेना.॥६५१॥ ऐसा तू **स**र्वेश्वर । तूचि सत्, असत्, जें दोहीसही पर । मागुती या सकळापरता अक्षर । **ज**गन्निवासा! तू ऐसा. ॥ ६५२ ॥ म्हणोनि तू **दे**वेश । तूचि **अ**नत, **म**हात्मा, **हृ**षीकेश, । ऐसें तुझें महत्त्व यश । तरी ते सिद्ध कां न वदिती तूतें? ॥ ६५३ ॥ ऐसें समजोनि सिद्धजन । तुझेचि करू लागती भजन । ऐसें बोलून आतां **अर्जुन** । मीहि ऐसेंच मानितों, म्हणतो या श्लोकी. ॥६५४॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ॥**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप! ॥ ३८ ॥**

तूं **दे**वादिदेव । जो सर्वांहूनि आधीं सगुण **दे**वाधिदेव । सर्वांपुरीं शरीरीं तो स्वयमेव । **पुरुष** म्हणती तूतें म्हणोनी. ॥ ६५५ ॥ आतां पुरीं शरीरीं म्हणतां वास । उत्पत्ति देखिली पुरास । तरी पुरासारखी उत्पत्ती पुरवासियांस । तैसी उत्पत्ति या पुरुषासही म्हणावी. ॥ ६५६ ॥ ऐसा संशयाचा ठाव । म्हणोनि परिहार याचा **पां**डव । बोलतो की तू **पुराण** म्हणिजे पुरातन देव । पुरे आलीकडे सकळही. ॥ ६५७ ॥ घटाहूनि पूर्वी माती । तथापि मातीची घटांत वस्ती । ततु वस्त्राहूनि पूर्वी असती । तथापि वास पटीं ततूचा. ॥ ६५८ ॥ अलकाराहूनि पुराण । ते अलकारीं वसे सुवर्ण । मृग-

जळाहूनि पूर्वी किरण । परि वास तथापि मृगजळीं किरणांचा. ॥ ६५९ ॥ **पुराण**शब्दी ऐसा अर्थ । मनीं धरूनि बोले **पार्थ** । तो अर्थ स्पष्टरूपे यथार्थ । द्वितीय चरणीं करीतसे. ॥ ६६० ॥

द्वितीयचरण—**त्वमस्य विश्वस्य परं निधानम्** ॥

तू विश्वाचें निधान । विश्वापरतें विश्वाचे स्थान । की विवर्तापरते[1] अधिष्ठान । निधान त्या विवर्ताचे. ॥ ६६१ ॥ रज्जु मिथ्यासर्पाचे निधान । म्हणजे मिथ्याभुजगाचे राहायाचे स्थान । विश्वापरतें अधिष्ठान । तरगांचें निधान त्यांपरता समुद्र. ॥ ६६२ ॥ एव विश्व नसे । सत्ता तुझी विश्वरूपे भासे । ऐसे अद्वैत बोलतां संदेह दिसे । द्वैत समूळ उडवितां. ॥ ६६३ ॥ की आहे अवघे एक । समूळ नाहीं हें अनेक । तरी ज्ञाता, ज्ञेय. हा कैचा विवेक? । कैचें पुनरावृत्तिरहित धामही? ॥ ६६४ ॥ की द्वैत जेव्हा नाही । ज्ञाता, ज्ञेय, बोलों नये काहीं । तरी सिद्ध करूनि हे सर्वेही । अद्वैत बोलतो तृतीय चरणीं.॥६६५॥

तृतीयचरण—**वेत्तासि वेद्यं च परं च धाम** ॥

**दे**वा! तूचि स्वयें **वेत्ता** । म्हणजे आत्मतत्त्वाचा जाणता । आणि **वेद्य** जें जाणावें तत्त्वतां । तेंही तूचि. ॥ ६६६ ॥ आणि तत्त्व जाणोनि केवळ । परधाम निर्गुण की वैकुठ जे पावावें स्थळ । तेंही तूचि, की सकळ । तूचि स्वयें. ॥ ६६७ ॥ वेत्ता वेद्यास आत्मत्वें जाणे । तेव्हां अद्वैत ऐसें बाणे । आणि जरी तो आपणास आपण नेणे । तरी वेत्ता, वेद्य, यांसी वेगळेपण असेना. ॥ ६६८ ॥ की चित्स्वरूप अधिष्ठान । विवर्त तेथें ज्ञान आणि अज्ञान । मोक्ष आणि बधन । विवर्त दोन्ही. ॥ ६६९ ॥ स्वप्नीं स्वप्नगज लोटला । तों स्वप्नसिहें मारिला । सिहाचे गर्जनेनें जागा झाला । तों दोन्ही नसती जागरीं. ॥ ६७० ॥ परतु दुःखाचा जाला निरास । ते स्वप्नदुःखही स्वप्नचि वाटे यास । परि हस्ती रगडितांही प्रत्ययास । येतो भोग दुःखाचा. ॥ ६७१ ॥ दुःखभोक्ता ये रीतीं । तो **प्रतिबिंबांश वेद** म्हणती । तीं बिबप्रतिबिबे वेगळीं दिसती । अनादि निद्रा अविद्या, तीकरितां. ॥ ६७२ ॥ त्याची दुःखनिवृत्ती । व्हावी म्हणोनि **वेदशास्त्रां**ची प्रवृत्ती । परि अज्ञान, ज्ञान, दोन्ही वृत्ती । **माये**चिया. ॥ ६७३ ॥ ते **माया** विवर्तरूपिणी लटकी । तिचेंचि कार्य सृष्टि जितकी । वेत्ता, वेद्य, हे ख्याति[3] तितकी । **माये**चिकरितां. ॥ ६७४ ॥ आपणास आपण म्हणे । कीं मी कोण हें नेणे । आणि आपणास आपण जाणे । दोन्ही शक्ति

---

१ विवर्त=नसून दिसते, ते, भास. २. आश्रय, ठाव. ३. भाषा, बोलणे.

**मायेच्या.** ॥ ६७५॥ जेथें आपण आपणातें पाहे। तेथें वेत्ता, वेद्य, हीं दोन्ही न राहे। ज्यास अनुभवितो तेंचि आहे। वेत्ता आणि वेद्य दोन्ही योगे **मायेच्या.** ॥ ६७६ ॥ ऐसी **माया योग**माया। ते तुझा अघटितघटनायोग **दे**वराया! । नसे, दिसे; दिसोनि नाहीं; ऐसिया। योगास नवमीं तुवां दाविलें. ॥ ६७७ ॥ **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी। विश्व असे नसे ऐसें दावूनी। द्वैत नाहींसें केलें यावरूनी। वेत्ता वेद्य सर्व तूंचि, ऐसें देखतो, हा भाव. ॥ ६७८ ॥ ऐसेंचि परम धाम। **वै**कुंठ ज्याचें नाम। तेंही तूंचि **आ**त्माराम। पुनरावृत्तिरहित जेथें असती. ॥ ६७९ ॥ एव च वेत्ता वेद्य इत्यादि जें द्वैत। तें द्वैत **गिळून** तूंचि दीससी अद्वैत। या भावें म्हणे **पांडु**सुत। वेत्ता, वेद्य, परधाम, तूंचि म्हणोनी. ॥ ६८० ॥ ऐसा या तृतीयचरणी भाव। परि जे शब्द बोलिला **पांडव**। नुसते विद्यावैभव। वेत्ता, वेद्य आणि परधामही. ॥ ६८१ ॥ विद्येनेंचि वेत्ता सुजाण। विद्येनेंचि कळे वेद्याची खूण। विद्येनेंचि सगुण निर्गुण। परधामही. ॥ ६८२ ॥ परि अविद्यारचित। जड प्रपंच अगणित। हा नश्वरभाग स्वयें अच्युत। केवी घडे? ॥ ६८३ ॥ ऐसें संशयाचे स्थळ। म्हणोनि हा विश्वपट सकळ। व्यापिला तुवां ततूनें म्हणोनि कुशळ। चतुर्थ चरणीं बोलतसे. ॥ ३८४ ॥

## चतुर्थ चरण—**त्वया ततं विश्वमनंतरूप!** ॥

ज्या रूपा कधीं नसे अंत। तें तुझें रूप अनंत। आणि हें विश्व जें अंतवंत। तें तुवां व्यापिलें. ॥ ६८५ ॥ म्हणोनि ऐसें **पांडु**सुत। म्हणे की हें जग प्रत्यक्ष जयाचा दिसतो अंत। यास व्यापिलें तुवां, त्या तुझें रूप अनंत। म्हणजे कधीं अंतातें पावेना. ॥ ६८६ ॥ एव नासे चराचर। परि तूं अनंत **स**र्वेश्वर। तरंग नाशतां जैसा सागर। न पावे अंत. ॥ ६८७ ॥ त्या तरंगातें सागर। व्यापी, तैसें तुवा हें चराचर। व्यापिलें, ज्यास अविद्यावृत नर। **विश्व** म्हणती वेगळें तुजहुनी. ॥ ६८८ ॥ ऐसा तू सर्व **स**र्वेश्वर। म्हणोनि मी देखतों सादर। ऐशियास मंत्रादिसिद्ध चतुर। कां न वदिती? हें पूर्वानुसंधान **येथवरी.** ॥ ६८९ ॥ सिद्ध वदिती ज्या ज्या हेतूकरूनी। मीही जाणतों ते ते **रीतीं** म्हणोनी। या श्लोकीं बोलतां मनीं। कळवळा उठला प्रेमाचा. ॥६९०॥ आपणही वारवार। यास करावे नमस्कार। ऐसें वाटतें, सर्व **स**र्वेश्वर। हाचि

---

१. अ० ९, श्लो० ४-७. २. अ० ९, श्लो० ५.

दिसतो. ॥ ६९१ ॥ तरी सर्वही हाचि या भावें । अर्जुन म्हणे यास वदावें । म्हणोनि वदनें आरंभिली पांडवें । या दोन श्लोकीं करूनी. ॥ ६९२ ॥

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**

देवा! तूचि वायु, तूचि अग्नि, यम । तूचि वरुण, तूचि सोम । प्रजापति ब्रह्मा तूचि, पुरुषोत्तम । जो तू प्रपितामहा, पिता तया पितामहाचा. ॥६९३॥ ब्रह्मा जगाचा पितामह । त्याचा पिता तू प्रपितामह । तो तूचि सर्वदेवसमूह । विश्वरूपा! ॥ ६९४ ॥ यांत वायु अग्नि हे देव दोन्ही । दों दिशांचे कोणाधिपति, यावरूनी । नैर्ऋत्य, ईशान सूचवूनी । यमवरुण दक्षिण-पश्चिमेचे तू म्हणे. ॥ ६९५ ॥ इंद्र आणि कुबेर । उरल्या दिशाचे सूचवी सुर । एव दिशा सर्व पांडुकुमार । भगवद्रूपें वदितो. ॥ ६९६ ॥ नमो नमस्ते म्हणोनी । दिशा सर्व देवता दिशांच्या लक्षूनी । जो संध्या उपस्थानी[1] । प्रत्यही वदी मत्रमात्रे. ॥ ६९७ ॥ प्राच्यादि दिशा आणि । या दिशात देवता ज्या कोणी । त्यांस नमस्कार ऐसी वाणी । भलताही उच्चारी तिन्हीं काळीं संध्येच्या. ॥ ६९८ ॥ त्या दिशा आणि त्या देवता । भगवद्रूप दिसती पांडुसुता । म्हणोनि म्हणे नमो नमो अच्युता! । सर्व दिशा, सर्व देवता तूचि जो. ॥ ६९९ ॥ अजी! ऐशा विश्वरूपा! तूतें वारवार । सहस्रदां हो ऐसा नमस्कार । सहस्रशब्दे अनत अपार । व्याकरणसिद्ध अर्थ ऐसा. ॥ ७०० ॥ अनतानत आकार । तितकिया रूपा पावो नमस्कार । या भावें म्हणे सहस्रवार । नमो नमो. ॥ ७०१ ॥ आतां पुन्हा म्हणे नमस्कार । मागुतीं पुन्हा नमो हा हर्षाचा भर । की योगी ज्ञानदृष्टींच वदिती जगदाकार । तो मी वदितों उभय दृष्टीनें. ॥ ७०२ ॥ सर्व देखतों चित्स्वरूप । तें बुद्धिगम्य, जे अरूप । त्या चित्समुद्रा विश्वरूप । इद्रियदृष्टी तरगाकार देखतो. ॥ ७०३ ॥ हे डोळां दिव्यदृष्टी । म्हणोनि नेत्री सर्व सृष्टी । भगवद्रूप देखतों म्हणोनि तुष्टी । सूचवी पुनःपुन्हा नमस्कारीं. ॥ ७०४ ॥ की अजी! तूतें नमो नमो । ऐसेंचि सहस्र आवृत्ति नमो नमो । पुन्हा नमो मागुतीं पुन्हा नमो । नमो नमो जी! नमो नमो. ॥ ७०५ ॥ ऐसा करितां नमस्कार । आठवला पूर्वसंस्कार । की ज्यास वदावें त्यापुढें वदणार । येउनी आपणापुढे तया वदितो. ॥ ७०६ ॥

---

१. उपस्थान=पूजा, दिशा व विदिशा यांच्या स्वामीस वदण्याचा विधि

हा तो सर्वत्र **सर्वेश्वर** । तरी याच अनुभवप्रकारें वदू म्हणे चतुर । म्हणोनि आनंदें निर्भर । सर्वत्र वदितो या श्लोकीं. ॥ ७०७ ॥

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ! ।**

**अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोसि सर्वः ॥ ४० ॥**

अजी ! पुढें तूतें नमो । आणि पाठीसीही तूतें नमो । आतां किंबहुना सर्वत्र नमो । नमो खालवरी, अंतर्बाह्य, चहूंकडे. ॥ ७०८ ॥ वदी सर्वत्र ऐसा । तों मनीं अतर्क्य वैभवाचा ठसा । उमटतां, यथाशक्ति सर्वात्मरसा । चाखूनि, मुखें वर्णितो. ॥ ७०९ ॥ कीं अनंतवीर्य आणी । अमितविक्रम तू **चक्रपाणी** । तृतीय चरणीं ऐसी वाणी । बोले **अर्जुनाची**. ॥ ७१० ॥ सहज सामर्थ्य तें **वीर्य** । आणि त्या सामर्थ्यें जे घडोनि आलें कार्य । त्यास म्हणती ऋषिवर्य । **पराक्रम** म्हणोनी. ॥ ७११ ॥ म्हणोनि ऐसा अर्थ । मनीं धरूनि बोले **पार्थ** । कीं अनंत सामर्थ्य ऐसा तूं समर्थ । त्या तुझा पराक्रमही मोजवेना. ॥ ७१२ ॥ घडोनि आला पराक्रम । अनंत ब्रह्मांडें स्थावरजंगम । यास गणना नाहीं निःसीम । परि सहज सामर्थ्य उरलें अनंत तें. ॥ ७१३ ॥ कीं सामर्थ्य आहे जितकें । कार्य नाहीं प्रगटलें तितकें । आम्हांस हे अमित वाटतें इतकें । अंश एक त्या अनंतवीर्याचा. ॥ ७१४ ॥ त्या सामर्थ्याचा नवलाव[1] । कीं सर्व विचित्र तूंचि **देव** । कीं तूंचि आहेस सर्व । त्या उपरि व्यापितोसिही सर्वातें. ॥ ७१५ ॥ कीं सर्वही अलंकार । सोनें स्वयेंचि होऊनि नाना प्रकार । मागुतीं पाहतां ते आकार । सोनें नव्हे काय? ॥ ७१६ ॥ त्या आकारास बाह्यांतर । सोनेंचि असे निरंतर । म्हणोनि म्हणावें, कीं व्यापिले ते आकार । सर्वत्र त्या सुवर्णानें. ॥ ७१७ ॥ या चरणें अभिनव । ऐसें वर्णी **पांडव** । पदें पुढोनि वाखाणीत मागें येतां वैभव । ये रीतीं अर्थ होतसे. ॥ ७१८ ॥ श्लोकांतीं **'असि सर्वः'** म्हणोनी । आहेस सर्व ऐसा अर्थ **'सर्वमसि'** या दों पदें करूनी । **'ततो'** म्हणिजे त्या उपरि तें सर्व तूं असोनी । **'सर्वं समाप्नोषि'** म्हणे ऐसें. ॥ ७१९ ॥ सर्व आहेस ऐसें असोनि । त्याउपरि तें सर्वही बरें व्यापिसी म्हणोनी । **'सर्वं समाप्नोषि'** या पदें करूनी । उफराटीं वाक्यें योजितां हा अर्थ. ॥ ७२० ॥ आतां **'सर्वं समाप्नोषि'** येथुनी । पदें वाखाणितां क्रमेंकरूनी । तूं सर्व जाणसी म्हणोनी । आहेस सर्व तूं, ऐसा अर्थ होतसे. ॥ ७२१ ॥ **'सर्वं समाप्नोषि'** म्हणजे जी ! **देवा** ! । सर्वातें तूं जाणतोसि **देवाधिदेवा** ! । त्याकारणें

१ आश्चर्यकर प्रभाव.

आहेस सर्व तू **मा**धवा! । खूण हे अनुभवाची बोलतो. ॥ ७२२ ॥ **'समाप्नोषि'** म्हणजे बरविया प्रकारे व्यापितोसी । **'समाप्नोषि'** म्हणजे बरविया प्रकारे पावतोसी । यांत व्यापितोसि म्हणणे या अर्थासी । मागे एका अर्थे वर्णिलें. ॥ ७२३ ॥ आतां समाप्नोषि म्हणजे पावतोसी । पावतोसि म्हणजे जाणतोसि । 'जें गत्यर्थ तें ज्ञानार्थ' ऐसी । व्याकरणीं प्रक्रिया प्रसिद्ध. ॥ ७२४ ॥ आणि पाहता लोकरीती । गोष्टी कळतां, 'गोष्टीस पावला' म्हणती । सर्व पावतोसि म्हणजे सर्व जाणतोसि ये रीती । बरविया प्रकारे. ॥ ७२५ ॥ **'सर्व समाप्नोषि'** म्हणजे । सर्व जाणतोसि ऐसें वाखाणिजे । **'ततो'** म्हणिजे त्या हेतूस्तव म्हणोनि अर्थ कीजे । **'असि सर्वः'** म्हणिजे आहेस सर्व त्या हेतूनें. ॥ ७२६ ॥ सर्व बरविया प्रकारे । जाणतोसि त्या हेतूच्या विचारे । सर्व आहेस तू ही चराचरे । ऐसीं पदे आणि अर्थ त्याचा. ॥ ७२७ ॥ आता अर्थाची रीती ऐसी । की सर्व तू बरविया प्रकारे जाणतोसी । त्या हेतूकरूनि तू सर्व अससी । कीं अधिष्ठानचि असे विवर्त. ॥ ७२८ ॥ चित्स्वरूपे सकळ जाणावें । तें तूचि स्वये म्हणावे । स्वस्वरूपे जाणसी तें स्वयें तू स्वभावें । अधिष्ठानचि असे विवर्त या हेतूकरूनी. ॥ ७२९ ॥ जे जयाकरितां दिसे । तें पाहतां तेंचि असे । सर्व तूतें तुझ्या स्वरूपे कळतसे । सर्वही तूचि त्या हेतूकरूनी. ॥ ७३० ॥ तुझा उपाधि शुद्धसत्त्व । ज्यास निर्गुणीं स्फुरे निर्गुण चित्स्वरूपे आत्मत्व । त्या निर्गुणेंचि तूतें स्फुरे सर्वत्व । स्फुरे अलकार हेमीं हेमाचे जे रीती. ॥ ७३१ ॥ हेमें स्फुरे अलकार । चित्स्वरूपे स्फुरे जडाकार । हेमीं, चित्स्वरूपीं एक प्रकार । हेतु एकत्वदर्शनीं नगाच्या, जगाचियाही. ॥ ७३२ ॥ अलकार हेमावांचुनी । सर्वथा न स्फुरे म्हणोनी । हेमचि ते अलकार या रीतींकरूनी । जड सर्व चित्स्वरूप. ॥ ७३३ ॥ ऐसे स्पष्ट **सा**मवेदीं । मृत्तिका सुवर्ण लोखड दृष्टाते **उ**पनिषदीं । ऐसेंचि **भा**गवतीं पदोपदीं । तें किती म्हणोनि वर्णावें ! ॥ ७३४ ॥ की ज्याकरितां जे दिसे । तेंचि तें पाहतां असे । आणि ज्याकरिता जे गवसे । तेंचि आदि, अत, मध्यही तयाचा. ॥ ७३५ ॥ मातीनेंचि घट दिसे । मातीच घटाच्या आद्यती असे । मध्येंचि घट दिसे तो गवसे । अवघीही मातीच, घट कैचा? ॥ ७३६ ॥ सुवर्णे नग दिसे । सोनेंचि नगास आदि अती असे । मध्येंचि नग दिसे तो गवसे । अवघे सोनेंचि, नग कैचा? ॥ ७३७ ॥ काय बोलोनि बहुत? । या हेतूनें विश्व **भ**गवत । प्रतिपदीं बोलती **श्रु**ति **भा**गवत । त्यांत एकादशस्कंधीं हा श्लोक ॥ ७३८ ॥

---

१. चाल, सप्रदाय, रीति. २ विकार

एका० श्लो०—**न यत्पुरस्तादुत यन्न पश्चान्मध्ये च तन्न व्यपदेशमात्रम्। भूतं प्रसिद्धं च परेण यद्यत्तदेव तत्स्यादिति मे मनीषा॥**

**कृष्ण** म्हणे '**उद्धवा**! जें कांहीं। पूर्वीं नव्हतें अतींही नाहीं। मध्येंच दिसते तेंही। नाहींच, जें नाममात्र. ॥ ७३९ ॥ मध्ये नाममात्र। हेमीं अलकार जैसे विचित्र। ताम्रादिधातूचे जितके पात्र। आणि आदीं, अतीं असेना. ॥ ७४० ॥ परंतु हा विचार। करिजे, तोंपर्यंत सत्य आकार। तेव्हां एक अलकार। एक सोनें, द्वैत हें. ॥ ७४१ ॥ तेव्हां कार्यरूपे अनेक। कारण सोनें एक। परि ज्यापासूनि नग जाले ते जे कनक। त्यावांचूनि प्रसिद्धि न घडे नगाची. ॥ ७४२ ॥ म्हणोनि जों न करिजे विचार। तोवरी अलकारासि सोनें इतर। म्हणोनि म्हणे **सर्वेश्वर**। '**परेण**' म्हणोनी. ॥ ७४३ ॥ की **पर** म्हणजे दुसरे त्यापासुनी। जे जाले आणि त्या परा दुसरियाकरूनी। प्रसिद्ध दिसो लागले ते तेंचि म्हणोनी। बुद्धि माझी **उद्धवा**!' म्हणे श्री**कृष्ण**. ॥ ७४४ ॥ की एक अलकार। एक सोनें तेव्हां ते त्यास पर। त्या परा इतराकरितां तो आकार। उत्पन्न होय, दिसेही त्याचकरिता. ॥ ७४५ ॥ अलकार हेमाकरिताच जाला। हेमाकरिताचि दिसों लागला। ऐसें कळले ज्याला। त्याला, जें परावे सोनें, तेंचि तो असे. ॥ ७४६ ॥ एक ततु, एक अबर। तेव्हा अबरास ते ततु जाले पर। परंतु पट कोठुनि जाला? हा विचार। आणि कोणाकरितां दिसतो? म्हणतां ततूच. ॥ ७४७ ॥ नग न दिसे विना सुवर्ण। उत्पन्नही नव्हे त्यावीण। ततूवेगळे पटपण। काढी ऐसा कोण असे? ॥ ७४८ ॥ तरग एक, एक सागर। बाळ नेणे, त्यास सागर इतर। त्यापासूनि जालें आणि त्यावांचूनि ते आकार। दृष्टीं न पडती, ऐसें कळता एकत्व. ॥ ७४९ ॥ एक रज्जु, एक सर्पाकार। त्या सर्पास रज्जु पर। परि करू जाता विचार। रज्जूच आहे सर्प तो ॥ ७५० ॥ एक शुक्ति, इतर एक रजत। परी शिपीकरितां रजत जालें निश्चित। आणि शिपीस दृष्टि न स्पर्शे जोंपर्यंत। तोवरी रुपे लटकें तें दिसेना. ॥ ७५१ ॥ शेवटीं शुक्ति आणि रुपे। एकचि दोन्ही रूपे। तैसे विश्व दिसे ज्या स्वरूपे। आणि ज्यापासूनि जालें तेंचि असे. ॥ ७५२ ॥ **उद्धवास** म्हणे **हरी**। की बुद्धि माझी ऐसी खरी। एवच बुद्धींत बुद्धि तेचि बरी। जे **गो**विदास संमत. ॥ ७५३ ॥ यालागीं या प्रस्तुतीं। सर्व तू जाणतोसि जी! **जग**त्पती। म्हणोनि सर्व तूचि ऐसी आपली मती। निवेदी **अर्जुन**. ॥ ७५४ ॥ कीं तूचि तुझिया स्वरूपेकरूनी। सर्व जाणसी म्हणोनी। सर्व उत्पन्न तुजपासुनी। आणि तूचि सर्व. ॥ ७५५ ॥

सर्व तू बरविया प्रकारे जाणसी । त्या हेतूस्तव सर्व तूचि असती । अनुभवकळा आपली ऐसी । ते तुझीच, हा भाव. ॥ ७५६ ॥ की विद्याशक्ति तुझी सर्वेश्वरा! । ऐसी कीं तू ज्या स्वस्वरूपे जाणसी चराचरा । त्या कनकावांचूनियां जडा अलकारा । थाराच नाहीं. ॥ ७५७ ॥ कनके जाणावा नग । तुवा स्वस्वरूपे जाणावें जग । या हेतूनें सर्व मग । तूचि की. ॥ ७५८ ॥ म्हणोनि सर्व बरवियापरी जाणसी । तेव्हां त्या हेतूस्तव तूचि सर्व अससी । या श्लोकीं चतुर्थ चरणीं ऐसी । अनुभवकळा आपली निवेदी अर्जुन.॥७५९॥ हा [1]अन्वयबोध । विरळ जाणती याचा शोध । [2]व्यतिरेक समजोनि करिती क्रोध । पुसतां ऐक्य जडचैतन्यांचें. ॥ ७६० ॥ असो तें, आतां ऐसा महिमा । अर्जुन देखोनि, सर्वोत्तमा । अपराध आपुले निवेदूनि, क्षमा । करी म्हणेल त्यात आधीं हा श्लोक. ॥ ७६१ ॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे! कृष्ण! हे! यादव! हे! सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥**

तू कृष्ण सखा आपला । देवा! इतकेचि ठाउके मला । हा तुझा महिमा नाहीं कळला । मानिला सखाचि म्हणोनी. ॥ ७६२ ॥ मर्कट मुक्ताफळें नेणे । दातें रगडी मानूनि चणे । तैसा मी अर्जुन म्हणे । सखा मानुनी बोलिलों तुजसी. ॥ ७६३ ॥ कल्पवृक्षाचा नागर । करू पाहे हलधर । म्या मानिलासी तू सर्वेश्वर । सखा प्राकृतपुरुषदृष्टीनें. ॥ ७६४ ॥ न कळतां परिसाचा गुण । टांक अठरा भार लूण । जोख पाव शेर मानूनि लवण । विकू लागला भारें तयाच्या. ॥ ७६५ ॥ कामधेनूचिया कांसे । गोचीड आवडी तृप्ति होतसे । तेचि उपमा मज दिसे । सुख पावलों सखा प्राकृत मानुनी. ॥ ७६६ ॥ दांडगियास चिंतामणी । सापडला तो घालूनि गोफणी । शेत संरक्षी, तसा मी चक्रपाणी । प्राकृत सखा मानिला. ॥ ७६७ ॥ किंबहुना ब्रह्मज्ञान । आइके अनधिकारी जन । शब्दज्ञानें साधूनि धनमान । सुखहेतु मानी. ॥ ७६८ ॥ ज्याच्या नामाचा प्रताप । निववी नाशुनि तिन्ही ताप । तो संतांचा मायबाप । प्राकृत सखा म्या मानिला. ॥ ७६९ ॥ इत्यादि पश्चात्तापकोटी । उपजल्या पार्थाचिया पोटीं । तो संक्षेपे विनवी किरीटी । कीं प्राकृतसखा अनादिसखा

१. जड हे चैतन्याचेच स्वरूप आहे, हा सबध; जडचैतन्याचें ऐक्य २. चैतन्य जडाहून भिन्न आहे, हा सिद्धात, जडचैतन्यातील भेद.

म्यां मानिला. ॥ ७७० ॥ **'द्वा सुपर्णा'** इत्यादि **वेद**श्रुती । ईश्वर सखा अनादि जीवांचा म्हणती । की ते जीव जें जे अपेक्षूनि भजती । ते तें पुरवी ईश्वर. ॥ ७७१ ॥ अमृत मानूनि पाणी । मूढ शिपी आंगणी । अनादि सखा **च**क्रपाणी । प्राकृत सखा म्यां मानिला. ॥ ७७२ ॥ प्राकृत सखा मानुनी । 'अरे! **कृ**ष्णा! अरे! **या**दवा! म्हणोनी।अरे! सख्या! अरे! गड्या!' ये रीतीं-करूनी । वेडें वाकडेंही मी वदलों. ॥ ७७३ ॥ हा ऐसा तुझा महिमा । नेणोनि बोलिलों मी **पु**रुषोत्तमा! । परि तू दयाळू करीं हें क्षमा । ऐसे पुढिल्या श्लोकी बोलेल. ॥ ७७४ ॥ परतु हा **कृ**ष्ण जगदीश्वर । ऐसें **व्यासनार**दादि ऋषी-श्वर । घडी घडी वर्णिती, तेव्हां हे पाचही **पां**डुकुमार । **स**र्वेश्वरत्वेहि पूजिती. ॥ ७७५ ॥ राजसूय यागीं **शि**शुपाळ । मारिला, तेव्हां तत्काळ । शुद्धसत्त्व-ज्योति प्रांजळ । **कृ**ष्णदेहीं प्रवेशतां देखिली. ॥ ७७६ ॥ इत्यादि वारवार । कळला कीं **कृष्ण स**र्वेश्वर । आणि प्राकृत सखा मानूनि चतुर । का ऐसा बोलिला? ॥ ७७७ ॥ ऐशिया संशयाचे स्थळ । म्हणोनि याचे निमित्त कुशळ । म्हणतो कीं चित्त विस्मरणशील । प्रमादास्तव बोलिलों. ॥ ७७८ ॥ प्रमाद म्हणजे विस्मरण । तें विस्मरण जाले कारण । न राहे श्रेष्ठत्वाचे स्मरण । घ-डले ऐसें त्याकारणे जी! **दे**वा! ॥ ७७९ ॥ बरे, तरी हे महिमेचे विस्मरण । नव्हे **ई**श्वरत्वाचे स्मरण । तथापि लोकदृष्टीं श्रेष्ठपण । काय उणे देखिले? ७८० ज्याच्या बळे हे **पां**डव । ज्याच्या आश्रयें **खां**डव । अग्नीस देतां, रणताडव । युद्धीं करूनि सुर जिंकिले. ॥ ७८१ ॥ **गो**वर्धन गिरी । दिवस सात एका करीं । धरी, आणि **कं**सादिका मारी । हें काय नेणे **अ**र्जुन. ॥ ७८२ ॥ **द्वा-**रका समुद्रजठरीं । एके रात्रींत निर्मिली **वै**कुंठपुरी । आणि **म**थुरावासी प्रजा सारी । तेचि रात्रींत नेली **द्वा**रके. ॥ ७८३ ॥ **द्वा**रकेचें वैभव । स्वयें देखे अभिनव । तो ऐसीं वचनें **पां**डव । कां अनादरे बोलिला? ॥ ७८४ ॥ ऐसीही ये स्थळीं शका । उपजेल म्हणोनि **शे**षपर्यंका । विनवितो कीं अजी! **जग**द-लकारकनका! । प्रीतीकरूनिही बोलिलों. ॥ ७८५ ॥ या श्लोकाचिया शेवटीं । **'प्रणयेन वापि'** म्हणे **कि**रीटी । की प्रीतीकरूनि ऐसें बोलिलों, मोटी । स-लगी **दे**वा! तुवां दिधली म्हणोनी. ॥ ७८६ ॥ अन्यथा दहा क्षत्रियांसमान । त्यासही बोलों देऊनि मान । ज्या शब्दीं नसे सन्मान । ते तुजसी लोकदृष्टींही कोण बोले? ॥ ७८७ ॥ अपशब्द बोलतां **शि**शुपाळ । मृत्यु पावला तत्काळ ।

---

१. द्वा सुपर्णा सयुजा सखाया समान वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥ (पुढें अ० १५, ओव्या ५६६–५७४, पहा.)

तोही पित्याच्या भगिनीचाच बाळ । जैसे आम्ही पांडव. ॥ ७८८ ॥ ज्या अपराधी द्वेषी मरती । त्या अपराधींही भक्त तरती । हें तुझे थोरपण जी! जगत्पती! । परतु आम्हास तों अनुचित. ॥ ७८९ ॥ 'अरे! कृष्णा! अरे! यादवा!' । कोण प्रीतीवाचून बोलो शके देवा । पश्चात्ताप हाचि देवाधिदेवा!। की अमृत प्यालों कांजी मानुनी. ॥ ७९० ॥ परतु अमृतें आपला गुण । केला, त्याची हेचि खूण । की तू अनतकल्याणगुण । सगुणत्व निर्गुणत्वही दाविसी. ॥ ७९१ ॥ हा महिमा न जाणत । सखा मानिलासि ऐसें म्हणत । यांत भाव ऐसा असे सूचवित । की वस्तुमहिमा केला वस्तूनें. ॥ ७९२ ॥ कांजी म्हणोनि प्यालो अमृत । तथापि अमर जालो निश्चित । प्राकृत सखा मानिला भगवत । तो सखा जिवलगचि कळलासी. ॥ ७९३ ॥ न कळतां घेतां ज्याचे नाम । अजामिळासि दे कैवल्यधाम । 'मरा मरा' म्हणतां जाला राम । वाल्मीकि चोरटा. ॥ ७९४ ॥ कामें तरल्या व्रजस्त्रिया । मोक्ष इच्छितां सुरतक्रिया । पौंड्रका, शिशुपाळा, कंसराया, । मत्सरें, द्वेषे, भयें मोक्ष. ॥ ७९५ ॥ भाग्य आमचें थोर । कैसा तरी सखा सर्वेश्वर । तथापि अतर कांहीं पडतां, चतुर । पश्चात्ताप मानिती. ॥ ७९६ ॥ म्हणोनि म्हणतों की जरी प्रीतीं । तूज ऐसे बोलिलों जी! जगत्पती! । तें आणि सलगी आणखीही ये रीती । सर्व क्षमा करीं, ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ७९७ ॥

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाप्यच्युत! तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥**

आणीक जो अच्युता! परिहासा-विनोदा-कारणें भगवता । तुझा अपमान आम्हीं केला अनता! । तोही क्षमा आम्हा करावा. ॥ ७९८ ॥ करितां क्रीडा विहार । खेळ खेळता नानाप्रकार । वचना करूनि वारवार । जिकिलास लटिकें पुढें करूनी. ॥ ७९९ ॥ एक फांसा पडिला । तो आपणास पाहिजे तैसा स्थापिला । तेव्हां विवादीं आरभिला । अपमान शब्दीं. ॥ ८०० ॥ असत्यास सत्यत्वे स्थापूनी । म्हणों 'आम्ही असत्य नेणो' म्हणोनी । 'तुझेचि सर्व मिथ्या' म्हणोनी । करू तुझा असत्कार. ॥ ८०१ ॥ "प्रत्यक्ष खाऊनि माती । 'नाही' म्हणसी मातेप्रती । आम्ही कधीं तरी ये रीती । बोलिलों कुंतीसी? तूं सांग. ॥ ८०२ ॥ पुत्र यशोदेचा नंदाचा । म्हणविसी, जाणो होसी साचा । माय कैची? बाप कैचा? । अवडबर दाविसी खरेच जाणो! ॥ ८०३ ॥ व्रजास येतों म्हणोनी । दवडोनि नंदादिका मथुरेहुनी । उद्धवाहातीं ब्रह्मज्ञान त्यांस

सांगवूनी । सत्यवादी जालासी. ॥ ८०४ ॥ करूनि सर्वेही असत्य । आपणास मागुती म्हणविसी सत्य । हें बोलणे नसे आम्हां अगत्य । लटिके खेळ खेळसी, यास्तव आठवतें. ॥ ८०५ ॥ आमचे प्रत्यक्ष खेळ खरे । तुझे रज्जूवरील सर्प सारे । स्वयें लटिकें खेळूनि कैसारे। आम्हांस लटिकेपण आणिसी[१]" ॥ ८०६॥ करितां क्रीडाविहार । इत्यादि तुझा असत्कार । केला, आता करितो नमस्कार । कीं ते क्षमा आम्हा करावें. ॥ ८०७ ॥ आता करितां एक शय्याशयन । बैसतां आसनीं एकासन । तेथें लोटोनि गरुडासन । निजों, बैसों जी! देवा! ॥ ८०८ ॥ ऐसेंचि करितां भोजन । उच्चपक्ति उच्चासन । आम्ही बैसों की कुरुकुळाचे शासन । यदुकुळावरी. ॥ ८०९ ॥ सार्वभौम आम्ही कुरुकुलोद्भव । मडलेश्वर हे यादव । धरूनि हृदयात हा अहभाव । अपमान करू जी! तुझा. ॥ ८१० ॥ निजो तुजहूनि उच शयनी । बैसो तुजदेखतां मुख्यासनी । श्रेष्ठत्व दावू भोजनीं । तुजपरीस आपलें. ॥ ८११ ॥ कोणे समयीं तू एकला । जेव्हा जेव्हां इत्यादि तुझा अपमान केला । केव्हां जनादेखतांही घडला । अपराध ऐसा मजपासुनी. ॥ ८१२ ॥ इत्यादि आठवे पोटीं । देखतां शरीरीं ब्रह्मांडकोटी । म्हणे अहा! राहाटी खोटी । घडोनि आली ऐशासी. ॥ ८१३ ॥ पश्चात्ताप ऐसा अत्यत । की आपण अपराधी निश्चित । तथापि क्षमा करील भगवत । कीं हा **अच्युत अप्रमेय** म्हणोनी. ॥ ८१४ ॥ प्राकृत जनाचा मान । उणा होतां होय अपमान । तो असे ज्या ज्या समान । न्यून त्या त्या परीस होतसे. ॥ ८१५ ॥ तो म्हणावा प्रतिष्ठाच्युत । तैसा नव्हे हा **अच्युत** । कधीं कांही च्यवेना ऐसें अद्भुत । ऐश्वर्य ज्याचे. ॥ ८१६ ॥ या भावे **अच्युता** ! म्हणोनी । म्हणतो की आमच्या या राहाटीकरूनी । जरी तुझी कांहीं होती हानी । तरी क्षमा न करितासही ॥ ८१७ ॥ उदड नाचला खद्योत । तथापि तेज सूर्याचे अच्युत । त्याचा अपराधचि अत्यत । न वाटे तया दिनमणीतें. ॥ ८१८ ॥ तथापि मज माझी क्रिया । मनीं शल्यरूपे स्मरते जी! जगन्मया! । म्हणोनि तुज अप्रमेया! । क्षमा करीं म्हणोनि म्हणतसें. ॥ ८१९ ॥ ज्याच्या स्वरूपाचे-महत्त्वाचे-परिमित । नव्हे तो **अप्रमेय** तू अनत । यालागीं करिसी क्षमा तू भगवत । अपराध माझे. ॥ ८२० ॥ कीं तू एव्हडा, इतका, ऐसा निश्चित । कळतां होतास परिमित । तरी अपमान घडो शकता निश्चित । अपमान तुझा घडेचिना. ॥ ८२१ ॥ हा इतका, एव्हडा, ऐसा दृष्टीस पडे । तरी अपमान त्याचा घडे ।

---

१. हौस किंवा जरूर.

जो अप्रमेय, आदि अंत न सांपडे । कैसा करावा त्याचा अपमान? ॥ ८२२ ॥ आतां यानतर श्लोक । तो कां बोले **पार्थ** पुण्यश्लोक । त्याचे निमित्त सुश्लोक । परिसोत आधीं. ८२३ ॥ देखोनि थोर महिमा । प्रार्थितों अपराधाची सीमा । की क्षमा करीं जी! **पुरुषोत्तमा**! । अपराध माझे. ॥ ८२४ ॥ त्यांत तू **अप्रमेय अच्युत** । तुझा अपराधचि न घडे निश्चित । परतु मीच आठवूनि स्वकृत । आपल्याच मनी शकतों. ॥ ८२५ ॥ म्हणोनि तू **अप्रमेय** । या भावें म्हणे **धनजय** । तो येथें काहीं संशय । उत्पन्न जाला. ॥ ८२६ ॥ की आपल्या राहाटीकरूनी । त्याची नव्हता किमपि हानी । आपण शकित व्हावें काय म्हणोनी? । तरी निमित्त ऐसें, म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ८२७ ॥

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**

अजी! या लोकांचा । पिता तो तूचि एक साचा । म्हणोनि **अर्जुन** म्हणे कीं स्ववाचा । चतुर्दशी श्री**कृष्ण**ही बोलेल. ॥८२८॥ **'अहं बीजप्रदः पिता'**[1] म्हणोनि । **'सर्वयोनिषु कौंतेय!'**[1] या श्लोके करूनी । चतुर्दशीं बोलेल यावरूनी । **अर्जुन** म्हणे पिता चराचराचा तू हे तत्त्व. ॥ ८२९ ॥ चराचरासहित आपला बाप । त्याच्या अपमानें कैसें नव्हे पाप? । पितृद्रोहें पश्चात्ताप । न उपजे कैसा? ॥ ८३० ॥ की मुख्य पिता । तू चराचराचा **अच्युता**! । त्या भावे पूज्य जाला हाही **भगवता**! । पिता त्वद्रूपे. ॥ ८३१ ॥ तेही पूजा तुझी **देवा**! । म्हणोनी पूज्य तूचि **देवाधिदेवा**! । परतु करितां गुरूची सेवा । न कळे तू पूज्य म्हणोनी. ॥ ८३२ ॥ तरी तू या जगाचा पूज्य जैसा । गुरूही तूचि **देवा**! तैसा । आतां तुझ्या अपमानें कैसा । नव्हे पश्चात्ताप चित्तासी? ॥ ८३३ ॥ आता गुरूही बहुप्रकार । ज्यांपासूनि मत्रविद्या वर्णसंस्कार । तेही गुरु, परतु अद्वैतसाक्षात्कार । दाखवी तो **'गुरुर्गरीयान्'** म्हणावा. ॥ ८३४ ॥ म्हणजे गुरु श्रेष्ठ अत्यत । ऐसा गुरु तो तूचि **भगवत** । प्रतिकल्पी प्रथम जो असे उपदेशित । **ब्रह्म**विद्या **ब्रह्म**याते. ॥ ८३५ ॥ एव पिता पूज्य गुरु या लोकीं । तूचि म्हणोनी बोलिला अर्धश्लोकीं । परतु एकातेंच थोर म्हणतां, शकला की । सर्व एक, तेव्हा नव्हे ऐसा कोण? ॥८३६॥ 'सर्व **ब्रह्म**' म्हणतां बोलणेंचि खुटे । पुन्हा 'एकचि थोर' म्हणतां शका उठे । परि ते शका मागुती तुटे । उच्च नीच उपाधि म्हणोनी. ॥ ८३७ ॥ मठी सांठविती सहस्र घट । परि सहस्रां घटीं न सांठवे मठ । आकाश मागुती एक निपट । सहस्र

---

१. अ० १४, श्लो० ४

घटीं मठींही. ॥ ८३८ ॥ प्रतापे या **भ**गवतासम । कोणी नसे, तेव्हां कैचा याहूनि उत्तम? । म्हणोनी ऐसा प्रभाव निःसीम । उत्तरार्धे बोलतो. ॥ ८३९॥

**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥४३॥**

अजी! तुजसमान कोणी नसे । अप्रतिम ऐसा प्रभाव दिसे । तुझ्या प्रभावाची प्रतिमा न गवसे । तिहीं लोकीं. ॥ ८४० ॥ अधिक अथवा तुजसमान । प्रभावेंचि नसे कोणी, म्हणे **अर्जुन** । कीं स्वरूपें सर्व परि **शे**षशयन । प्रभावेंचि थोर, हा अर्थ. ॥ ८४१ ॥ जातीनें सम ब्राह्मण । त्यांत थोर तो, थोर ज्याचे गुण । ऐसें सर्वांचे सम ब्रह्मात्मपण । सम, अधिक, न्यून, हें गुणतारतम्य. ॥ ८४२ ॥ त्यांत उत्तम कारण । कार्यास त्याहूनि उणेंपण । सर्वांकारणांचेंही कारण **ब्रह्म** सगुण । निर्गुणत्व याचें सम सर्वांत. ॥ ८४३ ॥ देहास कारण पंच भूतें । श्रेष्ठत्व देहापरीस भूतातें । त्यांचे कारण अहंकार, त्या तामसातें । श्रेष्ठत्व भूतांपरीसही. ॥ ८४४ ॥ अहंकाराचें कारणत्व । ज्यास, तें महत्तत्त्व । त्याहूनि श्रेष्ठ अव्यक्ततत्त्व । कारण तया महत्तत्त्वाचें. ॥ ८४५ ॥ त्या अव्यक्तत्त्वापलीकडे । चित्स्वरूप जें सम चहूंकडे । त्यापरतें कांहीं न सांपडे । म्हणे श्रुती. ॥ ८४६ ॥

श्रुति—**महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः ।**
**पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥**

**श्रु**त्यर्थ—श्रेष्ठ महत्तत्त्वाहूनी । ज्याचें नांव **अव्यक्त** म्हणोनी । त्यापलीकडे **पु**रुष तेथूनी । बोलणें खुंटलें. ॥ ८४७ ॥ ते महत्तत्त्व **ब्र**ह्मयाचा उपाधी । अव्यक्ततत्त्व त्याहूनि आधीं । **ब्र**ह्मीं प्रगटले तधीं । महत्तत्त्वादि कांहींच नव्हतें. ॥ ८४८ ॥ होतें निर्गुणचि एक । मग महदादि उपाधि हे अनेक । पुरे-शरीरें-आलीकडे,"सर्व लोक । त्या पुरीं वसे तो **पु**रुष चिन्मात्र. ॥ ८४९ ॥ चिन्मात्र**पु**रुष ऐसी **श्रु**ति । अव्यक्ततत्त्वापलीकडे ज्याची स्थिति । त्या अव्यक्त उपाधियुक्त म्हणती । **ब्र**ह्म सगुण. ॥ ८५० ॥ त्याच्या प्रभावाचा अंश । **ब्र**ह्मादि जितके सृष्ट्यादि कार्यांचे ईश । अप्रतिमप्रभाव जो सगुण **स**र्वेश । कोणी त्या सम असेना. ॥ ८५१ ॥ तेव्हां अधिकपण कैचें? । निर्गुण तो समचि साचें । अधिकत्व न्यूनत्व ज्या निर्गुणाचें । कोठें नसे. ॥ ८५२ ॥ एवं अप्रतिमप्रभाव । प्रभावें थोर तोचि **दे**वाधिदेव । त्यासमानही नसती कोणी देव । अधिक होती कोठूनी? ॥ ८५३ ॥ अत एव

१. गुणाचा कमीअधिकपणा.

पूर्वाध्यायांत । **'न मे विदुः सुरगणाः प्रभवं'**[1] म्हणे भगवत । कीं माझा प्रादुर्भाव कोणासि नाहीं विदित । **'अहमादिर्हि देवानां महर्षीणां'**[2] म्हणोनी. ॥ ८५४ ॥ की धरोनि अव्यक्तोपाधी । प्रगटतो देवाधिदेव आधी । महत्त्वादि ब्रह्मादि उपाधि तधीं । नव्हते, ते कैसे जाणती उदय माझ्या उपाधीचा ? ॥ ८५५ ॥ की मी आदि त्यांचा । मजपासूनि उद्भव तयां सर्वांचा । ऐसे बोलिला स्ववाचा । तें अर्जुन सर्वसंमत म्हणे येथेंही. ॥ ८५६ ॥ **'आहुस्त्वामृषयः सर्वे'**[3] या श्लोकी । अर्जुन ऐसे बोलिला की । व्यासादि जे वेदतत्त्ववेत्ते या श्लोकी । ते ऐसेंचि म्हणती ॥ ८५७ ॥ तो महिमा कानीं ऐकिला । प्रत्यक्ष विश्वरूपीं देखिला । ऋपि वेद बोलती तैसा ओळखिला । महिमा यदुकुलावतसा विष्णूचा. ॥ ८५८ ॥ वेदशास्त्रपुराणमथितार्थ । जे गीताशास्त्र तेथें ऐसा सिद्ध अर्थ । की कोणी देव नव्हे समर्थ । गोविंदासम, अधिक कैचा ? ॥ ८५९ ॥ ऐसा अप्रतिमप्रभाव । म्हणोनी हाचि पिता पूज्य देव । हाचि एक देवाधिदेव । वरिष्ठ गुरु सर्वांचा. ॥ ८६० ॥ मज घडला अपराध ऐशियाचा । विहारशय्यासनभोजनी साचा । त्या कारणास्तव क्षमा करीं म्हणोनि मागुती वाचा । बोलतसे या श्लोकी. ॥ ८६१ ॥

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**

तू ऐसा म्हणोनी । नमस्कार तूते म्हणोनी । शरीर तुजपुढें समर्पूनी । 'प्रसन्न होय' म्हणूनि प्रार्थितों. ॥ ८६२ ॥ की तू ईश समर्थ । 'प्रसन्न होई' म्हणतों एतदर्थ । क्षमा करूनी देणार पुरुपार्थ । तरीच ईश म्हणोनि तूतें प्रार्थितों. ॥ ८६३ ॥ ईश उदडही म्हणविती । परि ईशत्वे करितां त्यांच्या स्तुती । अपक्क घटीं उदक ये रीती । स्तुति होती तयाच्या. ॥ ८६४ ॥ ज्यांस म्हणावें ईश । त्याहूनि अधिक ईशत्व देखतां लेश । भल्यास वाटे क्लेश । असत्यवादाचा. ॥ ८६५ ॥ अपक्क घटीं जळ । न थारतां कष्टचि केवळ । स्तुति तुझी तों करितां निर्मळ । चतुःपंचषट्सहस्रमुखही[3] भागले. ॥ ८६६ ॥ स्तुति करितां भागले । न कळतां अती राहिले उगले । परि यथाशक्ति वर्णूनि रगले । चरणीं तुझिया. ॥ ८६७ ॥ अमृतसागराचा अत । न कळे, परतु चूळ मात्र पडतां मुखात । होती अजर अमर अत्यत । फळ पावती तितकियाचे. ॥८६८॥ ऐसें गुण अनत । स्तविता न सापडे कधीं अत । स्तविती तथापि यालागीं संत । देवाधिदेवा ! तूतेंचि. ॥ ८६९ ॥ कीं स्तुति करावी त्यापरिस । अधिक

---

१. अ० १०, श्लो० २. २. अ० १०, श्लो० १३ ३ चतुर्मुख=ब्रह्मदेव, पचमुख=शकर; षण्मुख=कार्तिकस्वामी; सहस्रमुख=शेष.

महिमा अधिक सुरस । असत्यवादें नव्हे कुरस । वाणी व्यासवाल्मीक्यादिकांची. ॥ ८७० ॥ तेही इतरांच्या स्तुती । करिती, कीं तूचि त्या विभूती । अनधिकारि जना लाविती । थोरपण दावूनि भजनी तयाच्या. ॥ ८७१ ॥ परि स्वतां त-यांचा महिमा । म्हणतां लाज वाटे ऋषिसत्तमा । मग भुज उचलूनि म्हणती कीं 'पुरुषोत्तमा । भजों शपथपूर्वक.' ॥ ८७२ ॥ तुझी करितां स्तुती । न क-ळोनि अतही सुखी होती । स्तुतियोग्य त्यातें म्हणती । तो एक तू ईड्य. ॥ ८७३ ॥ एव सकळ अनत उत्तमगुण । ज्यास तो स्तुतियोग्य म्हणती नि-पुण । जो ऐसा तया क्षमा पूर्ण । असेच की. ॥ ८७४ ॥ म्हणोनी या भावें । प्रार्थितो कीं 'प्रसन्न व्हावें' । कोणाही शरणागता तुवां देवाधिदेवें । अतर दीधलें हें घडेना. ॥ ८७५ ॥ आतां अपराधियास दंड । केले ऐसे उदड । तरी ते असुरस्वभाव प्रचंड । मी शरणागत सदाचा. ॥ ८७६ ॥ कृष्ण माझा, मी कृष्णाचा । भाव इतका तों अखड साचा । खड न पडे या भावाचा । कदा-पिही. ॥ ८७७ ॥ जो म्हणवी आपला । तो जरी बहुतां स्थळीं चूकला । तरी त्याचा क्षमा जाला । अपराध तो. ॥ ८७८ ॥ हा तो भलत्या भल्याचा गुण । तो भला तुझ्या विभूतीचा अश निपुण । स्वयें तो तू ब्रह्म सगुण । आणि मी तुझा. ॥ ८७९ ॥ आह्मास तो बापमाय । कृष्णजी! तुझेचि पाय । सखा सो-यरा सहाय । कृष्ण आमचा हा निर्धार. ॥ ८८० ॥ किंबहुना सतीचा भर-वसा । कीं आपली लज्जा आपला पति रक्षील ऐसा । आम्हासही जगन्निवासा । भरवसा तुझा ऐसाच. ॥ ८८१ ॥ आमचा ऐसा भाव । आणि तू कल्पवृक्ष-स्वभाव । 'जैसे जे भजतील तैसा मी देव । पावेन त्याला' स्वयें म्हणसी.॥८८२॥ तरी इतुकियांचेपरी । अपराध माझे क्षमा करीं । भाव धरूनि ऐसा अतरीं । या श्लोकाच्या उत्तरार्धें बोलतसे. ॥ ८८३ ॥

**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव! सोढुम् ॥ ४४ ॥**

पिता पुत्राचे अपराध जैसा । क्षमा करी सोसूनि, तैसा । अन्याय माझे ज-गन्निवासा! । सोसावया तूं योग्य. ॥ ८८४ ॥ की आम्ही असतां बाळ । पां-डूस गिळिता जाला काळ । तदारभ्य आमचा सांभाळ । कोणें केला तुजविणें? ॥ ८८५ ॥ कंस मारिल्यावरी । आम्ही कैसे आहों हस्तिनापुरीं । म्हणूनि बिचारायास ते अवसरीं । अक्रूर मथुरेहूनी धाडिला. ॥ ८८६ ॥ तो सांप्रत पांडू मेला वनीं । आम्हांस धृतराष्ट्रें आणवुनी । गाईचीं वासरे व्याघ्रसदनीं । ऐसें शासनीं स्वपुत्रांच्या ठेविले. ॥ ८८७ ॥ तदारभ्य आजपर्यंत । बापमाय तूंचि जालासि भगवत । सोसूनि अन्याय अत्यत । कृपा केली. ॥ ८८८ ॥

स्वयें जालासि सारथी । मज दीनासि केलें रथी । मजपुढें रथी महारथी । केले जैसे सूर्यापुढें खद्योत. ॥ ८८९ ॥ पिता पुत्राचे अपराध सोसी । हेही तुवां पूरविलि अॅसोसी । पिता प्रार्थिल्या पूर्वीच होसी । परि मी पश्चात्तापें क्षमा प्रार्थितों. ॥ ८९० ॥ इत्यादि भावार्थ । सूचवूनि बोले पार्थ । आणीक ऐसेंचि बोलतो जो कृतार्थ । प्रार्थनेहूनि पहिलेंच. ॥ ८९१ ॥ कीं सखा सखयाचा जैसा । अपराध सोसी माझा तैसा । अपराध सोसावया जगन्निवासा ! । योग्य होसी. ॥ ८९२ ॥ जीवांचा तूं अनादि सखा । 'द्वा सुपर्णा' श्रुति आणि ऐशा आणिका । बोलती, परतु जो तो पॅरखा । आपणचि अविद्येनें होतसे. ॥८९३॥ कल्पवृक्ष काय धोंडे देईल । ऐसा कल्पवृक्षातळीं बोलतां बोल । धोंडेमार होतां न लगे वेळ । कल्पवृक्षस्वभाव तुझाही. ॥ ८९४ ॥ तुज पारिखा मानी । तोचि पारखा देहाभिमानी । वस्तुतः तू शार्ङ्गपाणी । अनादि सखा जीवांचा. ॥८९५॥ त्यांत माझें काय भाग्य! । कीं नेणे भक्तिवैराग्य । सर्वापराधी, परंतु योग्य । सख्यपदवीस मी जालों. ॥ ८९६ ॥ 'सख्य कृष्णार्जुनांचे' । म्हणोनि सर्वत्र बोलणें जनाचें । आणि उॅठाण सर्वदा माझ्या मनाचें । कीं सखा माझा श्रीकृष्ण. ॥ ८९७ ॥ सख्यपणाचें लक्षण । कोण ऐसे दावी विचक्षण । जैसें दाविसी तू कमलेक्षण । सर्वत्र सर्वदा. ॥ ८९८ ॥ मी आणि शेषशयन । करूं एकशय्याशयन । मी आणि गरुडासन । बैसों एका आसनीं. ॥ ८९९ ॥ जो स्वयें लक्ष्मीपती । तो मज करी भगिनीपती । ज्याला काळकृतांत कांपती । मी परिहासें हांसतों तयासी. ॥ ९०० ॥ चराचरशरीररथीं । जो स्वयें सर्वात्मरथी । तो माझा सारथी । विश्व पाहे. ॥ ९०१ ॥ सखा होऊनि केवळ । सोशिलेच अपराध सकळ । तथापि स्वापराधे विव्हळ । पश्चात्तापे बोलतो. ॥ ९०२ ॥ कीं अपराध केले नसते क्षमा । तरी कां दावितासि ऐसा महिमा । परि मी चुकलों पुरुषोत्तमा! । कीं सर्वेश्वरत्वभावें न भजलो. ॥ ९०३ ॥ म्हणोनि क्षमा करावे । पिता होऊनि पुत्रत्वे पाहावें । सखा मानूनि देवें । क्षमा करावें हें सखयाचे परि म्हणतसे. ॥ ९०४ ॥ इत्यादि भाव पोटीं । तो म्हणतसे किरीटी । कीं सखा सोसी अन्याय कोटी । तैसे माझे सोसीं तू. ॥ ९०५ ॥ अर्जुन बोले ये रीती । तों पुन्हा पूर्वील सलगी आठवती । तों तो म्हणे मागुती । क्षमा करीं, पुन्हां क्षमा करीं. ॥ ९०६ ॥ आतां म्हणतो प्रिया सती । प्रिय जीस अत्यंत पती । ते चुकली तरी सोसी, तू जगत्पती । सोसीं माझे अपराध तैसे. ॥ ९०७ ॥ मान रक्षी सतीचा । मुख्य धर्म हा पतीचा । तरी प्रति-

---

१. हौस, उत्कट इच्छा. २. परका ३ उमेद, उत्साहपूर्ण कल्पना.

क्षणीं मान आमुचा । रक्षिला तुवां. ॥ ९०८ ॥ द्रौपदीवस्त्रापहरणीं । काय आठवावी तुझी करणी । जेव्हां आम्ही लक्षित धरणी । अधोमुख बैसलों. ॥ ९०९ ॥ आइकोनि आमच्या वनवासा । दुर्योधनें धाडिले दुर्वासा । ते काळीं कोणें जगन्निवासा ! । लाज आमुची राखिली. ॥ ९१० ॥ आम्हीं वैरियाचे हातीं । ओपिली पांचाळी सती । परि अगीकारी जगत्पती । जालासि तू. ॥ ९११ ॥ आम्हीं उपेक्षिली पांचाळी । ते जरी नग्न सभेस होती ते काळीं । तरी आम्ही आपुली तोंडें काळीं । कोणासी कैसे दावितों. ॥ ९१२ ॥ ते काय द्रौपदीची लाज । जे रक्षिता जालासी तू महाराज । बुडतां पांडुपुत्रांचा समाज । अपमानाच्या सागरीं. ॥ ९१३ ॥ सतीची लज्जा पती । रक्षी, तैसा तू आम्हां जगत्पती । हे गोष्ट बोलू जातांही कापती । चारी वाचा. ॥ ९१४ ॥ द्रौपदी आम्ही उपेक्षिली । काय पतिपणाची मर्यादा रक्षिली । परि तू आमची लज्जा रक्षिली । पति तो तूचि आमुचा. ॥ ९१५ ॥ हृदयांत इत्यादि भाव । तों ऐसे म्हणे पांडव । की तू पतीच माधव । प्रिया आम्ही तुझिया. ॥ ९१६ ॥ भक्त तेच तुझ्या प्रिया । प्रिय तो तूचि त्यांचा आत्मप्रिया ! । सम भक्ताची आणि सतीची क्रिया । तुझी पतीची रीती सम. ॥९१७॥ परपुरुषही देखे सती । परतु विपयदृष्टी न दिसती । विषय कामिनीचे जे नव्हती । ते पुरुषचि नव्हती हें सत्य. ॥ ९१८ ॥ भक्त विषयांतें जाणती । परि विषयबुद्धि न देखती । पुरुषोत्तमातेंचि पाहती । तरग न म्हणतां, सिधूच असे. ॥ ९१९ ॥ विषयबुद्धि न पाहातां विषय । पुरुषचि दिसे विश्वमय । तेव्हां विषय तो विषय न होय । परपुरुष विषय नव्हे जैसा सतीचा. ॥ ९२० ॥ सती पुरुष पाहे अशेष । परतु वाटे पतीच पुरुष । तैसे देव देखूनि नाना विशेष । सेव्य-उपास्य-वाटसी तू एक. ॥ ९२१ ॥ पुरुष एकचि सती । पुरुषपणें जाणे, जो आपला पती । तसा परमपुरुष जगत्पती । एकचि दिसती भक्तातें. ॥ ९२२ ॥ मायिक नानाकार दिसती । जैसे नाना पुरुष देखे सती । परि पटीं ततु ऐसा पुरुष एकचि देखती । पुरुष एकचि जैसा वाटे सतीतें. ॥ ९२३ ॥ परि सतीपणास नाहीं मुकली । प्रिया असोनि जरी चुकली । तरी प्रियानें ते चुकी सोसिली । तैसे भक्तापराध हरि सोसी. ॥ ९२४ ॥ की आवडी हरीची निरतर । उपास्य न वाटे देवतांतर । त्यांपासूनि पडिलें जरी अंतर । क्षमा भगवत तें करी. ॥ ९२५ ॥ भगवताची प्रीति सोडी । विषयांची धरी गोडी । बाहेर दाखवी आवडी । भगवताची. ॥ ९२६ ॥ त्यास कैसा हरि प्रिय? । प्रिय त्यातेंही न मानी श्रीप्रिय । ज्यांस त्यावांचूनि सकळ अप्रिय ।

ते प्रिय स्वप्रिया **श्री**प्रियाचे. ॥ ९२७ ॥ त्यांच्या अपराधाच्या कोटी । तो क्षमा करी, घाली पोटी । या भावें म्हणे **किरीटी** । **'प्रियः प्रियायाः'** म्हणोनियां. ॥ ९२८ ॥ अपराध केले उदड । परतु आवडी हरि तुझी होती अखड । म्हणोनि असुरासारिखा दड । न करिसी, क्षमा करिसी, हा भाव. ॥९२९॥ ऐसी क्षमा मागत असे । परि **वि**श्वरूपी तैसेचि दारुण दिसे । मनीं कांहीं हर्ष, कांहीं भय वसे । म्हणोनि पूर्वरूप दावीं, म्हणतो या श्लोकीं. ॥ ९३० ॥

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव! रूपं प्रसीद देवेश! जगन्निवास ॥ ४५ ॥**

कधीं नाहीं देखिले । ते एकसरा डोळां रेखिले । थोर भाग्य म्या आपुलें लेखिलें । हर्षलो या गोष्टीकरूनी. ॥ ९३१ ॥ विश्वरूप जे अतर्क्य अनत । तें अत नाहीं ऐसें दिसतें अत्यत । हर्ष या गोष्टीचा पोटांत । परि भयेंही व्यथित मन माझे. ॥ ९३२ ॥ म्हणोनि तेचि आपुलें । रूप दावीं पहिले । येविषयीं प्रसन्न पाहिजे जाले । आजी **दे**वा! **जग**न्निवासा! ॥ ९३३ ॥ 'तें पूर्वील रूप कैसें' । म्हणोनि म्हणेल ऐसे । यालागी सारथ्य करितां देखिले जैसें । **गी**ता उपदेशितां, तैसें दावीं, म्हणतो या श्लोकीं. ॥ ९३४ ॥

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो! भव विश्वमूर्ते! ॥ ४६ ॥**

किरीट शोभे शिरीं । **कौ**मोदकी गदा भारी करीं । चक्र हस्तीं, यापरी । देखत होतों, तैसेंच पाहू इच्छितो. ॥ ९३५ ॥ जैसे चतुर्भुज रूप सांवळे । सालकार आणि अबर पिवळे । शरीर सुदर सुकुमार कोंवळे । देखिले **गीता** उपदेशितां. ॥ ९३६ ॥ त्याच रूपेकरूनी । अगा! सहस्रबाहो! प्रगट हो म्हणोनी । म्हणे **अर्जुन** यावरूनी । **वि**श्वरूपचि तू चतुर्भुज ऐसें सूचवी. ॥ ९३७ ॥ वचन **अर्जु**नाचें ये रीती । आइकोनि विश्वपती । कृपासिधु आता त्याप्रती । हा श्लोक बोलतो श्री**भग**वान् ॥ ९३८ ॥

श्री**भग**वानुवाच—**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥**

म्हणे श्री**भ**गवत । अगा! **अर्जु**ना! मी अनत । प्रसन्न आहेंचि अत्यत । प्रसन्नपणेंचि दाखविले हें रूप. ॥ ९३९ ॥ **अर्जुना**! हे रूप परम । ज्या रूपीं तेजोमय स्थिरजगम । ऐसें तेजोमय विश्व उत्तम । रूप माझे. ॥९४०॥ ज्या रूपास नाहीं अत । जें अधिष्ठानीं अनतीं अनत । जें आद्य म्हणजे आधीं

मीच भगवंत । तेजोरूप आपणास कल्पिता जालों. ॥ ९४१ ॥ तेजोरूप शुद्ध सत्त्वगुण । त्या तेजेचि कल्पिले विश्व हें त्रिगुण । प्रथमचि आपणास आपण । कल्पिता जालों या विश्वरूपे. ॥ ९४२ ॥ मग ब्रह्मा माझिया शक्तीतें । पावोनि त्याच तेजोमयातें । स्वयें कल्पू लागला जें म्यां भगवतें । कल्पिलें पूर्वी त्याहुनी. ॥ ९४३ ॥ धाता यथापूर्व कल्पिता जाला । वेद याच अर्थी बोलिला । प्रतिकल्पीं प्रवाह चालिला । येच रीती. ॥ ९४४ ॥ कीं म्यां कल्पावें प्रथम । तेजोमय विश्व उत्तम । तेंच ब्रह्मयास होय सुगम । अनायासें कल्पावया. ॥ ९४५ ॥ म्यां कल्पिले ज्या शक्तीकरूनी । तेच सृष्टिशक्ति ब्रह्मयास दिधली, म्हणोनी । जें म्यां कल्पिले तेंचि त्यापासुनी । प्रगट जाले. ॥ ९४६ ॥ परतु लोकदृष्टीं । न दिसे ऐसी प्रकाशक सृष्टी । देखोनि दिव्यदृष्टीं । तू कष्टी वेडेपणें होतोसि. ॥९४७॥ माझा जो आत्मयोग । त्या आत्मयोगे कल्पूनि पाहतों जग । त्या योगाचा करूनि संयोग । तुझ्या दृष्टीस हें दाविलें.॥९४८॥ ऐसें हें विश्वरूप । तुज वेगळें कोणीं देखिलें नाही मद्रूप । कृतार्थ उदड जाणती स्वस्वरूप । परि ऐसें तेजोमय देखिलें तुवांचि. ॥ ९४९ ॥ चित् सुवर्णचि नग जड । स्फुरे तितकेंच देखती सुघड । हें अन्वयज्ञान अवघड । परि जडाभास माया तें म्हणती. ॥ ९५० ॥ भक्त षड्गुणत्वें[1] पाहती । त्याज्यांश माया न मानिती । तें नवमीं दाविले तुजप्रती । 'पश्य[2] मे योगमैश्वरं' म्हणोनी. ॥ ९५१ ॥ ज्ञानिया भक्तास जग । चित्स्वरूपचि जड, ऐसा माझा ऐश्वरयोग । दिसे, परतु लाधोनि दिव्यदृष्टिसंयोग । ऐसें तुजवेगळें कोणीं न देखिलें. ॥ ९५२ ॥ प्रसन्न मी आहें जरी । विश्व ये रीती दाविलें तरी । ज्ञानियास योगसिद्धि होईल, परी । हें कौतुक दिसेना. ॥ ९५३ ॥ म्हणसी साधनें इतरे । करितां, ऐसें देखेल बरे । तरी तुज सांगतों खरे । ऐक, म्हणतो या श्लोकीं. ॥ ९५४ ॥

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ! ॥ ४८ ॥**

अगा ! वेदीं बोलिले यज्ञ जैसे । ते सर्वही करी तैसे । अथवा ते वेद अर्थासरिसे । पढे जरी. ॥ ९५५ ॥ ऐसिया वेदयज्ञाध्ययनीं । कोणी ये रीतीक-

---

१. ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, धर्म, यश व श्री, या छकडीला षड्गुण, षाड्गुण्य किंवा षड्गुणैश्वर्य असें म्हणतात. या सहा गुणांनी युक्त अशा ईशस्वरूपाचे वर्णन पंडितांनी यथार्थदीपिकेच्या प्रथमाध्यायाच्या मंगलाचरणांत मोठे सुरस केलें आहे. (अ० १, ओव्या ५–६४, पहा)
२. अ० ९, श्लो० ५.

रूनी । मज नाहीं देखिलें अथवा देउनी । दानें जीं जीं वेदीं बोलिलीं. ॥ ९५६ ॥ अथवा तीर्थाटनादि क्रिया । करोनि कोणी मज अद्वया । ऐशा विश्वरूपा मातें धनजया! । देखेल हें घडेना. ॥ ९५७ ॥ अथवा उग्र तपे । करोनि, त्यांच्या प्रतापे । मज देखेल या रूपे । न घडेल हेंही. ॥ ९५८ ॥ अगा! कुरुप्रवीरा! । तुजवांचूनि मज ऐशा सर्वेश्वरा । शक्त कोणी नव्हे पाहावया, जाणें बरा । जालासि योग्य एकचि तू. ॥ ९५९ ॥ ऐसें बोले जगन्मय । परि अर्जुनाचें न फिटे भय । तें जाणे साक्षी, की धनंजय । पूर्वरूप न देखतां, स्वस्थ नव्हे. ॥ ९६० ॥ विश्वरूपे होतो कष्टी । पाहों न शके तेजसृष्टी । म्हणोनी आच्छादूनी ते दिव्यदृष्टी । अवताररूप दाखवू इच्छिले. ॥ ९६१ ॥ परंतु आपलें वैभव । भक्तासि दाखविता जाला देव । तें न आच्छादी स्वयमेव । पार्थिल्याविण. ॥ ९६२ ॥ तुज हे देखतां होते व्यथा । म्हणोनी आच्छादूनी पार्था! । अवताररूप दावितों, अन्यथा । माझे देणें अमोघ. ॥ ९६३ ॥ वैभव अनंत दाविले । ते पुन्हा आच्छादिले । मी ऐसा नव्हे, परतु जालें । भय तूतें अत्यत. ॥ ९६४ ॥ याकारणें हें दृष्टीं दिसेना । आणि देखसी मज कमलनयना । ऐसें आतां करितों अर्जुना! । या भावें बोलतसे हा श्लोक. ॥ ९६५ ॥

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ् ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

अगा! होते तूतें व्यथा । माझे हें रूप देखोनी पार्था! । तरी हें रूप माझें सर्वथा । उग्र होय. ॥ ९६६ ॥ की जेथवरी आकार । काळचक्रें त्याचा संहार । काळास न भी ऐसा सुर, नर, असुर, । कोण असे? ॥९६७॥ कृपाळू जाला जरी शार्दूल । तरी भितीच[१] अजाबाळ । कृपाळू जाला जरी व्याळ । मूषक पाहों न शकती. ॥ ९६८ ॥ सिंहें धरिलें सौम्यपण । तरी हस्तीस दारुण । मी दाखवितों हें रूप करुण । तू व्यथा सर्वथा पावसी. ॥ ९६९ ॥ तरी नव्हे तूतें व्यथा । प्रीति पावे मन सर्वथा । ऐसा प्रीतमना होऊनि पार्था! । तेंच रूप पाहें तू माझे. ॥ ९७० ॥ व्यथा तुझी जाय । हा मूर्च्छाभाव दूरी होय । ज्या रूपासि देखतां आणि जें तुज प्रिय । तेंचि हें रूप माझें तू पाहें. ॥ ९७१ ॥ या उग्र दर्शनाची व्यथा जाय । आणि हें फिटे तुझें भय । ऐसें पाहें हें रूप, जें प्रिय । सर्वथा तूतें. ॥ ९७२ ॥ पश्य म्हण-

---

१. सर्वसाक्षी, विश्वदृक्, परमेश्वर. २ मेंढरू, करडू.

तांचि पाहें । हा अर्थ सिद्ध होत आहे । परंतु आतां पाहणें उगें न साहे । आत्मत्वें पाहें, ऐसें बोलों इच्छिलें. ॥ ९७३ ॥ म्हणोनी जेथें **पश्य** म्हणावें । तेथें **प्रपश्य** म्हणे गूढभावें । कीं प्रकर्षें बरवें मज पाहावें । ततुदृष्टीं पट जैसा. ॥ ९७४ ॥ जो आत्मदृष्टीं मज पाहे । तो मीच होऊनि राहें । कीं आत्मा त्याचा ततूच आहे । चतुर्भुज पट मी त्या ततूचा. ॥ ९७५ ॥ **अर्जुना**! अपरोक्षानुभव । पावलासि आणि माझे वैभव । देखिले, आतां माते बरें पाहें, हा भाव । **'प्रपश्य'** म्हणतां सूचवी. ॥ ९७६ ॥ ततु दृष्टीं दिसताहे । आणि पटरूपचि जो पाहे । तें 'बरे पाहतों' म्हणणें न साहे । ततु देखे तोचि [1]देखणा. ॥ ९७७ ॥ देखोनि पटसृष्टी । ततु पाहे दृष्टीं । तो बरे पाहतो गोष्टी । ऐसें जरी पाहावे चित्स्वरूप. ॥ ९७८ ॥ भगवद्रूप उत्कट । शुद्ध सत्त्व जरी चोखट । तरी ततूचा मायापट । बरा पाहे, तोचि बरा. ॥ ९७९ ॥ या गूढभावेंकरूनी । **'पश्य'** म्हणावें तेथें **'प्रपश्य'** म्हणोनी । म्हणे आतां पुढें काय करिता जाला तें एथूनी । बोलतसे **सं**जय. ॥ ९८० ॥

**सं० उ०—इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥५०॥**

**धृ**तराष्ट्रास **सं**जय । बोलता जाला, की **ज**गन्मय । सर्वभूतीं वसतो अद्वय । **वासु**देव **अर्जु**नातें ऐसें बोलोनी; ॥ ९८१ ॥ जैसें रूप आपलें । पाहेन म्हणोनि **अर्जु**नें प्रार्थिले । तैसेंचि यथापूर्व पहिले । रूप दाविता जाला मागुती. ॥ ९८२ ॥ जो **अर्जु**न अत्यत भ्याला । सौम्यरूप दावूनि त्याला । आश्वासन पुन्हां करिता जाला । महा थोर आत्मा जयाचा. ॥ ९८३ ॥ दृष्टीस परिमित दिसे । परि तो अनत आत्मा असे । म्हणोनी **सं**जय म्हणतसे । **'महात्मा** आश्वसिता जाला' म्हणोनी. ॥ ९८४ ॥ परतु करील जों आश्वासन । त्याहूनी पूर्वी निर्भय मन । होतांच, **सं**जय म्हणतो की ऐसें वचन । बोले **अर्जु**न आधींच या श्लोकीं. ॥ ९८५ ॥

अर्जुन उवाच—**दृष्ट्वेवं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन! ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

**अर्जु**न म्हणे **ज**नार्दना! । हे रूप तुझे **म**धुसूदना! । जें मनुष्याकारें सौम्य नयना । दिसतसे; ॥ ९८६ ॥ हें देखोनी नयनी । समाधान पावलों मनीं । युक्त जालों स्वबुद्धीकरूनी । प्रकृतीतें पावलों. ॥ ९८७ ॥ जे आपली स्वच्छ

---

१. बघणारा, डोळस.

मती । तेचि म्हणावी **प्रकृति** । ते घाबरी होतां तिचे होती । विपरीत भाव. ॥ ९८८ ॥ दूरि होतां घाबरेपण । जो स्वस्थ होतो आपण । तो प्रकृतीतें पावला हे खूण । **अर्जुन** सांगे आपली. ॥ ९८९ ॥ स्वच्छ चित्त जालें । तें आपल्या प्रकृतीतें पावले । तेव्हां मन आटोपले । जें घाबरें होतें अत्यंत. ॥ ९९० ॥ मन आटोपतां, आपण । **संवृत्त** जालों म्हणे निपुण । **सचेता** म्हणतां दावी खूण । चित्त स्वस्थ जालें म्हणोनी. ॥ ९९१ ॥ म्हणे पावलों प्रकृतीतें । कीं स्थिरत्व आले मतीतें । जों ती चचळ, तो तीतें । पावलों नव्हतों, हा भाव. ॥ ९९२ ॥ **काळरूपे** जनाचें मर्दन । करिता देखिला होता **जनार्दन** । त्यातें सौम्य मानुषरूपे देखोनि **अर्जुन** । '**जनार्दना! हें सौम्यरूप देखिलें**' म्हणतसे. ॥ ९९३ ॥ ऐसें बोलिला **अर्जुन** । तें आइकोनि वचन । **संजय** म्हणे **जगज्जीवन** । आश्वासन ऐसे बोलता जाला **भगवत**. ॥ ९९४ ॥

श्रीभगवानुवाच—**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥**

बोलता जाला श्री**भ**गवत । कीं हें सुदुर्दर्शरूप माझे अत्यंत । जें देखिले तुवां आद्य अनंत । देवही नित्य दर्शन इच्छिती या रूपाचें. ॥ ९९५ ॥ '**सुदुर्दर्श** म्हणिजे बहुत । दुःखे सोसूनि कष्ट केले जरी अत्यंत । तरी कोणी पाहो न शके निश्चित । रूप जें तुवां आतां देखिले. ॥ ९९६ ॥ **ब्रह्मा**दि थोरही देव । नित्य अपेक्षिती, की **दे**वाधिदेव । दाखवो आम्हांस **वा**सुदेव । **विश्वरूप.** ॥ ९९७ ॥ ते देवही अपेक्षिती मात्र । परि कृतार्थ नव्हती त्यांचे नेत्र । जें पाहायास जालास पात्र । तू **अर्जुना**! ॥ ९९८ ॥ आतां यानंतर श्लोक । त्याचे [1]प्रमेय **उ**त्तमश्लोक । मागेचि बोलिला, पुन्हा किंनिमित्तक । बोलेल, तें रसज्ञ समजोत. ॥ ९९९ ॥ कीं वेदयज्ञाध्ययनदानीं । तपे उग्रेंही करूनी । मी शक्य नव्हे ये रीती पाहाया म्हणोनी । पूर्वी **अर्जुना**तें बोलिला. ॥ १००० ॥ तुवां जैसें देखिले मातें । ऐसें कोणीही न देखे करूनि कोण्याही उपायातें । ऐसेंचि पुन्हा पूर्वोक्त रीती **पार्था**तें । बोलों पाहतो. ॥ १००१ ॥ कीं देखतां सौम्यरूप । अदृश्य होतां तें भयानक **विश्व**रूप । **अर्जुन** बोलिला टाकूनि ताप । की मी आतां प्रकृतीतें पावलों. ॥ १००२ ॥ कीं भयें बुद्धि चचळ होती । कांहीं न सुचे मजप्रती । आतां स्वच्छ होतां तीप्रती । मी पावलों. ॥ १००३ ॥ त्या प्रसंगीं वाटला त्रास । ज्या रूपाचा, तेंचि आठवे **अर्जुना**स । परि त्या दर्शनें कृतार्थ बोलिला आपणास । तें विस-

१ प्रतिपाद्य विषय.

रला वाक्य देवाचें. ॥ १००४ ॥ पावलों आतां प्रकृतीतें । ऐसें म्हणतां, तेव्हां मतीतें । स्थिरत्व नसतां, तीतें । त्या भयापुढें कैची धारणा या गोष्टीची.॥१००५॥ याकारणें तें प्रमेय । पुन्हा बोलतो अप्रमेय । तदर्थ वेदवेदांतगेय[1] । आरभिता जाला हा श्लोक. ॥ १००६ ॥

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥**

अगा! वेदांचें अध्ययन । आणि वेदार्थांचेंही पठन । केलें तरी वेदीं मी जगज्जीवन । शक्य नव्हे ऐसा पहाया. ॥ १००७ ॥ तैसेंचि तपेंही करूनी । अथवा सकळ दानेंही देउनी । अथवा सकळा यागीं यजूनी । पाहों शकती मज या रूपें, हें घडेना. ॥ १००८ ॥ देखतां जालासि तू जैसा । कोण्या उपायें कोणी न देखेल मज ऐसा । म्हणोनी पूर्वीं बोलिला श्रीकृष्ण जैसा । तैसाच मागुतीं वदे स्वस्थ देखोनी. ॥ १००९ ॥ आतां यानतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ १०१० ॥ कोण्या उपायें कोणी । मज ये रीती पाहू न शके त्रिभुवनीं । जैसें तुवां देखिलें म्हणोनी । पूर्वश्लोकीं बोलिला श्रीकृष्ण. ॥ १०११ ॥ हें आइकोनि अर्जुन । म्हणे कोण्या उपायें हा जगज्जीवन । शक्य नव्हे, तेव्हां जें अनन्यभक्तिभजन । तेंही नव्हे साधन काय या गोष्टीचें? ॥ १०१२ ॥ अर्जुन ऐसें म्हणे मनीं । तों हें सर्वसाक्षी समजोनी । 'अनन्यभक्तीनें तो मी सुलभ अत्यत' म्हणोनी । म्हणतसे या श्लोकीं. ॥ १०१३ ॥

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन! ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप! ॥ ५४ ॥**

अनन्यभक्तीनें तो मी परंतपा! । एवंविध विश्वरूपही मी अत्यंत सोपा । जाणाया, पाहाया, प्रवेशायासही, बापा! । सुगम मी होतसें. ॥ १०१४ ॥ आपला उपास्य वासुदेव । सर्वही तोचि देवाधिदेव । त्यावांचूनि अन्य कांहीं नाहीं, ऐसा प्रीतिभाव । **अनन्यभक्ति** त्यातें म्हणावें. ॥ १०१५ ॥ **'वासुदेवः[2] सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः'** म्हणे श्रीपती । भक्त सप्तमीं वर्णिला ये रीती । त्याची भक्ति ते अनन्या भक्ति बोलावी. ॥ १०१६ ॥ चतुर्विध[3] भक्त सप्तमींच हरी । बोलिला त्यांत ज्ञानी भक्त सर्वांवरी । श्रेष्ठ वर्णिला, तो जे भक्ति

---

१. वेद व वेदांत यांनीं गाण्या (प्रशसण्या) जोगा. २. अ० ७, श्लो० १९ ३. अ० ७, श्लो० १६.

करी । ते **अनन्या भक्ति** बोलावी. ॥ १०१७ ॥ हें अद्वैतज्ञान जालियावरी । सर्वात्मभावे हरी । आवडीनें भजावा तेचि बरी । भक्ति बोलावी अनन्या. ॥ १०१८ ॥ भक्ति ऐसी **भा**गवतीं । **गी**तेचे संक्षेप तेथें विस्तार पावती । नवमादिपूर्वाध्यायटीकेंत **प्रा**कृती । ते कांहीं **संस्कृ**तश्लोक वाखाणिले. ॥ १०१९ ॥ सप्तमस्कधीं **प्र**ऱ्हाद । दैत्यबाळकांसी ज्ञानसंवाद । बोलोनि शेवटीं विशद । बोलिला हें भक्तिरहस्य या श्लोकीं. ॥ १०२० ॥

**भा**गवतश्लोक—**एतावानेव लोकेऽस्मिन् पुंसः स्वार्थः परः स्मृतः ।**
**एकांतभक्तिर्गोविंदे यत्सर्वत्र तदीक्षणम् ॥ १ ॥**

या मनुष्यलोकी स्वार्थ । पुरुषाचा परम थोर पुरुषार्थ । इतकाच तो सांगतों यथार्थ । कीं एकांतभक्ति **गो**विंदीं. ॥ १०२१ ॥ एकीं अनेक वसे । ते अनेक त्या एकाचेंचि गवसे । तेव्हा त्या अनेकासि भिन्नत्व नसे । त्या एकीं अत त्या अनेकाचा ये रीती. ॥ १०२२ ॥ एका कनकी अत । सर्व अलकाराचा अत्यत । दृष्टांतीं म्हणावा हा **एकांत** । ऐसा अत एका स्वरूपीं जडाचा.॥१०२३॥ जड प्रपंच चराचर । एका चित्सागरीं तरगाचा पसर । अंत पावे परि आद्यत-मध्य जळ निरतर । सर्व देखती. ॥ १०२४ ॥ जो ऐसा एका चित्स्वरूपीं अंत । जडा चराचराचा अत्यत । या अन्वयबोधाचे नांव **एकांत** । या दृष्टीनें जे प्रीती, ते **एकांतभक्ति**. ॥ १०२५ ॥ ऐसे श्लोकाचे तीन चरण । **प्र**ऱ्हाद बोलोनि, यांचे विवरण । चतुर्थचरणीं करी करुण । की विशद कळावें सर्वांतें. ॥ १०२६ ॥ चतुर्थचरणीं **प्र**ऱ्हाद । ऐसें बोले विशद । कीं जो सर्वत्र **गो**विंद । जें त्यास सर्वत्र पाहणें, **एकांत** तो. ॥ १०२७ ॥ ऐसा सर्वभूतीं **श्री**कांत । पाहावा तोचि **एकांत** । या आवडीचें नाव सर्व संत । **एकांतभक्ति** ऐसें बोलती. ॥ १०२८ ॥ जे एकांतभक्ती । तेचि म्हणावी अनन्यभक्ती । म्हणोनि ये स्थळीं **भ**गवताची उक्ती । **'भक्त्या त्वनन्यया शक्य एवं'** म्हणोनी. ॥१०२९॥ अनन्यभक्तीचा ऐसा अर्थ । परतु निर्गुणाभिमानी श्रमती व्यर्थ । कीं ज्ञान होतांचि, सिद्ध जाला पुरुषार्थ । मग भक्ति किमर्थ त्यावरी? ॥ १०३० ॥ त्याचें मागें जालें खडन । जें **गी**ताशास्त्राचें मडन । परतु मागुतीं मुडमुंडन । कांहीं करावें लागतें. ॥ १०३१ ॥ या श्लोकीं **शे**षशयन । **'ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन'** ऐसें वचन । तरी **ज्ञातुं** म्हणजे जाणावया, तेव्हां ज्ञान । व्हावया अनन्यभक्ति बोलतो, ऐसें बोलती. ॥ १०३२ ॥ तेव्हां अन्यदेवताभक्ति नसे । ते अनन्यभक्ति बोलतसे । अद्वैतभक्ति उडविती ऐसें । कीं ज्ञानियातें भक्ति किमर्थ? मत त्यांचें. ॥ १०३३ ॥ परि हें कोण प्रकरण । कोणत्या जाणावयाचें हें विवरण ।

हें न जाणती, ज्यांस चरण । प्रिय नव्हती सगुणाचे. ॥ १०३४ ॥ 'तुझें रूप **ऐश्वर** । पाहों इच्छितों' म्हणे **पांडुकुमर** । आणि **संजयही** पाहोनि चतुर । ऐसेंचि बोले **धृतराष्ट्रा**. ॥ १०३५ ॥ की दाविता जाला **योगेश्वर** । **पार्थाका**-रणें रूप **ऐश्वर** । दाविले तें तों चराचर । सर्व एकदा दिव्यदृष्टी. ॥ १०३६ ॥ **विश्वरूपीं** दावी चराचर । त्याचे नाम **रूप ऐश्वर** । हेच नवमीं म्हणे **सर्वेश्वर**। **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ १०३७ ॥ नसोनि दिसे चराचर । हा माझा योग पाहें **ऐश्वर** । नवमी म्हणे आणि **विश्वरूपीं विश्वेश्वर** । रूप **ऐश्वर** दाखवी. ॥ १०३८ ॥ एव चराचर जग । तोचि अघटितघटनायोग । तोचि योग **ऐश्वररूप** मग । **विश्वरूपीं** दाखवी. ॥ १०३९ ॥ तरी जों आत्मज्ञान नसे । तों हा योग सर्वथा न दिसे । अन्वयज्ञान जालियाउपरि गवसे । **माया**-भासही योग **ईश्वराचा** म्हणोनी. ॥ १०४० ॥ तोचि योग त्याचें रूप । तेंचि रूप दाखविले **विश्वरूप** । कळले जऱ्ही सर्व चित्स्वरूप । तऱ्ही **ऐश्वररूप** हें न कळे. ॥ १०४१ ॥ ज्ञान जालियानतर । जाणावें हें रूप **ऐश्वर** । परि जो अनेकीं एकत्व देखे निरतर । सगुणभक्त ऐसा. ॥ १०४२ ॥ '[1]**ब्रह्मभूत** जो ब्रह्मचि जाला । तोही सर्वांभूती भक्ति पावला । त्या भक्तीनें मग जाणतो मला' । ऐसें **भगवंत** अष्टादशीं बोलेल. ॥ १०४३ ॥ '[1]**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा**' या श्लोकेंकरूनी । '[1]**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते**' ऐसें वदोनी । त्या [2]भक्तीनें मी जितका जैसा आहें तें जाणतों, म्हणोनी । क्रमेंचि त्याहीपुढे बो-लेल. ॥ १०४४ ॥ '[2]**भक्त्या मामभिजानाति**' । या श्लोकें बोलेल **श्री**-पती । कीं मी जितका जैसा आहे **जगत्पती** । त्या मातें जाणूनि मजमध्यें प्रवेशतो. ॥ १०४५ ॥ एव च ज्ञान जालियाहीवरी । सर्वभूतीं भक्ति पावल्या-उपरी । मातें जाणतो, म्हणे **हरी** । तैसाच अनन्यभक्तीनें जाणावया शक्य येथें म्हणतसे. ॥ १०४६ ॥ एव च ज्यास अन्वयभक्ति ऐसी बाणे । तो हा **माया**-भासही रूप **ऐश्वर** म्हणोनि जाणे । म्हणोनि या श्लोकी श्रीकृष्ण म्हणे । कीं त्या भक्तीनें एवंविध जाणाया मी शक्य. ॥ १०४७ ॥ मी **'एवंविध'** । म्हणजे मी या प्रकारींचा, त्या माझा बोध। कैसा होय? ऐसा करितां शोध । अन-न्यभक्तीनें शक्य मी. ॥ १०४८ ॥ म्हणे पूर्वार्धी **'एवंविध'** म्हणोनी । उत्तरार्धी **'ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन'** म्हणजे तत्त्वेंकरूनी । कीं आधीं अद्वैततत्त्व जा-णोनी । त्या तत्त्वें मी एवविध शक्य जाणावया. ॥ १०४९ ॥ कीं नवमीं '[3]**मया**

---

१. अध्याय १८, श्लोक ५४ पहा. २ अध्याय १८, श्लोक ५५ पहा. ३. अध्याय ९ श्लोक ४.

**ततमिदं सर्वं'** येथुनी । दुसरिया श्लोकीं **'[1]मत्स्थानि सर्व भूतानि ।** येथपर्यंत अद्वैततत्त्व उपदेशुनी । **'पश्य मे योगमैश्वरं'** मग म्हणे.॥१०५०॥ आधींच आयता आपण । प्रिय **अर्जुना**चा सगुण । तो करूनी अद्वैतबोधीं निपुण । त्यास मग अघटितघटनायोग आपला बोधिला. ॥ १०५१ ॥ ज्ञानी भक्त आणि निर्गुणोपासक । या दोघांत अतर इतकेचि एक । कीं त्यास नावडे सगुण **श्री**वत्सांक । भक्तांस आवडे. ॥ १०५२ ॥ वेरकड जडीं चित्प्रकाश । तेही पाहती सावकाश । परंतु अधिक पावती क्लेश । सगुणातें उपेक्षितां. ॥ १०५३ ॥ तैसा नव्हे **अर्जुन** । त्यास यथापूर्व आवडे **क**मलनयन । त्यास होतां अद्वैततत्त्वज्ञान । अनन्या **ह**रिभक्ति बाणली. ॥ १०५४ ॥ त्यास नवमीं अनन्यभक्तीकरूनी । योग **ऐ**श्वर अद्वैततत्त्वेचि कळला म्हणोनी । या अध्यायांत त्यास तें रूप दावुनी । मग ऐसें बोलिला. ॥ १०५५ ॥ की **'एवंविध'** मी जाणावया । आणि **'एवंविध'** मी पाहावया । आणि **'एवंविध'** मी प्रवेशावया । शक्य अनन्यभक्तीनें. ॥ १०५६ ॥ त्यांत एवविध जाणावया । आणि एवविध पाहावया । **अर्जुन** योग्य जाला, तेव्हां प्रवेशाया । जालाच योग्य. ॥ १०५७ ॥ कीं प्रवेशे बिबीं चिदश । तोचि म्हणावा **प्रवेश** । तरी **वि**श्वरूपे देखतां **ज**गदीश । स्पर्शे सत्त्वव्यापका चित्स्वरूपातें. ॥ १०५८ ॥ व्यापक **चै**तन्यबिब । एकाच देहीं प्रतिबिब । ज्यास शुद्धसत्त्व [3]अवलब । प्रतिबिबास जळ जैसें. ॥ १०५९ ॥ भूमीचवरी नदीजल । दरडीही भूमीच केवळ । प्रतिबिब दरडीचें चचळ । दिसे नदीच्या उदकांत. ॥ १०६० ॥ तें उदक दरडीवरी चढे । तेव्हां दरडीमात्र दृष्टी पडे । प्रतिबिब दरडीचे न सांपडे । ते समयीं उदकांत. ॥ १०६१ ॥ विश्वव्यापक तत्त्व । त्यास या प्रतिबिब**चि**दशाचे बिबत्व । त्या ततूनें विश्वपट पाहे सत्त्व । तेव्हां प्रतिबिब सत्त्वी दिसेना.[2]॥ १०६२ ॥ तोचि प्रवेश । येथें बोले **हृ**षीकेश । अनन्यभक्तीवांचूनि हे लेश । लभ्य नव्हे कोणासी. ॥ १०६३ ॥ जे टाकूनि सगुण । ध्याती केवळ शुद्ध निर्गुण । त्यांसही प्रवेश ऐसा, परि खूण । न कळे ऐसिया **ऐ**श्वरयोगाची. ॥ १०६४ ॥ हा भक्तियुक्त प्रवेश । **सगुणमोक्ष** यास म्हणे **हृ**षीकेश । निर्गुणमोक्षी अनुभवलेश । नसे स्वसुखाचा निर्धर्मी. ॥ १०६५ ॥ म्हणोनी एवविध म्हणे **ह**री । कीं जो मी सगुण ऐसे परी । त्यास जाणाया, पाहाया, प्रवेशायास अंतरीं, । साधन अनन्यभक्तीच. ॥ १०६६ ॥ यांत **अर्जुन** जाणता जाला । जेव्हां

---

१. अध्याय ९ श्लोक ५. २. एरव्हीं, बाकी ३. आधार

**'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनी उपदेशिला । जें नवमीं, आणि या एकादशीं देखिला । योग **ऐश्वर** दिव्यदृष्टीनें. ॥ १०६७ ॥ आतां नवमीं म्हणे **पश्य** म्हणोनी । कीं दृश्य जेव्हां जितके दिसेल नयनीं । तें **चित्स्वरूपचि** ऐसें बुद्धीनें ओळखोनी । **माया**भासयोग रूप माझे तू पाहें. ॥ १०६८ ॥ की पाणियाची गार । दृष्टीं दिसे पाषाणरूप आकार । कठिणपण जाणती कर । परि रसना जाणे जलत्वें. ॥ १०६९ ॥ तैसें चित्स्वरूप जाणे बुद्धी । तें बुद्धिगम्य ऐसी वेदीं प्रसिद्धी । परि इद्रियद्वारा दिसे समृद्धी । बुद्धि तेचि **माया**भासाची.॥१०७०॥ बुद्धि दृश्य **माया**भासही जाणे । त्या भासास योग **ऐश्वर** म्हणोनी **कृष्ण** म्हणे । परि योग एकसरां दृष्टीं न बाणे । तो **विश्वरूपीं** देखिला. ॥ १०७१ ॥ हें **अर्जुनें** अपेक्षिलें । म्हणोनी **देवें** त्याचें वचन रक्षिलें । आणि एक कार्यही लक्षिलें । की **भीष्मादिक** म्यां मारिले हें दाखवू. ॥ १०७२ ॥ याचि भावेंकरूनी । या श्लोकी **परंतपा**! म्हणोनी । **अर्जुनातें** आळवी सूचवूनी । कीं पर जे शत्रु, त्यांस ताप करणार तू. ॥ १०७३ ॥ की इहलोकपरलोकहानी । तुझी युद्ध न करितां, म्हणोनी । म्यां **विश्वरूपीं** दाविले मारूनी । **भीष्मादिक**. ॥ १०७४ ॥ यास्तव दाविले **विश्वरूप** । कीं तू क्षत्रिय परतप । लाड पाळूनि **काळप्रताप** । दाखविला. ॥ १०७५ ॥ की **भीष्मादिकांचा** मी मारणार । हा तुवां न धरावा अहकार । म्हणोनी हें तुज कळावया वीर । म्यां मारूनी, तुज दाखविला. ॥ १०७६ ॥ अन्यथा **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । अघटित योगज्ञान दृष्टीं दावूनी । आतां इंद्रियगम्य तितके योग माझा समजूनी । पाहें, म्हणोनी तेथेंचि दीधले दर्शनही. ॥ १०७७ ॥ आतां इंद्रियांतें प्रपच सारा । न दिसे, तरी नभीं द्विविध वारा । तैसा स्वस्वरूपींच थारा । देखिल्या, न देखिल्या, प्रपचाचाहि तू जाण. ॥ १०७८ ॥ **'येथाकाश'** या श्लोकी । म्हणे आकाशीं द्विविध वायु या लोकीं । त्यांत मोठा एक आणि सर्वत्र एक, तो ऐसा की । प्रत्यय तयाचा येत नसे. ॥ १०७९ ॥ तथापि तोही वारा । आकाशींच की **पांडुकुमारा**! । तैसीं न दिसती, न स्मरती, तथापि थारा । त्या भूतांचा मजमध्येंच, ऐसें तू जाण. ॥ १०८० ॥ एव च आत्मस्वरूपीं सर्व जाणे । त्यांतेंचि दृश्य देखतां योग बाणे । तैसें पाहावें, त्या पहायास **कृष्ण** येथें म्हणे । कीं एवविघ मज पाहावें अनन्यभक्तीनें. ॥ १०८१ ॥ येथें **अर्जुनें** घेतली आळी । म्हणोनि **देव** भक्ताचा लाड पाळी । परि पाहणियाची नव्हाळी[३] ।

१ अ० ९, श्लो० ५. २. अ० ९, श्लो० ६. ३. अपूर्वता, नवीनपणा, विशेष. (या शब्दाचा 'प्राप्ति, लाभ' असाही अर्थ आहे.)

नित्य हेचि, कीं दृश्य योग भगवंताचा. ॥ १०८२ ॥ एवं जे अनन्यभक्त जन । ते जरी इच्छिती ऐशाही रूपाचें दर्शन । तरी त्यांस दावीच शेषशयन । परि कां भयानक ऐसें पाहावें? ॥ १०८३ ॥ दृष्टीं जितकें दिसे । आणि शास्त्रदृष्टीनें स्मृतीस गवसे । तें भगवताचें योगैश्वर्यरूप असे । जें नसोनी असे स्वात्मरूपीं. ॥ १०८४ ॥ हें अनन्य भक्तातें दर्शन । असेच अखंड दडायमान । अनन्यभक्तीनेंच ऐसें ज्ञान । जाले जया. ॥ १०८५ ॥ एवं अनन्यभक्तीनें जाणावया । अनन्यभक्तीनें पाहावया । अनन्यभक्तीनें प्रवेशाया । शक्य भगवद्रूप, तें हेंचि. ॥ १०८६ ॥ कां तो तेजोरूप विशाळ । पाहावा क्रूर उग्र काळ[१] । कां इद्रियमूषकां दावूनि तो व्याळ । घाबिरें करावें[२] ॥१०८७॥ बुद्धीचा पूर्वसंस्कार। अर्जुन घाबरा जाला फार । कृपाळू जगदाधारा। कळोनिही.॥१०८८॥ एव अनन्यभक्तीचा विचार । या श्लोकी ऐसाच अर्थ निर्धार । अनन्य अद्वैत भक्तीनें विश्वाकार । भगवदाकार, ऐसें अद्वैततत्त्वेचि जाणावे. ॥ १०८९ ॥ अद्वैततत्त्वेचि पाहावा । अद्वैततत्त्वेंचि प्रवेशावा । या भावें बोले पांडवा । 'ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन' म्हणोनी. ॥ १०९० ॥ आतां अनन्यभक्तीचा अर्थ । आणीक एक, तोही समर्थ । परि या प्रकरणीं होतो व्यर्थ । कीं भेदवादीही अन्यदेवता न भजती. ॥ १०९१ ॥ न भजे अन्य दैवत । आणि निषेधी अद्वैत । दाटूनि आठवूनि द्वैत । भेदेचि भजे; ॥ १०९२ ॥ तो अद्वैतसाक्षात्कारातें । पावेल, ऐसें बोलवेल कवणातें? । आतां श्रद्धा अद्वैतीं असोनि ज्यातें । अनन्यभक्ति असेल, ॥ १०९३ ॥ तो पावेल साक्षात्कार । परि जाणेल आत्मा निर्गुण निराकार । या प्रसंगीं विश्वाकार । ऐश्वर्ययोग दाविला. ॥ १०९४ ॥ हा त्यांस कळे योग ऐश्वर । कीं ज्यांस असेल आत्मसाक्षात्कार । त्यांचा अनन्यभक्तिप्रकार । न वदवे जिज्ञासु भक्तासारिखा. ॥ १०९५ ॥ जो ऐसा भक्त निपुण । त्याच्या अनन्यभक्तीचें लक्षण । ऐसें कीं अद्वैततत्त्वें घडे निरीक्षण । भगवद्रूप हें विश्व. ॥ १०९६ ॥ असो आतां निर्गुणोपासकासही । सर्वत्र ब्रह्म पाहणें काय नाहीं? । त्यासही चित्स्वरूपावांचूनि कांहीं । दिसेचि ना. ॥१०९७॥ आतां मायाभास । भगवद्रूप पाहणें नसे तयास । तरी होतां मिथ्या सर्पाचा निरास । चैतन्यरज्जूच जड असे. ॥ १०९८ ॥ तथापि स्थितिकाळ । म्हणोनी रज्जु कळतां, जैसा दिसेना व्याळ । तैसें न घडे, म्हणोनी कुशाळ । चैतन्यकनकीं अलंकार देखती जडत्वें. ॥ १०९९ ॥ तो अलकार नुसतें हेम । जैसें जडही केवळ ब्रह्म । एवं ब्रह्म म्हणणें आणि भगवद्रूप पाहणें सम। सगुणभक्तिविशेष तो कोणता ओळखावा? ॥११००॥ ऐशा संदेहाचें हें स्थळ ।जाणे सर्वज्ञ

घननीळ । म्हणोनी अद्वैत बोधफळ । आणि सगुणभक्तिलक्षण वर्णितो या अंतींच्या श्लोकीं. ॥ ११०१ ॥

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ! ॥ ५५ ॥**

अगा ! **पां**डवा ! मदर्थ कर्म । तो आचरे शुद्ध **भागवतधर्म** । कीं मोक्षापरीस मी सगुण **ब्रह्म** । परम वाटतों जयासी. ॥ ११०२ ॥ माझ्या भक्तींत सुख जैसें । निर्गुणमोक्षांत कैचे तैसें[२] । की अनुभवचि नाहीं तेथें कैसें । सुखस्वरूप सुख वाटेल[२] ॥ ११०३ ॥ अमृत अमृताची गोडी नेणे । तैसे सुख सुखातें न जाणे । रसनेस गोडी, तैसें बाणे । सुख अनुभवांत सत्त्वातें.॥११०४॥ तें सत्त्व जेथें न उरे । तेथें स्वसुख कोणातें स्फुरे[२] । जेव्हां प्रारब्ध अवघे सरे । निर्गुणीं न उरे तें सत्त्व. ॥ ११०५ ॥ म्हणोनी मोक्ष नुसता निर्गुण । न अपेक्षी तो निपुण । सगुणीच सुख ऐसी खूण । कळली जया. ॥ ११०६ ॥ तो कां नव्हे मत्परम । की मी सगुणचि ज्यास परम । माझ्या भक्तिसुखासम । मुक्ति न दिसे जयासी. ॥ ११०७ ॥ म्हणोनी मजकारणे । कर्म त्यास आचरणें । कीं कर्मे मज समर्पणें । हे दास्यभक्ति गोड जीवन्मुक्तींतही. ॥ ११०८ ॥ कीं जो ऐसा वर्णितों भक्त । तो **पां**डवा ! जीवन्मुक्त । की संगवर्जित आणि निर्वैर, नित्यतृप्त । सर्व भूतीं. ॥ ११०९ ॥ संग वासना, तद्विवर्जित । तेव्हां लिंगदेह जाला भर्जित । प्रारब्धें स्थूळ वागे तो ऊर्जित । **भ**गवद्भाव सर्वभूतीं जो पाहे. ॥ १११० ॥ सर्वभूतीं निर्वैर । की कोण आपणासी आपण करी वैर? । ज्या भूतांस रूप **ऐ**श्वर । अघटितघटनायोग ईश्वराचा जो पाहे. ॥ ११११ ॥ सर्व भूतीं **भ**गवद्भाव । पाहे तो उत्तमोत्तम भक्तराव । ऐसा **भा**गवतीं वर्णित भाव । नवमाध्यायांत[१] मागे वर्णिला. ॥ १११२ ॥ ऐसा सर्वभूतीं जो चतुर । पाहे **भ**गवद्भाव योग **ऐ**श्वर । तो कैसा नव्हे निर्वैर । सर्व भूतीं? ॥ १११३ ॥ निर्गुणमात्रीं तत्पर । तेही सर्वभूतीं निर्वैर । परि **भ**गवत्कर्म करणार । आणि **भ**गवत्पर **भ**गवद्भक्त ते नव्हती. ॥ १११४ ॥ म्हणोनी त्यांस[२] विलक्षणें । भक्तांचीं तीन लक्षणें । या श्लोकी बोलिलीं **क**मलेक्षणें । **'मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्त'** म्हणोनी. ॥ १११५ ॥ मदर्थ—मजकारणें—कर्म । करणें, तें मत्कर्म । म्हणजे मज समर्पावया करी, हा **भागवतधर्म** । जीवन्मुक्तासही चतुर्थाध्यायांत बोलिला. ॥ १११६ ॥ **'गैतसंगस्य**[३] **मुक्तस्य'** या

१. अ० ९, श्लोक ३-७ यावरील टीका पहा. २. त्यास लागू न पडणारीं, त्याना न साजणारीं. ३. अ० ४, श्लो० २३.

श्लोकेंकरूनी । **'यज्ञायाचरतः कर्म'**[1] म्हणोनी । **यज्ञ विष्णु** तदर्थ मुक्तही होऊनी । कर्मे करीं सर्व समर्पी ऐसें बोलिलों. ॥ १११७ ॥ कीं संग--वासना--ते गेली । ज्ञानें चित्तास स्थिति बाणली । ऐसा जीवन्मुक्त त्याचीही वर्णिली । भक्ति कर्मसमर्पणाची. ॥ १११८ ॥ तैसाच येथें **मत्कर्म** । म्हणजे मज अर्पाया करी कर्म । कीं मीच ज्यास परम । म्हणोनि मद्भक्त. ॥ १११९ ॥ अर्पावया करी कर्म । ते श्रवणकीर्तनादि **भागवतधर्म** । कर्म आणीक तो निर्मम । गतसंग करीचना. ॥ ११२० ॥ जो ऐसा भक्त तो । **पां**डवा! मज पावतो । मज सगुणी प्रवेशोनि असतो । नित्यसुखानुभवे **वै**कुठी. ॥ ११२१ ॥ आतां हे साधकदशा म्हणोनी । कितेक बोलती त्यावरूनी । संगवर्जित आणि निर्वैर सर्वभूती ही दोनी । लक्षणे साधकाकडेच लाविती. ॥ ११२२ ॥ कीं संग दुष्टसंगती । ती न धरी तो सुमती । आणि शास्त्री सर्व **ब्रह्म**श्रुती । ऐकोनि मात्र निर्वैर. ॥ ११२३ ॥ आणि कर्मे करी समर्पाया । अर्पाया सगुणा **दे**वराया । परि आत्मज्ञान नसे तया । की आत्मज्ञानियास का सगुण[2] ॥ ११२४ ॥ ऐसा निर्गुण ज्ञानाभिमान । ते ऐसे करिती व्याख्यान । तरी **'गतसंगस्य मुक्तस्य'** या श्लोकी चतुर्थी त्यांचे खडन । सावकाशे **भ**गवतेंचि दाविले. ॥ ११२५ ॥ तेंही असो यानतर । पुढिल्याच अध्यायांत **स**र्वेश्वर । हाच स्वकर्म करणार । 'निःसंग, निर्वैर, ज्ञानी, भक्त;' म्हणोनी वर्णील. ॥ ११२६ ॥ त्यासही निर्गुणाभिमानी । वाखाणिताती साधक अज्ञ म्हणोनी । परि ते अधिक संमत निर्गुणोपासकाहुनी । हा अध्यायप्रारभीं सिद्धांत. ॥ ११२७ ॥ तींही त्यांचीं ज्ञानलक्षणें । जीं येथूनि वर्णिलीं **क**मलेक्षणे । तीं अन्यथा व्याख्यानें अवलक्षणें । सर्व उडविती. ॥ ११२८ ॥ परि त्या भक्तातें नाही ज्ञान । ऐसें जें त्यांचें व्याख्यान । तें सिद्ध होतां, **भ**गवद्वचन । विरुद्ध होतें. ॥ ११२९ ॥ सप्तमीं सर्वोपरीस । ज्ञानी थोर ऐसें सुरस ।[3] **भ**गवद्वाक्य तें होतें विरस । त्याहूनि[4] थोर अज्ञानी म्हणतां द्वादशीं. ॥ ११३० ॥ आतां ऐसा विरोध । तेही जाणती करितां शोध । म्हणोनि म्हणती की अनधिकारियास बोध । सगुणभक्ति थोर मानावी म्हणोनी. ॥ ११३१ ॥ परि हें भविष्य **च**क्रपाणी । जाणे सर्वज्ञचूडामणी । म्हणोनि अध्यायाच्या अती स्ववाणी । चमत्कारें बोलेल. ॥ ११३२ ॥ **'ये[5] तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते'** या श्लोकेंकरूनी । **'यथोक्तं पर्युपासते'** म्हणोनी । या **यथोक्त**शब्दें गेली उडोनी । कल्पना

---

१. अ० ४, श्लो० २३. २ दोषयुक्त, वेडीवाकडी. ३. अ० ७, श्लो० १७. ४. अ० १२, श्लो० २-५ ५. अ० १२, श्लो० २०.

त्याची. ॥ ११३३ ॥ **गी**तेंत अर्थवाद । कांहीं न बोले **गो**विंद । आपली न मानूनि बुद्धि मद । अर्थवाद **गी**तेंत आणिती. ॥ ११३४ ॥ हें पुढिल्याच अध्यायांत । **वा**मनमुख **वि**श्वतोमुख अनत । आपलें यथार्थ बोलणें **भ**गवत । या **य**थार्थदीपिकेंत यथार्थ दाखवील. ॥ ११३५ ॥ एव ऐसा अनन्यभक्त । म्हणे **मत्कर्मकृन्, मत्परम, मद्भक्त** । तो अनन्यभक्तीनें सगुणानुरक्त । जाणतो, पाहतो, प्रवेशतो पूर्वानुसंधानें.' ॥ ११३६ ॥ तो निर्गुणोपासका विलक्षण । म्हणोनि ऐसें त्याचें लक्षण । बोलिला या श्लोकीं **क**मलेक्षण । **'मत्कर्मकृन्, मद्भक्त, मत्परम'** ऐसें. ॥ ११३७ ॥ एव अपरोक्ष साक्षात्कार । ज्यांस तेचि मुख्य भक्त हा निर्धार । सिद्धांत ऐसा वारवार । या **भ**गवद्गीतेंत. ॥ ११३८ ॥ ज्यांस उपास्य निर्गुणमात्र । त्यांस हें **गी**ताशास्त्र । आप्त नव्हे, कीं आपुलें कृपापात्र । भक्त त्याहूनि थोर **भ**गवत बोलतो. ॥ ११३९ ॥ परतु त्या निर्गुणोपासकांचें जीवन । तें भक्ताकारणें **ज**गज्जीवन । येथें बोले, म्हणोनि तेही जन। झोंबले यास. ॥ ११४० ॥ माता पाजी लेंकरातें । परि तें सघृतदुग्ध मांजरातें । प्रिय अत्यंत म्हणोनि त्या क्षीरातें । न विसंबती मार्जार सर्वथा.॥११४१॥ **कृ**ष्णरूप **गी**ता माउली समर्थ । आशा त्यांचीही न करी व्यर्थ । अवशिष्ट शेषें त्यांसही करी कृतार्थ । भक्तां **ब्र**ह्मादि पुत्रांचिया. ॥ ११४२ ॥ ते आपणास जें जें प्रतिकूळ । तें तें योजिती अनुकूळ । परि ज्ञान भक्तांचे समूळ । उडविती. ॥ ११४३ ॥ कीं 'ज्ञान जालियावरी । भक्ति नलगे' ऐसी त्यांची वैखरी । ते या **गी**ताशास्त्रावरी । टीकाकार जाले **क**लियुगीं. ॥ ११४४ ॥ आतां हे **य**थार्थदीपिका । यथार्थ **गी**तार्थ, त्याची दीपिका । कलियुगतमांत प्रकाशिका । **गी**तार्थाची प्रगटली. ॥ ११४५ ॥ भीड कोणाची नाही । विरुद्ध अर्थ नावडे कांहीं । संमत वेदां आणि **व्या**सादिकांही । मूलग्रथकारातें तें बोलणें.॥११४६॥ ऐसी हे **य**थार्थदीपिका । त्यांत **वि**श्वरूप एकादशाध्यायाची हे टीका । वदूनि **शे**षपर्यंका । चरणीं समर्पी **वा**मन. ॥ ११४७ ॥ **वा**मन समर्पी चरणीं । तों स्वहृदयावरी धरी **च**क्रपाणी । म्हणे जे माझें अंतःकरणीं । तेंचि **वामन** मुखें बोलतो. ॥ ११४८ ॥

---

## अध्याय बारावा.

जय! जय! सधर्मविज्ञानप्रिय! । जय! जय! धर्मज्ञानमय! जगन्मय! । जय! जय! धर्मामृतोपदेशहतसंचय[1]! । सर्वाशयस्थ! ॥ १ ॥ जय!

---

१. ज्ञानयुक्त सगुणभक्तीच्या उपदेशानें नाहींसें केलें आहे सचित—प्राक्तनकर्म—ज्यानें अशा कृष्णा!

जय! बुधभक्तसंमतार्थ! । जय! जय! परमपुरुषार्थ! । अव्यक्तोपासकाव्यक्त-परमार्थ! **पार्थ**सारथे! ॥ २ ॥ जय! जय! भक्तैकसुलभ! । जय! जय! तदन्य-दुर्लभ! । जय! जयानादि**माया**वल्लभ! । जगदधिष्ठान! **जगद्गुरो**! ॥ ३ ॥ **दे**-वाधिदेवा! **शुका**दिक । जीवन्मुक्त तुझे उपासक । अनायासे तरले बहुतेक । जे ज्ञानी होऊनिही सगुण भजती. ॥ ४ ॥ ज्ञान जालियानतर । कोणी सगु-णाचा त्यजिती आदर । ते निर्गुणोपासक नर । निर्गुणा तूतेंचि पावती. ॥ ५ ॥ परि त्या अव्यक्तोपासकां अतिक्लेश । आणि ज्ञानियां भक्तास नलगे आयासलेश । या द्वादशाध्यायात तू **हृषीकेश** । गुह्य सिद्धात बोलसी ऐसा. ॥ ६ ॥ त्या या द्वा-दशाध्यायात । तू ऐसें बोलोनि **भ**गवत । समाप्तिश्लोकी म्हणसी हे धर्म्यामृत । जे यथोक्त उपासिती, ॥ ७ ॥ ते भक्त मातें अत्यंत । प्रिय, जे न करितां अर्थ विपरीत । यथोक्त उपासिती कीं जैसें बोलिलो मी तैसाच निश्चित । भावही माझा. ॥ ८ ॥ म्हणूनि उक्तप्रकारे । जैसे बोलिलो, तैसेंचि आदरे । जे उपा-सिती ते निर्धारे । प्रिय अत्यत मजलागीं. ॥ ९ ॥ शब्दार्थ एक, भावार्थ आ-णिक । ऐसेंही शास्त्रकाराचे बोले मुख । अनधिकारियासही हो सुख । म्हणोनी. ॥ १० ॥ गुळाची दावूनि आस । दे औषध पिता पुत्रास । तैसें काम्यफळ दावूनि अनधिकारियास । वेद काम्यकर्मे बोलती. ॥ ११ ॥ **स्व**र्गादिकामना तरी धरू । आणि जन वेदोक्तकर्मे करू । म्हणूनि मोक्षसुखकल्पतरू । वेद काम्येंही बोलता. ॥ १२ ॥ गुळाची दावूनि आस । दे औषध पिता पुत्रास । परमार्थ मानूनि त्या शब्दास । गूळचि फळ मानी औषधाचे. ॥ १३ ॥ परंतु तें न म्हणवे यथोक्त रीती । तैसी नव्हे या अध्यायार्थाची गती । हें यथोक्त म्हणूनि तूं **श्री**पती । समाप्तिश्लोकी बोलसी. ॥ १४ ॥ आणि यथोक्त या अध्यायाचा अर्थ । न वाखाणितां टीका जालिया व्यर्थ । होती अर्थाचे अनर्थ । पूर्वापरविरोधदोषेकरूनी. ॥ १५ ॥ मालागी या अध्यायाचे विवरण । यथोक्त-रीती निरूपण । करितों, ऐसें म्हणतो हेही आपण । तूचि वदसी. ॥ १६ ॥ तूचि वक्ता तूचि श्रोता । तूचि सर्वेही **भ**गवता! । म्हणोनि श्रोतयांकडे आतां **अनता**! । त्वद्रूपे लक्षूनि बोलतो. ॥ ॥ १७ ॥ पूर्वाध्यायाचे अती । **विश्वरूप** दावूनि **पार्था**प्रती । म्हणे **भ**गवत की ये रीती । मज न देखती कोणी **अ**-र्जुना! ॥ १८ ॥ घडतां माझी अनन्यभक्ती । देखों शके ऐसी माझी व्यक्ती । **'[1]भक्त्या त्वनन्यया शक्य'** म्हणोनि या श्लोकी उक्ती । ऐसी **अर्जुनें** ऐ-किली. ॥ १९ ॥ त्यापुढें शेवटील श्लोक । तेथें भक्ताचीं लक्षणें **उत्तमश्लोक** ।

---

१. अ० ११, श्लो० ५४.

बोलिला तें पुण्यश्लोक । ऐकता जाला **धनंजय.** ॥ २० ॥ **'मत्कर्मकृन्मत्परम'**[1] । निर्वैर जो सर्वभूतीं सम । या लक्षणीं **पुरुषोत्तम** । ज्ञानसंयुक्त भक्ति बोलिला. ॥ २१ ॥ की जे भक्ति आत्मज्ञानाविण । न कळे देवाची आपुली एकत्वखूण । वेद आणि ऋषि निपुण । ते भक्ति मुख्यत्वें न लेखिती. ॥ २२ ॥ येविषयीं वारवार । पूर्वी या टीकेत जाला निर्धार । कीं आत्मज्ञानावांचूनि भजनप्रकार । मुख्य नव्हे. ॥ २३ ॥ तैसाच या **गी**तेंत **गी**ताकार । ज्ञानी भक्त थोर म्हणूनि वारवार । बोलिला तो अर्थ निर्धार । ठसावला हृदयांत **अर्जुनाच्या.** ॥ २४ ॥ षष्ठाध्यायाच्या समाप्तिश्लोकीं । योग बोलोनि ऐसें **उ**त्तमश्लोक बोलिला की । योगिया सर्वांतही या श्लोकीं । योगी आणि भक्त माझा तो युक्ततम मज संमत. ॥ २५ ॥ उगाच योग उपासिती । त्यास शास्त्रकार **युक्त** म्हणती । एवं च युक्त आणि सेवी सगुण**श्री**पती । त्यातें **युक्ततम** म्हणे षष्ठीं **श्रीविष्णू.** ॥ २६ ॥ तैसाच या द्वादशाध्यायांत । **'ते[2] मे युक्ततमा मता'** म्हणेल **भग**वंत । की अव्यक्तोपासकाहूनि अत्यंत । स्वभक्त युक्ततम आणि संमत मजलागीं. ॥ २७ ॥ तेव्हां **अर्जुन** निःसंदेह होऊन । पावेल समाधान । तोंवरी संशययुक्त त्याचे मन । की हे थोर, तेव्हां ते काय नव्हती यांसम ? ॥२८॥ म्हणूनि या दोन्ही कोटी । एक भक्त, एक निर्गुणोपासक, यांत मोठी । कोण पदवी म्हणोनि **कि**रीटी । पुसो म्हणे. ॥ २९ ॥ तैसेंच सप्तमांत । चतुर्विध[3] भक्त बोलिला **भ**गवंत । त्या चतुर्विधांत थोर अत्यंत । जो सगुणभक्त ज्ञानी होउनी. ॥ ३० ॥ तेथेंही जे निर्गुणज्ञानाभिमानी । निर्गुणोपासनाच भक्ति म्हणोनि । वाखाणूनि त्या टीकावचनी । ज्ञानियांचें सगुणभजन उच्छेदिती ते. ॥ ३१ ॥ परी जैशीं आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, हीं तिनी । तिघाचीं लक्षणे, तैसें चौथियाचें लक्षण ज्ञानी । ते तिघे सगुण भजती म्हणोनी । तैसा हा ज्ञानीही भक्त सगुणभजनें. ॥ ३२ ॥ परंतु तेंही संशयाचे स्थळ । की तेचि भक्ति होय जें ध्यावें निर्गुण केवळ । तेव्हां जे निर्गुणोपासना निष्कळ[4] । तेचि भक्ति कां न घडे. ॥ ३३ ॥ ते या द्वादशीं **ह**री । संशयाचें स्थळ परिहरी । की भक्त म्हणोनि वैखरी । न वदे ज्ञानियांत जे निर्गुणमात्र उपासिती. ॥ ३४ ॥ जे निर्गुणोपासक । त्यांसि भक्त न म्हणे **श्री**वत्सांक । जे सगुणोपासक । तेचि भक्त. ॥ ३५ ॥ आर्तजिज्ञासु अर्थार्थीही जैसा । ज्ञानीही सगुणभक्तीनेंचि भक्त तैसा । एवं च सगुण भक्तीनें **भक्त** म्हणोनि ऐसा । स्वसिद्धांत **स**र्वज्ञ बोलिला.

---

१. अ० ११, श्लो० ५५. २. पुढें श्लोक २ ३. अ० ७, श्लो० १६. ४. शुद्ध, निर्मळ, केवळ.

॥ ३६ ॥ **'प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थमहं'**[1] या श्लोकेंकरूनी । **'स च मम प्रियः'** म्हणोनी । परस्पर प्रीती तेथें वर्णूनी । सगुणभक्तीच त्याची बोलिला. ॥ ३७ ॥ कीं प्रीतिरूप सगुणधर्म । निर्गुण काय जाणे निर्धर्म । आणि निर्धर्म तें भजतां प्रीति परम । सगुणपर्णीं उपजेना. ॥ ३८ ॥ **'ये[2] यथा मां प्रपद्यंते'** या श्लोकेकरूनी । जे जैसे भजती त्यास तैसाच भजतों म्हणोनी । चतुर्थी म्हणे यावरूनी । परस्पर प्रीति म्हणतां सगुणभक्तचि बोलिला. ॥ ३९ ॥ परंतु **अर्जुन** । न समजला हा भावार्थ गहन । कीं ज्ञानी भक्त थोर तरी निर्गुणमात्र ज्ञान । ज्यांस, ते काय थोर यासमान होती. ॥ ४० ॥ म्हणूनि द्वादशीं प्रथम । हा प्रश्न करितो **पांडवोत्तम** । कीं पूर्वाध्यायातीं **सर्वोत्तम** । ज्ञानयुक्त भक्त पुन्हा श्रेष्ठत्वें बोलिला. ॥ ४१ ॥ तेव्हा **अर्जुन** । स्मरला स्थळस्थळीं जें **भगवद्वचन** । की ज्ञानीही होउनि जे भक्तजन । ते अतिश्रेष्ठ. ॥ ४२ ॥ तरी ज्ञान असोनि भक्तिहीन । तेही थोर ऐसें **भगवद्वचन** । ज्ञानप्रशसाप्रकरणीं **अर्जुन** । ऐकता जाला. ॥ ४३ ॥ **'योंतः[3]सुखोंतराराम'** । या श्लोकीं उगाच जो आत्माराम । त्याचे श्रेष्ठत्व बोलिला **मेघश्याम** । स्थळस्थळीं अन्यत्रही. ॥ ४४ ॥ आणि आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, जन । भक्त, परतु ज्ञानहीन; । म्हणूनि बोलिला **जगज्जीवन** । कीं ज्ञानी भक्त तोचि अतिथोर. ॥ ४५ ॥ म्हणूनि भक्तजन । आत्मज्ञान नसोनिही करिती भजन । त्यातें मानी **अर्जुन** । कीं कोटि त्याची ज्ञानियासम नव्हे. ॥ ४६ ॥ कीं ज्ञानप्रकरणीं । ज्ञानियाचेच श्रेष्ठत्व वदला **चक्रपाणी** । आणि भक्त वर्णितांही **भगवद्वाणी** । ज्ञानयुक्त भक्तचि थोर म्हणे. ॥ ४७ ॥ जरी **भगवद्भक्ति** करूनि ज्ञान । होणार, तथापि ते ज्ञानियासमान । नव्हती, ऐसें समाधान । **अर्जुन** पावला. ॥ ४८ ॥ परि भक्तिहीन ज्ञानी । आणि ज्ञानी युक्त भक्तीकरुनी । दोहींची प्रशसा कानीं । श्रेष्ठत्वेचि ऐकिली. ॥ ४९ ॥ याही दों पक्षांत । श्रेष्ठ कोणास मानितो **भगवत** । हें पुसावे ऐसे अत्यत । पुसतो सादर **अर्जुन**. ॥ ५० ॥

अर्जुन उवाच—**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

**अर्जुन** म्हणे ऐसें सततयुक्त । जे तूतें उपासिती भक्त । आणि जे अक्षर अव्यक्त । उपासिती; ॥ ५१ ॥ या दोहीं कोटीच्या उपासकांत । कोण योगवेत्ते अधिक अत्यत । हें तू जाणसी सर्वज्ञ **भगवत** । तरी मज हें सांग, अर्थ

---

१. अ० ७, श्लो० १७. २. अ० ४, श्लो० ११ ३ अ० ५, श्लो० २४.

ऐसा. ॥ ५२ ॥ पाहतां वरिच्यावरी । श्लोकार्थ इतुकाच, परी । अर्थात् अर्थ हें वैखरी । दाखवी अपार. ॥ ५३ ॥ आणि जे सगुणचरणीं अनुरक्त । त्यांतेचि अर्जुन म्हणे भक्त । आणि त्यांतेंचि म्हणे सततयुक्त । आणि **'एवं'** म्हणजे बोलिले पूर्वी तुवां ॥ ५४ ॥ तेव्हां अकरा अध्यायपर्यंत । भक्त ह्मणूनि जितके बोलिला भगवत । ते सर्व सगुण भजती ऐसे निश्चित । समजोनि **'एवं सततयुक्ता भक्ताः'** ह्मणतसे. ॥ ५५ ॥ तरीच दोन्ही योगवेत्ते । द्विविध योगांचे दोघेही जाणते । परि दोघांतही अधिक योगवेत्ते कोणते? । ते मज सांग, ऐसें बोलतो. ॥ ५६ ॥ एक योग निर्विकल्प । एक योग सविकल्प । योग दोन्ही अनल्प । षष्ठाध्यायांत बोलिले. ॥ ५७ ॥ ते योग दोन्ही । दोघेही जाणती ह्मणोनी । दोघांत योगवेत्ते अधिक कोण, ये रीतीकरूनी । पुसतसे. ॥ ५८ ॥ योगवेत्ते दोघेजण । त्यांत एक भजती सगुण । एक नुसतेचि निर्गुण । या विशेषे कोण योगवेत्ते अधिक दोघांत? ॥ ५९ ॥ दोघेही योगवेत्ते । निर्विकल्प, सविकल्प, योगाचे जाणते । यांतही अधिक कोणते? । प्रश्नार्थ ऐसा. ॥ ६० ॥ दों प्रकारें योग दोन्ही । आणि दोघेही जाणती हें कशावरूनी । वाखाणावें ह्मणोनी । शका येथें. ॥ ६१ ॥ तरी एकाच्या दोन्ही योगरीती । अर्जुन सूचवूनि बोले देवाप्रती । पुढें उत्तर देतां श्रीपती । स्पष्ट योग दोन्ही बोलेल. ॥ ६२ ॥ त्यांत भक्त वदोनि या श्लोकीं । अर्जुन ऐसें बोलतो की । जे अक्षर अव्यक्तचि उपासिती या लोकीं । या दोहींत योगवेत्ते अधिक कवण? ॥ ६३ ॥ म्हणे अक्षर उपासिती । यांत सूचवी कीं निर्विकल्पयोगातें जाणती । अव्यक्त उपासिती ह्मणे सुभद्रापती । सविकल्पयोग सूचवूनी. ॥ ६४ ॥ आणि **'भक्तास्त्वां पर्युपासते । अव्यक्तमपि उपासते । ये च अक्षरमुपासते'** । ऐसा अन्वय **च**कारे **अपि**शब्देंकरूनी. ॥ ६५ ॥ अधिक योगवेत्ते कवण म्हणोनी । प्रश्न सम योगवेत्तयांचा म्हणोनि, यावरूनी । अक्षर अव्यक्त ही पदे दोन्ही । **अपि**शब्दे **च**कारे लागती ऐशीं दोहींकडे. ॥ ६६ ॥ त्यांत **अक्षर** म्हणजे न क्षरे । प्रलयकाळीं क्षरातें गिळूनि उरे । जें क्षरा-नश्वरा-जडावेगळे स्फुरे । बुद्धि अवलबूनि जाणे क्षरातें. ॥ ६७ ॥ पाहतां तें अक्षर । सविकल्प न दिसे तेथें क्षर । चित्त होणें तदाकार । तेचि अक्षरउपासना. ॥ ६८ ॥ जे निर्गुणोपासना ये रीती । तोचि **निर्विकल्पयोग** म्हणती । म्हणतां अक्षर उपासिती । निर्विकल्पयोग सूचविला. ॥ ६९ ॥ दों उपासकांत अधिक योगवेत्ते । अर्जुन म्हणे कीं कोणते । तेव्हां दोघेही या योगाचे जाणते । हें सिद्ध जालें. ॥ ७० ॥ न बोलतां परि निर्गुणोपासक । उपासिती ऐसें निर्गुणचि

एक । भक्त हा योग जाणोनिही सगुण शेषपर्यंक । उपासिती. ॥ ७१ ॥ म्हणूनि हे भक्त लेखिले । ते अव्यक्तोपासकचि बोलिले । तऱ्ही सम तुकें[1] तोलिले । म्हणतां अधिक योगवेत्ते कोणते म्हणोनी ? ॥ ७२ ॥ भक्त ज्ञानी योगी भगवदाकार । कोण्ही एक उपास्य अवतार । आणि विश्वरूप विश्वभर सचराचर । द्विविध अलकार त्या अक्षरा सुवर्णाचेचि पाहती. ॥ ७३ ॥ साकारीं जडत्वभावना । उपजवी नुसती निर्गुणोपासना । म्हणूनि द्विविधयोग अभ्यासिल्याविना । न मोडे पूर्वसस्कार. ॥ ७४ ॥ यालागीं सगुणभक्त जे ज्ञानी । निर्विकल्पयोगातेंही जाणूनी । सगुण उपासिती भक्त म्हणोनी । दुसरे अक्षर मात्र उपासिती, हे वदला. ॥ ७५ ॥ एव च अक्षरपदे करूनी । प्रलयकाळीं क्षर नाशतां, अक्षर उरे म्हणोनी । जें प्रलयशेष तेचि क्षरनिषेधशेष, यावरूनी । निखिळ[2] निर्गुण उपासनारूप हा योग ॥ ७६ ॥ आतां सविकल्प योगाची सूचना । करी बोलतां अव्यक्तोपासना । व्यक्ति दिसोनिही व्यक्ति असेना । तें अव्यक्त. ॥ ७७ ॥ दिसे प्रपच अवघा व्यक्त । तो व्यक्त पाहतांचि ब्रह्म अव्यक्त । कीं जें अलंकार नव्हे तेंचि आकारयुक्त । कनक अव्यक्त व्यक्तींतही. ॥ ७८ ॥ जे व्यक्ति दृष्टीं दिसे । तेचि बरें पाहतां नसे । व्यक्ति अव्यक्ति सैमरसे[3] । हे अव्यक्त उपासना. ॥ ७९ ॥ इद्रियास व्यक्ति वाटती । बुद्धीस दोनी ब्रह्मचि दिसती । दृष्टीस घन आणि हातासि कठिण लागती । परि रसनेसि गारा द्रवरूप मृदु उदक. ॥ ८० ॥ एव च इद्रियासहित । प्रपंच अवघा ब्रह्मचि निश्चित । व्यक्ति दिसोनि नसती अत्यत । ते अव्यक्त उपासिती, हा अर्थ. ॥८१॥ हाचि **सविकल्पयोग** । कीं सच्चिद्रूप पाहणे जडजग । कनकीं दृष्टीं देतां नग । दिसोनिही असे कनकमात्र. ॥ ८२ ॥ आतां दोघात अधिक योगवेत्ते । अर्जुन म्हणे कोणते । तेव्हां सगुणोपासकही जाणते । याही सविकल्पयोगाचे सिद्धचि हें. ॥ ८३ ॥ परतु विश्वाकार भास । माया म्हणूनि त्याज्यांश निर्गुणोपासकास । सगुणोपासका ज्ञानियास । जगन्निवासचि जग सर्व. ॥ ८४ ॥ कीं भासरूप माया । ते भगवताची योगमाया । म्हणूनि नवमीं म्हणे धनजया । **'पश्य[4] मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ ८५ ॥ तो ऐसा योगऐश्वर । भगवद्रूप हें चराचर । म्हणूनि ज्ञानी सगुणतत्पर । विश्वरूपें उपासिती. ॥ ८६ ॥ त्या प्रसगें अवतार । शुद्धसत्त्वविद्यारचित आकार । चित्कनकचि तें दिव्य भगवद्देह अलंकार । सगुणोपासक उपासिती. ॥ ८७ ॥ एव च दोघे द्विविधयोगाचे जाणते । म्हणूनि दोघेही योगवेत्ते । परतु दोघांत अधिक योगवेत्ते कोणते ? । हा

---

१. वजनानें, महत्वानें. २ निष्कळ, शुद्ध ३. मिळून जाते, एकरूप होते. ४ अ० ९, श्लो० ५.

प्रश्न. ॥ ८८ ॥ दोघांत अधिक कोण धनुर्धर? । म्हणतां धनुर्विद्या जाणते दोघेही नर । दोघांत कोण अधिक साहित्यचतुर? । म्हणतां साहित्यवेत्ते दोघे हें सिद्ध. ॥ ८९ ॥ इत्यादि नाना न्याय । सूचवी येथे धनंजय । दोघांत योगवित्तम कोणते म्हणूनि निर्णय । पुसतो जेधवां. ॥ ९० ॥ **'योगवित्'** म्हणजे योगवेत्ते । **'योगवित्तम'** म्हणजे अधिक योगाचे जाणते । त्या दों पक्षात योगवित्तम म्हणे कोणते । तेव्हां योगवेत्ते दोघेही हें सहज सिद्ध. ॥ ९१ ॥ हा न्यायसिद्ध ऐसा अर्थ । परतु निर्गुणोपासनाभिमानी ऐसा सहज यथार्थ । अर्थ न मानूनि, अनर्थ । बळेचि येथें साधिती. ॥ ९२ ॥ त्यांच्या मतें आत्मा कळला । तो सगुणोपासनेपासूनि टळला । सिद्धांत त्यांचा येथें चळला । ज्ञानियांस सगुणोपासना बोलतां. ॥ ९३ ॥ ते येथें ऐसें म्हणती । कीं सगुणोपासक आत्मा नेणती । निर्गुणोपासकचि जाणती । ग्रथ वाखाणिती ते ऐसा. ॥ ९४ ॥ अर्थ ऐसा न मानिती ते । की दोन्ही पक्ष योगाचे जाणते । दोहींत अधिक योगवेत्ते कोणते? । त्यांस हा अर्थ मानेना. ॥ ९५ ॥ आतां योगवेत्तेपणीं दोन्ही कोटी[१] । समान मानूनि पोटी । अधिक योगवेत्ते कोण ऐसें किरीटी । बोलतसे. ॥ ९६ ॥ हा अर्थ ते टीकाकार । न बोलती ऐसा न करिती विचार । कीं दृढतर त्यांचा सस्कार । स्फुरो नेदी हा अर्थ. ॥ ९७ ॥ एक ज्ञानहीन सगुणोपासक । निर्गुणोपासक ते एक । दोघांत योगवित्तम म्हणिजे कोणते **अधिक** । इतके उगेचि वाखाणिती. ॥ ९८ ॥ समुद्रांत मुक्ताफळे । त्यावरूनि उडती पक्षियांचीं कुळें । परि जळांत मोत्यें निर्मळे । तीं न पाहती. ॥ ९९ ॥ लघूनि क्षीरसागर । जाऊ शकती गगनचर । परि रत्ने निघती त्यांत मंदर । प्रवेशूनि मथी जेधवां. ॥ १०० ॥ जे नसती निरभिमान । त्यांसि नव्हे गीतार्थाचें ज्ञान । यथामति व्याख्यान । भलता करी. ॥ १०१ ॥ आतां **योगवित्तम** ऐसें पद । ये रीती जाले विशद । तरी ज्यांस अभिमानाचा मद । ते बोलती येथें ये रीती. ॥ १०२ ॥ की सगुणभजनचि योग त्यांचा । आणि निर्गुणोपासना योग यांचा । त्यांत योगवित्तम म्हणे अर्जुनाची वाचा । कीं आपलाल्या योगीं योगवित्तम कोणते? ॥ १०३ ॥ तरी बोलावा हा अर्थ । परि विचारितां होतो व्यर्थ । जे निरभिमानी जाणते समर्थ । हा अर्थचि त्यातें मानेना. ॥ १०४ ॥ कीं नव्हे जो दोघांचा योग एक । तो न पुसवे न्यून अधिक । हें बोलतां ग्रथ अनेक । वाढेल येथें. ॥ १०५ ॥ नख न लागे ज्याला । कां कुऱ्हाडी हाणणें त्याला? । योगवेत्ते न म्हणतां दोघांला । अर्थचि

---

१. बाजू, पक्ष.

याच्या उत्तराचा लागेना. ॥ १०६ ॥ कीं याचें उत्तर । उत्तरश्लोकीं देईल सर्वेश्वर । तेथे सगुण तत्पर । अधिक म्हणेल निर्गुणोपासकांहूनी. ॥ १०७ ॥ जे सगुणोपासक । ते योगवेत्ते अधिक । आणि मज संमत, म्हणेल श्रीवत्साक । आणि कष्ट अधिक, म्हणे, निर्गुणोपासकां. ॥ १०८ ॥ जेव्हां ते सगुणभक्त । न म्हणावे आत्मयोगयुक्त । तेव्हा ते ज्ञानहीन आणि सगुणीं अनुरक्त । म्हणावे ऐसे. ॥ १०९ ॥ जरी आत्मज्ञानी म्हणावे । तरी योगवेत्तेही गणावें । भगवद्वाक्यानुरूप वाखाणावे । नीटचि तेव्हा. ॥ ११० ॥ जरी म्हणावे ज्ञानहीन । उगेचि करिती सगुणभजन । तरी ज्ञानियापरिस जगज्जीवन । अधिक आणि मज संमत त्यापरिस, ऐसे म्हणेना. ॥ १११ ॥ निर्गुणोपासक ज्ञानी । सगुणोपासक अज्ञानी । तेव्हा अज्ञानी ज्ञानियाहुनी । अधिक आणि मज संमत म्हणतो, हे साधतें. ॥ ११२ ॥ सर्वांपरिस ज्ञानी प्रबुद्ध । श्रेष्ठ, म्हणूनि सर्वत्र भगवद्वाणी प्रसिद्ध । आणि येथे ऐसे होतें सिद्ध । की ज्ञानहीन थोर ज्ञानियापरिसही. ॥ ११३ ॥ तेव्हां ज्ञानियाच्या प्रशसेचे बोल । सर्वही येथें जाले फोल । एव च भगवद्वाणी सखोल । अभिमानें अन्यथा वाखाणिती, म्हणावें. ॥ ११४ ॥ तेही अभिमानें ये रीती । येथें आधीं वाखाणिती । परि पूर्वापर विरोधास मागुती । भीति, बोल लागतो म्हणोनी. ॥ ११५ ॥ परतु सगुणोपासक ज्ञानी । म्हणतां स्वसिद्धांतासि होते हानी । कीं ज्ञानियांस सगुणोपासना नाहींच म्हणोनी । मत त्याचे. ॥ ११६ ॥ याकारणें ज्यांचे येथें सगुणभजन । वर्णिले त्यांस ते म्हणती ज्ञानहीन । परतु त्याते म्हणे जगज्जीवन । श्रेष्ठ अत्यत निर्गुणोपासकापरिस. ॥ ११७ ॥ हा उरावरील धोंडा जड । बहुत वाटे अवघड । तथापि आपला सिद्धांत देखोनि रोड । पुष्ट करीती कुयुक्तीनें. ॥ ११८ ॥ कीं अनधिकारी जन । टाकूनियां सगुणभजन । निर्गुणाकडे लागतील, यास्तव मधुसूदन । सगुणभक्त थोर म्हणतसे. ॥ ११९ ॥ कोणी ऐसें बोलती । कोणी प्रकारांतरे भाव काढिती । कोणी एके रीती साधिती । ज्ञानहीनत्व या सगुणभक्तांचे. ॥ १२० ॥ परतु जे निर्गुणोपासनेचे अभिमानी । ते येथे ऐसा भाव काढुनी । या भक्तास ज्ञानहीन म्हणतील म्हणोनी । सर्वज्ञ जाणे भगवत. ॥ १२१ ॥ म्हणूनि म्हणे या अध्यायांत । जें[१] मी बोलिलों भगवत । तें यथोक्त उपासिती जे अत्यत । प्रिय मज ऐसें अध्यायांती बोलिला. ॥ १२२ ॥ शब्दाचा प्रवाह जैसा । अर्थ भावार्थही तैसा । त्यास म्हणावें **यथोक्त** म्हणूनि ऐसा । निर्णय पूर्वोक्ताचा बोलिला.

---

१. पुढे श्लो० २०.

॥ १२३ ॥ भक्त थोर म्हणोनी । भगवत म्हणे तेथें स्वयुक्तीकरूनी । भावार्थ आणिक काढुनी । नीचपण आणिलें भक्तातें. ॥ १२४ ॥ भगवत म्हणे भक्त युक्ततम । उभय पक्षांत अधिक आणि मज समत उत्तम । त्यास नीचपण आणूनि, त्याहूनि परम । ते केले, ज्यांस दो पक्षांत युक्ततम मज समत म्हणेना. ॥ १२५॥ तेव्हां यथोक्तपण कोठे उरले? । यथोक्त अर्थास विरुद्ध जाले । भक्त नीच म्हणतां आलें । अन्यथात्व भगवदुक्तीसी. ॥ १२६ ॥ निर्गुणोपासकाहूनि भक्त । भगवत उत्तम म्हणे हें यथोक्त । भाव काढुनि थोर म्हणणें अभक्त । हें यथोक्त कैसें म्हणवेल? ॥ १२७ ॥ शब्दार्थ दिसतो जैसा । भावही त्याचा असे तैसा । तरी तें यथोक्त म्हणावे ऐसा । निर्णय अध्यायांती होणार. ॥१२८॥ **'ये[2] तु धर्म्यामृतमिदं'** या श्लोकेकरूनी । **'यथोक्तं पर्युपासते'** म्हणोनी । अर्थास विरुद्ध कल्पना निषेधूनी । टाकिली येथें. ॥ १२९॥ आणि या अध्यायांत । जे मी बोलिलों भगवत । तें अवघे **धर्म्यामृत** । म्हणिजे **सगुणामृत,** अर्थ हा. ॥ १३० ॥ सगुणोपासनेकरूनी । भक्त श्रेष्ठ अत्यत जे ज्ञानी । ऐसे या अध्यायांत वर्णिले म्हणोनी । हे सगुणामृत जाणावे. ॥ १३१ ॥ आणि यथोक्त उपासिती । ते **श्रद्दधान मत्पर** म्हणे **श्री**पती । ते मज प्रिय अती । भक्त म्हणे. ॥ १३२ ॥ जे असतील ज्ञानी आणि सगुणभक्त । तेच अध्यायार्थ वाखाणितील यथोक्त । जे निर्गुणोपासनाभिमानी सगुणीं अभक्त । ते अश्रद्दधान या यथोक्त अर्थी हें जाणें सर्वज्ञ. ॥ १३३ ॥ म्हणोनि जे श्रद्दधान । त्यांतेंचि यथोक्त अर्थाचे ज्ञान । तेंचि सधर्म सगुणधर्म्यामृत सेवन । करिती या अध्ययांतीं हा अर्थ. ॥ १३४ ॥ अध्यायाती विशद याचा । अर्थ करील त्याच भगवंताची वाचा । प्रस्तुतीं या श्लोकाचा अर्थ हाचि साचा । की आत्मयोगवेत्ते हे दोघेही. ॥ १३५ ॥ तरीच निर्गुणोपासकाहूनि अधिक । म्हणे योगवित्तम सगुणोपासक । ऐसें यथोक्त वाखाणितां सुज्ञ लोक । यथोक्त उपासितील हे उपासना. ॥ १३६ ॥ कीं दोघेही आत्मज्ञानी । दोघेही आत्मयोगवेत्ते म्हणोनी । एक सगुण भजती ज्ञान होउनी । एक निर्गुण मात्र ॥ १३७ ॥ सगुणभजन, सगुणत्याग । हेच विशेष प्रसग । म्हणोनि दोघे जाणती योग । यांत अधिक योगवेत्ते कोण? हा प्रश्न. ॥ १३८ ॥ म्हणूनि याचें उत्तर । ऐसें देईल सर्वेश्वर । कीं युक्ततम आणि मज समत जे सगुणतत्पर । हे श्रेष्ठत्वे ज्ञाननिष्ठ भक्त म्हणोनी. ॥ १३९ ॥ जरी ज्ञानहीन भक्तांचा प्रसग । असता, तरी ऐसें न

---

१. दुसराच, निराळा, भलताच. २. पुढें श्लो० २०.

बोलता **श्री**रंग । की नसतां अविद्यावरणविक्षेपभग । श्रेष्ठ ज्ञानियापरिस, हें अघटित. ॥ १४० ॥ **शु**कादिक जीवन्मुक्तीं । प्रगट केल्याच आपल्या सगुण-भक्ती । **श्री**मद्भागवतीं ज्याच्या उक्ती । स्थळस्थळीं ऐशाच. ॥ १४१ ॥ हेही असो आणि **श्रु**ती । ज्ञानियातेंचि देव गुरुभक्ति बोलती ।सगुण भजतां ज्ञानाची स्थिती । विघडली कोणाची, हें तों न आइको. ॥ १४२ ॥ **'यस्य देवे परा भक्ति । यथा देवे तथा गुरौ'** ऐसी **श्रु**तीची उक्ती । आणि निर्गुणपक्षाभि-नीही भक्ति । गुरूची तो करितीच. ॥ १४३ ॥ तरी **श्रु**ति म्हणे देवाचे ठायीं जैसी । भक्ति गुरूच्याही ठायीं तैसी । करावी तरी गुरुभक्ति करितां कैसी । सगुणभक्ति न घडे. ॥ १४४ ॥ गुरुप्रतिमाही सगुण । तैसें सगुण-**ब्र**ह्मही सगुण । गुरूसी भजतां न अंतरे निर्गुण । तैसेंच सगुण भजतांही. ॥ १४५ ॥ जैसी भक्ति सगुणीं । तैसीच गुरूचे ठायीं म्हणे **वे**दवाणी । हें सगुण दाटूनि नलगे म्हणोनी । बोलूनि गुरुभक्ति मागुती करितीच. ॥१४६॥ एव च भक्तिमार्गास विलक्षण । निर्गुणोपासनेचे दावावे लक्षण । म्हणूनि ऐसें बोलती ते विचक्षण । म्हणवती कैसे. ॥ १४७ ॥ तथापि जे शुद्धनिर्गुणोपा-सक । त्यांसही या **गी**ताश्रवणें जाला विवेक । जयास **गी**ता ठाउकीच नाहीं, ऐसे कितीएक । मोक्ष कष्टी होऊनि पावले. ॥ १४८ ॥ परतु सगुणोपासना । ज्ञानियास नलगे, ऐसे त्यांच्या मुखास येईना । निर्गुणचि गोड लागलें त्यांच्या मना । ते बहुतां कष्टे मोक्ष पावले योगसिद्धीनें. ॥ १४९ ॥ आलीकडे कोणी टीकाकार । करूनि त्या पक्षाचा अगीकार । ज्ञानियास नलगे सगुण साकार । बोलती ऐसें. ॥ १५० ॥ परतु **गी**ताव्याख्यान । न साहे निर्गुणवादाभिमान । अर्थ केला तरी समाधान । त्या टीकेत न घडे शोधकांचें. १५१ ॥ आत्म-ज्ञानें युक्त । ते भक्ति थोर म्हणूनि ते थोर भक्त । हा भक्तिमार्ग **भ**गवदुक्त । **गी**तेंत या. ॥ १५२ ॥ नुसत्या ज्ञानाहुनी । ज्ञानयुक्त भक्ति श्रेष्ठ म्हणोनि । या **गी**तेंत भक्तीच थोर करूनी । **भ**गवत वदे. ॥ १५३ ॥ म्हणोनि सिद्ध करूनि भक्ति थोर । करावा **गी**तार्थनिर्धार । ऐसें स्वयें **गी**ताकार । अष्टादशीं ग्रंथ संपतां बोलेल या श्लोकीं. ॥ १५४ ॥

अष्टादशाध्यायश्लोक—**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥**

अर्थ याचा विशद । पुढें होणारचि प्रतिपद । येथें उपयोगी सांप्रद । अर्थ

---

१. अज्ञानाचे पटलाचा निरास व नाश. २. न साजणारे, विसगत. ३ शाहाणे. ४. अ० १८, श्लो० ६८.

इतका. ॥ १५५ ॥ की हें गुह्य परम । माझ्या भक्तांप्रति जो सांगेल उत्तम । तो मातेंच पावेल म्हणे पुरुषोत्तम । परि जरी भक्ति थोर करूनि सांगेल. ॥ १५६ ॥ माझे ठायीं भक्ती । थोर करूनि, सांगे हे **गी**ता माझी उक्ती । तरी तो मातेंचि पावे म्हणजे मुक्ती । ऐशा **गी**तार्थाच्या निरूपणें. १५७ ॥ माझे ठायीं भक्ति थोर करूनी । म्हणजे भक्ति थोर सर्वांहूनि । ऐसा **गी**तार्थ सांगे, तो मज पावे म्हणोनि । फळ ऐसें ऐशा **गी**तार्थनिरूपणाचे. ॥ १५८ ॥ या श्लोकाची हे टीका । अन्यथा बोलती अर्थ फिका । जो यदुकुळाचिया टिळका । सर्वथा संमत नव्हे ॥ १५९ ॥ **'भक्तिं मयि परां कृत्वा'** म्हणोनी । अर्थ जो होतो तृतीयचरणेंकरूनी । तो अगीकारितां जातो उडोनी । सिद्धांत आपला. ॥ १६० ॥ थोर करूनि भक्तीतें । सांगेल या गुह्यातें । तो पावेल म्हणतां माते । भक्ति सर्वांपरिस थोर बोलावी. ॥ १६१ ॥ म्हणूनि अर्थ ऐसा करिती । कीं **गी**तार्थ सांगेल जो सुमती । तो पावेल मजप्रती । मग श्रेष्ठ भक्ति माझी भजनरूपे करूनियां. ॥ १६२ ॥ अर्थ तो ऐसाही जाला । परतु अर्थास बाध आला । कीं **गी**तार्थ ज्यानें नाहीं सांगितला । तोही भक्ति करूनि पावेल. ॥ १६३ ॥ तेव्हां **गी**तार्थकथनाचे फळ । विशेष काय बोलिला घननीळ । एवच लेकराचे खेळ । ऐसे अर्थ. ॥ १६४ ॥ न सांगताही **गी**तार्थ । प्राप्ति भक्तीनें यथार्थ । **गी**तार्थनिरूपणें कृतार्थ । काय जाला ? ॥ १६५ ॥ **'भक्तिं मयि परां कृत्वा'** म्हणोनी । याचा बाधित अर्थ कोणी ये रीतीकरूनी । करिती आणि कोणी शहाणे त्याहुनी । तेही बाध लागेसेंचि बोलती. ॥ १६६ ॥ कीं माझे ठायीं भक्ति थोर । आधी भजनरूपे करूनि सादर । जे हे **गी**ता सांगती ते नर । मातेंचि पावती. ॥ १६७ ॥ चतुराईनें ऐसें बोलती । परतु ऐसें न समजे त्यांची मती । की भजनरूप भक्ति करूनि पावती । **गी**तार्थ सांगितल्याविनाही. ॥ १६८ ॥ विना **गी**तार्थनिरूपण । भक्ति करूनि त्यातें पावतीच निपुण । **गी**तार्थनिरूपणाचा विशेष गुण । कोण ये स्थळीं दाखविला म्हणावा. ॥ १६९ ॥ भक्ति केल्याविना । **गी**तार्थ सांगतां येईना । या भावेंकरूनि मना । भ्रमे हा रुचि देतो. ॥ १७० ॥ परतु **गी**तार्थकथनफळ । मातें पावती म्हणे घननीळ । तरी **गी**तार्थ सागितल्याविनाही भक्ति त्याची केवळ । पाववी त्यातें. ॥ १७१ ॥ फळ **गी**तार्थकथनाचें । राहिलेंचि या अर्थी साचें । हें मत नव्हे **गी**ताकाराचे । बाध लागतो म्हणोनी. ॥ १७२ ॥ भक्तीतें करूनिही थोर । यथार्थ **गी**तार्थ सांगे निर्मत्सर । यथोक्त अर्थी सादर । त्यास भगवत्प्राप्ति, अर्थ ऐसा. ॥ १७३ ॥ सोडोनि हा अर्थ ।

अन्यथा बोलणें व्यर्थ । पुसतां न भेटे तो समर्थ । इतर अर्थही वाटती. ॥ १७४ ॥ यालागि इत्यादि अर्थ । पुसतां भेटतां होती व्यर्थ । अर्थ हाचि अबाधित यथार्थ । कीं भक्तीतें थोर करूनी जो सांगे. ॥ १७५ ॥ तो मातेचि पावे निश्चित । की **गी**तार्थ ऐसाच वर्णिता होतो अबाधित । अबाधितार्थाचें लक्षण **भ**गवत । या प्रकरणी दावितो. ॥ १७६ ॥ की भक्त ज्ञानी नुसतीया ज्ञानियाहुनी ॥ श्रेष्ठ आणि मज समत म्हणोनी । म्हणे या यथोक्त अबाधितार्थे-करूनी । बाध अवघे परिहरती. ॥ १७७ ॥ या भक्तास म्हणतां ज्ञानहीन । ज्ञानियाहूनी नव्हे याचे थोर भजन । तेव्हा स्वये **ज्ञा**नानदघन । विरुद्ध बोलतो, ऐसें स्थापते. ॥ १७८ ॥ तरी अनधिकारियाकारणें । ऐसे बोलिले **ना**रायणें । म्हणूनि म्हणतां, दूषणें । अपरिमितें लागती. ॥ १७९ ॥ की अनधिकारी टाकूनि सगुण । भ्रष्टतील भजता निर्गुण । म्हणूनि सगुण भक्तांतें **ब्रह्म** सगुण । श्रेष्ठ म्हणतो, ऐसें जरी म्हणावे; ॥ १८० ॥ तरी याच अध्यायांत । **'अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि'** या श्लोकापासूनि **भ**गवत । पायरिया बोलेल बहुत । एक नीच एकीहुनी. ॥ १८१ ॥ की चित्त माझे ठायी जरी । स्थिर करू न शकसी तरी । अभ्यासयोगें इच्छा करी । चित्तस्थिरत्वें मज पावावया. ॥ १८२ ॥ जरी अभ्यासींही समर्थ नव्हसी । तरी मत्कर्मे करीं तेणेंही पावसी । इत्यादि नाना रीती कैसी । **भ**गवद्वाणी बोलिली? ॥ १८३ ॥ तेथें अनधिकारी । टाकूनि नीच पायरी । चढेल उच पायरीवरी। म्हणूनि कां नाहीं शकला? ॥ १८४ ॥ ज्याचा जितका अधिकार । तितकेचि भजन त्यास बोले **गी**ताकार । नीचास उच करूनि बोलावें हा प्रकार । न साहे येथें. ॥ १८५॥ एवच अनधिकारियाकारणे । नीच पायरी उच करणे । ऐसें या अध्यायांत **ना**रायणें । बोलिले नाहीं. ॥ १८६ ॥ तरीच अध्यायांतीं म्हणे यथोक्त। हे धर्म्यामृत उपासिती जे भक्त । ते माझे ठायी अनुरक्त । ते प्रिय अत्यत मजलागी. ॥ १८७ ॥ या **यथोक्त**शब्देकरूनी । कल्पित भाव ऐसें निवारूनी। ज्ञानियापरिस भक्त थोर म्हणोनी । सिद्धात केला. ॥ १८८ ॥ तरी तो सिद्धांत विरुद्ध । जेव्हा हे भक्त न म्हणावे ज्ञानी शुद्ध । सर्वांत थोर ज्ञानी प्रबुद्ध । अज्ञ त्यापरीस श्रेष्ठ आणि संमत न म्हणावे. ॥ १८९ ॥ विरुद्ध बोले **ना**रायण । तरी त्याचे वचन केवि प्रमाण? । त्याची टीका करायाचेचि कारण । मग कैचें? ॥ १९० ॥ जरी त्याचे बोलणें प्रमाण। तरी विरुद्ध न वदे तो सर्वज्ञ सुजाण । आणि तो तरी ज्ञानियांहूनी थोरपण । भक्तांस देतो. ॥ १९१ ॥ ज्ञानियांपरीस अज्ञभक्त । थोर ह्मणणें तों सर्वथा अयुक्त ।

यालागीं योगवेत्ते अधिक कोण? हें **अर्जुनोक्त** । वचन ज्ञानयोग दोहींपेक्षांचा सूचवी हें सत्य. ॥ १९२ ॥ एवच निर्विकल्प, सविकल्प योग दोन्ही । दोघेही जाणती म्हणोनी । अधिक योगवेत्ते दोघांत कोण? ये रीतीकरूनी । **'तेषां के योगवित्तमा'** म्हणतसे. ॥ १९३ ॥ असो आतां ज्ञानी आणि सगुणभक्त । त्यांतेचि **अर्जुन** म्हणे **सततयुक्त** । यास उत्तर **भ**गवताचें कीं ते नित्ययुक्त । भक्त युक्ततम आणि मज संमत. ॥ १९४ ॥ जो अर्थ सततयुक्तीं । तोचि अर्थ नित्ययुक्तीं । की सर्वदा या भक्तांतें स्वभक्ती । म्हणूनि योजले ऐसे सर्वदा. ॥ १९५ ॥ **सतत** म्हणजे जे सर्वकाळ । **युक्त** म्हणजे योजले सुशीळ । अगीकारूनी याच अर्थातें **मे**घनीळ । ते नित्ययुक्त म्हणेल उत्तर देतां उत्तरश्लोकी. ॥ १९६ ॥ तरी स्वस्वरूपीं योजलें चित्त । अभ्यासानुरूप दोघांचेंही निश्चित । परि दोघांचेंही चित्त सतत । योजलें स्वरूपीं असेना. ॥ १९७ ॥ जों प्रारब्धाचा देह । तोंवरी विस्मृतीस काय सदेह? । जरी सोडिला त्याचा स्नेह । तरी विस्मृति पडेच केव्हां तरी. ॥ १९८ ॥ द्रष्टा अवस्थात्रयाचा । ज्या बुद्धीकरूनि साचा । ते तमी लीन होतां, स्मरणधर्म कैचा । सुषुप्तींत निर्गुण आत्मयातें? ॥ १९९ ॥ सुषुप्तींत आत्मप्रत्यय । असे, तरी ते अवस्था तुर्या होय । एवच सत्त्वतमोमय । आत्मस्मृति कैची तेव्हां ज्ञानियासही? ॥ २०० ॥ एवच भजोत सगुण अथवा निर्गुण । स्मृतीनें न घडे सर्वदा युक्तपण । विस्मृतींत आत्मा असे आपण । अविद्या असतां होता जे रीती. ॥ २०१ ॥ आत्मा विस्मृतींत असे । परि बुद्धीस तो दिसोनि न दिसे । सूर्यप्रकाशीं वर्ततां स्मृति नसे । जैसी तयाच सूर्याची जों जों ठाऊका. ॥ २०२ ॥ हें नव्हे सततयुक्तपण । भजोत सगुण अथवा नुसतें निर्गुण । युक्तपण तोंचि जोंवरी स्मरण । कीं अतःकरण जों मरे. ॥ २०३ ॥ ऐसें असोनिही सततयुक्त । **अर्जुन** म्हणे भक्त । जे उपासिती नुसतेंचि अक्षर अव्यक्त । सततयुक्त त्यातें म्हणेना. ॥ २०४ ॥ तैसेंचि उत्तर । भक्तांस नित्ययुक्त म्हणे **दा**मोदर । म्हणूनी हा सततयुक्तपणाचा पदर । भक्तींत सांपडे. ॥ २०५ ॥ जे भक्तीनें युक्त । तेचि म्हणावे सततयुक्त । कीं भक्ति ज्यांस, तेच भक्त । भक्तीनें सततयुक्त ते होती. ॥ २०६ ॥ जे नव्हती भक्त । ते स्मृति विघडतां अयुक्त । जों स्मृति, तोंचिवरी युक्त । सततयुक्तत्व न घडे विस्मरणीं तयांचें. ॥ २०७ ॥ त्यांचें स्वरूपस्मरण विघडे । तेव्हां त्यांस सततयुक्तत्व न घडे । यांच्या भक्तींत अंतर पडे । तेव्हां हेही नव्हती सततयुक्त ॥२०८॥ तरी स्मृतीचें युक्तपण । जाय पडतांचि विस्मरण । भक्तीच्या अयुक्त-

त्याचें लक्षण । जरी अभक्ति उपजे. ॥ २०९ ॥ पुत्राची नव्हे स्मृती । तेव्हां न म्हणवे ते अप्रीती । जे क्षणीं अप्रीती । ते क्षणींच प्रीती खडली म्हणावी. ॥ २१० ॥ स्त्री, गृह, धन आवडे । आणि क्षणक्षणा त्यांचें स्मरण विघडे । तथापि विस्मृतींत आवडी गेली, ऐसें न घडे । नावडी उपजतांचि आवडी गेली म्हणावी. ॥ २११ ॥ एवच उपजे अभक्ती । तेव्हांच खडली म्हणावी भक्ती । अभक्ति नाहीं तोंपर्यंत अनुरक्ती । असे विस्मरण पडतांही. ॥ २१२ ॥ **भक्ति** म्हणजे आवडी । आवडी विघडे जेव्हां उपजे नावडी । नावडी न उपजे, तों विस्मृति पडे जऱ्ही घडी । सततयुक्तपण आवडीनें असेच. ॥२१३॥ निर्गुणोपासकांही । आवडी न म्हणवे नाहीं । परि त्यांस मोक्ष आवडे, यांस कांहीं । नावडे **भ**गवतावांचुनी. ॥ २१४ ॥ आणि निर्गुणोपासका ज्ञान । जाले करितांच सगुणभजन । निर्गुणात्मत्व कळता मन । काढिलें सगुणावरूनी. ॥ २१५ ॥ पूर्वी होतेच भक्त । मग सगुणी जाले अभक्त । त्यांतें न म्हणावें सततयुक्त । नित्ययुक्त न म्हणे **भ**गवतही. ॥ २१६ ॥ ज्ञान जालियाहीवरी । सगुण यथापूर्व आवडे तरी । ते भक्तीनें सततयुक्त ऐसी वैखरी । **अर्जु**नाची आणि नित्ययुक्त म्हणे **भ**गवत. ॥ २१७ ॥ कीं भक्ति यांची अखंडित । जे सगुण भजती ज्ञानी पंडित । म्हणूनि याचेंचि असे मंडित । सततयुक्तपण. ॥ २१८ ॥ म्हणूनी जे ज्ञानी होउनी सगुणीं अनुरक्त । त्यांतेंचि **गी**ताकार म्हणतो **भक्त** । जे टाकूनि भजती नुसतें अव्यक्त । भक्तही त्यातें म्हणेना. ॥ २१९ ॥ त्यांत भक्त आणि ज्ञानी । सप्तमाध्यायात थोर वर्णिला सर्वांहुनी । एव **'सततयुक्ता ये भक्ता'** म्हणोनी । त्याचवरूनि हा प्रश्न **अर्जु**नाचा.॥२२०॥ सगुणोपासकातेंचि **गी**ताकार । भक्त म्हणे वारंवार । तोचि **अर्जु**नातें संस्कार । दृढ बाणला. ॥ २२१ ॥ म्हणूनि म्हणे ऐसे सततयुक्त । जे तूतें उपासिती भक्त । आणि जे उपासिती नुसते अक्षर अव्यक्त । या दों पक्षांत अधिक योगवेत्ते कोण ? ॥ २२२ ॥ सप्तमीं चतुर्विधभक्तियुक्त । त्यांत थोर जो ज्ञानी भक्त । तोचि ज्ञानी सगुणीं अनुरक्त । पूर्वाध्यायाचे अतीं वर्णिला. ॥ २२३ ॥ तरी चतुर्विध भक्तांत जे थोर । ज्ञानी होऊनि सगुणतत्पर । ते निर्गुणोपासकांहूनि न्यून कीं अधिकतर ? । हा प्रश्न **अर्जु**नाचा या श्लोकीं. ॥ २२४ ॥ प्रश्न ऐसा सादर । ऐकता जाला **दा**मोदर । उत्तर याचें जगदेकसुदर । देतसे आतां श्री**भ**गवान्. ॥ २२५ ॥

श्रीभगवानुवाच—**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

अवतरलें **ब्रह्म** परिपूर्ण । हें जगचि ज्याचे ऐश्वर्यादि[1] गुण । तो बोलता जाला सर्वज्ञ निपुण । ये रीती. ॥२२६॥ अगा ! जे नित्ययुक्त । ज्यांस तूं म्हणसी सततयुक्त । आणि एवप्रकारे उपासिती ह्मणसी भक्त । ते युक्ततम आणि संमत मजलागीं. ॥ २२७ ॥ म्हणसी **'एवं सततयुक्त'** । की ऐसे जे उपासिती भक्त । आणि उपासिती अक्षर अव्यक्त । त्यात कोण योगवित्तम ? हा प्रश्न तुझा. ॥ २२८ ॥ तरी दो पक्षात योगवित्तम । अधिक योगाचे जाणते उत्तम । भक्तचि म्हणूनि म्हणे **पुरुषोत्तम** । युक्ततम म्हणोनी. ॥ २२९ ॥ जो अर्थ म्हणतां **योगवित्तम** । तोचि अर्थ म्हणता **युक्ततम** । एवच अधिक योगवेत्ते उत्तम । भक्त म्हणूनि उत्तर तयाचें. ॥ २३० ॥ दोघेही योगाचे जाणते । यांत अधिक भक्तचि योगवेत्ते । ऐसें उगेचि येथें **भगवद्वाणी** बोलते । कारण याचे विशद **भगवद्वाणीच** बोलेल. ॥ २३१ ॥ **'कीं तेषामहं समुद्धर्ता'** । म्हणूनि म्हणेल **विश्वभर्ता** । निर्गुणोपासका नावडे सगुणवार्ता । म्हणूनि उद्धर्ता त्यांचा मी म्हणेना. ॥ २३२ ॥ ते आपलिया अभ्यासबळेकरूनी । मज निर्गुणातें पावती म्हणोनी । याहूनि अधिक क्लेशी होउनी । पावती ऐसें म्हणेल. ॥ २३३ ॥ एक मागोनि भीक । धन मेळवी आणि एक । पृथ्वीपतीचा सेवक । अधिक धनवत तो त्याहुनी. ॥ २३४ ॥ आणि थोडे त्याचे आयास । भीक मागे त्याचे अति प्रयास । म्हणूनि म्हणे **श्रीकृष्ण** स्वभक्तांस । युक्ततम ते म्हणोनी. ॥ २३५ ॥ **युक्त** म्हणजे योगी योगवेत्ते । **युक्ततम** म्हणजे अधिक योगाचे जाणते । म्हणूनि **अर्जुन** पुसे योगवित्तम कोणते[2] । तरी युक्ततम भक्त, हें उत्तर तयाचे. ॥२३६॥ जैसे प्रश्नीं सततयुक्त । आणि उत्तरीं ते नित्ययुक्त । तैसें प्रश्नांत कोण योगवित्तम, तरी भक्त । युक्ततम म्हणूनि **देव** म्हणे. ॥ २३७ ॥ एवंच दोघेही ज्ञानी । दोघेही आत्मयोगाचे जाणते म्हणोनी । भक्त युक्ततम की अनायासेंकरूनी । मत्प्रसादें जीवन्मुक्तीतें पावती. ॥ २३८ ॥ याचा ऐसा विचार । की जाला अद्वैतबोधनिर्धार । तथापि अभ्यासें मोडोनि पूर्वसस्कार । योगसिद्ध मुक्तीतें पावती. ॥ २३९ ॥ ते सगुणप्रसादावांचुनी । अद्वैतज्ञान न कळे म्हणोनी । सगुणभजनें आधीं आत्मा जाणुनी । मग चित्त तदाकार करणें हा अभ्यासयोग

---

१. ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, धर्म, यश व श्री हे षड्गुण २ पुढे श्लोक ७ पहा.

त्यांचा. ॥ २४० ॥ तें ज्ञान जालियावरी । कोणी म्हणती आतां सगुण कां परी ? । ते सगुण टाकूनि नानापरी । अभ्यास करिती ज्ञान बिबावया. ॥२४१॥ म्हणूनि त्याते सततयुक्त । अर्जुन म्हणेना आणि नित्ययुक्त । देव न म्हणे, कीं सांप्रत अभक्त । ते जाले. ॥ २४२ ॥ म्हणूनि त्यांस कष्ट होती बहुत । ऐसें पुढें बोलेल भगवत । यांचा योग भगवत्प्रसादे त्वरित । सिद्धीतें अनायासें पावतो. ॥२४३॥ म्हणूनि अधिक योगवेत्ते । अर्जुन म्हणे, दोघांत कोणते ? । भगवत म्हणे, अधिक योगाचे जाणते । भक्त आपले ये रीती. ॥ २४४ ॥ अत एव नित्ययुक्त । भगवत म्हणे ते भक्त । कीं ज्ञान होतां नुसतें धरिलें अव्यक्त । भक्ति खडली तयाची. ॥ २४५ ॥ कीं प्रथम सगुणभजनाविना । सर्वांस संमत कीं आत्मज्ञान होईना । एवच पूर्वी सगुणोपासना । होतीच निर्गुणोपासकांतेंही. ॥ २४६ ॥ ते समयीं तेही भक्त । साप्रत उपासिती अक्षर अव्यक्त । म्हणूनि ते नव्हती नित्ययुक्त । भक्ति खडली सगुणाची. ॥ २४७ ॥ जे जाणोनिही अक्षर अव्यक्त । न सोडिती मागुती सगुण ते भक्त । पूर्वी सगुण भक्तीतें जैसे युक्त । तैसेच आत्मा सर्वगत अपरोक्ष कळतांही. ॥ २४८ ॥ याकारणें न होतां बहुत कष्टी । स्वरूपीं जडे भक्तांची ज्ञानदृष्टी । आवळा सांपडे जेवि मुष्टी । तैसें अनायासें अद्वैत बिबे भक्तांतें. ॥ २४९ ॥ म्हणूनि अधिक योगाचे जाणते । भगवत म्हणे भक्तचि ते । याच कारणे भगवद्वाणी बोलते । कीं ते मज समत अत्यत. ॥ २५० ॥ नित्ययुक्त म्हणूनि समत । कीं ज्ञान होतां सोडिला नाही भगवत । ज्यांस सगुण टाकितां क्लेश अत्यत । ते केवि समत होती अनादि सर्वज्ञा तयाते ? ॥ २५१ ॥ ज्यास अधिक योग बाणे । तोचि अधिक योग जाणे । म्हणूनि भगवत स्वयें म्हणे । युक्ततम भक्तांतें. ॥ २५२ ॥ हे अधिक योगवेत्तेपण । सगुणभक्ति याचे कारण । ज्ञान जालियाही न सोडिले सगुण । नित्ययुक्त भक्तीनें म्हणोनी. ॥ २५३ ॥ ऐसे नित्ययुक्त । म्हणूनि मज समत म्हणे भक्त । कीं ज्ञान जाले तरी अनुरक्त । सगुणचरणीं. ॥ २५४ ॥ तरीच द्विविध योगही बाणती । तरीच अधिक योग निर्गुणोपासकांहूनि जाणती । आणि सर्वज्ञ त्यातेंचि आपणास समत म्हणती । जे न सोडिती उपाय अनायासप्राप्तीचा. ॥ २५५ ॥ यालागीं ते नित्ययुक्त । म्हणूनि मज समत म्हणे भक्त । जे कळतां अव्यक्त । सगुण टाकिती, ते नित्ययुक्त म्हणूनी नाही बोलिले. ॥ २५६ ॥ दोघींत भली कोणती । म्हणूनी पुसतां दोघींचा पती । एकीस म्हणे पतिव्रता सती । तेव्हां दुसरी व्यभिचारिणी बोलला, न बोलतां. ॥२५७॥ दोघांत योगवित्तम । कोण ? म्हणे पांड-

वोत्तम । त्यांत भक्तांस सर्वोत्तम योगवित्तम । आणि मज समत म्हणतसे. ॥ २५८ ॥ यालागीं ते समत न म्हणे मातें । मज समत म्हणूनी म्हणे स्वभक्तातें । कीं त्या नित्यभक्तियुक्तांतें । सुगम मार्गत्याग घडलाच नाहीं. ॥ २५९ ॥ जैसे पूर्वी सगुणभक्त । तैसेच अद्वैत कळतांही भक्तीनें युक्त । म्हणूनी ते नित्ययुक्त । मज समत त्याहूनि कृष्ण म्हणे. ॥ २६० ॥ ज्या काळीं ज्ञान नव्हतें । त्याही काळीं सगुणप्रेम होतें । ज्ञान जालें त्या काळींही त्यातें । भक्ति सगुणीं. ॥ २६१ ॥ ऐसे सर्वकाळीं भक्तियुक्त । म्हणूनी सततयुक्त नित्ययुक्त । ते मज समत म्हणे भक्त । की सुगम पथ तिहीं न सोडिला. ॥ २६२ ॥ आतां तेही शाहाणे । जरी कष्टीं बहुतां योग बाणे । सगुणप्रसादेंचि योगसिद्धि, ऐसें नेणे । बुद्धि कां तयांची? ॥ २६३ ॥ आणि कळलिया निर्गुण । ते का टाकिती सगुण । आणि हे कोणे गोष्टीनें निपुण । कीं न सोडिती भक्ति सगुणाची. ॥ २६४ ॥ येथें शका ये रीती । म्हणूनि जाणे जगत्पती । म्हणोनि म्हणतो पार्थाप्रती । **'श्रद्धया परयोपेता'** म्हणोनी. ॥ २६५ ॥ अगा! **श्रद्धा** आस्तिक्यबुद्धी । की खरेचि सगुण भजतां योगसिद्धी । ज्यांस ऐशा आस्तिक्यबुद्धीची समृद्धी । ते न सोडिती भक्ति सगुणाची. ॥ २६६ ॥ ते निर्गुणोपासकही शहाणे बरे । स्वहिततत्परचि खरे । परंतु आत्मा कळतांचि भरे । आगीं वारे जाणिवेचे. ॥ २६७ ॥ ज्या गांवीं सुख अत्यत । तो दृष्टीं दिसों लागला निश्चित । परतु मार्गी आड पर्वत । वाट दाखविणार तेथें सोडिला. ॥ २६८ ॥ दृष्टीं गांव दिसतो नीट । आतां काय दाखवावी येणें वाट । म्हणोनि साधनाचे कडे अचाट । शरीरबळें वेघों आरंभिले. ॥ २६९ ॥ नदीची पैल थडी । दृष्टीं देखतां वाटते नदी थोडी । नांव सांडूनि टाकिली उडी । आवर्त्तशतप्रवाहांत[1]. ॥ २७० ॥ तैसें कळतांचि निर्गुण । आतां नलगे म्हणती सगुण । आपणातें मानूनि निपुण । करिती अभ्यास योगाचा. ॥ २७१ ॥ तों देव विघ्नें करिती । ते चित्त विषयीं भरिती । हे तोंतों प्रत्याहारादि[2] योगरीती । निर्गुणीं लाविती चित्तातें. ॥ २७२ ॥ आणि कष्टी बहुत होती । म्हणूनि म्हणेल श्रीपती । **'क्लेशोऽधिकतरस्तेषां'**[3] म्हणूनि ये रीती । श्रद्धा सगुणाची सोडितां. ॥ २७३ ॥ हे अनायासेंकरूनी । योगसिद्धि पावती यावरूनी । की प्राप्तिस्थान दृष्टीस देखोनी । न सोडिला

---

१. ज्यांत शेकडों भोंवरे आहेत अशा प्रवाहात. २. यम, नियम, आसन प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं योगाचीं आठ अंगें किंवा साधनें होत. प्रत्याहार=इंद्रियांची अंतर्मुखता, बाह्य वस्तूंवरून मन आटोपून त्याचा परमात्मविषयांत प्रवेश करणें. ३. पुढे श्लोक ५ पहा.

सगुण दाखवणार मार्गाचा. ॥ २७४ ॥ की ज्ञान जाले परी । योगसिद्धि जाली पाहिजे या उपरी । ते सगुणभक्तीनेंचि बरी । अनायासें साधेल. ॥ २७५ ॥ ऐसी श्रद्धा परम । ती करूनि युक्त ते भक्तोत्तम । म्हणूनि ते त्यांपरीस युक्ततम । आणि समत मजही याचिकरितां. ॥ २७६ ॥ आतां जे ते नित्ययुक्त । म्हणिजे पूर्वी आणि ज्ञान जालियाउपरिही भक्त । परि ज्ञान जालिया ते अनुरक्त । भजती ज्ञानदृष्टीकरूनी. ॥ २७७ ॥ पूर्वी मी साकार सगुण । त्या माते उगेचि ध्यात होते मनीं निपुण । परि त्या माझी ऐक्य-खूण । जाणत नव्हते तत्पूर्वी. ॥ २७८ ॥ आत्मा चित्स्वरूप कळला जयीं । त्यावीण कांही न स्फुरे हें कळले तयीं । मग मद्रूपीं ठायीं ठायीं । आपणातेचि पाहों लागती. ॥ २७९ ॥ आपला आत्मा अनत अपार । त्या चित्स्वरूपींच माझा कल्पूनि आकार । ध्याती त्यांचे मन निर्विकार । साकारीं निराकार पाहती. ॥ २८० ॥ तेव्हां मन तयांचे । प्रवेशले म्हणावे मजमाजी साचे । म्हणूनि लक्षण त्याच्या सगुणध्यानाचें । श्लोकाच्या आरभींच बोलतसे. ॥ २८१ ॥ **'मय्यावेश्य मनो'** म्हणोनी । म्हणे की मन मजमध्यें प्रवेश-वूनी । ध्याती कीं कनकप्रतिमा कनकेंचिकरूनी । स्फुरतसे. ॥ २८२ ॥ तें कनक तों आपण । त्या कनकें मनातें मनपण । तें मनचि त्या मूर्तीचे करच-रण । परि सकळचैतन्य कनक स्वआत्मा. ॥ २८३ ॥ आणि धरूनि ऐसीच खूण । विश्व मद्रूप पाहे निपुण । जें जें दिसे, तें तें ब्रह्म सगुण । अनुभवें पाहे ये रीती. ॥ २८४ ॥ पाहे ऐशा अनुभवें । मन प्रवेशलें त्याचि सदैवें । अलंकारीं सोनें पाहावें । दृष्टीं तेव्हां म्हणावी नगीं प्रवेशली. ॥ २८५ ॥ बाळ दृष्टीं देखे पट । परतु नेणेच कीं ततु आहे निपट । तंतु दृष्टीं दिसोनि स्पष्ट । ततुचि आहे हें न कळे. ॥ २८६ ॥ दृष्टि त्याची वरिच्या वरी । देखे म्हणावी मिथ्या पटाची कूसरी । ततु मात्र असे म्हणूनि पाहे तरी । दृष्टि पटीं प्रवेशली म्हणावी. ॥ २८७ ॥ पाहे कनकाची मूर्ती । आणि कनक न कळे, ज्याकरितां जिची स्फूर्ति । ते वरिच्या वरी मूर्तीचवर्ती । दृष्टि चा-ळिली म्हणावी. ॥ २८८ ॥ कनकाकडे पाहे । तेव्हां मूर्ति कनकमात्र होऊनि राहे । ते दृष्टि प्रवेशली म्हणणें साहे । मूर्तीमध्यें. ॥ २८९ ॥ तैसे भगव-ताचे अवतार । सकळ दृष्टीं देखती ते आकार । परि शुकादिकांच्या दृष्टीं निर्विकार । दिसे चैतन्यमात्र त्यांमाजी. ॥ २९० ॥ जे याप्रकारे दे-खती । त्यांच्याच म्हणाव्या प्रवेशल्या मती । जे आकारमात्र पाहाती । दृष्टि वरिच्या वरी तयांच्या. ॥ २९१ ॥ जयीं नव्हतें ज्ञान । तयीं वरिच्या वरी

घडत होतें ध्यान । ज्ञान गुरुमुखें पावतां, जालें समाधान । की कनकचि आहे आकार कनकाचा. ॥ २९२ ॥ तेव्हां अवतारमूर्ती । जगदुद्धारका ज्याच्या कीर्ति । आणि चराचर या समस्ताची स्फूर्ती । ज्या वस्तूनें, तेंचि हें वस्तु सर्व. ॥ २९३ ॥ मग प्रवेशवूनि मन । करिती भगवद्रूपाचें चिंतन । साकार तितके ते भक्तजन । निरंजन चिद्वस्तु पाहती. ॥ २९४ ॥ तेव्हां मन तयांचें । म्हणावें प्रवेशलें भगवद्रूपीं साचें । म्हणूनि प्रस्तुती त्यांच्या मान-साचें । भजन भगवंत बोलतो ऐसें या श्लोकीं. ॥ २९५ ॥ **'मय्यावेश्य मनो ये मां'** म्हणोनी । म्हणे की मन मजमध्यें प्रवेशवूनी । नित्ययुक्त उपासिती यावरूनी । निर्गुणानुभवें सगुणोपासना सूचविली. ॥ २९६ ॥ तरीच ज्ञानिया अव्यक्तोपासकांहीहुनी । हे भक्त अधिक योगवेत्ते म्हणोनी । भगवंत म्हणे अन्यथा अज्ञानी । ज्ञानियापरीस थोर म्हणणें विरुद्ध. ॥ २९७ ॥ येथें हेतु कल्पूनि काहीं । म्हणावें की या भक्तास आत्मज्ञान नाहीं । तरी अध्यायांती **यथोक्त**शब्दें हे सर्वही । स्वयें भगवंतेंचि निषेधिले. ॥ २९८ ॥ आणि सकळ उपनिषदाचा मथितार्थ । हें **गीता**शास्त्र अत्यंत समर्थ । येथें जें बोलणें, तें यथार्थ । तत्रापि या द्वादशीं **यथोक्त**शब्द. ॥ २९९ ॥ आणि हें **धर्म्यामृत** । म्हणूनी म्हणे भगवंत । की धर्मयुक्त हें अमृत । निर्धर्म निर्गुणामृत हें नव्हे. ॥ ३०० ॥ की सगुणोपासक ज्ञानी । थोर निर्गुणोपासकांहुनी । हा सिद्धांत या अध्यायेंकरूनी । केला म्हणूनी **'धर्म्यामृत'** हा अध्याय.॥३०१॥ **'ये तु धर्म्यामृतमिदं'** या श्लोकीं भगवंत । म्हणे यथोक्त हें धर्म्यामृत । कीं जैसें बोलिलों तैसाच सिद्धांत । अध्यायांत या. ॥ ३०२ ॥ या यथोक्ता धर्म्यामृतातें । जे उपासिती श्रद्धधान मातें । अतिप्रिय म्हणे की ज्ञानिया सगुणोपासकांतें । भक्तांतेंचि उपासना घडेल या सगुणामृताची. ॥ ३०३ ॥ जे सगुण टाकिती होतां ज्ञान । ते का होती या सधर्मामृतीं श्रद्धधान[१] । जे ज्ञानी सगुणभक्त तेचि समाधान । पावतील, ऐसें सूचवी. ॥ ३०४ ॥ एवंच अर्जुनें पुसिले प्रश्न दोन्ही । दोघेही आत्मयोग जाणती ज्ञानी । दोघांत कोणते अधिक योगवेत्ते[१] म्हणोनी । तरीच म्हणे. ॥ ३०५ ॥ आणि दोघेही आत्मयोगनिष्ठ । तरीच ज्ञानी सगुणभक्त त्याहूनि श्रेष्ठ । म्हणूनि भक्त युक्ततम आणि मज संमत म्हणे स्पष्ट । ज्या टीकेत हा अर्थ, तेच **यथार्थदीपिका.** ॥ ३०६ ॥ दोघां सहोदरांत अधिक बरा । एक म्हणतां, उणा त्याहूनि दुसरा । त्या न्यायें न्यून म्हणूनि पांडुकुमरा । सगुणभक्त युक्ततम म्हणोनि

---

१. पुढें श्लोक २० पहा.

सांगितलें. ॥ ३०७ ॥ **अर्जुनप्रश्नही** ऐसाच । कीं योगवित्तम म्हणजे अधिक योगवेत्ता कोण साच[१] । तैसाच **'श्रीभगवानुवाच'** । **'ते मे युक्ततमा मता'** म्हणोनी. ॥ ३०८ ॥ उगाच यांत कोण योगवेत्ता । म्हणूनी अधिक शब्दावांचूनी पुसता । तरी एक पक्ष योगाचा जाणता । एक नेणता हे घडतें. ॥३०९॥ दोघांत कोण चागला । म्हणता विदरेपण येतें दुजियाला । दोघात अधिक चांगला कोण ऐसें बोलिला । तेव्हा कोण उणा? कोण अधिक? हें पुसतो, म्हणावे. ॥ ३१० ॥ परतु चागले दोघेही जण । त्यांत एक न्यून, एक पूर्ण । पुसतो, म्हणूनी उत्तरही सुजाण । तदनुरूप बोलतो तयाचें. ॥ ३११ ॥ अयुक्त असते प्रश्नवचन । तरी वक्ता न देता अनुमोदन । युक्त प्रश्नाचे उत्तर सज्जन । अनुमोदन देऊनि बोलती. ॥ ३१२ ॥ प्रश्न हा **अर्जुनाचा** । **भगवते** अनुमोदिला साचा । म्हणूनी प्रश्नानुरूप स्ववाचा । **'ते मे युक्ततमा मता'** म्हणतसे. ॥ ३१३ ॥ उगाच युक्त भक्तातें म्हणता । तरी हाच पक्ष योगाचा जाणता । ऐसे होते, तेव्हा दुसरा पक्ष नेणता । होतें सिद्ध ये रीती. ॥ ३१४ ॥ युक्ततमा म्हणजे अधिक । योगवेत्ते सगुणोपासक । तेव्हां तेही जे नुसते निर्गुणोपासक । योगवेत्तेच हें सिद्ध जाले. ॥ ३१५ ॥ दुसरा पक्षही योग जाणे । परि सगुणोपासना टाकितां पडलें उणें । **'क्लेशोधिकतरस्तेषां'** तरीच म्हणे । निर्गुणोपासकासी. ॥ ३१६ ॥ एवच दोघेही ज्ञानी । दोघेही योगवेत्तेच म्हणोनी । त्यांत अधिक योगवेत्ते आणि जे संमत ते वर्णुनी । जे न्यून ते सांगतो या श्लोकापासूनि दो श्लोकीं. ॥ ३१७ ॥

> **ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
> **सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**
> **संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
> **ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

नव्हे क्षर म्हणिजे नव्हे नश्वर । तें म्हणावे **अक्षर** । क्षर जितका **मायां**शाचा पसर । त्यावेगळे अक्षर जे क्षर नव्हे. ॥ ३१८ ॥ जे प्रलयानतर । जेव्हां नसे कांहीं क्षर । तेव्हां उरतें अक्षर । प्रलयशेष जें **वेद** वर्णिती. ॥ ३१९ ॥ जें प्रलयशेष । तेंचि **माया** निषेधिता उरे आत्मत्वे अवशेष । म्हणूनि अक्षरशब्दापुढेचि **भगवद्वचनपीयूष** । अनिर्देश्य म्हणोनी. ॥ ३२० ॥

---

१. पुढें श्लोक ५ पहा.

आणि जें नुसतेंचि अक्षर । जे उपासिती सोडोनि सगुण ईश्वर । यांस नाहीं निर्गुण साक्षात्कार । म्हणूनी ज्ञणी कोणी बोलती. ॥ ३२१ ॥ कीं साक्षात्कारावांचूनी । उगेचि अक्षर निर्गुण आयकोनी । ते उपासिती म्हणोनी । कोणी ऐसें जरी बोले. ॥ ३२२ ॥ तरी अक्षराची उपासना । साक्षात्कारावांचूनि सर्वथा घडेना । म्हणूनि भगवत म्हणे अर्जुना । अनिर्देश्याते उपासिती ॥ ३२३ ॥ कीं सांगतां घटाचा प्रकार । श्रोता मनीं धरी ऐकोनि तो आकार । हे काशाहीसारिखें निराकार । सांगतां नये. ॥ ३२४ ॥ जें सांगतां येतें वचनीं । ते म्हणावें **निर्देश्य** म्हणोनी । जे न सांगवे शब्देंकरूनी । **अनिर्देश्य** त्यातें म्हणावे. ॥ ३२५ ॥ तैसें क्षरातीत अक्षर नुसतें । जरी सांगीतल्या आणि न देखतां कळत असतें । तरी सगुणमूर्तीसारिखे ठसावतें । मनीं साक्षात्कारावांचूनी. ॥ ३२६ ॥ म्हणूनी अक्षरा निर्गुणाची उपासना । साक्षात्कारावांचूनी बोलवेना । शाखाचद्रन्यायें अर्जुना । गुरुमुखे जाणूनि भजती, हा अर्थ. ॥ ३२७ ॥ कीं तें अनिर्देश्य साच । गुरूसही न सांगवे, अर्थ ऐसाच । परि शिष्याचा आत्माच । सर्व निषेधितां उरे तोची. ॥ ३२८ ॥ अनिर्देश्य अनिर्वाच्य परी । राहता पैरा पैश्यती मैध्यमा वैखरी । जरी अनुभवा नये ते तरी । अनिर्देश्य अनिर्वाच्यही कोण म्हणे? ॥ ३२९ ॥ एवच तें अक्षर आत्माच आपला । म्हणूनि सांगितल्याविणें सांगवे गुरूच्या बोला । कीं अनात्मभाग निषेधितां द्रष्टा उरला । तोचि तें अक्षर अनिर्देश्य. ॥ ३३० ॥ शाखा दावी वैखरी । तो बाळचंद्रचि उरला त्यावरी । तो दृष्टि चाळितां तदुपरी । चद्र देखे मागे टाकूनी शब्दातें. ॥ ३३१ ॥ एवंच अक्षर अनिर्देश्य ये रीती । साक्षात्कारेंचि उपासिती । त्या उपासनेतेंचि म्हणती । **निर्विकल्पयोग.** ॥३३२॥ बुद्धीस आत्मा कळे । परतु पूर्वसंस्कारे तेथूनि चळे । नीच भूमीस ढळे । उदक जैसें. ॥ ३३३ ॥ उदक उच्चस्थानीं । चढवावें उपायेंकरूनी । चढवितां तें न ढळे तेथूनी । **योग** म्हणजे उपाय ऐसे करावे. ॥ ३३४ ॥ म्हणूनि यम नियम । आसनजय प्राणायाम । योगरीती करूनी मनही ब्रह्म । होय, ऐसें करावें. ॥ ३३५ ॥ सगुणभक्तही येचि रीती । निर्विकल्पयोगातें अभ्यासिती । परतु सगुणभक्तीनें चित्तवृत्ती । तन्मय राहे प्रसादें सगुणाच्या. ॥ ३३६ ॥ ऐसे योगाचे क्लेश । भक्तांसही लागती लेश । तरीच म्हणे हृषीकेश । **'क्लेशोऽधिकतरस्तेषां'**[2]

१. परा=नाभिस्थानस्थित निर्विकल्प आठवरूप वाणी. पश्यती=हृदयस्थित भासरूप वाणी. मध्यमा=कंठस्थित मननरूप वाणी. वैखरी=प्रत्यक्ष शब्दरूप वाणी. २ पुढें श्लोक ५ पहा.

म्हणोनी. ॥ ३३७ ॥ कीं भक्त सगुणोपासक । ते योगवेत्ते म्हणे अधिक । आणि क्लेश अधिकतर म्हणे **श्री**वत्साक । निर्गुणोपासका. ॥ ३३८ ॥ अधिकतर म्हणे क्लेश । तेव्हां भक्तासही क्लेश परि, लेश । म्हणूनि त्यातें म्हणे **हृषी**केश । क्लेश अधिकतर म्हणोनी. ॥ ३३९ ॥ एवच भक्त योगवेत्तेच अधिक । त्यांस हा उपयोग की सगुणोपासक । अक्षरोपासकां हेचि उपास्य एक । म्हणूनि योगचि त्यांची उपासना. ॥ ३४० ॥ यास सगुणाची उपासना । म्हणूनि स्थिरता अधिक अनायासें यांच्या मना । म्हणूनि त्यांची जे उपासना ते म्हणे **अर्जुना** । योग याचा या भावे योगवित्तम हे, म्हणे.॥३४१॥ याकारणे अक्षर अव्यक्त उपासिती । म्हणूनि म्हणे **यो**गपती । एवच **अर्जुन**प्रश्न अनुमोदूनि त्याप्रती । उपासनारूपे निर्विकल्पयोग सागितला. ॥ ३४२ ॥ कीं एव सततयुक्त । जे तूतें उपासिती भक्त । आणि जे उपासिती अक्षर अव्यक्त । यात कोण अधिक योगवेत्ते? म्हणूनी अर्जुनप्रश्न. ॥ ३४३ ॥ त्यात अक्षर उपासना । ते अनिर्देश्याची उपासना अगा! **अर्जुना**! । जे व्यतिरेक आत्मसाक्षात्काराविना । उपासना करणे अशक्य. ॥ ३४४ ॥ हाचि निर्विकल्पयोग । आतां अव्यक्त उपासिती म्हणूनि **सविकल्पयोग** । ज्या योगीं चराचर जड नग । चित्सुवर्णचि अवघे. ॥ ३४५ ॥ **'ये चाप्यक्षरमव्यक्त'** म्हणूनि **अर्जुन** । प्रश्न करिता जाला, त्यासि अनुमोदन । देऊनि बोलतो **कंस**निषूदन । **'अव्यक्तं पर्युपासते'** म्हणोनी. ॥ ३४६ ॥ जैसा प्रपंच क्षर । म्हणूनि म्हणावे **ब्रह्म** अक्षर । तैसा प्रपच व्यक्त चराचर । तें तों नव्हे म्हणूनि **अव्यक्त** ते म्हणावे. ॥ ३४७ ॥ एव व्यक्ति देखोनि अव्यक्त तें ब्रह्म । म्हणावें जें व्यक्तीं अलंकारी जैसे हेम । व्यक्ति विषमा त्यांत अव्यक्त सम । अव्यक्तचि हेम जैसें सम नाना विषम अलकारी. ॥ ३४८ ॥ एवच दिसे व्यक्त । बरे पाहतां असे जशाचे तसेचि अव्यक्त । ऐसिया उपासनेकरूनि युक्त । हाचि योग सविकल्प. ॥ ३४९ ॥ की **अर्जुन** बोलोनि उपासना । दोघांत 'योगवित्तम कोण? म्हणे **क**मलनयना । त्यास भक्त युक्ततम म्हणिजे अधिक योगवेत्ते गा! **अर्जुना**!। ऐसें योग दावूनि उत्तरही दीधले. ॥ ३५० ॥ **उप** म्हणिजे समीप । असणे स्मरोनि चित्तें चित्स्वरूप । तेचि **उपासना** हेचि रूप । योग दोहींचे. ॥ ३५१ ॥ वृत्तीवेगळें चित्त स्थिर । लक्षी क्षरातीत अक्षर । जों वृत्तिशून्य चित्त तन्मय निरतर । निर्गुणसमाधियोग तोंचिपर्यंत. ॥ ३५२ ॥ तैसा प्रपच नानारूप व्यक्त । अवघा तरगवृंद चित्समुद्रचि अव्यक्त । जडीं जडत्व न स्फुरे ऐसें तोंपर्यंत युक्त । सविकल्पयोगें. ॥ ३५३ ॥

हेचि अव्यक्तोपासना । की व्यक्तींचें जडत्व वाटेना । जडपटीं चित्तंतूविना । न दिसे किमपिही. ॥ ३५४ ॥ **'अव्यक्तं पर्युपासते'** । या चरणे सविकल्पयोगाचे जाणते । ऐसें सूचवूनि हेचि भगवद्वाणी बोलते । **'सर्वत्रगमचिंत्यं च'** म्हणोनी. ॥ ३५५ ॥ **'अव्यक्तं पर्युपासते'** म्हणजे अव्यक्तातें । सर्वत्र उपासिती म्हणूनि **'पर्युपासते'** बोलिला पार्थातें । कीं ओळखिलें व्यतिरेकें ज्या अक्षराते । अन्वयें सर्वत्र सर्वव्यक्तींत अव्यक्ताते उपासिती. ॥ ३५६॥ त्याचेच विशदरूप । की सर्वत्र जे अचिंत्य चित्स्वरूप । चिंतायास योग्यरूपें त्यांत अरूप । चित्स्वरूप तें अचिंत्य. ॥ ३५७ ॥ की घटपटादि पदार्थ कल्पिले । ते म्हणावे मनी चिंतिले । परि ज्या चित्सत्तेनें कल्पूनि आठविले । तें न चिंतवे सर्वथा. ॥ ३५८ ॥ एवंच एकाग्र करूनि मन । श्रुत दृष्ट प्रपंचाचें चिंतन । करूनि, त्या प्रपंचीं अनंत सत्य ज्ञान । तें अचिंत्य सर्वत्र चिंतिलिया प्रपंचीं पाहती. ॥ ३५९ ॥ प्रपंच चिंतूनि चिंत्य । त्या जडा तरंगीं चित्सिंधु अचिंत्य । उपासिती आत्मत्वे स्वप्रकाश चैतन्य सत्य । असत्यचि त्यांत, अर्थ ऐसा. ॥ ३६० ॥ मन चिंतील घट । मन चिंतील पट । परी ज्या चित्सत्तेनें मन करी हे खटपट । तें चिंतू शकेना. ॥ ३६१ ॥ येथें अनुभवीं जनी । खूण पहावी आपल्या मनी । की सर्व चिंतन ज्या आत्मसत्तेकरूनी । चित्स्वरूप ते अचिंत्य. ॥ ३६२ ॥ **'सर्वत्रगं'** म्हणजे सर्वत्र गम्य ते । म्हणजे चित्सत्ता सर्वत्र जाणिजेते । सर्व चिंत्य परि आत्मसत्ता ते । न चिंतवे. ॥ ३६३ ॥ ते स्वरूप आत्मसाक्षात्कारे । सर्वत्र उपासिती बरे । हा सविकल्पयोग योगेश्वरे । सांगितला अव्यक्तोपासकांचा. ॥ ३६४ ॥ ते योगवेत्ते अधिक । आणि हेही योगवेत्ते निर्गुणोपासक । म्हणूनि उपासनारूपे शेषपर्यंक । योग सविकल्प बोलिला. ॥ ३६५ ॥ आतां अचिंत्य म्हणतां केले रूप । कीं चिंतवेना तें चित्स्वरूप । सर्वारूपीं अन्वयें जाणिजे ते अरूप । तें चैतन्य आत्मयोगियाचे. ॥ ३६६ ॥ ऐसा सिद्धांत जाला । परि येथें संदेह एक उपजला । की न चिंतवे चैतन्य तेव्हां त्याला । आत्मत्व सर्वांचें. ॥ ३६७ ॥ एक तो आत्मा चित्स्वरूप । दुसरे जड शरीर नानारूप । त्या रूपाचा जाणता अरूप । तोचि आत्मा. ॥ ३६८ ॥ त्यास भोक्ता म्हणती । येविषयीं प्रमाण श्रुती । आणि जडास भोग न घडे ये रीती । प्रत्यक्षही युक्तिसिद्ध. ॥ ३६९ ॥ आणि या श्रीगीतेंतही भगवद्वाणी बोलते । कीं **'पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते'** । आणि श्रुतीही ऐसेंचि म्हणते । कीं शरीर रथ, रथी आत्मा तो भोक्ता. ॥ ३७० ॥

**श्रुति—आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव च**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च।**
**इंद्रियाणि हयानाहुः विषयांस्तेषु गोचरान्**
**आत्मेंद्रियमनोयुक्तो भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥**

श्रुति म्हणे आत्मा रथी जाण। शरीररथ त्याकारणे होतो निर्माण। बुद्धि सारथि, जिच्या निश्चयें मन। वागोरे होउनि चाळी इंद्रियाश्वातें. ॥३७१॥ अश्व वाटा चालती। तैसीं इंद्रियें विषय घेती। ते विषय गोचर होती। त्या अश्वां इंद्रियातें. ॥३७२॥ आत्मा रथी रथाचा धनी। इंद्रिया मनासी मिळोनी। भोक्ता सर्वांचा म्हणोनी। बुद्धिमत म्हणती श्रुति म्हणे. ॥ ३७३ ॥ बुद्धिमत त्या आत्मयास भोक्ता म्हणती। म्हणुनि म्हणे श्रुती। की बुद्धिहीन अल्पमती। मना जडा म्हणती भोक्तृत्व. ॥ ३७४ ॥ आणि **'उत्क्रामंतं स्थितं वापि'**[1] या श्लोकीं। पंचदशी भगवतही बोलेल की। भोक्ता गुणीं युक्त त्यातें या लोकीं। न देखती मूढ आणि पाहती ज्ञाते ज्ञानदृष्टीने. ॥ ३७५ ॥ **'भुंजानं वा गुणान्वितं'** म्हणोनी। **'विमूढा नानुपश्यंति'** ऐसे स्ववचनीं। म्हणेल पंचदशीं याहीवरूनी। भोक्ता आत्माच, परि कैसा हे विरळ जाणती. ॥३७६॥ हें विशद होईल त्रयोदशीं। विशद त्याहूनि पंचदशीं। एवंच जडास भोक्तृत्व न घडे, कीं चिदंशी। भोक्तृत्व बोलावे. ॥ ३७७ ॥ तरी चित्स्वरूप तें ब्रह्म। यास भोक्तृत्व म्हणणें भ्रम। आणि चित्स्वरूप ते एकचि ऐसे निगम। प्रतिपदीं बोलती॥३७८॥ याचा निर्णय श्रुती। जळीं सूर्य तैसे चित्प्रतिबिंब बोलती। **'ममैवांशो'**[2] म्हणूनि श्रीपती। त्यातेंचि अंश आपला म्हणेल. ॥ ३७९ ॥ तो चिदंश या शरीरीं। भोग भोगितो नानापरी। सुषुप्तिकाळी प्रलयकाळीं मिळे अंतरीं। सर्वव्यापकाच्या. ॥ ३८० ॥ प्रस्तुती **अचिंत्य**पदेकरूनी। चित्स्वरूप सिद्ध जाले म्हणूनी। त्यास भोक्तृत्वही चिदंशीं यावरूनी। शंका येथें उपजली. ॥ ३८१ ॥ की जे तें अचिंत्य चैतन्य उपासिती। भोक्तृत्व सुखदुःखाचे त्यातेंचि बोलती। तेव्हां त्यास सर्वगतत्व कोणे रीती। सिद्ध होतें. ॥ ३८२ ॥ भोक्ता आणि सर्वगत। तेव्हां एकाच्या दुःखे सर्वां देहीं सर्वी व्हावें दुःखित। ऐसें संदेहाचे स्थळ भगवंत। सर्वज्ञ जाणे. ॥ ३८३ ॥ तें अचिंत्य आत्मा नव्हे म्हणावें। तेव्हां द्वैत अंगीकारावें। म्हणूनि **'कूटस्थमचलं ध्रुवं'** या तिहीं पदीं देवे। हा संदेह अवघा निरसिला. ॥ ३८४ ॥

---

१. पुढे अध्याय १५, श्लोक १० पहा. २. पुढे अध्याय १५, श्लोक ७ पहा.

कीं आत्मा होय चित्स्वरूप। त्याचेचि या देहीं द्विविध रूप। एक सर्वां रूपीं व्यापक अरूप। एक प्रतिदेहीं वेगळे. ॥ ३८५ ॥ सर्वां घटीं एक आकाश। परि घटजळीं प्रतिबिंबे दुजे अवकाश। तैसा सर्वत्र चिदात्मा अनंत स्वप्रकाश। सत्त्वजळीं प्रतिबिंबांश वेगळे. ॥ ३८६ ॥ एक सर्वां घटीं आकाश। परि घटीं त्यास म्हणती घटाकाश। तैसा प्रतिशरीरीं व्यापक स्वप्रकाश। **कूटस्थ** म्हणती प्रतिदेहीं तयातें. ॥ ३८७ ॥ आणि घटीं जळीं प्रतिबिंबला। प्रतिबिंबांश म्हणती त्याला। **'ममैवांशो जीवलोके'**[1] म्हणूनि ज्याला। पंचदशीं **भ**गवंत भोक्ता म्हणे. ॥ ३८८ ॥ प्रस्तुतीं सर्वगत चित्स्वरूप उपासिती। म्हणूनि म्हणे **श्री**पती। तो कूटस्थ म्हणतां उडती। संदेह भोक्तृत्वाचे तयाचे. ॥ ३८९ ॥ कीं कूटस्थ चैतन्य अचळ। न चळे, होतां देह चंचळ। घट हालतांही, निश्चळ। घटीं जैसा घटाकाश. ॥३९०॥ कीं घट हालतां हाले जळ। तैसें अंतःकरण देहयोगें होतां चंचळ। चिदंश प्रतिबिंब त्याचीच डळमळ। सुखदुःखभोगाची. ॥ ३९१ ॥ चंचळ नव्हे घटाकाश जैसा। सुखदुःख भोगवर्जित कूटस्थ तैसा। अनुभवी जाणती सिद्धांत ऐसा। **श्रु**ति, पुराणें, **गी**ता बोलती. ॥३९२॥ म्हणूनि **कूटस्थ**पदाउपरी। **अचळ**पद बोले **ह**री। कीं चित्प्रतिबिंबचि चळे, परी। कूटस्थ सर्वां देहीं अचळ हा. ॥ ३९३ ॥ प्रतिबिंब हाले हालतां जळ। चिदंश भोग भोगी होतां डळमळ। त्याच देहीं कूटस्थ आत्मा अचळ। भोगरहित जो, त्यातें उपासिती. ॥ ३९४ ॥ आणि सुषुप्तींत बिंबीं मिळे। भोगकाळीं चित्तीं चळे। जों अविद्योपाधि, तोंवरी मिसळे। पुनःपुन्हा प्रतिबिंबरूपें उपाधींत. ॥ ३९५ ॥ कूटस्थ नव्हे तैसा। तरी तो **अर्जु**ना! म्हणसील कैसा?। तरी सांगतों, तो ऐसा। कीं **ध्रु**व म्हणिजे शाश्वत. ॥ ३९६ ॥ उपाधि होतां निर्मळ। प्रतिबिंबात्मा होतो चंचळ। हा शाश्वतरूपें अचळ। ध्रुव म्हणावा यालागीं. ॥ ३९७ ॥ एवंच कूटस्थ, अचळ, ध्रुव,। या तिहीं पदीं **मा**धव। आत्मत्व साधूनि भोक्तृत्व नाहीं ऐसें अभिनव। चित्स्वरूप उपास्य वर्णिता जाला. ॥ ३९८ ॥ आतां वर्तती कोणे रीती। आणि काय करूनि योगस्थिती। जतन करिती आणि कोण गती पावती। हें बोलतो **श्री**पती या श्लोकें. ॥ ३९९ ॥

**संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः।**
**ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

इंद्रियांचा समुदाय जो ग्राम। त्याचा बरा करूनि नियम। सर्वत्र ज्याची

---

[1] पुढें अध्याय १५, श्लोक ७ पहा.

बुद्धि सम। सर्वभूतहितीं रत ऐसे वर्तती. ॥ ४०० ॥ ते मातेंचि पावती। जे सगुण सोडोनि मज निर्गुणातेंचि ध्याती। इतकींच वचनें बोले श्रीपती। आतां विशद अर्थ ये रीती या वचनाचा. ॥ ४०१ ॥ इंद्रियद्वारीं विषम। विश्व वाटे तो भ्रम। कीं कळलें जरी हेम सम। विसरतां, विषम अलंकार दिसती. ॥ ४०२ ॥ इंद्रियें इच्छिती विषम। विषयाकारें दिसे निर्विषय। तीं इंद्रियें नेमितां चिन्मय। विश्व वाटे बुद्धीतें. ॥ ४०३ ॥ ऐसीं इंद्रियें नेमिती। विश्व अवघें ब्रह्म ते ध्याती। आणि त्याच स्मृतीनें लोकीं वर्तती। सर्वभूतहितीं रत तेधवां. ॥ ४०४ ॥ ब्रह्म सर्वत्र सम। म्हणूनि शत्रुमित्र न वाटती विषम। ठसावतां हा भाव परम। सर्वभूतहितीं रत होती. ॥ ४०५ ॥ आतां त्याची गती। सागे की ते पावती मजचिप्रती। मी जो निर्गुण त्या मातें पावती। अर्थ ऐसा. ॥ ४०६ ॥ सोडोनियां सगुण। अक्षर अव्यक्त उपासिती तें मीच निर्गुण। ज्या रूपे भजावे त्याच रूपातें पावावें हे खूण। सूचवी येथें. ॥ ४०७ ॥ हा दों श्लोकी ये रीती। उपास्य उपासना उपासक आणि गती। अव्यक्तोपासकांची श्रीपती। बोलता जाला. ॥ ४०८ ॥ तों हें सर्वही सम। ऐसे असोनि भक्त युक्ततम। आणि मज संमत भक्त ते ऐसें पुरुषोत्तम। कोण्या विशेषे बोलिला[१] ॥ ४०९॥ ऐसा सशंक अर्जुन। होतां साक्षी जाणे मन। म्हणूनि विशेषत्व न्यूनत्व जगज्जीवन। दावूनि बोलतो या श्लोकीं. ॥ ४१० ॥

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्।**

अगा! त्या निर्गुणोपासकांचेंही सर्व बरें। निर्गुणातें मातेंचि पावती खरें। परतु सगुणाच्या अनादरें। क्लेश अधिकतर तयांला. ॥ ४११ ॥ क्लेश त्यांतें म्हणतां अधिकतर। या भक्तातें क्लेश न्यून सूचवी सर्वेश्वर। कीं त्यांची उपासना तेचि यांचा योग आणि ते तत्पर। देहीं अभ्यासीं योगाचिया. ॥ ४१२॥ भक्त बोले युक्ततम। आणि प्रश्नही ऐसा की कोण योगवित्तम[१]। तेव्हां दोघां यत्न दोघां सम। त्यांत अधिक क्लेश निर्गुणोपासकांतें ॥ ४१३ ॥ तेही उगेंच अधिक न म्हणे सर्वेश्वर। क्लेश त्यांतें म्हणे अधिकतर। तेव्हां भक्तांचे क्लेश अतिस्वल्प ऐसा सादर। भक्तांकडे भक्तवत्सल सूचवी. ॥ ४१४ ॥ म्हणोनि भक्तांतें भगवत। म्हणे कीं मज संमत। हे क्लेश पावती अत्यंत। संमत नव्हती यालागीं. ॥ ४१५ ॥ आणि निर्गुणोपासकांस। जरी बोलिल्याप्रमाणें घडे अभ्यास। तरीच अव्यक्तीं गति तयांस। शब्दज्ञानियांतें शब्दबडि-

---

१. आवरितां, आटोक्यात ठेविली असतां.

वार हेंचि सूचवी. ॥४१६॥ कीं भक्तांस सगुण प्रसाद । ईश्वर परिहरी त्यांचे प्रमाद । यांस अभ्यासें मोक्ष अथवा उगाच वाद । निर्गुणपक्षाची प्रतिष्ठा मात्र त्यायोगे. ॥ ४१७ ॥ आतां ते मातेंचि पावती । म्हणूनि म्हणे **श्री**पती । तेव्हां सगुण निर्गुण दोन्ही स्वयें ये रीती । स्वमुखे बोलतो. ॥ ४१८ ॥ तरी ते भक्ति करिती सगुणीं । आणि हे भक्ति करिती निर्गुणीं । दोन्हीं स्वयें **च**क्रपाणी । आणि विषमता मागुती दावितो. ॥ ४१९ ॥ भक्तांस याच्या प्रसादेचि करूनी । सुगम योगसिद्धि यावरूनी । सगुणत्वीं साभिमान म्हणोनी। सगुण भक्तां सुलभ शंका ऐसी. ॥ ४२० ॥ तरी या विषमतेचा परिहार । चतुर्थी वदला **दा**मोदर, । कीं जे जैसे मज भजती, मी तैसाच ईश्वर । पावतों त्यांतें. ॥ ४२१ ॥ **'ये[1] यथा मां प्रपद्यंते'** या श्लोके करूनी । **'तांस्तथैव भजाम्यहं'** म्हणोनी । जे जैसे भजती मी तैसा त्या रीतीकरूनी । पावतों ऐसें बोलिला॥४२२॥ म्हणोनि या श्लोकी । द्वितीय चरणीं ऐसें बोलिला कीं । अव्यक्ती आसक्त चित्त ज्यांचें या लोकीं । ते क्लेश अधिकतर पावतीच. ॥ ४२३ ॥ ज्यासि व्यक्ति नाहीं तें अव्यक्त । त्या अरूपीं चित्त त्यांचें आसक्त । ते अव्यक्तरूपीं भजतां मी सगुण व्यक्त । पावो कैसा तयांतें? ॥ ४२४ ॥ एका रूपें भजतां । अन्यरूपें नये फळ देतां । विषम भजती तेही विचारितां । मातेंचि भजती. ॥ ४२५ ॥ जो भजतो जया । तो भजतो मजचि सर्व जगन्मया । परि त्यारूपे तितकेंचि फळ तया । मी देतसें. ॥ ४२६ ॥ हे अनादि मर्यादा मोडे । तरी मज समासही विषमता घडे । जो लागला ज्या रूपाकडे । त्या रूपीं जे शक्ति तें फळ देतों मी तया. ॥ ४२७ ॥ सगुण भजतां सगुण फळ । निर्गुण भजतां तेंचि केवळ । देवतांतर भजतां जितकें बळ । फळ तितकेंचि त्या रूपे मीच देतों. ॥ ४२८ ॥ मीच निर्गुण, निर्धर्म । मीच सगुणही, सधर्म । मीच विश्व, विश्वाचें कर्म । जो ज्या रूपे भजे, त्यास त्या रूपें पावतों. ॥ ४२९ ॥ भक्तांवरी करावी करुणा । सगुणपणींच या खुणा । हें कांहींच न कळे मज निर्गुणा । त्या अव्यक्तीं आसक्त चित्त त्यांचें. ॥४३०॥ ते न लगे म्हणती सगुण । तों सगुणास होणें न लगे करुण । त्यांस पाहिजे निर्गुण । तों कृपाळुत्वगुण तेथें असेना. ॥ ४३१ ॥ एवच मनास निर्गुणध्यान । जों जों लागे अनुसंधान । तों तों योगयत्नेंकरूनि मन । उन्मन कांहीं कांहीं होतसे. ॥ ४३२ ॥ मन होतां चिदाकार । फिटे मनाचा जडत्वस्मरणसंस्कार । ऐसे यत्न करितां अपार । मुक्ति पावती भृगकी-

---

१. अध्याय ४, श्लोक ११ पहा.

टन्यायें अतिक्लेशें. ॥ ४३३ ॥ एवंच जें अव्यक्त । जेथें नसे वात्सल्यादि गुण व्यक्त । त्या अव्यक्तीं चित्त सप्रेम आसक्त । ते क्लेशी होती अधिकतर भक्तांहुनी. ॥ ४३४ ॥ भक्तही क्लेश करिती । परि भवसमुद्रीं माझी कांस धरिती । म्हणूनि ते स्वल्प यत्नेंचि तरती । हे अधिकतर क्लेशी होती स्वयें पोहतां. ॥ ४३५ ॥ मी सगुणत्वीं भजन त्यांचे जाणें । आणि निर्धर्म निर्गुणत्वीं नेणें । दया त्यांवरीही करूं म्हणे । परि न करीं विषमता झणी लागे म्हणूनी. ॥ ४३६ ॥ कीं ते सेवितां निर्गुणपणीं । मी कृपा करूं सगुणीं । तरी सकाम भजती त्रिगुणीं । निर्गुण कैवल्य फळही म्यां कां न द्यावे ? ॥ ४३७ ॥ जे मागती मुक्ती । त्यांस म्यां समर्थें कां न द्यावी मुक्ती ? । कीं निर्गुणीं ज्यास आसक्ती । त्यांस म्यां सगुणभक्ति फळ जरी द्यावें. ॥ ४३८ ॥ कीं जे जैसे भजती । म्यांही तैसेंच भजावें त्यांप्रती । हे कल्पवृक्षाची स्वभावरीती । समता माझियाचमध्यें. ॥ ४३९ ॥ एवच क्लेशी होती अधिकतर । ऐसें बोलोनि सर्वेश्वर । ते अव्यक्तासक्तचित्त म्हणूनि परिहार । भक्तपक्षपात विषमतेचा सूचवी. ॥ ४४० ॥ तरी त्यां अव्यक्त भजन । कां उपासकांस कठिण ? । कां स्थिर नव्हे मन ? । जरी म्हणेल कोणी. ॥ ४४१ ॥ प्रस्तुतीं अर्जुन । म्हणेल कां कठिण अव्यक्तभजन ? । म्हणूनी जगज्जीवन । हेतु सांगतो उत्तरार्द्धे. ॥ ४४२ ॥

उत्तरार्ध—**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

अगा ! ज्याची इच्छिती गती । ज्या स्वरूपाते उपासिती । तें अव्यक्त आणि जे भजती । हे देहवत. ॥ ४४३ ॥ यांचा अनादि सस्कार । कीं देह आत्मा आणि सत्य देहादि आकार । जे ऐसें त्याचें उपास्य निराकार । रात्रिचरादिवांधासि मैत्री सूर्याची. ॥ ४४४ ॥ आधारशक्ति नेणे पाणी । तरणें गुण नसे पाषाणीं । तैसी देहवंतातें म्हणे चक्रपाणी । अव्यक्तगति. ॥ ४४५ ॥ ज्यांस देह त्रिगुण । आत्मा वाटे आपण । त्यांस उपास्य निर्गुण । दुःख कैसें न पावती ? ॥ ४४६ ॥ उदकांमधील मासे । तप्तभूमींत सुख पावती कैसे ? । अव्यक्तगति दुःख ऐसें । देहवत देहीं पावती. ॥ ४४७ ॥ सरितांची नीच गती । त्या नेतां उगमाप्रती । दुःख कैसें न पावती । नेणार ते ? ॥ ४४८ ॥ अव्यक्तगति देहवत । पावती, परंतु दुःख अत्यत । ज्यांत सेव्य सगुण भगवत । तेच अनायासें पावती. ॥ ४४९ ॥ येथें कोण्ही निर्गुणाभिमानी । म्हणती देहवत म्हणिजे देहाभिमानी । ते दुःखें पावती जे निरभिमानी ज्ञानी । ते सुखचि पावती. ॥ ४५० ॥ अर्थ ये रीती । अल्पदृष्टी कोण्ही करिती । परि क्लेश अधिकतर म्हणे ज्यांप्रति श्रीपती । ते काय देहाभिमानी म्हणावे. ॥ ४५१ ॥

**'संनियम्यैंद्रियग्रामं'** या श्लोकेंकरूनी । **'सर्वत्र समबुद्धयः'** म्हणोनी [१] । आणि **'सर्वभूतहितेरता'** म्हणे यावरूनी । देहाभिमान कोठें याचा पाहावा ॥ ४५२ ॥ ज्यांस देहाभिमान । त्यांस सर्वत्र समबुद्धीचें कैचें ज्ञान । आणि **'सर्वभूतहितेरत'** ऐसे निरभिमान । क्लेश अधिकतर तैशांसही म्हणतसे. ॥ ४५३ ॥ ज्यांस पूर्वार्धी म्हणे क्लेश अधिकतर । तेचि अव्यक्तगति दुःखे पावती म्हणे सर्वेश्वर । देहवत म्हणे कीं अनादिकाळ शरीर । ज्यांस,ते निराकारीं दुःखें पावती. ॥ ४५४ ॥ जरी सर्वत्र समताज्ञान । जरी नाहीं देहाभिमान । तरी निराकारी देहवंताचें ध्यान । बहुतां कष्टीं बाणतें सगुण टाकितां. ॥ ४५५ ॥ अव्यक्तोपासकाचें मन । ध्यानीं न थारता करी विषयाचिंतन । तेव्हां तें करितां जतन । दुःख बहु फार पावती. ॥ ४५६ ॥ ज्ञानिया सगुणभक्ताचे मन । योगीं न थारतां आरंभिती श्रवण कीर्तन । निर्मळपणा पूर्वील होऊनि जतन । अधिक उन्मन होऊ लागे स्वरूपीं. ॥ ४५७ ॥ त्याचा सर्वेही योगक्षेम । मी वाहतों ऐसा नवमीं केला नेम । ज्ञानी होऊनि सगुणप्रेम । त्यांच्या योगसिद्धीचा भार तो वाहे. ॥ ४५८ ॥ हेंचि आतां कमलेक्षण । सांगोनि भक्तांचें योग-लक्षण । जे ऐसे भक्त नित्ययुक्त विचक्षण । त्यांस मी स्वयें उद्धरितों म्हणतो दों श्लोकी. ॥ ४५९ ॥

> **ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
> **अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**
> **तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
> **भवामि न चिरात्पार्थ ! मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

अगा ! जे भक्त मत्पर । ज्यांस मीच थोर वाटतों सगुण सर्वेश्वर । त्यांचा उद्धरणार अतिसत्वर । मृत्युससारसागरीं मी होतसें. ॥ ४६० ॥ ऐसा दों श्लोकांचा अन्वय । दाउनि नेत्रकरसंकेताभिनय । म्हणतो श्रीवत्सांकहृदय स-दय । कीं भक्तांचा तारक मी अतिसत्वर होतसें. ॥ ४६१ ॥ ऐसे जे मत्पर । त्यांचा उद्धरणार मी सर्वेश्वर । ऐसें म्हणोनि भक्तिज्ञानलक्षणें सादर । त्यांचीं क्रमेंचि प्रथमश्लोकीं सांगतसें. ॥ ४६२ ॥ कीं ते सर्व कर्मे । मज समर्पिती भागवतधर्मे । समर्पितां कर्मे होती अकर्मे । हें बहु स्थळीं पूर्वीं तुज बोलिलों हा भाव. ॥ ४६३ ॥ कीं **'यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र'** [२] । या श्लोकीं निर्णय बो-लिला कमलनेत्र । तो ऐसा कीं विष्णुसमर्पणावांचूनि कर्ममात्र । बंधक हो-

---

१. अध्याय ९, श्लोक २२ पहा. २. अध्याय ३, श्लोक ९ पहा.

तसे. ॥ ४६४ ॥ इत्यादि निर्णय तृतीयाध्यायांत । तैसाच चतुर्थी बोलिला **भगवंत** । की गतसंगमुक्त ज्ञानी स्थिरचित्त । त्याचेही **विष्णुप्रीत्यर्थ** कर्म लय पावतें. ॥ ४६५ ॥ **'गतसंगस्य मुक्तस्य'** या श्लोकीं । ऐसे चतुर्थीं **श्रीकृष्ण** बोलिला की । गतसंग मुक्त ज्ञानी स्थिरचित्त, याचेही या लोकीं । कर्म प्रकर्षे—विशेषें—लय पावतें. ॥ ४६६ ॥ **यज्ञ**नामका सगुणा **विष्णू**कारणें । ज्या ज्ञानिया भक्तांस कर्म आचरणे । त्यांचे कर्म वर्णिलें **जगद्वंद्य**चरणें । कीं प्रकर्षे-विशेषे—लय पावतें. ॥ ४६७ ॥ **'प्रविलीयते'** म्हणोनी । या पांचा अक्षरें-करूनी । या भक्तां ज्ञानियांचे कर्म प्रकर्षे—विशेषे सर्वांहुनी—लय पावतें ऐसें चतुर्थी बोलिला. ॥ ४६८ ॥ तो कैसा प्रकर्ष । आणि कैसा विशेष । हा प्रकार संक्षेपे अशेष । चतुर्थाध्यायटीकेत वर्णिला. ॥ ४६९ ॥ कीं, सगुण-भक्ति वर्जिती ज्ञानी । ते कर्में सगुणीं न अर्पुनी । आत्मा अकर्ता देखती, तेही कर्मेंकरूनी । अकर्त्ते होती. ॥ ४७० ॥ कर्म त्यांचेंही पावे लय । परि प्रकर्षें—उत्कर्षें—नाहीं म्हणूनि अव्यय । म्हणे कीं कर्म अर्पिती ज्ञानी सगुणप्रिय । तें प्रविलीयते उत्कर्षें—विशेषे—करूनि लय पावतें. ॥ ४७१ ॥ **'यज्ञार्थात्कर्मणो-न्यत्र'** । या श्लोकीं म्हणे **कमलनेत्र** । की **विष्णू**कारणें करणें कर्म तें एक मात्र । बध काहीं न करी. ॥ ४७२ ॥ अज्ञदशेत अर्पिलें कर्म । तें होणार जेव्हां अकर्म । ज्ञानियांचे तों **भागवतधर्म** । तें प्रकर्षें—विशेषें—लय पावेच कीं. ॥ ४७३ ॥ भक्त ऐकती, गाती **भगवद्गुण** । हें कर्माचे प्रकर्षण । आणि त्यांच्या संगतीनें जनातें श्रवण । घडे विशेष ये रीतीचा. ॥ ४७४ ॥ ते निर्गुण ध्याती । आणि सर्वत्रही ते पाहती । देहनिर्वाहकर्में करूनि राहती । मौन धरूनि अथवा निर्जनीं वास. ॥ ४७५ ॥ देहाचा अगत्य निर्वाह । परंतु तेथें नसे अहङ्कर्तृत्वप्रवाह । आत्मा अकर्ता पाहती, तो उत्साह । तेचि त्यांचा जाणती. ॥ ४७६ ॥ त्या कर्में अकर्त्तेच होती । परि प्रसन्न नव्हे **जगत्पती** । यांचीं कर्में अर्पितां लय पावती । आणि प्रसाद प्रतिपदीं **सर्वेश्वराचा**. ॥४७७॥ **'प्रविलीयते'** म्हणोनी । या भावें बोले हा अर्थ सूचवूनी । तें स्पष्ट या दों श्लोकेंकरूनी । या द्वादशीं बोलतसे. ॥ ४७८ ॥ **'ये तु सर्वाणि कर्माणि'** । **'मयि संन्यस्य मत्परा'** या श्लोके म्हणे **चक्रपाणी** । **'तेषामहं समुद्धर्ता'** म्हणोनी । दुसरिया श्लोकीं अन्वय. ॥ ४७९ ॥ चतुर्थाध्यायांत **'गतसंगस्य मुक्तस्य'** म्हणोनी । आणि **'ज्ञानावस्थितचेतसः'** ये रीती करूनी । ज्ञानी

---

१. अ० ४, श्लो० २३, पहा. २. अ० ३, श्लोक ९, पहा.

स्थितप्रज्ञ होउनी। **यज्ञ**नामका **विष्णू**कारणें कर्म करितो बोलिला. ॥ ४८० ॥ त्याच भक्तांचे विशद विवरण। या द्वादशीं हे **धर्म्यामृत**प्रकरण। **'ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य'** म्हणूनि कर्मार्पण। सागोनि आतां ज्ञानयोग त्यांचा बोलतो. ॥ ४८१ ॥ **'अनन्येनैव योगेन। मां ध्यायंत उपासते'** म्हणे **पद्म**नयन। की कर्मे मज समर्पूनि भक्तजन। अनन्ययोगेचि मातें ध्याती उपासिती. ॥ ४८२ ॥ ज्या द्विविधयोगींही नाहीं अन्य। तो द्विविधही अद्वैतयोग बोलावा **अनन्य**। जो अनुष्ठितां अव्यक्तोपासकही वर्णिले धन्य। त्याच अनन्ययोगे भक्त मातें ध्याती, उपासिती. ॥४८३॥ **'अनन्येनैव योगेन'** म्हणोनी। या **एव**शब्दे करूनी। जो अव्यक्तोपासनारूप योग बोलिला विवरूनी। त्याच अनन्ययोगे ध्याती उपासिती, हा अर्थ. ॥४८४॥ यांत सगुणरूप ध्याती। तें ध्यान, असतां, अनन्ययोगे उपासिती। अलकारे अलकृत होऊनि पाहती। अनन्य कनकातें, हा अर्थ. ॥ ४८५ ॥ द्विभुज, चतुर्भुज उपास्यरूप। आणि विश्व सर्व **भग**वत विश्वरूप। ऐसें ध्यात असतां चित्स्वरूप। सर्वत्र उपासिती प्रकाशक आकारां सर्वांचे. ॥ ४८६ ॥ सर्व कर्मे समर्पुनी। अनन्ययोगेचि करूनी। मातें ध्याती उपासिती म्हणोनी। बोले त्याचा हा अर्थ. ॥ ४८७ ॥ 'ध्यात असतां उपासिती'। ऐसे शब्द योजी **श्री**पती। सगुण ध्यात असतां पाहती। अनन्य चैतन्य, हा अर्थ. ॥ ४८८ ॥ की सगुण निर्गुणोपासक। यांत कोण योगवेत्ता अधिक। म्हणूनि **अर्जुन**प्रश्न त्यास **शे**षपर्यंक। 'अधिक योगवेत्ते भक्त' म्हणे. ॥ ४८९ ॥ परतु निर्गुणोपासकां जनां। उपास्य नसे निर्गुणाविना। म्हणूनि त्यांचा योगचि उपासना। तो अनन्ययोग उपासनारूपे वर्णिला. ॥ ४९० ॥ त्याच योगें भक्तजन। सगुणही ध्याती म्हणूनि **शे**षशयन। म्हणे या श्लोकी **'अनन्येनैव योगेन। मां ध्यायंत उपासते'** म्हणोनी. ॥ ४९१ ॥ अनन्ययोग मागे बोलिला। त्याच अनन्ययोगे मजला। ध्यात असतां उपासिती म्हणूनि सिद्ध केला। **एव**शब्दें तोचि योग. ॥ ४९२ ॥ एक ज्ञानयोगी आणि भक्त। दुसरे ज्ञानयोगी उपासिती नुसतें अव्यक्त। यांत कोण योगवेत्ते अधिक ? या प्रश्नास युक्त। उत्तरही दोघांचिया योगवेत्तेपणाचेचि. ॥ ४९३ ॥ तरीच ज्ञानी अव्यक्तोपासक। त्याहूनि भक्त बोलिले अधिक। ऐसें असोनिही निर्गुणवादाभिमानी लोक। कोणी येथें अन्यथा बोलती. ॥ ४९४ ॥ की **विष्णू**वांचूनि देव अन्य। न भजती त्या योगातें म्हणती अनन्य। ऐसें म्हणती कीं यांस ज्ञानी म्हणतां करावें लागतें मान्य। सगुणभजन ज्ञानियांतें. ॥ ४९५ ॥ जरी तो अनन्ययोग बोलिला असता। तरी अनन्ययोगचि नुसता म्हणता।

**एव**शब्दावांचूनिही गवसता । तो अर्थ. ॥ ४९६ ॥ दों पक्षांत एकास । अनन्ययोगरूपे उपासना वदे **श्री**निवास । ते अनन्ययोगेचि ध्याती उपासिती म्हणूनि यांस । **एव**शब्दे तोचि योग आहे ऐसे बोलिला. ॥ ४९७ ॥ प्रश्नांतही कोण योगवित्तम । उत्तरांतही भक्त युक्ततम । आणि त्याहूनि भक्त संमत म्हणे **पुरु**षोत्तम । हे इतके अर्थही झांकिती. ॥ ४९८ ॥ आणि ज्यांस **भग**वत म्हणे ज्येष्ठ । हे त्यांस म्हणती कनिष्ठ । एवच अधिक योगवेत्ते संमत ऐसे श्रेष्ठ । भक्त हे ज्ञानीच म्हणोनी. ॥ ४९९ ॥ ऐसा सर्वत्र विरुद्धार्थ । क्लिष्टकल्पनेनें साधिला तरी व्यर्थ । कोंडा कांडिला तरी न होती पदार्थ । मांडे गुळवऱ्या, तेलवऱ्या. ॥ ५०० ॥ असो ऐसा श्लोकार्थ जाला । यांत **मत्परा** म्हणूनि शब्द राहिला । सर्व कर्मे समर्पूनि मजला । ध्याती उपासिती ते **मत्पर** म्हणे **भग**वत. ॥ ५०१ ॥ श्लोकार्थ संपों आला । मत्परा म्हणूनी या शब्दाचा अर्थ नाहीं जाला । शब्दार्थ मात्र जरी बोलिला । तरी विशद अर्थी गोडी बहु असे. ॥ ५०२ ॥ की मातें कर्मे समर्पिती । आणि सगुणत्वे मातेंचि ध्याती, उपासिती । सगुणब्रह्म आणिका दैवतातें न मानिती । मत्पर ते म्हणूनि, हा अर्थ. ॥ ५०३ ॥ ज्यांस मीच पर । म्हणजे मीच एक **सर्वे**श्वर । ऐसें परत्व माझे जाणती ते मत्पर । जें विशद सप्तमीं, अष्टमीं, नवमीं, दशमीं, एकादशीं. ॥ ५०४ ॥ कीं **ब्र**ह्मादि सर्वेही कार्य । कारण सर्वांचें मीच एक सुरवर्य । म्हणूनि आपलें स्वतंत्र सर्वोत्कृष्ट ऐश्वर्य । **अर्जु**नाप्रति सांगितलें. ॥ ५०५ ॥ **अर्जु**नेंही ऐकिलें । तों त्यास **व्या**सादिकांचे बोलणे आठवले । दशमीं तें अनुवादरूपें बोलिलें । **अर्जु**नेंही. ॥ ५०६ ॥ '[1]**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्**' या श्लोकापासुनी । '[2]**आहुस्त्वामृषयः सर्वे**' या श्लोकेकरूनी । '**देवर्षिर्नारदस्तथा असितो देवलो व्यासः**' म्हणोनी । **सर्वे**श्वर तूं एक सर्व म्हणती, म्हणे **अर्जु**न. ॥ ५०७ ॥ कीं **वे**दांचा अर्थ जाणे । तो **वेद**व्यास आणि **ना**रदादिक शाहणे । हे सगुणब्रह्म एक तूतेंचि नेमूनि म्हणती, म्हणे । आणि म्हणे '**स्वयं चैव ब्रवीषि मे.**' ॥ ५०८ ॥ कीं स्वयें तू बोलसी जे रीती । **वे**दार्थवेत्ते ऐसेंचि म्हणती । एवच तूचि एक **ज**गत्पती । ऐसें दशमीं **अर्जु**न म्हणे. ॥ ५०९ ॥ आणि विश्वरूपीं **दे**वाप्रती । **अर्जुन** जेव्हां करी विनती । तेव्हां म्हणे **सु**भद्रापती । '[3]**गरीयसे ब्रह्मणोप्यादिकर्त्रे**' ॥ ५१० ॥ एव **ब्र**ह्मादिक कार्येंचि सकळ । त्यांचा कर्ता कारण रमा-

---

१. अ० १०, श्लो०१२ पहा. २. अ०१०, श्लोक १३पहा. ३. अ० ११, श्लो० ३७ पहा.

कांत केवळ । सगुणपणींही जो कारण सर्वांचें मूळ । कारण अलंकाराचें कनक जैसें. ॥ ५११ ॥ अलंकार आणि सुवर्ण । जरी दोहींस नाहीं भिन्नपण । तथापि सुवर्ण कारण । कार्य सर्वेही अलंकार. ॥ ५१२ ॥ त्या सुवर्णाचेही भेद दोनी । एक सगुण, एक निर्गुण म्हणोनी । आकार तितकी माया यावरूनी । लाटा, खुरा, ही मायाच आकारही सुवर्णाचे. ॥ ५१३ ॥ दिसोनिही जे नाही । ऐसे असेल जे काहीं । माया म्हणूनि तेंही । नांव पावे. ॥ ५१४ ॥ सोनें सर्वथा असे । नग नसोनि दिसे । एवंच जितका आकार तितकी मायाच गवसे । निखळ सुवर्ण तेव्हां निर्गुण. ॥ ५१५ ॥ लाटा खुराही आकार । परि त्यास कोण्ही न म्हणती अलंकार । की त्या लाटियापासूनि होती सर्वेही प्रकार । तैसें सगुण ब्रह्म कारणच, कार्य म्हणवेना. ॥ ५१६ ॥ कीं कार्यदशेस नाही पावलें । आणि लाटा, खुरा, कांहीं एक रूप देखिलें । त्याहीवेगळें सोनें प्रत्यया आले । ऐसें घडेना. ॥ ५१७ ॥ परंतु कारणांत आणि कार्यांतही । तेंचि, जें कांहींएका आकारांवाचूनि दिसत नाहीं । तेही कारण आणि लांब, वर्तुळ, चतुष्कोण कांहीं । ज्याचे अलंकार नाही जाले तेंही कारण. ॥ ५१८ ॥ एवंच मायांशविना । निर्गुणब्रह्म प्रतीतीस येईना । जैसा अग्नि काष्ठ, गोंवरी, लोह, कांशा एकाविना दिसेना । जें ऐसें तेंही ब्रह्म कारण सर्वांचें. ॥ ५१९ ॥ तैसेंचि सुवर्ण । जें न दिसे कांहींएका आकारावीण । परंतु अलंकार कार्य नव्हतां कांहींएक खूण । तेंही लाटा, खुरा, इत्यादि कारण म्हणावें. ॥ ५२० ॥ दृष्टांतास प्रमाण । प्रत्यक्ष व्यवहार तेव्हां सुवर्ण । लाटा, खुरा, इत्यादि रूपे तें भूषण । न म्हणती कोण्ही. ॥ ५२१ ॥ हेंही असो जगत्कारण । श्रुति म्हणती ब्रह्म सगुण । प्रथम ज्यापासूनि जाला निर्माण । ब्रह्मा आणि देव सर्व. ॥ ५२२ ॥ हा निर्णय दशमीं । स्वयें बोलिला स्वामी । ऐसें परत्व समजोनि, ज्यांस मी । थोर वाटतो ते मत्पर येथें म्हणतसे. ॥ ५२३ ॥ कीं जे ऐसे मत्पर । ज्यांस मीच थोर सर्वेश्वर । ते मज सर्वं कर्में समर्पूनि सादर । अनन्ययोगेंचि ध्याती, उपासिती. ॥ ५२४ ॥ ऐसा सगुण मी श्रीपती । त्या मातें ऐसें आत्मत्वें उपासिती । ज्या सगुणत्वीं व्यक्त दिसती । गुण भक्तवात्सल्यादिक. ॥ ५२५ ॥ मीच ज्यांस थोर । मी कृपामेघ, ते कृपापात्र मयूर । मी कृपाचंद्र, ते कृपापात्र चकोर । संबंध मज त्यांसी ऐसा. ॥ ५२६ ॥ मग मी त्यांचा उद्धर्ता । मृत्युसंसारसागरीं होतों जगद्धर्ता ।

---

१. लगड, पत्रा इत्यादि.

स्वप्नीही मृत्युसंसारवार्ता । पडों नेदी कानीं तयाच्या. ॥ ५२७ ॥ मृत्यु मरणातें म्हणती । संसारीं पुनःपुन्हा उत्पत्ती । या दोहींतें म्हणे **श्री**पती । समुद्र म्हणोनी. ॥ ५२८ ॥ त्या समुद्रापासुनी । अतिस्वल्पकाळेंचिकरूनी । त्याचा उद्धर्ता मी होतों म्हणोनी । योगसिद्धि अनायासें देतों, हें सूचवी. ॥ ५२९ ॥ की जन्म आणि मरण । दोन्ही मिळोनि दुःखाचे रूप दारुण । दुःख तोंवरी, जों स्फुरण । द्वैता अविद्यारचिताचें. ॥ ५३० ॥ हा विचार **सामवेदीं** । **सन**त्कुमार **नारदसंवादो**पनिषदीं । मस्तक ठेवूनि पदीं । **नारद** पुसे **सन**त्कुमारातें. ॥ ५३१ ॥ की शोकाच्या पैलपारा । मज तारूनि नेई गुरुवरा ! । ऐसें पुसतां **सन**त्कुमारा । तो म्हणे सुखाची जिज्ञासा करावी. ॥ ५३२ ॥ **नारद** म्हणे सुखा तया । तुजपासूनि जाणों इच्छितों गुरुराया ! । तो म्हणे **भूमा** म्हणावें जया । तो भूमा म्हणिजे अतरहित सुख ते. ॥ ५३३ ॥ **नार**द म्हणे गुरूत्तमा ! । तुजपासूनि जाणो इच्छितो तोचि भूमा । **कु**मार बोले अनत वस्तु ज्यास नसे सीमा । तेचि व्हावे, तरी कळे भूमा तो. ॥ ५३४ ॥ ऐसें म्हणे **सन**त्कुमार । जेथें अनन्य पाहे तो अनत अपार । अनन्य ऐके, अनन्य जाणे, तदाकार । बुद्धि होणें, तो **भूमा श्रु**ति म्हणे. ॥ ५३५ ॥

**श्रुति—यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा**

**श्रु**त्यर्थ ॥ हे ऐसें म्हणे श्रुति । की जेथें नुरे अन्यत्वप्रतीती । ऐशा अनुभवातें म्हणती । जो भूमा त्याचें जाणणे. ॥ ५३६ ॥ कीं भूमा जाणों इच्छितो । म्हणोनि प्रश्न **नार**द करितो । **सन**त्कुमार उत्तर देतो । कीं तो भूमा म्हणोनी. ॥५३७॥ की जेथें अन्य त्यावीण न पाहे । अन्य ऐकणें, अन्य जाणणें जेथें न साहे । एक चित्त तन्मय होउनि राहे । जें जाणणे भूमा म्हणिजे अंत नाहीं तयातें. ॥ ५३८ ॥ जों ऐसी नव्हे प्रतीती । तोंवरी अन्य दिसती अन्य ऐकों येती । जेथें अन्य त्यास अल्प म्हणती । **अल्प** म्हणिजे अतवंत. ॥ ५३९ ॥ ज्यास दिसे अत । तें अल्प अतवत । जे अल्प तेंचि निश्चित । **मर्त्य** म्हणिजे मरणधर्मयुक्त **श्रु**ति म्हणे. ॥ ५४० ॥

**श्रुति—अथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पम् । यो वै भूमा तदमृतं अथ यदल्पं तन्मर्त्यम्॥**

**श्रु**त्यर्थ ॥ **श्रु**ति म्हणे जेथें अन्य पाहतो । जेथें अन्य ऐकतो, जाणतो । ऐसा अन्यत्वप्रत्यय येतो । तेथें अल्पत्व, परिमितत्व जेथें. ॥ ५४१ ॥ त्यास म्हणावें अल्प । की ज्यास परिमितत्व तेंचि स्वल्प । ज्यास परिमितत्व

नाहीं ऐसा अनल्प । तोचि भूमा. ॥ ५४२ ॥ म्हणोनि जो भूमा तें अ-मृत । जें अल्प तें **मर्त्य** निश्चित । मर्त्य म्हणिजे मरणधर्में बाधित । एवंच मरण ज्यास, जन्मही त्यास. ॥ ५४३ ॥ या **श्रु**तीवरूनी । जड प्रपंच अल्प म्हणूनि । तोचि मरणधर्मेंकरूनी । अत्यंत नश्वर. ॥५४४॥ नाश आणि उत्पत्ती। पुनःपुन्हा प्रपंचातेंचि दिसती । तोचि मृत्युसंसारसागर, ज्यांत बुडती । जीव-गण वासनापाषाण बांधोनी. ॥ ५४५ ॥ जो प्रपंच ये रीतीचा । तोचि मृत्यु संसारसागर साचा । त्यापासूनि उद्धर्ता मी होतों साचा । **भ**गवंत बोले. ॥ ५४६ ॥ तरी तो प्रपंचचि नसे । जेव्हां **भ**गवद्रूप योगरीतीं दिसे । तेव्हांच त्यास गवसे । पैल पार मृत्युसंसारसिंधूचा. ॥ ५४७ ॥ प्रस्तुतीं प्रश्नही योग-वेत्ते जे उभय पक्ष, त्यांचा । योगवेत्तेच अधिक भक्त म्हणे **दे**ववाचा । या-लागीं अर्थ हाचि साचा । कीं योगसिद्धि देणेंचि उद्धरणें. ॥ ५४८ ॥ जन्म-मृत्युसमुद्रापासूनी । सत्वरचि तारितों म्हणे कीं योगेंकरूनी । मृत्युसंसारप्रपंच नाहींच म्हणोनी । योग ऐसा भक्तांस बिंबवितों. ॥ ५४९ ॥ ते स्वसाधन-बाहुबळें । तरती मृत्युसंसारसिंधूचीं ऊर्मिकुळें । हे तरती अनायासें, योगसिद्धि-फळें । पावती मत्प्रसादें, अर्थ हा. ॥ ५५० ॥ म्हणूनि त्यांस क्लेश । अधिकतर, आणि भक्तांस लेश । ऐसा **श्री**हृषीकेश । या श्लोकीं बोलिला. ॥ ५५१ ॥ भक्तांस उद्धरावया अतिकाळ । न लावीं म्हणे **गो**पाळ । कीं सगुणपणीं करु-णाशीळ । ऐसाच मी. ॥ ५५२ ॥ सगुणत्वीं दयाळु मी **भ**गवंत । त्या मज-माजी प्रवेशविलें तिहीं चित्त । म्हणूनि मी विलंब न करितां, अत्यंत । शीघ्र त्या भक्तांतें उद्धरितों. ॥ ५५३ ॥ उद्धर्ता नव्हे तयांचा । म्हणूनि अधिक क्लेश बोले स्ववाचा । आणि उद्धर्ता होतो म्हणे भक्तांचा । हें वैषम्य उभयत्रही परिहरी. ॥ ५५४ ॥ त्यांस म्हणे **'अव्यक्तासक्तचेतसां'** । यांस म्हणे **'म-य्यावेशितचेतसां'** । एवंच आपण न पडे वैषम्यफांसां । दिसोनि वैषम्य, सम आपण ऐसें सूचवी. ॥ ५५५ ॥ कीं भक्त उद्धरावे, हे खूण । नेणे निर्धर्म निर्गुण । सगुणीं वात्सल्यादि गुण । त्या मजमाजि चित्त प्रवेशलें ज्यांचे. ॥ ५५६ ॥ म्हणूनि **'तेषामहं समुद्धर्ता'** । ये रीती म्हणे **वि**श्वभर्ता । कीं ते **'मय्यावेशितचित्त'** यालागीं वार्ता । मज नसे विषमत्वाची हें सूचवी. ॥ ५५७ ॥ आणि चित्ताचा प्रवेश । मज सगुणीं म्हणे हृषीकेश । या प्रवे-शाची रीतिलेश । **'मय्यावेश्य मनो ये मां'** या श्लोकीं वर्णिली. ॥ ५५८ ॥ कीं कारणदृष्टि कार्य पाहे । दृष्टि त्याची प्रवेशली म्हणावी आहे । पटीं दृष्टि प्रवेशली म्हणणें न साहे । तंतुदृष्टी पटमिथ्यात्व जो न देखे. ॥ ५५९ ॥ कार्य

पाहतां कारणातें जाणे । त्यास बरे पाहणें म्हणती शाहणे । हें **यो**गवासिष्ठीं **व**सिष्ठ म्हणे । ऐसें बरे पाहणे तें ज्ञान.॥ ५६० ॥

**यो**गवासिष्ठश्लोक—**द्वौ क्रमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव! ।
योगो वृत्तिनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥**

या श्लोकाचा अर्थ विशद । याच अध्यायांत होईल प्रतिपद । उपयोग इतकाच सांप्रद । कीं बरे पाहणे तें ज्ञान. ॥ ५६१ ॥ तरी जों न पाहे बरे । न दिसे कार्यात कारण खरें । तोंवरी दृष्टि प्रवेशली नाहीं, ऐसें विचारे । सिद्ध जालें. ॥ ५६२ ॥ एवच ते अव्यक्तासक्त । परि कृपाधर्मवर्जित अव्यक्त । मी सगुण करुणायुक्त । भक्तआवेशितचित्त ऐसिया मजमध्यें. ॥ ५६३ ॥ म्हणूनि करुणाप्रभावें । मी कल्पवृक्ष स्वभावे । भक्तास तारितो या भावें । ते **'अव्यक्तासक्त'** हे **'मय्यावेशितचित्त'** म्हणतसे. ॥ ५६४ ॥ परि तो प्रवेश ऐसा चित्ताचा । की सगुणीं अनुभव आत्मतेचा । तरीच अनन्ययोगे ध्याती म्हणे **दे**ववाचा । तरीच युक्ततम संमत भक्त त्यांपरिस. ॥ ५६५ ॥ आतां कोणी म्हणतील कीं, जरी । भक्त हे ज्ञानी म्हणतां, तरी । ते ज्ञानें उद्धरलेच त्यातें हरी । उद्धर्त्ता होतो म्हणतो, तेव्हां ज्ञान नाहींच म्हणावे. ॥ ५६६ ॥ जे ऐसें म्हणती । त्यांस पुसावे की क्लेश अधिकतर कां होती । जे आत्मसाक्षात्कारे उपासिती । अनिर्देश्यातें. ॥ ५६७ ॥ एवच ज्ञान जालियावरी । योगसिद्धीविना मोक्ष सिद्ध होतो जरी । ते क्लेशी नव्हते कदापि तरी । हे तो क्लेशी नव्हती योग बिबतां प्रसादें **भ**गवताच्या. ॥ ५६८ ॥ असो, आता मजमाजि चित्त । भक्तांचें प्रवेशले म्हणे **अ**च्युत । कीं जडाभासा विश्वरूपा मज निश्चित । चित्स्वरूपे पाहती. ॥ ५६९ ॥ ऐसेच माझे दिव्यलीलादेह । चित्स्वरूपचि निःसंदेह । म्हणोनियां निश्चयें धरिती स्नेह । सगुणावताररूपाचा. ॥ ५७० ॥ मन कल्पी आकार । तें सर्वेही जें निराकार । तेंचि म्हणूनि निर्धार । आणि साक्षात्कार बुद्धीस ज्यांच्या. ॥ ५७१ ॥ दृष्टीं दिसे गार कठीण । रसना म्हणे हें अवघे मृदु जीवन । तैसें मन आकार कल्पी, परतु **ज्ञा**नघन । ब्रह्मचि म्हणे बुद्धि त्यांची. ॥ ५७२ ॥ म्हणतां त्यांचें चित्त प्रवेशलें । प्रमेय ऐसें सूचविलें । परि निर्गुणवादी या बोलें । क्षोभती कांहीं. ॥ ५७३ ॥ की ऐसें चित्त प्रवेशलें । ते उद्धरलेच, त्यांस सगुणें काय केलें । म्हणूनि येथें ऐशा बोलें । हें ऐसें नव्हे म्हणती. ॥ ५७४ ॥ तरी अव्यक्तोपासक चित्त । प्रवेशविती चित्स्वरूपीं, हें तों निश्चित । तथापि क्लेश अधिकतर त्यांला म्हणे **अ**च्युत । ते यांस नव्हती

प्रसादे सगुणाच्या. ॥ ५७५ ॥ प्रवेशविल्या उपरी । न धारतां यत्ने कष्टती भारी । सगुणभक्तांचें चित्त हरी । स्थिर सत्वर करितो हा विशेष. ॥ ५७६ ॥ एवच मजमाजि चित्त प्रवेशविलें त्यांचा । मी उद्धरणार ऐसा साचा । कीं क्लेशी होणें न लगे स्थिरत्वाचा । उपाय करितां. ॥ ५७७ ॥ ऐसे सगुणातें भजती । विश्वरूपे उपासिती । चित्त चित्स्वरूपीं प्रवेशविती । त्यांचा उद्धर्ता मी होतसें ॥५७८॥ ऐसा अर्थ भावार्थ । विशद समजला पार्थ । तों देव म्हणे कृतार्थ । तूही होय ऐसाचि म्हणोनी या श्लोकीं. ॥ ५७९ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**

**अर्जुना** ज्ञानाचें फळ । हें कीं तदनुरूप आचरण होय विमळ । या भावें म्हणे **गो**पाळ । की तूही माझे ठायींच मन ठेवीं. ॥ ५८० ॥ आणि बुद्धीचा प्रवेश । मजमाजि करीं म्हणे हृषीकेश । मन बुद्धि यांस भेद दावूनि लेश । त्या वृत्तिभेदीं सूचवी तत्वार्थ. ॥ ५८१ ॥ आकाराचें चिंतन । तें म्हणावे कल्पनात्मक **मन** । जे कल्पिले, त्याच्या निश्चयपर्यंत जीस गमन । **बुद्धि** म्हणावी ते वृत्ती. ॥ ५८२ ॥ शुंडा, पुच्छ, दंत, पद, इत्यादि रचना । स्फुरे ते मनाची कल्पना । तो गज म्हणूनी निश्चय वाटे जना । हे बुद्धी. ॥ ५८३ ॥ तो गज सुवर्णाचा कल्पी मन । त्यांत कल्पना हे मनपण । तो सुवर्णगज इतकी ही निश्चयाची खूण । बुद्धीस म्हणावी. ॥ ५८४ ॥ तो गज म्हणोनि ऐसें बुद्धि जाणे । परि गज नाहीं सोनेंचि आहे ऐसें नेणे । ऐसें बुद्धीचें पाहणें त्यास शाहणे । बरें पाहणें न म्हणती. ॥ ५८५ ॥ सुवर्णगजास बाह्यांतर । अवघे सोनेंचि निरंतर । दिसे तें मिथ्या गजशरीर । हें बरे जाणणे बुद्धीचे. ॥ ५८६ ॥ ऐसें बरें पाहों जाणे । ते बुद्धि त्या रूपी प्रवेशली म्हणती शाहणे । या भावें श्री-कृष्ण म्हणे । **'मयि बुद्धिं निवेशय'** म्हणोनी. ॥५८७॥ मजमाजी ठेवीं मन । ऐसें म्हणोनि मागुती म्हणे जगज्जीवन । कीं बुद्धि मजमाजी घालीं हें वचन । गहन अर्थातें सूचवी. ॥ ५८८ ॥ घडली सगुणाची उपासना । सगुणीं लावितां मना । ऐसें असोनि मागुती म्हणे अर्जुना ! । **'मयि बुद्धिं निवेशय'** म्हणोनि. ॥ ५८९ ॥ मजमध्येंच ठेवीं मन । म्हणजे चराचर भगवद्रूप ऐसें करीं चिंतन । परि जों तंतुदृष्टि न देखे वसन । तों ततूच पट ऐसें कळेना. ॥ ५९० ॥ म्हणूनी जों रूपीं अरूप । न दिसे जडीं चित्स्वरूप । तोंपर्यंत विश्व भगवद्रूप । ऐसें न ये अनुभवा. ॥ ५९१ ॥ किंबहुना अवतार । जे शुद्ध विचारचित आकार । त्यांच्या ध्यानींही हा प्रकार । उपदेशी अर्जुनातें. ॥ ५९२ ॥ कीं मद्रूपींच

ठेवीं मन । परि ज्या आत्मप्रकारें चिंतन । घडे त्या रूपाचें तेथें जतन । निश्चय बुद्धीचा करीं ऐसा. ॥ ५९३ ॥ कीं चित्कनकाविण । नव्हे आकारअलंकाराचें स्फुरण । तेव्हां हें भगवद्रूपही आहे आपण । कीं चैतन्य तें आपला आत्माच कीं. ॥ ५९४ ॥ मद्रूपीं ठेवूनि मन । करी या बुद्धिनिश्चयातें जतन । तें बुद्धीचे प्रवेशणें ऐसें जगज्जीवन । सूचवी म्हणतां **'मयि बुद्धिं निवेशय'** ॥ ५९५ ॥ एवंच पूर्वश्लोकीं चतुर्थ चरणीं । जे बोलिला चक्रपाणि । कीं चित्त प्रवेशविती जे माझ्या रूपीं सगुणीं । त्यांचा उद्धर्ता भवसागरीं मी होतसें. ॥ ५९६ ॥ त्याचेच ये रीती । विशद रूप करूनि श्रीपती । तूही ऐसा होई म्हणूनि पार्थाप्रती । या श्लोकीं पूर्वार्धीं बोलिला. ॥ ५९७ ॥ कीं अर्जुनातें अष्टमीं । आत्मसाक्षात्कार उपदेशिता जाला स्वामी । साकार ऐश्वर योग नवमीं । उपदेशिता जाला. ॥ ५९८ ॥ ऐसें व्यतिरेकान्वयज्ञान । पावला भगवताच्या मुखे अर्जुन । त्या ज्ञानें पावोनिया समाधान । एकादशीं प्रथम श्लोकीं तोचि तें बोलिला. ॥ ५९९ ॥ **"मदनुग्रहाय परमं"** या श्लोके करूनी । गुह्य अध्यात्म सांगीतले त्यावरूनी । मोह माझा गेला म्हणोनी । स्वमुखे अर्जुन बोलिला. ॥ ६०० ॥ ऐसें ज्ञान जालियावरी । योगसिद्धि जाली पाहिजे बरी । जो ज्ञानी चित्त चिन्मय करी । तोचि पावे मुक्तीतें. ॥ ६०१ ॥ ज्ञान जालें अर्जुना । परि योग बाणला नाहीं मना । म्हणूनि अभिमन्युपुत्रमरणीं नाना । शोक केले. ॥ ६०२ ॥ एवच ज्ञानही जालियावरी । योगसिद्धि पूर्वसंस्कारातें परिहरी । तो योग या गीतेंत हरी । प्रतिपदीं वदे ज्ञानियांस. ॥ ६०३ ॥ त्यांत कोणी टाकूनि सगुण । योगरीती उपासिती आत्मा निर्गुण । तेही सिद्धि पावती निपुण । परि क्लेशी अधिकाधिक ते होती. ॥ ६०४ ॥ ज्ञानदृष्टीं करूनी । सगुणीं चित्त प्रवेशवूनी । आपला आत्मा परमात्मा सगुण म्हणोनी । जे ध्याती ऐसे उपासिती, ॥ ६०५ ॥ त्यांचा उद्धर्ता मी श्रीहरी । अति शीघ्र भवसागरीं । होतों म्हणूनि यापरी । पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ ६०६ ॥ सागररूप मृत्युसंसार । त्यापासूनि हाचि शीघ्र उद्धार । कीं जडभ्रमसंस्कार । जाउनी बिंबेचि चिदात्मता. ॥ ६०७ ॥ पूर्वश्लोकपर्यंत । ऐसें बोलिला भगवत । या श्लोकीं योगरत । सगुणभक्तिपूर्वक करितो पार्थातें. ॥ ६०८ ॥ कीं ज्ञान जालियाचें फळ । चित्स्वरूपचि बिंबावें केवळ । त्याचा उपाय सांगितला निवळ । योगयुक्त भजन सगुणाचें. ॥ ६०९ ॥ जे ऐसे सगुण भक्त । तेचि सतत युक्त, नित्य युक्त । कीं ज्ञान जालियाउपरि नुसतें अव्यक्त । सगुण टाकूनि धरिलें, क्लेशी अधिक ते. ॥ ६१० ॥ आत्मज्ञान

जालियाविना । सर्वथा न घडे अनिर्देश्याची उपासना । त्यांसही क्लेश अधिकतर **अर्जुना!** । श्रीकृष्ण म्हणे. ॥ ६११ ॥ एवच ज्ञान जाले मग । क्लेश अधिकतर बिबतां योग । चैतन्य हेमचि, जड जग नग । ऐसें ठसावले बहु क्लेशीं. ॥ ६१२ ॥ तोचि योग सुगम । ज्ञानें भजतां सगुण सर्वोत्तम । अवतार आणि स्थावरजगम । चिन्मात्र ज्याला ठसावे. ॥ ६१३ ॥ अनुभव ऐसा ठसावला । तो भक्त योगसिद्धीतें पावला । प्रवेश भगवद्रूपीं फावला । त्यातेंचि देहावसानीं ऐसा की पुन्हा निघेना. ॥ ६१४ ॥ म्हणूनि सगुणोपासना योगरीती । पूर्वार्धीं वदला जगत्पती । योगसिद्धि ऐसी आणि फलश्रुती । बोलतो आतां उत्तरार्धे. ॥ ६१५ ॥

**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

मग मजमध्ये प्रवेशसी । तो प्रवेशसीच ऐसा की पुन्हा न निघसी । ऐसा प्रवेश केव्हां म्हणसी । तरी या देहपातानतर. ॥ ६१६ ॥ **'अत ऊर्ध्वं'** म्हणूनि हरी । म्हणे या देहाउपरी । कीं देह पडलियावरी । प्रवेशसीच म्हणिजे न निघसी पुन्हा. ॥ ६१७ ॥ **मय्येव** म्हणोनी । **मयि** आणि **एव** ऐसीं पदे दोनी । त्यात **एव**पद **'निवसिष्यसि'** यापुढे योजुनी । **'निवसिष्यस्येव'** म्हणूनि अन्वय. ॥ ६१८ ॥ **'अत ऊर्ध्वं'** म्हणे हरी । अर्थ याचा ऐसा की याहूनि उपरी । म्हणिजे देह पडिलियावरी । प्रवेशसीच. ॥ ६१९ ॥ की प्रवेश आत्मयाचा । हें तों न म्हणेल भगवताची वाचा । कीं ज्यांत प्रवेशावें तो आत्माच साचा । तेव्हां प्रवेश बुद्धीचा बोलावा. ॥ ६२० ॥ तरी बुद्धि प्रवेशविल्या उपरी । हा प्रवेश बोले हरी । ते प्रवेशलीच आतां **'अत ऊर्ध्वं'** म्हणिजे यावरी । प्रवेशसी कां म्हणावें. ॥ ६२१ ॥ एवच प्रवेश बुद्धीचाच खरा । परी शरीरीं प्रारब्धभोगाचा थारा । भोगकाळीं प्रारब्धभोगाचा वारा । तरग उठवी चित्समुद्रापासूनि बुद्धीचा. ॥ ६२२ ॥ यालागीं प्रवेशोनि निघणें । जों देहप्रारब्धाचें भोगणें । देह पडतां नाहीं परतणें । बुद्धिलहरीस त्या स्वानंदसिधूपासुनी. ॥ ६२३ ॥ यालागीं बुद्धिवृत्तीचाच प्रवेश । चित्स्वरूपींच बोले हृषीकेश । आणि पूर्वार्धीं बुद्धिप्रवेशोपदेश । तो मन ठेवूनि सगुणीं, घे स्वानुभव निर्गुणीं म्हणोनी. ॥ ६२४ ॥ आतां भोक्ता प्रतिबिबांश । **'निवसिष्यसि अत ऊर्ध्वं'** म्हणूनि हा त्याचा प्रवेश । ये रीती म्हणतो हृषीकेश । म्हणूनि जरी येथें म्हणावें. ॥ ६२५ ॥ तरी बुद्धि प्रवेशतां बिबीं । प्रतिबिंब बिबास अवलबी । कीं सत्त्वोपाधि जळकदबीं । असणें प्रतिबिबांशा

जीवाचे. ॥ ६२६ ॥ नदीजळीं नदीतीर । प्रतीबिंबे परतु तेंचि नीर । तीर बुडवूनि जेव्हां धरी पसर । प्रतिबिंब जळीं तीराचे दिसेना. ॥ ६२७ ॥ ते स्वये तीरींचे कडेच दिसती जळीं । तेव्हा प्रतिबिंब त्याचें जळीं न डळमळी । तैसें चित्प्रतिबिंब निर्मळीं । सत्वीं समार्धात गवसेना. ॥ ६२८ ॥ जेव्हां बिंबीं बुद्धिप्रवेश । तेव्हा प्रवेशेच प्रतिबिंबाश । **'निवसिष्यसि अत ऊर्ध्वं'** म्हणे हृषीकेश । तरी बुद्धिप्रवेशींच प्रवेश त्याचा देखिला. ॥ ६२९ ॥ बुद्धि जड तिचा होतां प्रवेश । काय न प्रवेशता वेगळा राहो शके चिदश । परि बुद्धि निघतां प्रारब्धभोगी प्रकाश । चैतन्या प्रतिबिंबाचा. ॥ ६३० ॥ बुद्धि सोडी बिंब । तेव्हा बुद्धीमध्ये प्रतिबिंब । तीर उघडें पडता विलंब । नसे प्रतिबिंब तटाचे पडावया. ॥ ६३१ ॥ जडास भोग न घडे । भोग लागला चैतन्याकडे । भोगीं ज्ञानियाच्याही बुद्धींत पडे । प्रतिबिंब. ॥ ६३२ ॥ बिंबीं प्रवेशतां बुद्धी । प्रतिबिंबाते प्रवेशसिद्धी । बुद्धि निवता भोगाची समृद्धी । बुद्धीत घडे प्रतिबिंबातें. ॥६३३॥ एवच **'निवसिष्यसि । अत ऊर्ध्वं'** म्हणे **अर्जुनासी** । **एव**शब्दे पुन्हा न निघसी । ऐसा प्रवेशसी, हा भाव. ॥ ६३४ ॥ यालागीं **'मय्येव'** पदें ही दोन्ही । यांत जे **एव** म्हणोनी । तें पद **'निवसिष्यसि'** यापुढे लावूनी । वाखाणावे. ॥ ६३५ ॥ येविपर्यी संशय । नाहीं म्हणे **अव्यय** । की ज्ञानें मज सगुणास भजतां सुलभ होय । मोक्ष भक्तातें. ॥ ६३६ ॥ येथवरी अर्थ ऐसा जाला । परि निर्गुणवादाभिमान ज्याला । त्यांच्या टीकाही श्रोतयांला । वाचिता, वाटेल हेंही घडों शके म्हणोनी. ॥ ६३७ ॥ तरी तेंही घडो शके तरी । की पूर्वापर विरोध न दिसे जरी । तो विरोधही परिहरिती परी । तो नव्हे परिहार. ॥ ६३८ ॥ त्यांचें ऐसें मत । की आत्मज्ञानियांस न लगे सगुण **भ**गवत । आणि भक्ताहूनि थोर अत्यत । ज्ञानी ऐसें मत त्यांचे. ॥६३९॥ परि जे ज्ञानी आणि भजती सगुण । ते नुसतिया ज्ञानियाहूनि कोटिगुण । अधिक मज संमत म्हणे **स**र्वज्ञ निपुण । **गी**तेंत विशेषे ये स्थळीं. ॥ ६४० ॥ म्हणूनि या अध्यायांत भक्ताचा । गुणानुवाद जो जो वदे **कृ**ष्णवाचा । अर्थ विपरीत त्यात्याचा । ते करिती. ॥ ६४१ ॥ प्रस्तुती या श्लोकी **अर्जुनातें** । **भ**गवंत म्हणे मनातें । मजमाजि ठेवीं आणि बुद्धीतें । प्रवेशवी मजमाजी. ॥ ६४२ ॥ ऐसें जेव्हां तूं करिसी । तेव्हां **अत ऊर्ध्वं**—या उपरी—मजमाजि प्रवेशसी । येथें त्यांची टीका ऐसी । की सगुणीं मन ठेवीं, सगुणींच प्रवेशवीं बुद्धीही. ॥ ६४३ ॥ मग तू ज्ञान जालियाउपरी । ज्ञानें मुक्ति पावसी बरी । या भावें म्हणती म्हणतो **ह**री । की प्रवेशसी मज-

माजी. ॥ ६४४ ॥ स्वमतस्थापनेचा वळसा । म्हणूनि अर्थ करिती ऐसा । परि **गी**ता साहेल कैसा ? । ऐसा अर्थ. ॥६४५॥ मतानुरूप बोलावें म्हणोनी । ज्ञानियास म्हणावें अज्ञानी । **भ**गवत म्हणे भक्त थोर निर्गुणोपासकांहूनी । हे थोर म्हणती निर्गुणोपासक. ॥ ६४६ ॥ तें असो **अर्जु**नास हा उपदेश । जो करितो **हृ**षीकेश । तोचि **भ**गवत **य**दुकुलेश । ज्ञानप्रद गुरु **अर्जु**नाचा. ॥ ६४७ ॥ स्वमुखे आत्मज्ञान । देवूनि म्हणतो करीं माझे सगुणध्यान । येथें स्पष्ट दावुनि मताभिमान । **अर्जु**न म्हणावा अज्ञानी. ॥ ६४८ ॥ सगुणीं मन लाविसी । सगुणीं बुद्धि प्रवेशविसी । तरी ज्ञान तुज होईल तेव्हां प्रवेशसी । मज निर्गुणी, ऐसें वाखाणिती विरुद्ध. ॥ ६४९ ॥ तरी काय ज्ञान देउनी **अर्जु**ना । विसर पडिला **ज**गज्जीवना ? । म्हणूनि ज्ञान **अर्जु**नातें असेना । ऐसा या श्लोकीं सूचवितो, म्हणावा हा अर्थ. ॥ ६५० ॥ एक भ्रांत मानावा **भ**गवत । किंवा हे टीकाकारचि भ्रांत अत्यत । या दो पक्षांत सत । भ्रांतपण अंगीकारोत एकाचे. ॥ ६५१ ॥ श्लोकीं नसोनि अर्थ । बाधित कल्पना व्यर्थ । करिती आणि ते समर्थ । म्हणूनि जन तेंचि मानिती. ॥ ६५२ ॥ आता ज्ञान देऊनि **भ**गवत । विसरला म्हणे तोचि भ्रांत । आणि ज्यांस त्या टीका मान्य अत्यत । ते भ्रांत त्या टीकाकारांतेंही म्हणती घडेना. ॥ ६५३ ॥ म्हणूनि तें गोष्टी एक येथें आणितील । की **अर्जु**नास आत्मज्ञानचि नाहीं म्हणतील । परि तेही शेवटीं मानितील । ज्ञान **अर्जु**नास जालें म्हणोनी. ॥ ६५४ ॥ पूर्वाध्यायांत जे वदला **अर्जु**न । आणि या अध्यायापुढें बोलेल वचन । तें ऐकतां निरभिमान जन । मानितील आत्मज्ञान या उपदेशकाळीं **पार्था**तें. ॥ ६५५ ॥ की **'मदनुग्रहाय परमं'**[1] या श्लोकेंकरूनी । गुह्य अध्यात्म मज उपदेशिलें त्यावरूनी । हा भेद मोह माझा गेला म्हणोनी । **अर्जु**न बोलिला पूर्वाध्यायांत. ॥ ६५६ ॥ पुढें अष्टादशीं **भ**गवत । म्हणेल की तुझा गेला कीं नाहीं मोह अत्यत । त्यास उत्तर दे **पांडु**सुत । **'नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा'**[2] म्हणोनी. ॥ ६५७ ॥ जें गुह्य अध्यात्मसंज्ञित । ते मज कळलें म्हणे **पांडु**सुत । त्यानें मोह माझा गेला निश्चित । ऐसें म्हणेल त्यास कैंवि ज्ञान नाहीं म्हणावें ? ॥ ६५८ ॥ तेव्हां व्यर्थचि **गी**ता । उपदेशिली म्हणावी **पांडु**सुता । कीं आत्मज्ञान नाहीं जालें तत्त्वतां । होउनी **गी**तोपदेश. ॥ ६५९ ॥ **भ**गवद्गीतेचा उपदेश । उपदेशकर्ता **हृ**षीकेश । आणि **अर्जु**न बोले स्वानुभवलेश । आत्मज्ञान नाहीं जालें म्हणती तयातें. ॥ ६६० ॥ नवमीं राजविद्या[3] । जे सर्वविद्यांत आद्या । ते

---

१. अ० ११, श्लो० १ पहा. २. अ० १८, श्लो० ७३ पहा. ३. अ० ९, श्लो० १–२ पहा.

उपदेशिली ज्या अनवद्या । तो कैसा ज्ञानहीन. ॥ ६६१ ॥ या टीकाकारांस ज्ञान अपरोक्ष । ते म्हणती **अर्जुना**स परोक्ष । आणि हीं **गीता**वचनें प्रत्यक्ष । ज्ञानसूचकें **अर्जुना**चीं. ॥६६२॥ जे येथें **अर्जुन** अज्ञानी म्हणती । तेचि **'मदनुग्रहाय परमं'** हा श्लोक वाखाणिती । तेथें आत्मानात्मविवेक आणिती । वाखाणितां **गुह्य अध्यात्म** शब्दाते.॥६६३॥ **अर्जुना**स आत्मसाक्षात्कार । येविषयीं प्रमाणें फार । जे नाहीं म्हणती टीकाकार । ते एक प्रमाण बोलोत पाहू येथें. ॥ ६६४ ॥ आता साधायासि हाचि पक्ष । म्हणतील या जन्मीं **अर्जुना**स नाहीं मोक्ष । तरी बिबला नाही म्हणावा योग अपरोक्ष । योगभ्रष्ट होईल मुक्त जन्मांतरी. ॥ ६६५ ॥ जरी मोक्ष याच जन्मीं जाला । तरी म्हणो योग बाणला । परतु आत्मसाक्षात्कार जाला । हे सिद्ध. ॥ ६६६ ॥ तरीच मन माझे ठायीं ठेवी । बुद्धी माझे स्वरूपीं प्रवेशवी । म्हणूनि **जगद्गुरु** गोंसावी । ध्यानयोग त्यातें बोलतो. ॥ ६६७ ॥ असो हें पिष्टपेषण । प्रगट त्यांची टीकाच त्याचें दूपण । एवच ज्ञानी **अर्जुन** त्यास **कौस्तुभ**भूषण । सगुणभक्ति आत्मत्वें करू सागतसे. ॥ ६६८ ॥ ऐसें जे ज्ञानी । सगुणभक्त ज्ञान होऊनी । ते भक्तिहीना ज्ञानियांहूनी । श्रेष्ठ **भ**गवत बोलिला. ॥ ६६९ ॥ अत एव दो पक्षांत उत्तम । कोणते योगवेत्ते अधिक म्हणूनि योगवित्तम । **अर्जुन** म्हणे त्यांस युक्ततम । भक्त **भ**गवत बोलिला. ॥ ६७० ॥ आणि क्लेश अभक्तां अत्यत । म्हणूनि भक्त संमत म्हणे **भ**गवंत । की मी मृत्युससारापासूनि अत्यत । सत्वर उद्धर्ता भक्तांचाच होतसें. ॥ ६७१ ॥ येथें कोणी ऐसेही म्हणती । कीं ज्ञान जालें तेव्हां ते स्वयेंचि तरती । मी उद्धर्ता होतों म्हणे **श्री**पती । तेव्हां ज्ञान नाहींच त्यांला म्हणावें. ॥ ६७२ ॥ तरी अनिर्देश्याची उपासना । न घडेचि आत्मसाक्षात्काराविना । त्यांस योगसिद्धि क्लेश सागितले भक्त जना । ते अनायासे देतो, तारितों, म्हणावे ये रीती. ॥ ६७३ ॥ की आत्मज्ञान जरी जाले । आणि योगसिद्धीतें नाहीं पावले । ते योगभ्रष्ट त्यांस बोलिलें । घेणे मागुती एक जन्म. ॥ ६७४ ॥ म्हणूनि योगसिद्धीलागीं । क्लेशी होती इतर योगी । भक्तांस भक्ति उपयोगी । योगसिद्धि अतिशीघ्र. ॥ ६७५ ॥ येथेंही हे टीकाकार साभिमान । म्हणती होतां जडचैतन्यज्ञान । सिद्धचि जाला **शु**कादिकासमान । जन्म कैचा तयातें? ॥ ६७६ ॥ परि आत्मज्ञान जालियावरी । चित्त चिन्मय करू न लागे जरी । आणि जडचैतन्य ओळखीच्या गोष्टीही करी । तो शब्दज्ञानीच होतसे. ॥ ६७७ ॥ अभ्यास करितां जे घडी । चित्त चैतन्यातें न सोडी । स्थिर होय लागतां गोडी । मग

तो च्यवेना गीता म्हणे. ॥ ६७८ ॥ योगसिद्धि षष्ठाध्यायांत । बोलोनि म्हणे भगवंत । की जाणेल तें सुख अत्यंत । मग तो च्यवेना तत्त्वापासुनी.॥६७९॥

षष्ठाध्यायश्लोक—**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥**

टीका याची प्रतिपद । मागें जाली विशद । बोलणें इतकेचि सांप्रद । की जेव्हां ऐसा, तेव्हांच च्यवेना तत्त्वापासुनी. ॥ ६८० ॥ **'न चैवायं स्थितश्चलति । तत्त्वतः'** म्हणूनि म्हणे **श्री**पती । अत्यंतसुखानुभवस्थिती । पावे तोचि न च्यवे तत्त्वापासूनी. ॥ ६८१ ॥ स्थळस्थळीं ये रीतीं । या **श्री**गीतेंत बोले **ज**गत्पती । ऐसेंच म्हणे **श्रु**ती । की मग तो च्यवेना. ॥ ६८२ ॥

श्रुति—**यदा पंचावतिष्ठंते ज्ञानानि मनसा सह ।**
**बुद्धिश्च न विचेष्टेत तमाहुः परमां गतिम् ॥ १ ॥**
**तां योगमिति मन्यंते स्थिरामिंद्रियधारणाम् ।**
**अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ॥ २ ॥**

जेव्हां पांच ज्ञानें पांच विषयाची । राहती म्हणजे न उठे वृत्ति इंद्रियांची । मनासहित बुद्धीही योगियांची । न चेष्टे स्थिर राहे. ॥ ६८३ ॥ तीस म्हणती परम गती । योगी योग त्यातेंचि मानिती । **श्रु**ति म्हणे **'अप्रमत्तस्तदा भवति'** । म्हणजे असावध तेव्हां तो नव्हे. ॥ ६८४ ॥ **'अप्रमत्तस्तदा भवति'** । येथवरी योग निर्विकल्प बोले **श्रु**ती । सविकल्पयोगरीती । **'योगो हि प्रभवाप्ययौ'** म्हणूनियां. ॥ ६८५ ॥ प्रभव म्हणजे उत्पत्ती । अप्यय नाशास म्हणती । हे दोनी योग म्हणे श्रुती । अर्थ दृष्टांतें योजावा. ॥ ६८६॥ **श्रु**ति **'योगो हि'** म्हणे यावरूनी । **हि**शब्दाच्या अर्थेकरूनी । हेतु सूचविला म्हणोनी । दृष्टांत येथें योजावे. ॥ ६८७ ॥ **हि** म्हणजे ज्या कारणास्तव । ज्यास उत्पत्ति नाश, तें नसे वास्तव । कीं सुवर्णी नगाचा उद्भव । लयही सुवर्णी. ॥ ६८८ ॥ तेथें अलंकार आहे जोंवरी । अद्वैतयोग सोन्या-अलंकाराचा तोंवरी । कीं उत्पत्ति लय हेमीं नसता त्याचा जरी । तरी न घडता अद्वैतयोग. ॥ ६८९ ॥ ज्या कारणास्तव । सुवर्णापासोनि उद्भव । आणि लय तेथेंचि वास्तव । **'योगो हि'** म्हणूनि अर्थ ऐसा **हि**शब्दाचा. ॥ ६९० ॥ प्रपंच ब्रह्मयाचा । योग ये रीती साचा । म्हणूनी म्हणे **वे**दवांचा । **'योगो हि प्रभवाप्ययौ'** ॥ ६९१ ॥ की **हि**शब्द म्हणे ज्या कारणास्तव । नाश आणि उद्भव । या कारणास्तव योग वास्तव । चैतन्याचा आणि जडाचा. ॥ ६९२ ॥ निर्विकल्पयोगीं **श्रु**ति म्हणे । ज्या चैतन्यांत

योग बाणे । त्या चैतन्यांतचि उत्पत्तिनाशातें शाहणे । वर्णिती जड प्रपचाचा ॥ ६९३ ॥ तरगाचा उद्भव लय । जळापासूनि हा निश्चय । तरगा आणि जळास अद्वैतनिर्णय । तरगजळ अद्वैतयोग याकारणें. ॥ ६९४ ॥ ज्या कारणास्तव घटाचा । उत्पत्ति नाश या मातीपासोनि साचा । योग त्याकारणें घटामृत्तिकेचा । ब्रह्म जगाचा ये रीती. ॥ ६९५ ॥ इत्यादि दृष्टात शत । **'योगो हि प्रभवाप्ययौ'** म्हणतां सूचवी अत्यत । प्रसंग श्रुतीचा प्रस्तुत । इतकाच येथें. ॥ ६९६ ॥ की जरी योग बाणे । तरीच देहात्मसंस्कारास लात हाणे । म्हणूनि हे श्रुति म्हणे । **'अप्रमत्तस्तदा भवति'** म्हणोनी. ॥ ६९७ ॥ सावधान नव्हे तो **प्रमत्त** । की आत्मा देह जड सत्य मानी चित्त । ऐसा प्रमत्त नव्हे तो **अप्रमत्त** । की जड नाहीं चैतन्यचि सर्व बाणे ऐसें. ॥ ६९८ ॥ ऐसेंचि पष्ठाध्यायात । तेव्हा न च्यवे म्हणे भगवत । कीं ब्रह्मसुख योगी जाणे अत्यत । तोंवरी योगभ्रष्टत्व, घडे अर्थ हा. ॥ ६९९ ॥ षष्ठींच म्हणे कमलनेत्र । **'यो मां पश्यति सर्वत्र'** । **'तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति'** म्हणूनि सर्वत्र । सिद्धात ऐसा ॥ ७०० ॥ की योग सविकल्प ऐसा । आणि योग निर्विकल्प तैसा । एकतरी बाणे, तरीच फांसा । तुटला अविद्येचा म्हणावा. ॥ ७०१ ॥ एवंच ज्ञान गुरुमुखेंकरूनी । अन्वयव्यतिरेके कळलें म्हणूनी । अभ्यास सोडीतो जाउनी । पडे शब्दज्ञानियांत. ॥ ७०२ ॥ ऐसेच शब्दज्ञानी । बहुत जाले म्हणूनी । म्हणती जडावेगळा आत्मा कळला यावरूनी । गेली अविद्या. ॥ ७०३ ॥ तरी अविद्या नाशावया द्वार । कळणें आत्मानात्मविचार । परि जो चित्त नव्हे चिदाकार । तोंवरी असेच अविद्या म्हणावी. ॥ ७०४ ॥ ब्रह्म ओळखे बुद्धी । परि जाली नाहीं ब्रह्मत्वसिद्धी । योगद्वयात एकही समृद्धी । जो नव्हे. ॥७०५ ॥ गीता आणि श्रुती । तेव्हां भय नाहीं म्हणती । की स्वरूपी स्वरूपाकारस्थिती । बाणे जेधवां बुद्धीस. ॥ ७०६ ॥ **'यतो वाचो निवर्तंते'** श्रुती । म्हणे मनासहित वाचा परतती । तेथें आनंद ब्रह्मीचा जाणे मनीं । तो मग न मानी कदापिही भयातें. ॥ ७०७ ॥

**श्रुति—यतो वाचो निवर्त्तंते अप्राप्य मनसा सह ।**
**आनंदो ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन ॥**

याचा अर्थ बोलिला असे । हा निर्विकल्पयोग [illegible] सविकल्पयोग फळही बहुतां ठायीं गवसे । येचि रीती. ॥ ७०८ ॥




१. अ० ६, श्लो० ३० पहा.

**श्रुति—यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति ।**
**आत्मानं सर्वभूतेषु न ततो विजुगुप्सते ॥**

जो सर्वभूतें आत्मयात पाहे । आणि पाहे कीं आत्माच सर्वभूतीं आहे । मग तो ऐसा होऊनि राहे । की नव्हे जुगुप्सित तो त्याउपरी. ॥ ७०९ ॥ म्हणिजे निंद्य मग नव्हे तो । कदापि जो ऐसा पाहतो । एवंच ऐसें कळोनिही हे पाहणें टाकितो । तो निंद्य भलत्या प्रकारे होतसे. ॥ ७१० ॥ काय बोलोनि बहुत । आत्मा कळला जरी निश्चित । तरी नव्हे जों योगरत । तोंवरी ज्ञान बिबेना. ॥ ७११ ॥ प्रस्तुत प्रसंग यावरूनी । की ज्ञान बिबेना अभ्यासावांचूनी । म्हणूनि **अर्जुन** जाला जरी ज्ञानी । तरी योग बाणला पाहिजे अभ्यासें. ॥ ७१२ ॥ **अर्जुनास** ज्ञान जाले । आणि तेंही पोंकास[1] योगे जरी नाही आलें । तरी त्यासही पाहिजे जाले । दुःख गर्भवासाचे. ॥ ७१३ ॥ कोणी म्हणती **अर्जुनासही** । या जन्मीं मोक्ष जाला नाहीं । तरी आम्हास विरुद्ध नव्हे काहीं । योगभ्रष्ट होऊनि मागुती अभ्यासें मोक्ष पावेल. ॥ ७१४ ॥ याकारणें याच जन्मीं । योगसिद्धि पावावी म्हणे **स्वामी** । हे प्रसिद्ध सर्वा निगमागमीं । **गीतेत** तो प्रतिपदीं. ॥ ७१५ ॥ **'अथ[2] चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरं'** या श्लोकी । याच अध्यायांत **देव** बोलेल की । **'अभ्यासयोगेन[2] ततो मामिच्छाप्तुं'** म्हणोन नेटकी । रीति अभ्यासयोगाची बोलेल. ॥ ७१६ ॥ **'शनैःशनैरुपरमेद्[3] बुद्ध्या धृतिगृहीतया'** । **'आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्'** म्हणूनियां । षष्ठाध्यायांत **धनजया** । सागीतल्या नाना रीती अभ्यासाच्या. ॥ ७१७ ॥ मोक्ष अभ्यासावांचूनी । होता तरी किमर्थ दाटुनी । हे योगक्लेश सांगता ? यावरूनी । ज्ञान जाले तऱ्ही क्लेश अधिकतर निर्गुणोपासकांतें. ॥७१८॥ जे कोणी टाकूनि सगुण । उपासिती नुसतें निर्गुण । ते जरी मातें पावती अपरोक्षनिपुण । तऱ्ही क्लेश अधिकतर तयातें **हरी** म्हणे. ॥ ७१९ ॥ आणि म्हणे ज्ञान जालिया नतर । जे सेवितीच सगुण **सर्वेश्वर** । त्यांचा उद्धर्ता मी होतों जे मत्पर । अनन्ययोगेंचि ध्यात मातें उपासिती. ॥ ७२० ॥ म्हणूनि मजमाजी मन लावी । आणि बुद्धि मजमध्यें प्रवेशावी । म्हणूनि **जगद्गुरु** गोंसावी । पूर्वार्धी बोलिला. ॥ ७२१ ॥ उत्तरार्धीही **हरी** । म्हणतसे तू ऐसा होसी जरी । तरी देह पडलियावरी । न निवसी पुन्हा, प्रवेशसी ऐसा. ॥ ७२२ ॥ त्यास निर्गुणाभिमानी । म्हणती **अर्जुनास** अज्ञानी । त्यास सगुणोपासना सागतों कीं ज्ञान पावोनी ।

१. परिपक्वपणाला. २. पुढें श्लोक ९ पहा. ३. अ० ६, श्लो० २५ पहा.

मग प्रवेशसी म्हणतो मजमध्यें. ॥ ७२३ ॥ तरी **अर्जुन** ज्ञानी । आत्मज्ञानसंपन्न जाला म्हणोनी । बहुतां **गीता**वचनीं । सिद्ध जालें. ॥ ७२४ ॥ त्यास बाणावी योगसिद्धी । म्हणूनि योगरीतीच आपुली बुद्धी । चित्स्वरूपीं प्रवेशवी, कीं कधीं । न निघसी ऐसा प्रवेशसी अत ऊर्ध्वं. ॥ ७२५ ॥ **अर्जुना**तें ज्ञान जालें । परि चित्तास तें नाहीं बाणलें । म्हणूनि योगसिद्धीकारणें बोलिलें । योगरीतीं सगुण-भजन या श्लोकीं. ॥ ७२६ ॥ तरी **अर्जुन**ही ज्ञानी । त्यातें सगुणोपासना सांगोनी । सगुणोपासनेमध्यें आत्मयोग दाखवूनी । फळ अपुनरावृत्ति बोलतो हाचि सिद्धांत. ॥ ७२७ ॥ कीं हें प्रारब्धाचें शरीर । म्हणूनि **'अत ऊर्ध्वं'** म्हणे **यदु**वीर । कीं या देहाउपरि तू न निघसी ऐसा स्थिर । प्रवेशसी मज-माजी. ॥ ७२८ ॥ मीच **वैकुंठ**नगर । अनादि प्रगटतों कृपासागर । जैसी **राम-कृष्णा**दि रूपें धरितों मी **सर्वे**श्वर । तैसें **वैकुंठ**रूप माझें. ॥ ७२९ ॥ कीं अव्यक्तोपासका निर्गुण । गति बोलिला **सर्व**ज्ञ निपुण । सगुणोपासकां मुक्तिही सगुण । ज्या मुक्तीत अखंडानुभव निजानंदाचा. ॥ ७३० ॥ **'आब्रह्मभुवना-लोकाः'**[१] या श्लोकीं । अष्टमीं **उत्तम**श्लोक बोलिला कीं । पुनरावृत्ति सर्वलोकीं । मातें **वैकुंठा**तें पावला तो न परते. ॥ ७३१ ॥ चतुर्दशीं विशद । हेंचि बोलेल **श्री**मुकुंद । एवं च **'निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं'** म्हणे तें पद । सगुण मुक्तीचें. ॥ ७३२ ॥ मुक्ति न घडे ज्ञानाविण । तें ज्ञान बिंबे सुखें भजतां सगुण । म्हणूनि **'मय्येव मन आधत्स्व'** म्हणे षड्गुण । आणि **'मयि बुद्धिं निवेशय'** बोलिला तें स्वस्वरूपीं. ॥ ७३३ ॥ कीं ज्ञान जालि-यानंतर । आत्मत्वें भजावा **सर्वे**श्वर । सगुणीं प्रेमाभ्यास निरंतर । ऐसा कीं जडीं चित्स्वरूप लक्षावें. ॥ ७३४ ॥ ऐसा अभ्यास न करी । तरी स्वात्मत्वें अनुभवा नये **हरी** । राज्यप्राप्ति होऊनि कां परी । भोगावी भेददरिद्रता ? ॥ ७३५ ॥ साकारीं वसे प्रेम । त्या साकार नगीं निराकार हेम । पाहे कीं हें योगसिद्धिरूप योगक्षेम । वाहतो योगसिद्धिदाता **भग**वत. ॥ ७३६ ॥ कृपाळु **जग**त्पती । बुद्धिचालक योगरीती । हृदिस्थ दावूनी मती । करी सुगम अभ्यासें स्वरूपीं स्थिर. ॥ ७३७ ॥ प्रत्यक्ष तो स्वयमेव । गुरु होऊनि **देव** । बोलतो कीं माझे ठायीं मनोभाव । ठेवीं आणि तेथेंचि बुद्धि प्रवेशवीं स्वस्वरूपीं. ॥ ७३८ ॥ परंतु पूर्वसंस्कार । जडत्वें स्मरेल स्मरतां आकार । म्हणूनि प्रत्य-[४]गात्मत्व वारवार । प्रत्यग्वृत्ति पहावें. ॥ ७३९ ॥ या अभ्यासें चित्त । साकारीं

१ अ० ८, श्लो० १६ पहा. २ अ० १४, श्लोक १-२ पहा ३ देहामध्ये व्यापून राहि-लेलें जे ब्रह्म त्याची स्थिती. ४. स्वस्वरूपाकार वृत्तीने.

निराकार पाहों लागे निश्चित । म्हणूनि अर्जुनातें अच्युत । अभ्यासयोग करू सागतो या श्लोकी. ॥ ७४० ॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ! ॥ ९ ॥**

मन ठेवूनि साकारीं । बुद्धि प्रवेशवणे निराकारीं । सगुण निर्गुण योग या प्रकारीं । पूर्वश्लोकीं तूतें बोलिलों. ॥ ७४१ ॥ आता हे करू न शकसी जरी। तरी याच प्राप्तीचा उपाय याउपरी । तूतें सागतों की करीं । अभ्यासयोग. ॥ ७४२ ॥ मी साकार जगदाकार । सर्वचैतन्य निर्विकार । परी स्थिर एतत्प्रकार । जरी ऐशिया मजमाजी ठेवू न शकसी. ॥ ७४३ ॥ तरी अभ्यासयोगेंकरूनी । मज सगुणास ये रीती पावेन म्हणोनी । स्वात्मस्वरूपी पुनःपुनः चित्त लावूनी । धरीं मातें इच्छा पावावयाची. ॥ ७४४ ॥ कीं आत्मत्वें विश्वरूप सगुण । ध्याती तेचि भक्त योगवेत्ते होती निपुण । तुज साकारीं चित्स्वरूपाची खूण । न धरे जरी. ॥ ७४५ ॥ तरी नुसतें या स्वस्वरूपीं मन । लावूनी टाकीं आकारमात्राचें चितन । परि सगुणनिष्ठा करी हे जतन । अन्यथा पडशील त्या कोटींत. ॥ ७४६ ॥ की जे निर्गुण तत्पर । ते ध्याती अतिशयें तेंचि अक्षर । परि त्यांचा सगुणभजनीं नसे आदर । ह्मणी तैसा तूं होसी. ॥ ७४७ ॥ तुज मुख्य हा उपासनाप्रकार । की साकारीं पहावा आत्मा निराकार । परि तो अभ्यास न करितां पूर्वसंस्कार । जडीं अजड स्मरों देईना. ॥ ७४८ ॥ म्हणूनि योगाचा अभ्यास करीं । परी सगुणनिष्ठा मनीं धरीं । की चैतन्यसंस्कार बाणल्याउपरी । साकारीं निराकार आपण भजेन. ॥ ७४९ ॥ म्हणूनि या परी । मज पावावयाची इच्छा धरीं । सगुणध्यानास पावावया करीं । निर्गुणात्मयोगाभ्यास अर्थ ऐसा. ॥ ७५० ॥ की मज सगुणीं मन ठेवीं । आणि बुद्धि चित्स्वरूपीं मजमाजी प्रवेशवीं । हें पूर्वश्लोकीं बोलोनि जगद्गुरु गोसावी । **'अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि'** म्हणतसे. ॥ ७५१ ॥ **अथ** म्हणिजे पूर्वश्लोकीं वदलों यापरी । चित्त स्थिर करू न शकसी जरी । अभ्यासयोगें तरी । इच्छा करीं मज पावावयाची. ॥ ७५२ ॥ कीं सगुण निर्गुण एकरूप । दिसती पाहतां जडीं अजडस्वरूप । परि आठवितां रूप तें अरूप । नाठवे पूर्वसंस्कारे. ॥ ७५३ ॥ तेव्हा याच अभ्यासेंकरूनी । स्थिर व्हावें याच सगुणध्यानी । तुज न ठाके, तरी स्वरूपमात्राचा अभ्यास करूनी । या सगुण रूपातें पावावें ऐसी इच्छा धरीं तू. ॥ ७५४ ॥ आतां पावणें सगुणातें । हें कृष्णावताररूपीं तों नाहीं

बोलिलें **भग**वतें । की पावलाच आहे त्यातें । पात्रों इच्छीं म्हणतसे जयाला. ॥ ७५५ ॥ तरी तें योग **ऐश्वर**रूप । जे **पार्थे** देखिले विश्वरूप । तें सगुणरूप देखणे चित्स्वरूप । तो योग बाणे तेचि प्राप्ति सगुणाची. ॥ ७५६ ॥ एकादशीं तिसरिया श्लोकीं विश्वरूप । **'द्रष्टुमिच्छामि ते रूप-मैश्वरं'** म्हणे तें **ऐश्वर**रूप । ते योग **ऐश्वर**रूप कीं चित्स्वरूप । जग **न**वमीं देखिले. ॥ ७५७ ॥ एकादशीं अष्टमश्लोकीं । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनि **दे**वही बोलिला की । नवमीं योग ऐश्वर अवलोकीं । म्हणे तेंचि सगुणरूप. ॥ ७५८ ॥ त्याचि सगुणप्राप्तीची इच्छा असे । तरी सगुणभक्ति हृदयीं वसे । **भग**वत्प्रसादे चित्तास गवसे । चित्स्वरूपीं स्थिरत्व. ॥ ७५९ ॥ तोचि मग व्यतिरेकसमाधी । जरी त्या समाधीतें न पावे तुझी बुद्धी । तथापि अभ्यास-योगेचि होऊ शके सिद्धी । साकारी निराकार पहावयाची. ॥ ७६० ॥ अ-भ्यासयोगेकरूनी । मज पावावयाची इच्छा धरी म्हणोनी । **श्री**कृष्ण म्हणे या वचनीं । अर्थ ऐसा. ॥ ७६१ ॥ कीं श्लोक पाठ करावयाकारणें । घोकूं लागे चरणचरणे । चरणही न म्हणवे तरी वर्णवर्णे । घोकावा. ॥ ७६२ ॥ परि इच्छा असावी मनीं । श्लोकचि यावा म्हणोनी । की अक्षरे पाठ होतां त्याव-रूनी । चरण पाठद्वारा श्लोक पाठचि होतसे. ॥ ७६३ ॥ या न्यायें म्हणे **ह**री । कीं चित्त बरे मजमध्यें धरूं न शकसी जरी । अभ्यासयोगें तरी । मज पावावें ऐसी मनीं धरीं तू इच्छा. ॥ ७६४ ॥ कीं अभ्यासें मोडे जडत्वसंस्कार । आणि चित्त होऊ लागे चिदाकार । स्वरूपीं न थारे, तरी वारवार । चिदात्मसंस्कारें अधिष्ठानातें तें लक्षी. ॥ ७६५ ॥ मग तें सविकल्प योगी । गोडी धरी सुवर्णत्वें नगीं । तैसी प्रीति उपजे जड जगीं । सकळ चित्स्वरूप म्हणूनि अनुभवें ऐशा. ॥ ७६६ ॥ कीं ऐश्वर्यादि षड्गुण । **भग** शब्दें या साही गुणांची खूण । याचा प्रकाशक आत्मा चैतन्यपूर्ण । **भग**वान् म्हणावें तयातें. ॥ ७६७ ॥ ते साही गुण हेंचि जग । तें त्या चित्प्रकाशीं जैसे क-नकीं नग । अभ्यासयोग करितां मग । गोडी उपजे ऐसी सर्वत्र. ॥ ७६८ ॥ जरी अभ्यासयोगे समाधी । न पावे निखिल स्वरूपीं बुद्धी । तरी विश्वात्म-योगाच्या अभ्यासाची सिद्धी । चित्तास बाणे. ॥ ७६९ ॥ कीं घोकितां पद-पद । तोंडास येऊ लागे श्लोकपाद । चरण घोकितां अनुपद । श्लोक पाठ होतो समग्रही. ॥ ७७० ॥ या भावें म्हणे **ह**री । की अभ्यासयोगे मज पा-

---

१. अ० ९, श्लो० ४-७ पहा.

वावयाची इच्छा करीं । मजमध्यें चित्त जरी । लावूनि ठेवू न शकसी. ॥ ७७१ ॥ तेव्हां अभ्यासयोगेकरूनी । मज पावसी म्हणोनी । सूचवी अर्थ ऐसा यावरूनी । की अभ्यासयोगे पावसी मज षड्गुणातें. ॥ ७७२ ॥ ज्या मजमाजी मन । ठेवू न शकसी वाटोनि कठिण । त्या मज पावावयाची इच्छा धरीं म्हणून । बोलिला, म्हणूनि हा अर्थ. ॥ ७७३ ॥ मजमाजीच मन ठेवी । मजमध्यें बुद्धि प्रवेशवीं । तरीच मजमध्यें म्हणतो जगद्गुरु गोंसावी । प्रवेशसी त्याउपरी. ॥ ७७४ ॥ की ऐशा माझ्या रूपातें ध्यात । जे अनन्ययोगे उपासिती संत । त्याचा उद्धर्ता मी भगवत । मृत्युसंसारसागरी होतसें हें मागें बोलिला. ॥ ७७५ ॥ एवच हें रूप सगुण । या रूपीं जरी चिदात्मत्वें न थारे अतःकरण । तरी अभ्यासयोगे चित्त चिन्मय निपुण । करूनि मज पाव म्हणे या श्लोकीं. ॥ ७७६ ॥ एव प्रत्यगात्मयातें प्रत्यग्वृत्ती । पुनःपुन्हा योजणें अभ्यासरीती । त्या अभ्यासें जो मी विश्वमूर्ती । पाव त्या सगुणातें अर्जुना! ॥ ७७७ ॥ सगुणभक्त थोर अत्यत । आणि भजावा आत्मत्वें सगुण भगवत । प्रत्यग्वृत्ति अभ्यास संत । करूनि पावों इच्छिती सगुणाते. ॥ ७७८ ॥ येथें सगुण म्हणजे विश्वाकार । निखळ चैतन्य देखणे निर्विकार । आणि प्रत्यग्वृत्ति स्वरूपी करणे वारवार । **अभ्यासयोग** या नाव. ॥ ७७९ ॥ हें विशद तिसरिया श्लोकेकरूनी । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** म्हणोनी । सगुण विश्वात्मबोध या अभ्यासाहीहुनी । श्रेष्ठ म्हणेल. ॥ ७८० ॥ प्रस्तुतीं मागूनि येथवरी । अनुसंधान आले यापरी । कीं अभ्यासयोगे मज पावावयाची इच्छा करी । म्हणतो तें ऐसें सगुणरूप. ॥ ७८१ ॥ अभ्यासयोग आत्मज्ञानाविण । न घडे, त्या अभ्यासयोगे जो मी सगुण । त्या मज पावावयाची इच्छा करीं म्हणे षड्गुण । भगवान् श्रीकृष्ण ये स्थळीं. ॥ ७८२ ॥ तरीच शेवटीं अच्युत । म्हणेल हे धर्म्यामृत । **अमृत** शब्दे ज्ञान निश्चित । **धर्म्यामृत** सगुणधर्म्यामृत हा अर्थ. ॥ ७८३ ॥ किबहुना समग्रही भगवद्गीता । सगुणधर्म्यामृत तत्त्वता । की अष्टादशीं म्हणेल **पांडुसुता** । हा तुझा धर्म्यसंवाद. ॥७८४॥ **'अध्येष्यते च य इमं'**[1] या श्लोकेकरूनी । **'धर्म्यं संवादमावयोः'** म्हणोनी । **श्री**कात म्हणेल, यावरूनी । निर्धर्म-निर्गुण-संवाद हा नव्हे. ॥ ७८५ ॥ ज्ञानें भजावा सगुण । आणि ज्ञानी उणे सगुणभक्तीविण । इत्यादि प्रसंगानुगुण । निर्गुणसंवादही **गीतें**त. ॥ ७८६ ॥ परतु ज्ञान जालिया सगुणभजन । नुसत्या निर्गुणोपासनेहून । थोर म्हणूनी **जग**ज्जीवन ।

---

१. अ० १८, श्लो० ७० पद्य.

हें शास्त्रमथितार्थ वदे उपनिषद्भागाचा. ॥ ७८७ ॥ म्हणूनि हा धर्म्यसंवाद । म्हणूनी धर्म्यामृत म्हणे गोविंद । हा सिद्धांत या अध्यायांत प्रतिपद । 'धर्म्यामृत' अध्याय हा यालागीं. ॥७८८॥ प्रस्तुतीं मज सगुणामाजी चित्त । स्थिर जरी ठेवू न शकसी म्हणे अच्युत । तरी अभ्यासयोगे तू निश्चित । सगुणातें मातें पावसी. ॥ ७८९ ॥ परि जरी सगुणभक्तियुक्त असती । की जरी मज सगुणातेंचि पावों इच्छिसी । तरी मज सगुणातें पावसी । म्हणूनि म्हणे की '**मामिच्छाप्तुं धनंजय**' ॥ ७९० ॥ आता अर्थ अभ्यासयोगशब्दाचा । ऐसी वदे त्या टीकाकारांची वाचा । कीं योग जो सगुणस्मरणाचा । तो अभ्यासयोग. ॥ ७९१ ॥ जरी अर्जुन ज्ञानी नसता । आणि त्यास ज्ञानप्राप्तीकारणें ऐसें बोलता । तरी हा अगत्यास विपरीतार्थ होता । मान्य मताभिमानरहितातें. ॥ ७९२ ॥ एक समाधियोग । तदर्थ अभ्यास तो अभ्यासयोग । दाटूनि अनुस्मरणयोग । म्हणूनि कां क्लिष्टकल्पना करावी. ॥ ७९३ ॥ जरी आत्मयाते । पार्थे ओळखिले नसते । तरी संमतही होतें । व्याख्यान. ॥ ७९४ ॥ आतां मज निर्गुणाते पावावयाची । इच्छा करीं म्हणूनि टीका याची । वदावी तरी भगवत भागवतधर्मभक्ति सगुणाची । करी म्हणतो याचिपुढें. ॥ ७९५ ॥ अर्जुनास आत्मसाक्षात्कार । जालाच ऐसे वारवार । सिद्ध जालें त्यास भगवत भागवतधर्मप्रकार । करीं म्हणतो जरी असमर्थ अभ्यासयोगीं. ॥ ७९६ ॥ ज्ञानी अर्जुन तयास । म्हणतो न ठाके जरी आत्मयोगाभ्यास । तरी करीं मातें पावावयास । माझे भागवतधर्म म्हणोनी. ॥ ७९७ ॥ ज्ञान जालियावरी । करी नुसते योगप्रयत्न तदुपरी । की जो निर्गुणोपासक तो न करी । भागवतधर्म. ॥ ७९८ ॥ नव्हे जरी अभ्यासयोगीं समर्थ । तरी तो सगुणधर्म न धरी तदर्थ । निर्गुणस्वरूपाभ्यासेचि कृतार्थ । होईन म्हणोनी. ॥ ७९९ ॥ तरीच अधिक क्लेश त्याला । स्वयें भगवत बोलिला । भागवतधर्मे सुलभ याला । योगसिद्धि म्हणोनी. ॥८००॥ ते **भागवतधर्म** । स्पर्शले ज्ञान, स्पर्शलें कर्म । चतुर्थाध्यायटीकेंत हें वर्म । विशद जाले. ॥ ८०१ ॥ की प्रथम कर्म कांड । त्यापुढें उपासना कांड । तिसरे तें ज्ञान कांड । मधील कांड उपासना. ॥ ८०२ ॥ तीं काडियांचा हा ऊंस । मधिल कांडी स्पर्शली दोहींस । खालील वरिलीस आणि वरील खालिलीस । कांडी स्पर्शली नसे जे रीती. ॥ ८०३ ॥ ज्ञानास नातळे कर्म । कर्मास नातळे ब्रह्म । उपासनारूप भागवतधर्म । दोहींस लागले. ॥ ८०४ ॥ सर्व भूतीं वासुदेव । म्हणूनि उपास्य

देवाधिदेव। **'वासुदेवः सर्वमिति'** स्वयमेव । सप्तमीं तोचि बोलिला. ॥८०५॥ चराचर रूप विश्वरूप । आणि **रामकृष्णादि** अवताररूप । सर्वेही स्फुरे चित्स्वरूप । ज्ञानाश्रित धर्म **भागवत** इत्यादि. ॥ ८०६ ॥ ऐसा ज्ञानी भागवत[1]। त्यास श्रवणकीर्तनींही अद्वैत । जें अद्वैतानुसंधान राहतां आयतें द्वैत । तें परिहरूनि, भक्ति करी स्वात्मदृष्टीनें. ॥ ८०७ ॥ कथाश्रवणीं सादर । श्रवण शब्द आणि अर्थविचार । अवतार आणि भूभारसंहार । आणि साधुरक्षणादि कर्में. ॥ ८०८ ॥ सर्वेही तोचि **वासुदेव** । जो जडा अलकारीं चित्सुवर्ण स्वयमेव । इत्यादि कीर्तनादिकींही सर्वात्मभाव । ज्ञानाश्रित **भागवतधर्म** ये रीती. ॥ ८०९ ॥ जो ऐसा भागवत । तो दुर्लभ जनास अत्यत । हें सप्तमीं **भगवत** । बोलिला स्वयें. ॥ ८१० ॥ या पदवीस पावावें । म्हणूनि **'मय्येव मन आधत्स्व'** ऐसें **देवे** । बोलिले, परि चित्त थारावें । तेव्हां एक भागवत होणार. ॥ ८११ ॥ ज्ञान देऊनि **अर्जुनातें** । ऐसे ज्ञानाश्रित **भागवतधर्म** त्यातें । सांगोनि, मोडावया पूर्वसंस्कारातें । प्रत्यगात्मस्वरूपीं अभ्यासयोग सांगीतला. ॥ ८१२ ॥ आतां हेही करूं न शकसी जरी । कर्मरूप **भागवतधर्म** तरी । ज्ञानाश्रित भागवतधर्म पावावया करीं । म्हणूनि ह्मणतसे आतां या श्लोकीं. ॥ ८१३ ॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

अगा! प्रत्यग्वृत्ती । स्वरूपीं योजीं पुनःपुन्हा सुमती । तेही अभ्यासरीती । सोपी नव्हे. ॥ ८१४ ॥ म्हणूनि अभ्यासीं ऐसिया । जरी समर्थ नव्हसी **धन**जया! । तरी मज पावावया । मत्कर्मपर तू होय. ॥ ८१५ ॥ श्रवण, कीर्तन, सगुणध्यान, । नामस्मरण, चरणसेवन, । अर्चन, वदन, दास्य, इत्यादि भजन । **मत्कर्म** हें. ॥ ८१६ ॥ तेंचि ज्यास वाटे परम । तो म्हणावा मत्कर्मपरम । जें मत्कर्म आचरतां उपरम[2] । होय चित्स्वरूपीं चित्ताचा. ॥ ८१७ ॥ माझ्या गुणांचें श्रवण, कीर्तन, स्मरण, । जैसें जैसें होय, तैसें तैसें अंतःकरण । शुद्ध होतां, तैसें तैसें स्फुरण । होऊ लागे आत्मतत्त्वाचे. ॥ ८१८ ॥ म्हणूनि मत्कर्मपरम । होता, होय स्वरूपीं चित्तोपरम । यालागि मत्कर्म करीं म्हणे **सर्वोत्तम**। ऐसेंच **भागवतीं** म्हणे **उद्धवासही**. ॥ ८१९ ॥

---

१. अ० ७, श्लो० १९ पहा. २. स्थिरवृत्ति, शांति, लय.

श्रीमद्भागवतश्लोक—**यथा यथात्मा परिमृज्यतेसौ**
**मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः ।**
**तथा तथा पश्यति वस्तु सूक्ष्मं**
**चक्षुर्यथैवांजनसंप्रयुक्तम् ॥**

**आत्मा** म्हणिजे अंतःकरण । त्याचे क्षालन मत्कथाश्रवण । आणि कीर्तनीं वर्णितां माझे गुण । शुद्ध होय. ॥ ८२० ॥ यालागीं पवित्र माझ्या पुण्य-कथा । त्या कथामृतजळीं यथा यथा । चित्त प्रक्षालिजे, तथा तथा । पाहे सूक्ष्म वस्तूते ॥ ८२१ ॥ यथा यथा म्हणिजे जैसें जैसें । तथा तथा म्हणिजे तैसें तैसें । जों जों क्षाळावे तो तों तत्त्व पाहे ऐसें । अभ्यासविषयीं बोलिलें. ॥ ८२२ ॥ त्यास दृष्टांत । **उद्धवासि** दावी **श्री**कांत । की अजनसंप्रयुक्त । नेत्र जैसा. ॥ ८२३ ॥ की जैसें जैसें घालावे अजन । तैसें तैसें अधिक पाहती नयन । एव आत्मज्ञानियास कथाश्रवणकीर्तन । जैसें जैसें घडे, तैसें तैसें तत्त्व दिसे. ॥ ८२४ ॥ म्हणूनि म्हणावे अजनयुक्त । तेथें म्हणे अजन-संप्रयुक्त । बरविया प्रकारे–प्रकर्षे–अजनें जे युक्त । तें **संप्रयुक्त** बोलावें. ॥ ८२५ ॥ अजन घालिता युक्त बोलिले । पुनःपुन्हा बरे घालितां सयुक्त जाले । अजनगुणे जैसे जैसे नेत्र पाहो लागले । तैसे तैसे अजनयुक्त होती ते प्रयुक्त. ॥ ८२६ ॥ दृष्टांतीं हा अर्थ दावी **पार्था** । दार्ष्टांतीं म्हणतां यथा यथा । तत्त्व पाहणे त्या फळीं म्हणतो तथा तथा । संप्रयुक्त शब्दार्थ ये रीती. ॥ ८२७ ॥ एवच **भाग**वतधर्म जैसा जैसा । घडों लागे, बाणे योगही तैसा तैसा, । सूक्ष्म वस्तूतें तैसा तैसा पाहे, याचा ऐसा । अर्थ दावी. ॥ ८२८ ॥ आणि इंद्रियातें न दिसे यास्तव । सूक्ष्म वस्तु म्हणे **माधव** । अन्यथा विचा-रितां वास्तव । अनत वस्तू लहान कैसी म्हणावी ? ॥ ८२९ ॥ तें असो प्र-स्तुतीं । **'मत्कर्म परम'** होईं म्हणे **अर्जुना**प्रती । की **उद्धवा**ते श्री**भागवतीं** । हाचि अर्थ सागितला. ॥ ८३० ॥ अभ्यासीं प्रत्यगवृत्ती । न करवे जरी अगा ! सुभद्रापती ! । तरी माझे जैसें जैसें श्रवण, कीर्तन करिती । तैसें तैसें लक्षिती आत्मस्वरूप. ॥ ८३१ ॥ म्हणूनि मत्कर्मपरम । तू होईं **अर्जुना**! म्हणे **पुरुषोत्तम** । मदर्थ कर्मेही करितां चित्ताचा उपरम । स्वरूपीं होतां सिद्धि पावसी. ॥ ८३२ ॥ **सिद्धि** तों तेचि निश्चित । **'मामिच्छाप्तुं ध-नंजय!'** म्हणूनि जें म्हणे **अच्युत** । मी विश्वरूपही चित्स्वरूप **भगवत** । त्या मातें पावावें म्हणूनि इच्छा तू धरीं. ॥ ८३३ ॥ विश्वात्मयोगीं

स्थिती । तेंचि पावणें सगुणाप्रती । की विश्वरूपेचि षड्‌गुण दिसती । **भग**-वत्स्वरूप सगुणाचे. ॥ ८३४ ॥ प्रस्तुतीं मत्कर्मे पावसी सिद्धी । म्हणिजे पावसी योगसिद्धी । ज्या योगीं समृद्धी । विश्वात्मतेची. ॥ ८३५ ॥ एवच पूर्वश्लोकी अभ्यासयोगेकरूनी । मज पावावयाची इच्छा करीं म्हणूनि । बोलिला, हा अर्थ त्यावरूनी । योगसिद्धि म्हणोनी येथें सिद्धीचा. ॥ ८३६ ॥ कीं विश्वात्मयोग उपासना । हेंचि पावणें सगुणा **जग**ज्जीवना । त्यास पावावया अभ्यासयोग ठाकेना । तरी मत्कर्मपरम होय, ऐसें बोलिला. ॥ ८३७ ॥ परतु होतां हें श्रवण । **अर्जुना**स त्या गोष्टीची जाली आठवण । दशमीं जें बोलिला करुण । रहस्य योग बिबायाचें. ॥ ८३८ ॥ **'एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्वतः'** म्हणोनी । **'सोविकंपेन योगेन युज्यते'** ऐसें स्वभावें करूनी । **'नात्र संशयः'** ऐसें निश्चित नेमुनी । हा योगसिद्धिउपाय बोलिला. ॥ ८३९ ॥ की या विभूतीतें आणि योगातें तत्त्वतां । जो जाणेल तत्त्वदृष्टि अगा ! **पांडुसुता** ! । तो अविकपयोगे पुरता । स्वरूपी योजतो हे निःसंशय. ॥ ८४० ॥ एवच विभूतिशक्तीचा अतिशय । योग म्हणिजे **ऐश्वरयोग** ऐसा निर्णय । जो नवमीं ज्ञानदृष्टी **ध**नजय । देखे म्हणता **'पश्य मे योगमैश्वरं.'** ॥ ८४१ ॥ आता **'एतां विभूतिं योगं च'** या श्लोकी योग । जरी म्हणावा चित्तचैतन्यसंयोग । तरी या योगाच्या जाणण्याचें फळ अविकपयोग । चित्तचैतन्ययोग तो म्हणावा. ॥ ८४२ ॥ एवच जे आपली अघटितघटना । की भूतें मजमाजी, मी भूती नसें **अर्जुना** ! । आणि मागुतीं म्हणे नाहींच हे भूतरचना । हा योग **ऐश्वर**च योग येथें. ॥ ८४३ ॥ ऐसा योग आणि या विभूति जाणे । त्यास **अविकंपयोग** म्हणजे अचळयोग बाणे । म्हणूनि दशमीं स्वमुखे **वि**श्वतोमुख म्हणे । ते स्मरण जाले **पा**र्थासी. ॥ ८४४ ॥ आणि होतां योगऐश्वराचें ज्ञान । थारे पद पावोनि पावला समाधान । परि अखडत्वें अद्वयानदानुसंधान । बाणलें नाहीं अखडत्वें **पा**र्थासी. ॥ ८४५ ॥ तदर्थ न शके करू अभ्यास । तरी मत्कर्मपरम होई ऐसें **श्री**निवास । बोलतां आठवला हा उपाय त्यास । अद्वययोग अचळ बाणावयाचा. ॥ ८४६ ॥ जो नृपासनीं बैसला । राजसेवा न करवे तयाला । अद्वयबोध जाला जयाला । कर्ममार्ग वाटे तया अशक्य. ॥८४७॥ प्राप्त जालिया राज्यपद । शक्ति असोनिही त्याचें पद । चालों न शकती, ऐसें सांप्रद । **अर्जुना**तें वाटलें. ॥ ८४८ ॥ कीं अद्वैतबोध मजला । याच्या प्रसादे समजला । आतां नीच पदवी ज्याची तें कर्म मला ।

---

१. अ० १०, श्लो० ७ पहा. २. अ० ९, श्लो० ५ पहा.

कां करू सांगतो हा भगवंत ? ॥ ८४९ ॥ आतां जो अद्वैत जाणे । त्यासही अविकंपयोग बाणे । तो सिद्ध म्हणूनि मज म्हणे । मत्कर्मपरम होय म्हणोनी. ॥ ८५० ॥ तरी उपाय योग बाणवयाचा । **'एतां विभूतिं योगं च'** या श्लोकें साचा । **'सोविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः'** म्हणूनि वाचा । या भगवताची बोलिली. ॥ ८५१ ॥ तरी तो कर्मातीत उपाय । मज अविकंपयोगसिद्धि नेदी काय ? । त्या उपायाचा जो असेल संप्रदाय । तोचि कां भगवत मज सांगेना ? ॥ ८५२ ॥ म्हणूनि वंदूनि पाय । अर्जुन पुसों म्हणतो उपाय । तों सर्वसाक्षी स्वयेचि तो संप्रदाय । बोलतो आता या श्लोकीं. ८५३

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

**अथ** म्हणिजे यानतर । कीं मत्कर्मे करिता सादर । सिद्धि पावसी म्हणूनि मी सर्वेश्वर । बोलिलों. ॥ ८५४ ॥ हें सुगम अत्यत परी । तेथेंही तू शक्त नव्हसी जरी । तरी अथ—याउपरांतिक—हें करीं । जें बोलतों आतां. ॥ ८५५ ॥ कीं माझ्या योगाचा आश्रित । आणि स्ववश आपले चित्त । ऐसा होऊनि करीं निश्चित । सर्व कर्मफलत्याग अर्जुना! ॥ ८५६ ॥ या श्लोकीं अर्थ इतकाच, परी । विचार सर्वकर्मफलत्यागावरी । करितां विरोध लागतो, तो परिहरी । त्यास सांपडे अर्थ याचा. ॥ ८५७ ॥ की सर्वकर्मफलत्यागीं अर्जुन । योजूनि, निष्काम त्याचें मन । आधीं केले, तेव्हां ज्ञान । उपदेशिलें तयातें. ॥ ८५८ ॥ **'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु'**[1] म्हणोनी । द्वितीयाध्यायांत या श्लोकेंकरूनी । कर्माच्या फळाचा त्याग सांगोनी । करविला फलत्यागसंकल्प. ॥८५९॥ मग अष्टमीं नवमीं ज्ञान । उपदेशी जगज्जीवन । एव आत्मज्ञानसंपन्न अर्जुन । फलत्यागेचि जाला. ॥ ८६० ॥ आतां कर्माचें फळ । टाकीं म्हणतो घननीळ । परि कर्मफलत्यागाची वेळ । पूर्वीच गेली. ॥ ८६१ ॥ फलत्यागे जालें ज्ञान । करू सांगतां ध्यान । कर्मफलत्यागाचें अभिधान । उचित नव्हे. ॥ ८६२ ॥ ऐसें असोनि येथें फलत्याग । काय बोलेल श्रीरग । हेंही असो मत्कर्म करी म्हणूनि भगवत्कर्मयोग । पूर्वश्लोकी बोलिला. ॥ ८६३ ॥ त्या कर्मी फलकामना । धरूनि, मदर्थ कर्मे करीं अर्जुना ! । ऐसें बोलिला म्हणावे तेव्हां या वचना । घडे सार्थकत्व, की पूर्वी सकाम, आता निष्काम करीं, म्हणतो. ॥ ८६४ ॥ पूर्वश्लोकीं तो नसे ऐसें । तेंही निष्काम, तेव्हां हें घडे कैसें ? । आतां

१. अ० २, श्लो० ४७ पहा.

श्लोकीं नसे, परि तात्पर्य काढावें तैसें। पूर्वश्लोकीं हा श्लोक नीट लावावया. ॥ ८६५ ॥ तरी हें मोक्षप्रकरण। सकाम कर्माची न सांपडे खूण। मदर्थ कर्में करितांही म्हणे नारायण। सिद्धि पावसी म्हणोनी. ॥८६६॥ सिद्धिशब्दें मुक्ती। अथवा ठसावें जेव्हां सर्वात्मभक्ती। ते सिद्धि जे जितांचि मुक्ती। विश्व भगवद्रूप पाहणें. ॥ ८६७ ॥ सिद्धिशब्दे या प्रकरणीं। नश्वर फलसिद्धि न वदे देववाणी। कर्मातीत सिद्धि तेव्हां तो चक्रपाणी। पूर्वश्लोकीं बोलिला, म्हणावें. ॥८६८॥ त्या निष्काम सिद्धीकारणें मत्कर्म। करीं म्हणे तें तों न म्हणवे सकाम। तेव्हां पूर्वश्लोकीं निष्काम। मत्कर्म बोलिला, ह्मणावा सर्वथा. ॥८६९॥ आतां पूर्वश्लोकीं म्हणे मत्कर्म। तीं कर्में म्हणावीं भागवतधर्म। आणि या श्लोकीं वर्णाश्रमोचित सर्व कर्म। फल त्याचे टाकी म्हणतो म्हणूनि जरी म्हणावें; ॥ ८७० ॥ तरी द्वितीय अध्याय, तृतीय, चतुर्थ, । पचमींही फलत्याग याच कर्माचा बोलोनि समर्थ। ज्ञान देऊनि मग कृतार्थ। करिता जाला पार्थातें. ॥ ८७१ ॥ अध्यात्मबोधे कृतार्थ। एकादशीं प्रथम श्लोकी वदे पार्थ। कीं गुह्य अध्यात्म मदनुग्रहार्थ। बोलिलास त्यानें गेला मोह माझा. ॥ ८७२ ॥ जो ऐसा आधीं निष्काम। करूनि स्वयें केला आत्माराम। त्यास आतां का बोलेल मेघश्याम?। सर्वकर्मफलत्याग करी म्हणोनी. ॥ ८७३ ॥ आणि पूर्वश्लोकी मत्कर्मपरम। होईं म्हणे तें वदला असता सकाम। तरी तद्विपरीत या श्लोकीं बोलता पुरुषोत्तम। तेंही न करवे, तरी करीं फलत्याग सर्व कर्माचा म्हणोनी. ॥ ८७४ ॥ ऐसीं याही अर्थी दूषणें फार। परि तीं बोलतां ग्रंथविस्तार। बहुत होतो प्रस्तुतीं श्लोकार्थविचार। अगत्य करणें. ॥ ८७५ ॥ तरी त्याचीं साधकें। आणि त्यांचीं बाधकें। दोन्ही गीतार्थसाधकें[1]। विचारावींच की. ॥ ८७६ ॥ आतां या श्लोकी सर्वकर्मफल। टाकी म्हणतो म्हणावें केवळ। तरी हा कर्मफलत्याग बोलतो मेघनीळ। ध्यानीं बुद्धिस्थिरत्वाकारणे. ॥ ८७७ ॥ **'मयि बुद्धिं निवेशय'** म्हणूनि। मजमाजि बुद्धि प्रवेशवीं ऐसें वदोनी। त्या पुढिल्या श्लोकेंकरूनी। म्हणे अभ्यासयोग करीं त्याकारणें. ॥ ८७८ ॥ त्यापुढील श्लोक। तेथें म्हणे उत्तमश्लोक। की अभ्यासही करू न शकसी तरी एक। मत्कर्मपरम तू होईं म्हणोनी. ॥ ८७९ ॥ कीं तेंही करू शकसी जरी। तरी कर्में माझीं तू करीं। आणि या श्लोकी तेंही न घडे तरी। सर्व कर्मफलत्याग सांगतो. ॥ ८८० ॥ एवंच ध्यानीं बुद्धिप्रवेशाकारणें। हे उपाय सांगितले नारायणें। तेव्हां सर्वकर्मफलत्याग बोलणें। ध्यानीं बुद्धि-

---

१. गीतेचा खरा अर्थ साधूं इच्छिणाऱ्याने.

प्रवेशालागीं, हें सिद्ध प्रसिद्ध. ॥ ८८१ ॥ तरी हा साधक । यास उचित बोधितो **बो**धक । की कर्मफलत्यागे निष्कलक । मन ध्यानीं थारतें. ॥ ८८२ ॥ परतु पुढिलिया श्लोकी ज्ञान बिबल्यानतर । कर्मफलत्याग बोलेल **सर्वे**श्वर । त्याचा याचा घडे विरोधपरिहार । तरी ध्यानार्थ हा अर्थ या कर्मफलत्यागाचाही घडो शके. ॥ ८८३ ॥ ध्यानाकारणें कर्मफल । टाकावें, हा अर्थ दिसतो निर्मळ । कीं कर्मफलत्याग काळ । जिज्ञासू, साधका, मुमुक्षूचा होय हा. ॥ ८८४ ॥ परतु **पार्थ** जाला ज्ञानी । तो फलत्यागेंचीकरूनी । ज्ञान पावला, आतां कर्मफलत्याग करीं म्हणोनी । बोलणें अयुक्त. ॥ ८८५ ॥ तेही असो, हाच कर्मफलत्याग । जो ज्ञानी ध्याननिष्ठ नि:संग । त्यास पुढिल्याच श्लोकीं बोलों पाहतो **श्री**रग । विरुद्ध तेथें होतो हा अर्थ. ॥८८६॥ **'ध्यानात्कर्मफलत्याग'** म्हणोनी । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** या श्लोकेकरूनी । ज्ञानिया ध्याननिष्ठासही हा त्याग उचित यावरूनी । कर्मफल त्यागीं न म्हणवे हा अर्थ उभयत्रही. ॥ ८८७ ॥ जो न त्यागी कर्मांचे फळ । तोचि त्याच्या चित्ताचा मळ । जो कर्मफलत्यागीं निर्मळ । तोचि ज्ञान पावतो. ॥ ८८८ ॥ तें ज्ञान अभ्यासापरीस उत्तम । ध्यान त्या ज्ञानाहूनि परम । त्यावरी म्हणेल पुरुषोत्तम । **'ध्यानात्कर्मफलत्यागः'** म्हणोनी. ॥ ८८९ ॥ जे या प्रस्तुत श्लोकीं टीकाकार । कर्मफलत्यागाचाच बोलती विचार । पुढिलिया श्लोकीं तेही फार । येविषयीं शकले. ॥ ८९० ॥ कीं कर्मफल टाकिल्याविना । ज्ञानचि सर्वथा होईना । तों त्याग ज्ञानिया ध्याननिष्ठ जना । म्हणणेंचि न लगे. ॥ ८९१ ॥ भात सिजलियावरी । तदुलकंडणादि वार्ता कां परी[१] । वृद्ध जालियाउपरी । त्याग बाल्याचा[१] ॥ ८९२ ॥ मध्यान्ही सूर्य दावूनि साचा । त्याग त्यावरी उदयाचळाचा । बोलतां जैसी वृथा वाचा । तैसा कर्मफलत्याग उत्तरश्लोकीं. ॥ ८९३ ॥ तेव्हां सर्वज्ञ **भ**गवत । ऐसें बोलेल हें न घडे निश्चित । ह्मणूनी जाले दुश्चित्त । ते टीकाकारही ये स्थळीं. ॥ ८९४ ॥ म्हणूनि तेही उत्तरश्लोकीं येथें म्हणती । कीं कर्मफलत्यागाची हे स्तुती । करितो ये स्थळीं **श्री**पती । की कर्मफलत्याग थारेऐसा वाटावा. ॥ ८९५ ॥ एवच मिथ्यास्तुती । **भ**गवत बोलतो, ऐसें बोलतो । सत्य म्हणतां **ज**गत्पती । विरुद्ध बोलतो म्हणावें लागेल यास्तव. ॥ ८९६ ॥ एवच अर्थ उकलेना जेथें । काय आणीक बोलावें तेथें । भक्तश्रेष्ठत्ववाक्य उडविती, तैसें येथें । हेंही **भ**गवद्वाक्य उडविती. ॥ ८९७ ॥ सगुणभक्त न म्हणवे ज्ञानी । हें साधावें म्हणोनी । यथोक्त अर्थ न करूनी । मिथ्यास्तुति म्हणूनी

---

१. खिन्न, बावरे.

बोलिले. ॥ ८९८ ॥ या अध्यायांत शेवटीं । कृष्ण म्हणे अगा! किरीटी! । जें माझिया पोटीं । तेच मी येथें वदलों यथोक्त हें॥८९९॥ 'ये[1] तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते' । ऐसें अतीं भगवद्वाणी बोलते । कीं झणी अर्थ भलतैसा भलते । भाव काढुनी येथें वाखाणितील. ॥ ९०० ॥ तरी यथोक्त हें धर्म्यामृत । जे उपासितील ते अत्यत । प्रिय मज म्हणे भगवत ! तेथें मिथ्यास्तुतीस अवकाश कैचा ? ॥ ९०१ ॥ आतां अगल्यास अर्थचि लागेना । तरी मिथ्यास्तुति म्हणावे या वचना । ज्या अर्थी भगवद्वाक्यरचना । तो सापडतां, कोण मानीन हा अर्थ? ॥९०२ ॥ आतां 'ध्यानात्कर्मफलत्याग' । उत्तरश्लोकी कैसा वाखाणावा हा त्याग । तरी कर्म आणि फलशब्दे सुख ऐसा विभाग । करूनि, दोन्हीं त्याग बोलतो म्हणावा. ॥ ९०३ ॥ 'ध्यानात्कर्मफलत्याग' म्हणे । की ज्ञानियासि जेव्हां ध्यान बाणे । तेव्हां अध्यात्मवेत्ते शाहणे । कर्मत्याग त्यायोग्य बोलती. ॥ ९०४ ॥ मुमुक्षु जोंवरी जिज्ञासु साधक । तोंचिवरी कर्माच्या फलाचा त्याग बोधी बोधक । तो ध्याननिष्ठ होतां त्याग एक । की तेव्हां उचित त्याग समूळ कर्माचा. ॥ ९०५ ॥ आणि विषयसुखवासना । न टाकवे ध्यानसुख सापडल्याविना । षष्ठीं हें स्पष्ट अर्जुना । ठाउकें जाले. ॥ ९०६ ॥ की जों न बाणे ध्यानयोग । तों वरी जो सुखत्याग । तो बलात्कारप्रसंग । मनावरी म्हणावा. ॥ ९०७ ॥ एवच कर्मत्याग । आणि दुसरा फलत्याग । फळ तेंचि कीं होऊनि विषयभोग । सुख वाटे. ॥ ९०८ ॥ हें याच श्लोकी विशद होईल । आणि पुढिल्या श्लोकीं हाचि बोलेल । विशद होईल अत्यत खोल । उत्तानार्थ[2] दिसतो हा नव्हे. ॥ ९०९ ॥ जो अर्थ होईल हाही उत्तान । परि खोल वाटे नव्हतां ज्ञान । की गहनही जळ न वाटे अत्यत गहन । जळचरातें. ॥ ९१० ॥ मताभिमानरहित जन । त्यांस खोलही अमृत गीताजीवन । कीं ते न करिती अन्यथा व्याख्यान । मताभिमानेंकरूनी. ॥ ९११ ॥ असो, आतां ध्याननिष्ठ जन । त्यांस जो त्याग बोलेल मधुसूदन । तो या श्लोकीं अर्जुनास बिबावया ध्यान । सिद्धांचा त्याग कां सांगे ? ऐसा पूर्वपक्ष. ॥ ९१२ ॥ याचें आधीं समाधान । होतां, रुचे यथार्थ अर्थाचें व्याख्यान । तरी धरिल्यावांचूनि शांति बाणे बिबतां ध्यान । ते पूर्वी बळे धरणें लागे शांति जयासी. ॥ ९१३ ॥ बिबतां सर्वात्मकध्यानयोग । घडे न करितां सर्व कर्मफलत्याग । हें ध्यान

---

१. पुढें श्लो० २० पहा. २. उथळ अर्थ, उघडा अर्थ.

बिंबावया **श्रीरंग** । त्याग दाटूनि करी म्हणतो. ॥ ९१४ ॥ समाधि बाणावया महदाश्रय । धरूं पाहे **धनंजय** । कीं दशमीं जाला निर्णय । तो मनीं धरिला **अर्जुनें**. ॥ ९१५ ॥ **'एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति'**[1] । या श्लोकीं बोलिला **जगत्पती** । कीं हा योग, या विभूती । जाणे तो अविकंपयोगें योजेल. ॥ ९१६ ॥ हें मनीं धरिलें **अर्जुनें** । तों हीं ऐकिलीं साधनें । निर्धनायोग्य साधनें तीं सधनें । आइकिलीं, जाला तो न्याय. ॥ ९१७ ॥ कीं अविकंपयोग बिंबायाचे साधन । विभूतींचें आणि **ऐश्वरयोगाचे** ज्ञान । तें तों मज आहे, मी मन । **भगवत्कर्मीं** तन्ही का घालूं ? ॥ ९१८ ॥ ऐसे साक्षी जाणे **अच्युत** । म्हणतो कीं हेही करूं न शकसी स्वहित । तरी बरें तू माझ्या योगाचाच आश्रित । होईं **अर्जुना** ! ॥ ९१९ ॥ या भावें **'मद्योगमाश्रितः'** म्हणोनी । आधींच **पार्थातें** वदोनी । **'सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु'** म्हणे यावरूनी । अर्थ ऐसा. ॥ ९२० ॥ **'ततः कुरु'** म्हणजे त्याकारणे करीं । सर्वकर्मफलत्याग म्हणे **हरी** । कीं मद्योगाचा आश्रित होणें जरी । तरी सर्वे कर्में आणि फलही टाकीं तू. ॥ ९२१ ॥ फळ सुखातें म्हणावें । कीं सुख नव्हे ज्याणें, तें निष्फल गणावें । येथें **फलशब्दें** जाणावें । विषयसुख. ॥ ९२२ ॥ कीं कर्मेंचि समूळ जो त्यागी । फल कैचें उरलें त्यागावया त्यालागीं ? । म्हणोनि **फलशब्दार्थ** या प्रसगीं । विषयसुखप्राप्ति ऐसें म्हणावें. ॥ ९२३ ॥ कीं विषय आधीं चित्तीं धरी । मग त्याचे सिद्धीकारणें भलतें कर्म करी । विषयसिद्धीची अपेक्षा तरी । सुखाचिकारणे. ॥ ९२४ ॥ एवं **फलशब्दार्थ** । विषयसुख यथार्थ । कीं कर्में आणि कर्मार्जित विषय होती व्यर्थ । सुख विषयांत जेव्हां न सापडे. ॥ ९२५ ॥ यत्नें मेळविली गोड साखर । तों शरीरीं उठला पित्तज्वर । कडू लागता म्हणे नर । सर्व निष्फल, कीं सुख न जाले. ॥ ९२६ ॥ चंदन यत्नें मेळवी नर । तों अंगीं संचरे शीतज्वर । उटी घेता कंप थोर । निष्फल म्हणे प्रयत्नप्राप्ति आणि विषयही. ॥ ९२७ ॥ यत्नें मेळवी तरुणी । तो षढ होय भोग आरंभाचे क्षणीं । निष्फल वाटती अंतःकरणीं । यत्न विषयासहित फल न होतां. ॥ ९२८ ॥ एवंच या प्रसंगीं फल विषयसुख । कीं त्यागास योग्य नव्हे सुख आणिक । जें ब्रह्मसुख फल विश्वतोमुख । तें त्यागप्रकरणीं बोलवेना. ॥ ९२९ ॥ त्यागास योग्य फल । विषयसुखचि जें चंचळ । एवंच या श्लोकीं हाचि अर्थ निवळ । कीं फळत्याग म्हणिजे त्याग विषयसुखाचा. ॥ ९३० ॥ सर्वे कर्मफलत्याग ।

---

१. अ० १०, श्लो० ७ पहा.

जो प्रस्तुतीं या श्लोकीं करू सांगे **श्रीरंग** । त्यांत कर्मे वेगळीं, फल वेगळे ऐसा विभाग । करिता अर्थ साधतो. ॥ ९३१ ॥ कीं सर्वकर्मांचा । आणि फलाचा म्हणिजे विषयसुखाचा । त्याग करी, ऐसी **भगवद्वाचा** । बोलतसे. ॥ ९३२ ॥ कर्मे टाकूनि सकळ । आश्रित माझ्या **ऐश्वरयोगाचा** केवळ । होय तू म्हणे **मेघनीळ** । जरी पूर्वश्लोकोक्त मत्कर्म करू न शकसी. ॥ ९३३ ॥ परतु अगा! कर्मत्याग दांभिकही । करी जो न करी कर्म कांहीं । परी विषयसुखत्याग अतरी नाही । तो बकध्यानवेष. ॥९३४॥ **'कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्'** या श्लोकी । तो मिथ्याचार दंभाचार या लोकी । ऐसें तृतीयाध्यायांत बोलिला कीं । कर्मत्याग तरी, जरी त्याग विषयसुखाचा. ॥ ९३५ ॥ म्हणूनि कर्मांचा । आणि विषयसुखरूपा फलाचा । त्याग करीं ऐसे **भगवताची** वाचा । पूर्वापर विरोधवर्जित बोलते. ॥ ९३६ ॥ विषयसुखाचा त्यागही । भोग सोडूनिही इच्छा असे जरी काहीं । तरी त्यागपण त्यासही नाहीं । तेव्हां विषयसुखेच्छात्याग हा फलत्याग. ॥ ९३७ ॥ एवच कर्मे टाकूनि सकळ । विषयसुख जे म्हणावे फल । दोन्ही टाकी म्हणोनि **घननीळ** । बोलतसे. ॥ ९३८ ॥ की त्याग **वेदोक्त** कर्मांचा । कर्मत्यागे सूचविला साचा । विषयसुखेच्छात्यागे लौकिकाचा । सूचविला त्याग. ॥ ९३९ ॥ आतां क्रिया सर्वही टाकिली । आणि सुखफलेच्छाही सोडिली । तरी योगसिद्धि ज्ञानियास जरी जाली । तरीच त्याग सफळ हे दोन्ही. ॥ ९४० ॥ आणि याच निमित्त । हे विधि, हे त्याग, बोलतो **अनंत** । आणि याच निमित्त दत्तचित्त । श्रवण करितो **पार्थही**. ॥ ९४१ ॥ तो **अर्जुन** ज्ञानी । परी योगसिद्धि व्हावी म्हणोनी । ज्ञानपरिपाकार्थ नानारीती दाऊनी । **भगवंत** बोलतो, तो ऐकतो. ॥ ९४२ ॥ परी त्याच्या हातास आले साधन । जे विभूतीचे आणि योगाचे ज्ञान । या प्रसंगीं ते **अर्जुन** । कैसा न आठवी? ॥ ९४३ ॥ ते आठवी **अर्जुन** । आणि **सर्वज्ञ** तो स्मरेच आपुले वचन । परि तें सकळ तेव्हां साधन । की त्यावेगळें सर्वही टाकी. ॥ ९४४ ॥ त्या योगातेंची मनीं धरी । त्यावीण अन्य कांहींच न करी । यास्तव कर्मत्याग, विषयसुखत्याग, **हरी** यापरी । म्हणतो करीं होउनि आश्रित योगाचा. ॥ ९४५ ॥ **'मद्योगमाश्रितः'** म्हणोनी । या श्लोकी या दो पदींकरूनी । माझ्या योगाचा आश्रित होउनी । करीं त्याग सर्वा कर्मांचा म्हणतसे. ॥ ९४६ ॥ आणि विषयसुखापेक्षा । टाकी तू अगा! स्वहितदक्षा! । परि योग माझा आत्मत्वें जों ये

---

१. अ० ३, श्लो० ६ पद्य.

लक्षा । तोवरी मद्योगाश्रित तू होईं, हा अर्थ. ॥ ९४७ ॥ कीं श्रीकृष्ण **'पश्य मे योगमैश्वरं'**[1] म्हणे । तेव्हां सर्व भगवद्रूप, ऐसें पार्थ जाणे । परंतु जडत्व-संस्कारे न बाणे । सर्वथा अविकपयोग सर्वत्र चित्स्वरूपीं. ॥ ९४८ ॥ तदर्थ सांगितला अभ्यास । जरी तोही न ठाके त्यास । सोडोनि तोही आयास । मत्कर्मपरम होईं, म्हणे भगवत. ॥ ९४९ ॥ परी करणे भगवत्कर्म । तत्कर्ममय भागवतधर्म । ज्यास कळले अपरोक्ष निर्धर्म । कर्म अवघड वाटे तयाते. ॥ ९५० ॥ त्यास योग बाणावयाचा । उपाय बोधी विभूतीसहित योगाचा । परतु जरी एकची याचा । असे योगाचा आश्रय. ॥ ९५१ ॥ हा थोर उपाय योग बाणायाचा । परी ऐसा संप्रदाय याचा । म्हणूनि म्हणते भगवतार्ची वाचा । की जरी करू न शकसी मत्कर्म पूर्वश्लोकोक्त. ॥ ९५२ ॥ तरी टाकूनि सकळ । धरी आश्रय योगाचा अचळ । ऐसा योगाश्रित होई निर्मळ । योग बिबतां तो विश्वरूपयोग तूचि भगवान. ॥ ९५३ ॥ **योग**शब्दे योग ऐश्वर । योगऐश्वर विश्वरूप चराचर । की विश्वरूप दाखविता स्वमुखे म्हणे सर्वेश्वर । **'दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरं'**[2] म्हणोनी ॥ ९५४ ॥ एव-च योग बिबे ऐसा जयास । मग तो योगचि तो की आत्मा जगन्निवास । आतां न बिबे तरी तो योग ऐसा बिबावयास । ज्ञान त्या विभूतियोगाचें. ॥ ९५५ ॥ तरी जो योग बिबता योगचि व्हावे । तो बिबेपर्यंत होऊनि आ-श्रित त्याचें असावे । आणि त्यावाचोनि कांहीं न करावें । न स्मरावें विषयसुख-फल कदापि, हा संप्रदाय. ॥ ९५६ ॥ पूर्वार्धी **'मद्योगमाश्रितः'** म्हणोनी । आदीं आश्रय स्वऐश्वरयोगाचा वदोनी । सर्व कर्मे सुखेच्छेसहित टाकी ऐसें उत्त-रार्धेकरूनी । याचि कारणें बोलिला. ॥९५७॥ आता योग बिबावया निमित्त । ऐश्वर योगाचे व्हावे कैसें आश्रित । हा अर्थ तोचि गीताकार भगवत । टीकाकार मुखे विश्वतोमुख बोलतो. ॥ ९५८ ॥ की मद्योग म्हणिजे माझा योग ऐश्वर । जो **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणूनि मी सर्वेश्वर । नवमीं बोलिलो, तू चतुर । जाणता जालास त्या योगाचा. ॥ ९५९ ॥ तो योगचि केवळ त्रिभूती । कीं त्या योगरूपीं चराचरी विविधविभूती । गुण विशेष देखोनि योगमूर्ती । ते मी म्हणे भगवत. ॥ ९६० ॥ ऐसा विभूतिमय योग जो जाणे । त्यास अविकप योग बाणे । परि बाणे तोंपर्यंत जे तुजसारिखे शाहणे । ते सर्व टाकोनि आश्रय याचाचि धरिती. ॥ ९६१ ॥ या योगास न बाणे जो ऐक्यनिश्चय । तोंवरीच म्हणावा आश्रय । म्हणूनि **आश्रित**शब्दार्थनिर्णय ।

---

१. अ० ९, श्लो० ५ पहा. २. अ० ११, श्लो० ८.

योग'बाणायाकारणें. ॥ ९६२ ॥ कळला की विश्वभगवद्रूप ऐश्वरयोग । आणि चित्तास चित्स्वरूपी नव्हे संयोग । तो बाणावया अविकंपयोग । साधन ज्ञान याच ऐश्वर योगाचें. ॥ ९६३ ॥ तें ज्ञान अविकंपयोगाचे । साधन म्हणूनि वाक्य भगवताचे । की धनचि साधन धन मेळवावयाचे । परतु जरी तें हातीचें नच जाय. ॥९६४॥ जरी ते मुद्दल होय जतन । तरी उदीम करितां मिळे बहु धन । तैसे हें ज्ञान ऐश्वर योगाचे साधन । अविकंप योग त्याच ऐश्वरयोगीं बाणाया. ॥ ९६५ ॥ परंतु हे योगज्ञान धन । तदाश्रित होतां होय जतन । जतन जालिया अविकंप मन । चिन्मात्र सर्व या योगी थारतें.॥९६६॥ म्हणूनि म्हणे भगवत । की माझ्या ऐश्वरयोगाचा आश्रित । तू होई ऐसा की हें विश्व सर्व निश्चित । रूप पड्गुण भगवताचे. ॥ ९६७ ॥ की जो योग ऐश्वर । अघटितघटनायोग मज सर्वेश्वर । नवमीं बोलिला तो योग हें चराचर । रूप माझिया सर्वेश्वराचे. ॥ ९६८ ॥ नवमीं म्हणे **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । एकादशीं **'शक्यसे द्रष्टुं'** या श्लोकी चतुर्थ चरणीं । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणे चक्रपाणी । एवच **योग**शब्दे स्वयें भगवान् विश्वरूप. ॥ ९६९ ॥ तोचि भगवत की हें चराचर भग । पाहे चित्स्वरूपी ऐसें की जैसें हेमीं नग । भग हे समस्त जग । आणि तद्युक्त चैतन्य भगवान् षड्गुण. ॥ ९७० ॥ कीं जो प्रकाशक **भग**शब्दवाच्य जगाचा । तो चिदात्मा आपुला आत्माचि साचा । सर्वप्रकाशक म्हणे देववाचा । प्रकाशक तरगां सर्वांचा समुद्र. ॥ ९७१ ॥ किवा जैसें कनक । सर्वा नगांचें प्रकाशक । कीं नाना घटांतें प्रकाशी एक । मृत्तिका जैसी. ॥ ९७२ ॥ एत्र अधिष्ठानाविण । न कळे विवर्ताची खूण । तैसें प्रपचास प्रपचपण । माझियाच आत्मयाकरितां. ॥ ९७३ ॥ ज्या रज्जूकरितां सर्पपण । त्या रज्जूवांचूनि न कळे त्याची खूण । अतीं सिद्धात ते रज्जूच आपण । सर्परूपें दिसतसे. ॥ ९७४ ॥ ज्यास न कळे दोर । तो म्हणेल सर्पची थोर । त्यास बोधितां म्हणावे हें सर्पशरीर । दोरीं असे. ॥ ९७५ ॥ परी बोधकास दोर ठावा । आणि जाणे सर्पाच्या अभावा । त्यानें तो दोर कैसा म्हणावा । जो नाहींच त्या सर्पी, तो असे, म्हणोनी. ॥ ९७६ ॥ आता मिथ्या सर्पाभास । म्हणूनि रज्जु नाहीं त्यांत, ऐसें वदावे त्यास । तरी तो म्हणेल आपणास । की नाहींच तरी प्रथम रज्जूत असे, म्हणता, हें न घडे. ॥ ९७७ ॥ तेव्हां उत्तर हेंचि त्याला । कीं रज्जु न कळतां तुज भासला । तुझ्या प्रत्ययाकडे पाहोनि, पहिल्या बोला । बोलिलों आम्ही. ॥ ९७८ ॥ एवच सर्प रज्जूत असे । परी सर्पी त्या तों

दोर नसे । आणि जेव्हां रज्जु दिसे । तेव्हां नाहींच कालत्रयीं तो सर्प. ॥ ९७९ ॥ या न्यायें **श्री**पती । नवमीं म्हणे भूतें मजमाजि असती । परी मी नसे त्या भूतीं । आणि भूतेंही नसती मजमध्यें. ॥ ९८० ॥ ऐसें असोनिही भूतें । **अर्जुना!** मजमाजीं दिसती तूतें । तें पाहें माझा योग ऐश्वर म्हणूनि ऐसें **भ**गवतें । बोलिले **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ ९८१ ॥ ऐसा अनुभव **श्री**पती । नवमीं देता जाला मजप्रती । तो योग ऐश्वर हाचि कीं दिसती । आत्मयामाजी भूतें चराचरे. ॥ ९८२ ॥ परी न थारे या अनुभवीं चित्त । कीं चित्स्वरूपची जग हें निश्चित । हें भग आणि तो **भ**गवत । जो आत्मरज्जु या जडसर्परूपे दिसतसे. ॥ ९८३ ॥ चित्त ऐसें थारे बरे । तेव्हां या ज्ञानाचें सार्थकत्व खरे । म्हणूनि हेंचि स्मरों मननरूपें आदरें । हे विश्व **भ**गवद्रूप म्हणोनी. ॥ ९८४ ॥ चित्स्वरूपची हें जड जग । की सुवर्णची सर्वेही नग । त्याचें प्रकाशक तेची, ऐसा योग । बाणणें अवघड कळोनिही. ॥ ९८५ ॥ तथापि मज कळले साच । कीं **भ**गवद्रूप प्रपच हाच। प्रपच म्हणता वाटते अहाच।उपदेश आठविता गुरूचा.॥९८६॥ स्मरोनि उपदेश मनीं । जो प्रपच दिसतो नयनी । हा **भ**गवद्रूपची म्हणोनी । कां न पाहावा सर्वदा ? ॥ ९८७ ॥ जों कारणदृष्टीं कार्य पाहे । तोंवरी समाधीच बाणला आहे । की कारणदृष्टीं सोनेंची होउनी राहे । अलकार. ॥ ९८८ ॥ चैतन्य कारण, जड कार्य । ऐसें न स्फुरे तरी **भ**गवताचें ऐश्वर्य । जग हे, स्वयें **भ**गवतचि माझा गुरुवर्य । या स्मरणेंची अविकपयोग पावेन मी. ॥ ९८९ ॥ ऐसें होणें निश्चित । त्या नांव **भ**गवद्योगाचा आश्रित । म्हणूनि म्हणे **भ**गवत । **'मद्योगमाश्रितः'** ऐसा होय म्हणोनी. ॥ ९९० ॥ आतां आश्रय ऐसाही धरी । आणि सर्व कर्मेही करी । चित्त त्याचें या स्मृतीवरी । सर्वदा न थारे. ॥ ९९१ ॥ विश्व हें **भ**गवत । ऐसें स्मरण न धरी चित्त । तो या योगाचा आश्रित । केवी म्हणवे ? ॥ ९९२ ॥ म्हणूनि सर्वकर्मत्याग । **'ततः कुरु'** म्हणजे त्याकारणें करीं म्हणे **श्री**रंग । कीं नव्हे तेव्हां योगाच्या आश्रितपणाचा भग । तदाश्रित होऊनि सर्व कर्मे जेव्हां टाकिसी. ॥ ९९३ ॥ टाकीं म्हणतां सर्व कर्म । टाकीं म्हणे सर्व धर्म । आणि होय मद्योगाश्रित हें वर्म । अनन्यशरणागतीचें दाखवी. ॥ ९९४ ॥ कीं **'सर्वधर्मान्परित्यज्य'** या श्लोकेंकरूनी । **'मामेकं शरणं व्रज'** म्हणोनी । अष्टादशीं बोलेल हेंचि उकलोनी । **अर्जुना**तें. ॥ ९९५ ॥ आधीं **'मन्मना भव मद्भक्तो'** म्ह-

---

१ अ० ९, श्लो० ४–५ २. वरवर. ३. अ० १८, श्लो० ६६. ४ अ० १८, श्लो० ६५.

णोनी । कर्माश्रित **भाग**वतधर्म त्या श्लोकेंकरूनी । अष्टादशींही श्री**कृ**ष्ण ऐसें वदोनी । मग **'सर्वधर्मान्परित्यज्य'** म्हणूनि बोलेल. ॥ ९९६ ॥ या द्वादशीं जे रीतीकरूनी । आधीं **'मत्कर्मपरमो भव'** ऐसें वदोनी । तेंही करून शकसी तरी आश्रित मद्योगाचा होउनी । या श्लोकीं टाकीं म्हणे सर्व कर्में. ॥ ९९७ ॥ जें येथें वदतो द्वादशीं । तेंचि वदेल अष्टादशीं । पुनरुक्ति बोलणें ये अशीं । म्हणूनि पुनरुक्त हे ऐसें अष्टादशीं बोलेल. ॥ ९९८ ॥ **'सर्वगुह्यतमं भूयः शृणु'** म्हणोनी । **'सर्वगुह्यतम'** पुन्हा आईक ऐसें वदोनी या श्लोकेंकरूनी । मग **'मन्मना भव'** या श्लोकीं **भाग**वतधर्म योजूनी । त्यापुढेंचि तिसरिया श्लोकी **'सर्वधर्मान्परित्यज्य'** म्हणेल. ॥ ९९९ ॥ हें ऐसें बोलणें द्वादशीं । म्हणूनि 'पुन्हा गुह्यतम ऐक' म्हणे अष्टादशीं । ऐसें असोनि अन्यथा या अशीं । जे येथें वाखाणिती; ॥ १००० ॥ त्यांस अष्टादशाच्या व्याख्यानीं । पुनरुक्ती **'भूयः'** शब्देंकरूनी । मागे कोठे हा अर्थ बोलिला हें न कळोनी । उगेचि **'तत्र तत्र'** म्हणूनि वदले. ॥ १००१ ॥ असो आतां **अर्जुन** ज्ञानी । आणि ऐश्वरयोगाचा जाणता म्हणोनी । **'मामेकं शरणं व्रज'** या **एक**शब्देंकरूनी । अष्टादशींही शरणागती हेचि बोलेल. ॥ १००२ ॥ कीं विश्व सर्परूप । मीच एक रज्जु चित्स्वरूप । जो मी ऐसा एकची विश्वरूप । ऐसिया एका मातें शरण ये. ॥ १००३ ॥ मग सर्वा पापापासुनी । मी तुज सोडवीन म्हणोनी । म्हणेल त्या **सर्वपाप**शब्देंकरूनी । संचित क्रियमाण बोलेल. ॥ १००४ ॥ होऊनि आत्मज्ञान । स्वरूपीं पावेल समाधान । तेव्हां संचित क्रियमाण । नाश पावती. ॥ १००५ ॥ हें अष्टादशीं विशद होणार । हाचि **भ**गवत बोलणार । कीं संचित क्रियमाण तेव्हां नाशणार । आत्मज्ञान बिंबे जेधवां. ॥ १००६ ॥ तरी तू ऐसा शरण । एकत्वें धरिसी माझे चरण । तेव्हां अविकंपयोगें अंतःकरण । विश्वात्मयोगीं स्थिर करीन मी तुझें.॥१००७॥ त्याचें हेंचि फळ । कीं संचित क्रियमाणें नाशती सकळ । ऐशिया कर्मनाशें मग केवळ । मोक्षचि कीं. ॥ १००८ ॥ एवच मोक्षास कारण ज्ञान । परि अविकंप योजे जरी मन । त्यास साधनें बहुत, त्यांत साधन । ज्ञान हें विभूतियुक्त ऐश्वर योगाचे. ॥१००९॥ परी त्यास कारण । सर्वही ईश्वर या भावें शरण । ते शरणागति ऐसी कीं स्मरण । उगेचि विश्व **भ**गवत म्हणोनी. ॥ १०१० ॥ स्मरण ऐसें राहे तरी । कीं सर्व धर्म टाकी जरी । मज तारक हें स्मरणची ऐसा आश्रय धरी । विश्व **भ**गवत या स्मरणाचा. ॥ १०११ ॥ म्हणूनि अ-

---

१. अ० १८, श्लो० ६४.

ष्टादशीं धर्मही इतर । टाकी म्हणेल **सर्वेश्वर** । तेंचि द्वादशीं म्हणे **श्री**धर । योगाश्रित सर्व कर्मे टाकी म्हणोनी. ॥ १०१२ ॥ आतां कर्मत्याग यानिमित्त । की ऐश्वरयोगाच्या आश्रयें राहे चित्त । परतु ऐशासही भ्रष्ट करी निश्चित । विषयसुखाची वासना. ॥१०१३॥ तें विषयसुखचि सर्वांच्या मतें फळ। म्हणूनि कर्मत्यागींच **मे**घनीळ । म्हणे कर्मत्याग करीं समूळ । आणि फलत्याग म्हणिजे सुखत्याग. ॥ १०१४ ॥ तोही सुखत्याग तों न घडे । कीं सुखजनक भोग टाकीं रोकडे । आणि चित्ताची मागुती उडी पडे । सुखेच्छेवरी. ॥ १०१५ ॥ एव सुखेच्छात्यागची त्याग हा । की सुखेच्छात्यागावीण असे सुखस्पृहा । अभिमानेंही सुखे महा महा । त्यागिती, परी स्पृहा मनीं त्या सुखाची. ॥ १०१६ ॥ एवच सर्व कर्मे आणि सुखस्पृहा । सोडितांची आठवे ऐश्वर योग हा । ते आठवण त्या निस्पृहा । आश्रित योगाचा करी अखडत्वे. ॥ १०१७ ॥ ह्मणूनि प्रस्तुत श्लोकी शेवटीं **भ**गवान् । होय म्हणे यतात्मवान् । आतां याचा अर्थही स्वये **श्री**मान् । बोलेल ऐसा. ॥ १०१८ ॥ यत म्हणिजे स्ववश जे संयत । आत्मा म्हणिजे चित्त । ऐसा पुरुष तो म्हणावा निश्चित । **यतात्मवान्. ॥ १०१९ ॥** की सर्व कर्मे आणि सुखेच्छाही । टाकूनि ऐश्वर योगाचा आश्रित नाही । त्यास फल नेदी हें काहीं । म्हणूनि यतचित्त आश्रित योगाचा होय म्हणे. ॥ १०२० ॥ या श्लोकाचा ऐसा अर्थ । प्रकारांतरे बोलती तो व्यर्थ । अर्थ बोलतां अनर्थ । मागिल्या पुढिल्या ग्रथास लागतो. ॥ १०२१ ॥ कर्मे करूनि टाकणें कर्मफल । हें तों अज्ञान असतां, **पा**र्थास बोलिला प्रांजल । आतां ज्ञानी, परतु तें बिंबे जो केवळ । तों हें साधन बोलतो. ॥ १०२२ ॥ **अर्जुन** ज्ञानी म्हणूनि अष्टादशीं । सर्वधर्मत्याग बोलेल तोच द्वादशीं । कर्मत्याग बोले येथें **अर्जुना**सी । स्पष्ट याहूनी अष्टादशीं बोलेल. ॥ १०२३ ॥ त्या प्रसगे सुखत्याग । त्यास म्हणे फलत्याग । पुढिल्या श्लोकींही सर्वकर्मफलत्याग । बोलेल, हाच अर्थ त्याचाही. ॥ १०२४ ॥ कीं कर्मत्याग योगारूढास । अथवा आश्रित ऐश्वरयोगाचा जो तयास । म्हणूनि अष्टादशीं **ध**नजयास । **'मामेकं शरणं व्रज'** म्हणूनि बोलेल. ॥ १०२५ ॥ येथें **'मद्योगमाश्रित'** म्हणे । कीं ऐश्वरयोग विश्वचि हें ऐसें जाणे । परी हा योग अविकपयोगे जों बाणे । तोंवरी आश्रित होई ह्मणे योगाचा. ॥ १०२६॥ कीं विभूति आणि योग जाणे । त्यास अविकपयोग बाणे । ऐसें मागे **भ**गवत म्हणे । **'एतां विभूतिं योगं च'** या श्लोकी. ॥ १०२७ ॥ आतां **'एतां विभूतिं योगं च'** म्हणोनी । या श्लोकी विभूती आणि योग हे दोनी ।

येथें **'मद्योगमाश्रितः'** म्हणोनी । म्हणे तरी याच **योग**शब्देंकरूनी । विभूतिही न बोलतां बोलिला म्हणावें. ॥ १०२८ ॥ विभूतीसहितही जग । मागुतीं म्हणावें ऐश्वरयोग । यालागीं विभूति सूचवोनि **श्रीरंग** । **'मद्योगमाश्रित'** म्हणतसे. ॥ १०२९ ॥ एवंच त्याग कर्माच्या फलाचा । या श्लोकीं न बोले **भ**गवताची वाचा । त्याग कर्मांचाची साचा । आणि फलशब्दें सुखेच्छा हाची अर्थ. ॥१०३०॥ या **कर्मफलत्याग**शब्दाचा विचार । या दोन्हीं श्लोकी न कळतां बहुत टीकाकार । घाबिरे होउनि जे जे चमत्कार । करिती होती व्यर्थ ते. ॥ १०३१ ॥ कीं ऐसाच जो यापुढें श्लोक । **'ध्यानात्कर्मफलत्यागः'** म्हणूनि **उत्तमश्लोक** । म्हणेल त्याचाही अर्थावलोक । करितां, न दिसे या अर्थाबांचुनी. ॥ १०३२ ॥ आतां तो उत्तरश्लोक । किमर्थ बोलतो **उत्तमश्लोक** । त्याच्या निमित्ताचा वेगळा आधीं विवेक । बोलतां ग्रंथ वाढेल बहु. ॥१०३३॥ आणि पूर्वानुसंधान । बोलतां अर्थ होईल कठिण । विचार करितां शिणेल मन । श्रोतयांचें. ॥ १०३४ ॥ यालागीं उत्तरश्लोकाचा प्रथम चरण । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** म्हणुनि बोलेल **करुण** । त्याच्या निमित्ताचें विवरण । प्रथम बोलों. ॥ १०३५ ॥ त्यापुढे अनुसंधान । लागतां श्रोते पावती समाधान । आतां **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** म्हणोनि हें वचन । कां येथें बोलतो तें ऐका. ॥ १०३६ ॥ सगुणभक्त जे ज्ञानी । ते श्रेष्ठ संमत नुसतिया ज्ञानियांहूनी । ऐसें श्री**कृष्ण** आधीं बोलोनी । ज्ञानयुक्त भक्ति त्याची बोलिला. ॥ १०३७ ॥ **'ये तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्पराः'** म्हणे **चक्र**पाणी । हे भक्तिरीति बोलोनि वाणी । ज्ञानसूचके वचनें ऐसीं बोलिला. ॥१०३८॥ **'अनन्येनैव योगेन । मां ध्यायंत उपासते'** म्हणे **ज्ञान**घन । त्या पुढिल्या श्लोकीं जगज्जीवन । म्हणे **'तेषामहं समुद्धर्ता'** म्हणोनी. ॥ १०३९ ॥ कीं ज्ञानीच ते, जे उपासिती अव्यक्त । परी योग बाणतां होती क्लेशयुक्त । आणि जे ऐसे ज्ञानी भक्त । त्यांचा उद्धर्ता मी होतसें. ॥ १०४० ॥ कीं योगभ्रंशकर । द्वैतसंस्कार मृत्युससारसागर । त्यापासूनि सत्वर । करितों उद्धार भक्त ज्ञानी तयांचा. ॥ १०४१ ॥ तरी अर्जुनही ज्ञानी । त्यास बोलिला याचि भावेंकरूनी । की **'मय्येव मन आधत्स्व'** म्हणोनी । आणि **'मयि बुद्धिं निवेशय'** ॥ १०४२ ॥ कीं मी जो जगदाकार । तोचि मी, माझा योगऐश्वर । त्या मजमाजि मन ठेवीं स्थिर । आणि कारणीं चित्स्वरूपीं प्रवेशवीं बुद्धीतें. ॥ १०४३ ॥ कीं दृष्टीं देखे अलंकार । परि तें सोनेंचि ऐसा बुद्धीचा निर्धार । तैसें मनास वाटे विश्व भगवदाकार । बुद्धि लक्षी प्र-

काशक त्या आकृतीचें. ॥ १०४४ ॥ दृष्टीं देखे कठिण गार । रसनेसि उदक मृदु म्हणूनि निर्धार । तैसें मन म्हणे भगवदाकार । बुद्धि म्हणे चित्स्वरूप अवघें म्हणोनी. ॥ १०४५ ॥ **अर्जुन** आत्मज्ञानी । म्हणूनि ये रीती योजिला सगुणभजनीं । परी या अनुभवीं न थारे त्याचें चित्त म्हणोनी । प्रवृत्ति जाली त्या पुढिलिया श्लोकाची. ॥ १०४६ ॥ **'अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि'** म्हणे । कीं माझ्या ठायीं चित्तास स्थिरत्व हें जरी न बाणे । तरी अभ्यासयोगें मज पावों इच्छणें । पुनःपुन्हा प्रत्यग्वृत्ति हा **अभ्यासयोग.** ॥ १०४७ ॥ चित्स्वरूपीं थारतां प्रत्यग्वृत्ती । समाधियोगची त्यास म्हणती । न थारतां मागुती मागुती । चित्त लावणें तो **अभ्यासयोग.** ॥ १०४८ ॥ ऐशा अभ्यासयोगेकरूनी । मातें पावों इच्छीं, म्हणोनी । **श्री**कृष्ण बोलिला यावरूनी । शका **पार्था**स उपजली. ॥ १०४९ ॥ कीं ऐसा हा सगुण । ज्या सगुणीं अखड स्फुरे निर्गुण । ऐसिया अनुभवा पावे निपुण । तोचि यातें पावला. ॥ १०५० ॥ अन्यथा प्रपच सकळ । सगुणयोग ऐश्वरचि केवळ । परी न दिसतां त्यांत चित्स्वरूप निवळ । अनर्थकारक दर्शन प्रपचाचें. ॥ १०५१ ॥ त्या चित्स्वरूपीं अभ्यास । करूनि, मागुती पावावें याच सगुण प्रपचरूपास । यापरीस त्या चित्स्वरूपीं चित्तास । कां स्थिर करून नसावें? ॥ १०५२ ॥ वेंघोनि वृक्षावरी । फलचि पावणें सिद्धि जरी । न वेंघतां फल हाता लागे तरी । कां तरुवरी वेघावें? ॥ १०५३ ॥ न देतां बुडी सागरीं । मुक्ताफळें लागतां करीं । बुडी सागरीं कां परी । द्यावी पुन्हा? ॥ १०५४ ॥ मृगजळींही पावावे सूर्यकिरण । त्या किरणींच लागतां अंतःकरण । मृगजळास पावावया कारण । कां इच्छा करावी? ॥ १०५५ ॥ तैसें चित्स्वरूप अधिष्ठान । जे सगुणयोग ऐश्वर रूपीं प्रकाशमान । त्याच्या अभ्यासयोगेंच होणार समाधान । मग याच्या पावावयाची इच्छा कां परी? ॥ १०५६ ॥ ऐसें असोनि **हरी** । अभ्यासयोगे मज पावावयाची इच्छा करी । म्हणोनी म्हणतो कां परी? । ऐसा **अर्जुन** शकला. ॥ १०५७ ॥ **'अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं'** म्हणूनि कां म्हणतो[१] । ऐसा **अर्जुना**स शब्द तो । सशक करी. ॥ १०५८ ॥ तेथेंचि **अर्जुन** । या संशयें करू पाहे प्रश्न । तो एकापुढें एक साधन । बोलतां, अवसर प्रश्नास न दिसे. ॥ १०५९ ॥ एक साधन न टिके जरी । तरी आणिक एक साधन करीं । ऐसीं एकापुढें एक हरी । साधनें वदला ॥ १०६० ॥ म्हणूनी हें पुसणें राहिलें । परी हृदयांत होते लिहिलें । सर्वज्ञास

१. ईश्वरातें.

तों तेव्हांच कळले । परी साधनक्रम नेला शेवटा. ॥ १०६१ ॥ आतां अ-भ्यासयोगेंकरूनी । मज पावावयाची इच्छा करीं म्हणोनी । बोलतां, जे शंका पार्थाच्या मनीं । ते परिहरितो प्रथमचरणें या श्लोकीं. ॥ १०६२ ॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥**

अगा! प्रत्यग्वृत्तीचा जो अभ्यास । ज्ञान अद्वैत थोर त्यापरीस । ज्या ज्ञानें जाणणें माझ्या ऐश्वरयोगास । **अद्वैतज्ञान** त्यातें म्हणावें ॥ १०६३ ॥ तें ज्ञान श्रेय । अभ्यासापरीस हा निश्चय । ज्या ज्ञानें जड जगही चिन्मय । दिसे तोची योग ऐश्वररूप मी. ॥ १०६४ ॥ मज पावावयाची इच्छा करी । म्हणूनि बोलिलों यापरी । की मी अद्वितीय या चराचरीं । त्या मज पाहणे तें ज्ञान. ॥ १०६५ ॥ जों या ज्ञानातें न पावे । तों अद्वैतज्ञान सर्वथा न म्हणवे । अद्वैतज्ञानची मिरवे । ज्ञानपणें ॥ १०६६ ॥ जडनिषेधीं आत्माच कळे । आणि जडही चित्स्वरूप हें ज्ञान न कळे । आणि अभ्यासीं चित्तही वळे । तरी अद्वैत जाणणें उरलेचि म्हणावे तयातें. ॥ १०६७ ॥ या भावें म्हणे **ज्ञान**घन । की श्रेय अभ्यासापरीस ज्ञान । याचा विचार निर्मत्सर जन । करोत अभिमान टाकोनी. ॥ १०६८ ॥ कीं अविद्येचीं रूपे दोनी । एक **आवरण,** एक **विक्षेप,** म्हणोनी । आवरण नासे व्यतिरेकविद्येकरूनी । विक्षेप नासे अन्वयें. ॥ १०६९ ॥ त्यांत **अविद्याआवरण** । जें न जाणे आपण कवण । आणि चित्स्वरूपीं व्यापकी जडपण । दिसतें **अविद्याविक्षेपें.** ॥ १०७० ॥ जडा पटा अनुलक्षेकरूनी । पावतो ज्ञानस्वरूपा ततूतें ज्ञानी । तें म्हणावें **अन्वयज्ञान** म्हणोनी । तें नाशक तया विक्षेपाचें. ॥ १०७१ ॥ हा विक्षेप ऐसा दूरि होय । त्या ज्ञानाचें नांव अन्वय । तरग अवघे जलमय । चिन्मय जड जग दिसे ये रीतीं. ॥ १०७२ ॥ तेव्हा म्हणावें विक्षेप गेला । तेव्हांच अद्वैतबोध जाला । व्यतिरेके आत्मा जाणोनि अभ्यास केला । तरी उरलेचि आहे जड द्वैत. ॥ १०७३ ॥ जडावेगळा आत्मा एक । कळला तोही म्हणावा **व्यतिरेक** । मुख्य व्यतिरेक, एकीं नाहींच हें अनेक । कळणें ये रीती. ॥ १०७४ ॥ कीं अलकार दिसे । तो अवस्तु, म्हणूनी हेमी[1] न वसे । मुख्य व्यतिरेक पाहती ऐसे । जेंवी हेमनगाचा सर्वज्ञ संत. ॥ १०७५ ॥ सागरीं तरगाकार दिसे । तो अवस्तु यास्तव जळीं नसे । मुख्य व्यतिरेक पाहती ऐसे । जेंवी जलतरं-

१ - सुवर्णामध्यें.

गांचा सर्वज्ञ संत. ॥ १०७६ ॥ ततूमाजि पट दिसे । तो अवस्तु म्हणोनि ततूत नसे । मुख्य व्यतिरेक पाहती ऐसे । जेवि ततुपटाचा सर्वज्ञ संत. ॥ १०७७ ॥ मातीमध्यें घट दिसे । तो अवस्तु म्हणोनि मातींत नसे । मुख्य व्यतिरेक पाहती ऐसे । जेंवि मृत्तिकाघटाचा सर्वज्ञ सत. ॥ १०७८ ॥ कि-बहुना जैसे धातुमात्राचे नग । धातूत नसती म्हणावे, तैसें जग । चित्स्वरूपीं नाहींच, ऐसें कळतां, मग । व्यतिरेक अखंड सर्वदा. ॥ १०७९ ॥ परतु चित्स्वरूपीं जड नग । अन्वये कळे, धातूत जैसे नग । हा व्यतिरेक पाहणें मग । ठायीं पडे. ॥ १०८० ॥ तोंवरी जडावेगळा आत्मा एक । एकचि देही देहावेगळा कळे, तोही व्यतिरेक । कीं जड चैतन्य या दोहींचा होतांचि विवेक । सद्य आवरण नाशतें. ॥ १०८१ ॥ मी कोण हे न कळे मज । या आवरणाचा भग होतसे कळतां निज । जडसाक्षी चित्स्वरूप आपण हा उमज । होतां, आवरण नासतें. ॥ १०८२ ॥ ऐसें नाशले आवरण । चित्तीं जालेंचि स्फुरण । प्रत्यग्वृत्ति पुन:पुन्हा योजणें अतःकरण । त्यास म्हणावा **अभ्यास.** ॥ १०८३ ॥ अभ्यास जो ये रीती । त्याहूनि ज्ञान श्रेय म्हणे **श्री**पती । कीं विना अद्वैत ज्ञान मागुती । जड द्वैत दिसे अभ्यासकास पाहतां. ॥ १०८४ ॥ यालागीं आत्मा कळलियावरी । जड द्वैत उरलें असेच जरी । त्यास ज्ञान जालें, ऐसी वैखरी । संतांची न बोले. ॥ १०८५ ॥ एवंच कळावया जडचैतन्यैकत्व । आदीं जाणावें आत्मतत्त्व । परतु जड द्वैत असतां, त्या ज्ञानास महत्व । ज्ञानपदवीचे नये सर्वथा. ॥ १०८६ ॥ जरी जडनिषेधे जे स्वरूपस्फुरण । तेंचि म्हणावें सर्वात्मबोधाचे कारण । तरी जों न कळे जडचैतन्यैक्यखूण । ज्ञान न म्हणवे त्या ज्ञानातें. ॥ १०८७ ॥ ऋतुस्नात जालियाविना । संतान सर्वथा होईना । परतु पुत्रवती न वाटे जना । पुत्र न होय तोंवरी. ॥ १०८८ ॥ आत्मा निषेधशेष कळल्याविना । सर्वात्मज्ञान सर्वथा होईना । परी तें होय जों, तों सज्जना । ज्ञान केवि म्हणवे तितकियाच बोधाते. ॥ १०८९ ॥ इतकियासही ज्ञान म्हणती संत । साळीस जेंवी म्हणती भात । परी कांडितां, रांधितां, पाक यथोचित । होतो, भात सत्य तो म्हणावा. ॥ १०९० ॥ परतु जो न पिकती साळी । भात नव्हे कवणे काळीं । तथापि कोण मिथ्या जिव्हा विटाळी । साळींच रांधिला भात म्हणोनी? ॥ १०९१ ॥ आधीं वृक्षास येतसे फूल । मग फुलाचेंच होय फल । परि फूलचि केवळ फल । कोण म्हणे? ॥ १०९२ ॥ दृष्टांत ऐसे फार । स्थळस्थळीं सूचती अपार । परंतु ग्रथ वाढता, विचार । दार्ष्टांतिकाचा अतरतो.

॥ १०९३ ॥ प्रस्तुतीं अभ्यासाहुनी । ज्ञान श्रेय म्हणोनी । श्रीकृष्ण म्हणे यावरूनी । कीं अद्वैत कळणें ज्ञान तें. ॥ १०९४ ॥ जरी आत्मा कळला । आणि अभ्यासीं मनोभावही वळला । तथापि प्रपच देखतां खवळला । द्वैत-भाव. ॥ १०९५ ॥ तें न म्हणवे ज्ञान । परंतु कलियुगीं कोणी ज्ञानाभि-मान । वाखाणिती नसोनिही समाधान । बाह्य कृतकृत्यता दाविती. ॥१०९६॥ म्हणती जडावेगळा आत्मा कळलियावरी । मग कांहींच उरली नाहीं उरी । जड जग दिसतें, तरी । हें नश्वर मिथ्या. ॥ १०९७ ॥ त्यांसी काय बोलोनि फार । पुसावा एकची निर्धार । कीं नश्वरा जडाविकारीं निर्विकार । चित्स्वरूप कैसें पाहावें? ॥ १०९८ ॥ नश्वरी अविनाश वस्तु दिसे । तेव्हां कनक नित्य नश्वर नगीं वसे । मग जडी सर्वत्र उमटती ठसे । चित्स्वरूपाचिया अनुभ-वाचे. ॥ १०९९ ॥ मग नश्वर म्हणोनी । मिथ्या म्हणणें नलगे त्यावरूनी । की नग मिथ्या कनका सत्यावांचूनी । न दिसे, तैसें विना चैतन्य जगही. ॥ ११०० ॥ जरी ऐसें जडीं चैतन्य दिसे । तरी कां चावळतील ते ऐसे? । यालागीं शाहणा इतकेंचि पुसे । की नश्वरीं व्यापक अविनाशी कैसें पाहावें? ॥ ११०१ ॥ बरे, नश्वर म्हणोनी । मिथ्या म्हणतां तुम्ही ज्ञानी होउनी । तरी असत्यात सत्य कोण्या अनुभवेकरूनी । पाहावें? सांगा अजी ! ऐसें पुसावे. ॥ ११०२ ॥ असत्यांत सत्य न दिसे । तोंवरी असत्यपण मानितां कैसें? । जों कनक अलकारीं न गवसे । तोंवरी सत्यचि तो अलकार. ॥ ११०३ ॥ नासतें म्हणूनि असत्य । तथापि असत्यांत असावेंच कीं सत्य । हे गोष्टी तों त्यासही अगत्य । अगीकारणें लागेच कीं. ॥ ११०४ ॥ मुक्ताफळाची माळ । अज्ञान्यास वाटे महाव्याळ । त्या सर्पास टाकूनि पळती बाळ । ते अभाग्य कैसे न म्हणावे ? ॥ ११०५ ॥ अलंकार मिथ्या म्हणोनी । सोन्यासहित त्यातें टाकूनी । अभाग्य निश्चित बैसती ये रीती करूनी । अधिष्ठानासहित टाकिती निषेधूनि जग, मिथ्या मानितां. ॥ ११०६ ॥ अरे ! हो कां तें नश्वर । परि त्यांत कैसा पाहावा परमेश्वर ? । जो आपणातें चराचराकार । कल्पितो. ॥ ११०७ ॥ हे सगुण सर्वेश्वराची खूण । न कळे, तरी असो नुसतें नि-र्गुण । अविनाशी नश्वरीं तुम्ही निपुण । पाहतां केंवी ? ॥ ११०८ ॥ एवंच व्यतिरेक नाममात्र । जडावेगळा आत्मा कळला जरी एकत्र । तरी तें नव्हे ज्ञान, जों सर्वत्र । जडीं चिदात्मा स्फुरेना. ॥ ११०९ ॥ जेथें सचेतनता दिसे । तेथेंचि स्वदृष्टांतें अनुमानें वाटे आत्मा असे । जडतरंगीं ज्ञानार्णव

समरसे । तें न कळोनिही, नश्वर म्हणोनि इतकेंचि मिथ्या मानिती.॥१११०॥ जरी जडावेगळा । जडसाक्षित्वें आत्मा कळला । तोही व्यतिरेक होय परि त्याला । मुख्य व्यतिरेक म्हणवेना. ॥ ११११ ॥ कीं आत्मा ततु, जड पट, । तेव्हां पट नसे, तंतूचि असे निपट, । व्यतिरेक अन्वयांतही उत्कट । ये रीतीचा. ॥ १११२ ॥ न कळे ऐसे जोंपर्यंत । आणि घडे प्रत्यक् अभ्यासही अत्यंत । तरी त्याहूनि श्रेय म्हणे भगवंत । ज्ञान म्हणूनि, त्याचा अर्थ हा. ॥१११३॥ हा प्रथम चरणाचा अर्थ । समजोनि ये रीती यथार्थ । जाला निःसंदेह पार्थ । म्हणतां **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** म्हणोनी. ॥ १११४ ॥ समजला कीं जड प्रपच आणि आत्मा चैतन्य । वेगळीं नसतीं अन्योन्य । या ज्ञानें नुरे कांहींच अन्य । तेव्हां ज्ञान याच ज्ञानातें म्हणो ये. ॥ १११५ ॥ **'ते[2] ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं'** या श्लोकेंकरूनी । ब्रह्म जाणती आणि तें ब्रह्म सर्व म्हणोनी । जाणती, म्हणे भगवत यावरूनी । ज्ञान म्हणावे या ज्ञानातें. ॥ १११६ ॥ केवळ अनादि जैसे । प्रपचाकारही होणें अनादि तैसें । दों परी जो नेणे, त्यास कैसें । म्हणावें ब्रह्मज्ञान. ॥ १११७ ॥ ऐसें असोनिही जरी । आत्माच कळे आधीं, तरी । असावीच कळावयाची उरी । की जालाच पाहिजे मज सर्वात्मबोध. ॥ १११८ ॥ त्यास कळेल केव्हां, कीं जग । ब्रह्मचि म्हणूनि मग । देखेल एकत्वें जगनग । ब्रह्महेमीं. ॥ १११९ ॥ तेव्हां सर्वात्मक ज्ञानरूप । हाचि सगुण भगवंत विश्वरूप । हेंचि याचें योग ऐश्वरूप । विश्वरूप दावितांही कळले बरें. ॥ ११२० ॥ **'दिव्यं ददामि ते चक्षुः'** या श्लोकेंकरूनी । **'पश्य मे योगमैश्वरं'** ऐसें वदोनी । विश्वरूप दाखविलें यावरूनी । योग ऐश्वर याचा हेंचि विश्व. ॥ ११२१ ॥ तो नवमीं योग ऐश्वर । मज बोधिता जाला हा सर्वेश्वर । एव ज्ञानशब्दाचा अर्थविचार । योग ऐश्वरच होतसे. ॥ ११२२ ॥ **'मत्स्थानि[3] सर्वभूतानि । न चाहं तेष्ववस्थितः'** ऐसें वदोनी । **'[4]नच मत्स्थानि भूतानि । पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनि नवमीं दाविलें. ॥ ११२३ ॥ रज्जूत सर्प भासे । परि रज्जु तो नाहींच, त्या सर्पी नसे, । बरे पाहतां न दिसे । सर्पही रज्जूत. ॥ ११२४ ॥ ऐसें चित्स्वरूपीं चराचर । तेव्हां हाचि ज्ञानशब्दार्थनिर्धार । तेव्हां हाचि योग ऐश्वर । हें विश्वरूपचि रूप या सगुणाचें. ॥ ११२५ ॥ अभ्यासयोगापरीस । श्रेष्ठत्व कोटिगुणें या ज्ञानास । एव अ-

---

१. मिळून असतो, सर्वत्र भरून आहे २ अ० ७, श्लो० २९. ३. अ० ९, श्लो० ४. ४. अ० ९, श्लो० ५.

भ्यास करूनि या सगुणास पावावयास । इच्छा करावी ते ऐसी. ॥ ११२६ ॥ शंका ऐसी अर्जुनास । कीं **'अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं'** म्हणूनि आपणास । देव बोलिला, तरी अभ्यासें स्वरूपींच राहों कां यास । पावावयाची इच्छा धरू अभ्यासें स्वरूपाच्या. ॥ ११२७ ॥ त्यास हें समाधान । की मज पावणें, तें हेंचि, की मी विश्वाभास, मीच अधिष्ठान, । अनुभव ऐसा या नांव ज्ञान । श्रेय हें ज्ञान नुसत्या चिदात्माभ्यासापरीसही. ॥ ११२८ ॥ म्हणूनि करूनि अभ्यास । त्या अभ्यासें ज्ञाननामका आपणास । पावावयाची इच्छा धरीं ऐसें मी जगन्निवास । बोलिलों **'मामिच्छाप्तुं'** म्हणूनि या भावें, भाव हा. ॥ ११२९ ॥ **अर्जुन**ही सर्वात्मक ज्ञानी । परि हें अविकपयोगे बाणावे म्हणोनी । सर्वात्मका मज पावावयाची इच्छा धरीं अभ्यासेंकरूनी । बोलिला कीं त्या अभ्यासापरीस श्रेय हें ज्ञान. ॥ ११३० ॥ ऐसा **अर्जुन** समजला । परतु मागुती कांही शका पावला । त्या शकापरिहारार्थ बोलिला । चरण दुसरा भगवत. ॥ ११३१ ॥ परतु प्रस्तुत प्रथमचरण । वाखाणितां ऐसें जाले निरूपण । कीं विश्वब्रह्म पावती निपुण । ज्ञान म्हणावें त्याच अद्वैतबोधातें. ॥ ११३२ ॥ इतर टीकाकार । बोलती येथें प्रकारांतर । अभ्यास शब्दाचा अर्थविचार । न बोलती ऐसा. ॥ ११३३ ॥ त्यांच्या मतें जडावेगळा । जडसाक्षी आत्मा जेव्हां कळला । तेव्हांच अपरोक्षबोध फळला । ज्ञान नांव त्याचेचि. ॥ ११३४ ॥ येथें जो अभ्यास बोलिला । तो प्रत्यग्वृत्ति स्वरूपीं न म्हणवे त्याला । की आधीं ज्ञान म्हणिजे स्वरूपबोध ज्यास जाला । त्या ज्ञानियानें तो करावा अभ्यास ॥ ११३५ ॥ ज्ञान जालियाउपरि अभ्यास । तेव्हां ज्ञान श्रेय कैसें अभ्यासापरीस? । संदेह ऐसा वाटतां तयांस । बुद्धि त्यांची विपरीत अर्थी धांविली. ॥ ११३६ ॥ कीं आत्मज्ञान नसतां शास्त्राद्यभ्यास । ज्ञान श्रेय त्यापरीस । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** या चरणास । वाखाणिती ये रीती. ॥ ११३७ ॥ तरी या प्रसंगीं **अर्जुनास श्रीरग** । बोलिला मागे अभ्यासयोग । त्या **अर्जुना**चा तों आवरणभग । जाला गेली द्विविधही अविद्या. ॥ ११३८ ॥ **'मदनुग्रहाय परमं'**[1] या श्लोकेंकरूनी । गुह्य अध्यात्म मज सांगितलें त्यावरूनी । मोह गेला म्हणोनी । एकादशीं प्रथमश्लोकीं **अर्जुन** बोलिला. ॥ ११३९ ॥ तेव्हां आत्मा कळला ज्या **अर्जुना**ला। अभ्यास हा बोलिला त्याला । तो प्रकरणप्रसंग सोडोनि जाला । प्रसंग नाहीं ज्याचा तो अर्थ. ॥ ११४० ॥ ज्ञान नसतां जो शास्त्राद्यभ्यास । ज्ञान थोर

१. अ० ११, श्लो० १.

त्यापरीस । बोलावया या वचनास । निमित्त नाहीं. ॥ ११४१ ॥ ज्या अर्जुनास । मागे बोलिला अभ्यास । ज्ञान अपरोक्ष दिधलेंची त्यास । ते **'मदनुग्रहाय परमं'** या श्लोकीं तोची वदला. ॥ ११४२ ॥ जो सांगितला चिदभ्यास । ज्ञान श्रेय त्याच परीस । अर्थ याचा न लगे म्हणोनि आयास । लागला अर्थ साधाया. ॥ ११४३ ॥ कीं पूर्वश्लोकीं **श्री**रंग । बोलिला कर्मफलत्याग । त्याचा मिथ्या स्तुतिप्रसंग । **भ**गवत बोलतो या श्लोकीं, ते ऐसें म्हणती. ॥ ११४४ ॥ तरी सर्वा उपनिषदांचा सिद्धांत । मथूनि **वेदवे**दांत । सार यथार्थ तेचि **भ**गवत । या **गी**तेंत उपदेशी. ॥ ११४५ ॥ तत्रापि अध्यायाच्या अती म्हणे **ह**री । कीं यथोक्त धर्मामृताची उपासना करीं । तो मज **अर्जु**ना प्रिय चराचरीं । ऐसा **यथोक्त**शब्दही न साहे हा अर्थ. ॥ ११४६ ॥ **यथोक्त** म्हणिजे जें जैसें बोलिलों तैसा । भावही माझा, अर्थ ऐसा । यावरूनि येथें बोलवेल कैसा । शब्दार्थास विपरीत भावार्थ ? ॥ ११४७ ॥ जैसा अर्थ तैसाचि भाव । या अध्यायात म्हणूनि **दे**व । **यथोक्त**शब्दे स्वयमेव । अर्थी अर्थ विरुद्ध कल्पना निषेधी. ॥ ११४८ ॥ त्याग कर्माचिया फलाचा । केला मनें कायावाचा । तेव्हां मुमुक्षु जिज्ञासु बोलावा साचा । तो येथें अपरोक्षानुभव बिबल्याउपरि कां बोलेल ? ॥ ११४९ ॥ अभ्यासापरीस श्रेय ज्ञान । ज्ञानाहूनि श्रेय ध्यान । मग कर्मफलत्याग, मिथ्या हें स्तवन । करितो **भ**गवत, ऐसें बोलती. ॥ ११५० ॥ या **गी**तेंत मिथ्यास्तुती । **भ**गवत करितो ऐसें वाखाणिती । आणि **यथोक्त**शब्द या अध्यायाच्या अंतीं । कोण अगीकारील हा अर्थ ? ॥ ११५१ ॥ एव विहित कर्मत्याग समूळ । आणि बाह्यसुखस्पृहानामक फल । या दोहींचा त्याग निवळ । बोलिला येथें हाचि मुख्यार्थ ॥ ११५२ ॥ योगारूढासि हा त्याग । अथवा ज्ञानिया शरणागतास बिबावया योग । कीं सर्व टाकूनि जो विश्वरूपी **श्री**रंग । शरण तया एका जगदात्मकातें. ॥११५३॥ न बिंबे तरी त्या सर्वात्मयोगाचा । एकत्वेंकरूनि आश्रय साचा । त्याग कर्माचा आणि सुखस्पृहेचा । करावा, हा त्यास उचित ऐशा अपक्कातेंही. ॥ ११५४ ॥ **'सर्वधर्मान् परित्यज्य'** या श्लोकेंकरूनी । **'मामेकं शरणं व्रज'** म्हणोनी। अष्टादशीं सविस्तर तेंचि निरोपूनी । पूर्वश्लोकीं येथेंही संक्षेपें बोलिला. ॥११५५॥ साधकदशे ये रीती । कर्मत्यागें बाणे योगस्थिती । सिद्धदशेचा त्याग साधकाप्रती । अनन्य शरणागतीकारणें बोलिला. ॥ ११५६ ॥ हें पूर्वश्लोकनिरू-

---

१ अ० १८, श्लोक ६६. २ निरूपण करून, सागून

पण । या श्लोकीं अर्जुनशंकानिवारण । की अभ्यासापरीस थोरपण । सर्वात्मक ज्ञानातें. ॥ ११५७ ॥ अभ्यासयोगेंकरूनी । मज पावावयाची इच्छा करीं म्हणोनी । सगुणभक्तिमहिमा बोलोनी । त्या प्रसंगीं ऐसें मागे बोलिले. ॥ ११५८ ॥ तरी पुरुषार्थ, हा की पावणें चित्स्वरूपास । करितां त्या स्वरूपीं अभ्यास । कां इच्छावें सगुणमायाशबलितास । पावावें म्हणोनी? ॥ ११५९ ॥ ऐसा अर्जुन शंकला । की हें रहस्य ठाउकें नव्हतें तयाला । जो सर्वात्मताज्ञान पावला । तोचि पावला सगुणयोग ऐश्वर्यरूपातें. ॥११६०॥ म्हणूनि अभ्यासाहुनी । श्रेय ज्ञान म्हणोनी । बोलेल तो श्रीकृष्ण या प्रथमचरणेंकरूनी । कीं **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'**. ॥ ११६१ ॥ सर्वात्मज्ञान सगुण । तें जाणे तोची निपुण । प्रत्यग्वृत्ति अभ्यासें पाहे निर्गुण । श्रेय सर्वात्मज्ञान त्याहुनी. ॥ ११६२ ॥ परतु सगुण भक्तीचे तत्त्व । सगुणपणाचें महत्त्व । न कळे ऐसें त्यांस, ज्यांस निर्गुणत्व । नुसतें आवडे. ॥ ११६३ ॥ त्यांस गीतार्थ दुर्घट । हा अध्याय तों अकळ[1] निपट । येथें त्यांस पडली हेचि खटपट । की जैसे-तैसे[2] श्रेष्ठ निर्गुणोपासक करावे. ॥ ११६४ ॥ सर्व वासुदेव, ऐसें ज्ञान । हेंचि भगवद्रूप, हें समाधान, । ज्यास असे, त्यास हें निधान । सांपडे भक्तिअजनें-करूनी. ॥ ११६५ ॥ आतां ज्ञानशब्दाचा शोध । ऐसा जाला कीं ज्ञान सर्वात्मबोध । या अर्थास लवलेश विरोध । न दिसे अनुभवे, युक्तीनें, प्रमाणेंही. ॥११६६॥ त्यांत अनुभव ऐसा, कीं जड चैतन्य । एकत्वे दिसेना, तों जड द्वैत अन्य । देखे ततु जड पटाचा तोचि धन्य । अनुभव ये रीतीचाच तें ज्ञान म्हणावें. ॥११६७॥ आपण जडाचें अधिष्ठान । जड विवर्त्त ऐसें समाधान । त्यातेंचि म्हणावे ज्ञान । अनुभव अंगे ये रीती. ॥ ११६८ ॥ हा युक्तिसिद्ध अनुभव । सर्व वेदाश्रित युक्तिवैभव । गुरुमुखे कळतां अभिनव । कार्यजड दिसे कारणचैतन्यमात्र. ॥ ११६९ ॥ वेगळी पाहतां दिसे दसोडी । तेचि दिसोन, न दिसे लक्षितां पासोडी । तेव्हां ततु कळोनिही न सोडी । दृष्टि पटभ्रांति, ऐसें म्हणावें. ॥ ११७० ॥ ऐसा आत्मा जडावेगळा । कळोनिही जडींच जड-प्रकाशक कळला । चिदात्मा न कळे, तों विफळा; । ते विद्या जिणें ओळखिलें निषेधशेष. ॥ ११७१ ॥ एकादशस्कंधीं भागवती । भगवत सनकादिकांप्रती । हंसरूपे वदे येच रीती । तो परिसा प्रसंगे हा श्लोक. ॥ ११७२ ॥

---

१. न समजण्याजोगा, गहन, गूढ. २. कसेतरी.

श्रीमद्भागवतएकादशस्कंधश्लोक—

**यावन्नानात्मधीः पुंसो न निवर्त्तेत युक्तिभिः।**
**जागर्त्यपि स्वपन्नज्ञः स्वप्ने जागरणं यथा॥**

हंसरूपें म्हणे हरी। कीं नानात्व आहे जोवरी। अज्ञान तोंवरी नव्हे दुरी। तो जागतो जरी, तरी निद्रित मानावा.॥ ११७३॥ कीं जो ओळखेल आपणा। जागृत म्हणावे त्याच निपुणा। जो जडनिषेधे ओळखे आत्मपणा। तो जागा म्हणावा अगत्य.॥ ११७४॥ ऐसा जागा जरी जाला। आणि नाना जडभ्रम असे ज्याला। तो जागा असोनि असे निजला। ऐसें तीन चरणीं हंस म्हणे.॥ ११७५॥ आता जो जागा, तोचि निजला। म्हणतां श्रोते विरुद्ध मानितील या बोला। म्हणोनी दृष्टांतमुखें या वचनाला चतुर्थचरणीं सिद्ध करी श्रीहंस.॥ ११७६॥

चतुर्थचरण—**स्वप्ने जागरणं यथा॥**

स्वप्नीं देखे स्वप्नरचिता जगा। तेथें आपणातें म्हणे मी जागा। धांवे, फिरे, पाहे खगा मृगा। परी तो जागा न म्हणवे.॥ ११७७॥ ये रीती जाणे आत्मयातें। जागा म्हणों ये तयाते। परी नानात्वीं एकत्व न दिसे जयातें। तो निजलाची आहे म्हणावा.॥ ११७८॥ यालागीं जागाही म्हणावा। आणि निजलाही गणावा। त्यासी दृष्टांतही हाची जाणावा। कीं स्वप्नी जागा तोही निजेलाची.॥ ११७९॥ प्रपच स्वप्नकल्पना। आपल्याच मायेनें रचिली नाना। त्या अनेकीं एक आपण, हें कळेना। तो स्वप्नचि देखतो.॥ ११८०॥ स्वप्नप्रपंचाची रचना। स्वस्वरूपीं स्वमानसाची कल्पना। त्यांत एका स्वदेहाविना। पारिखेंची मानी.॥ ११८१॥ तैसा आपण अधिष्ठान। आपलीच शक्ति माया त्रिगुण। जडा तरगीं चित्समुद्र आपण। हे नेणे जाणूनिही आत्मता.॥ ११८२॥ तों स्वप्नी जागा जैसा। स्वस्वरूप जाणे तैसा। जों सर्व प्रपच आपणचि ऐसा। बोध नाहीं.॥ ११८३॥ ऐसा **भाग**वतश्लोक। हंसरूपे वदला हाचि उत्तमश्लोक। येथेंही कोणी लोक। कांहीं विपरीतची बोलती.॥ ११८४॥ जे जडभागाच्या निषेधे। आत्मा समजोनि त्याच वेधें। कृतकृत्य मानिती तितक्याच बोधे। ते म्हणती इतकियानेंच जाला सर्व बोध.॥ ११८५॥ जडप्रकाशक आपण। जडनगीं आपण चित्सुवर्ण। हे न सांपडली अन्वयज्ञानाची खूण। तरी कृतकृत्य ते म्हणती.॥११८६॥ म्हणोनि म्हणती जागा जाला। म्हणजे स्वहित करावे वाटलें

१. परके.

त्याला । परी नानात्वभेदें आहे निजेला । एवच तो आत्मा नेणे ऐसेंच साधिती. ॥ ११८७ ॥ जे ऐसें बोलती । एक पुसावें त्यांप्रती । की आत्मा कळला ते मती । समजली जडनिषेधमात्रातें. ॥ ११८८ ॥ तीस अन्वयें करूनी । जों न कळे विश्व ब्रह्म म्हणोनी । तोंवरी ते जागी की निजेली? हें विचारुनी । सांगा बरे. ॥ ११८९ ॥ जरी जागी म्हणावी । तरी नानात्व कां सत्य भावी? । निजेली म्हणावी तरी ठावी । आत्मसत्ता. ॥ ११९० ॥ आतां ते म्हणती ऐसें । की नानात्व ज्यास सत्यत्वें दिसे । त्यास आत्मसत्ता ठाउकी नसे । अगत्यास ऐसेंही बोलती. ॥ ११९१ ॥ तरी आधीं तंतु ओळखावा । मग पटाकार मिथ्यात्वे पाहावा । ततु ओळखूनिही नसे ठावा । मिथ्या पटाकार, म्हणोनि ऐसा कां असों नये? ॥ ११९२ ॥ बाळ ओळखे जळ । आणि भिऊ लागे देखोनि कल्लोळ । ऐसा जाणोनि आत्मा केवळ । जडैक्य नाही समजला, ऐसा का असो नये? ॥ ११९३ ॥ आतां आत्मसत्ता जाणे । आणि तोंडें नानात्व मिथ्या म्हणे । आणि असत्यांत सत्य कैसें आहे, हें नेणे । तें मिथ्यात्व म्हणणें शब्दबोध. ॥ ११९४ ॥ एवच आत्मा जडद्रष्टा इतुके जाणे । आणि नाना नगीं चित्कनक एक नेणे । त्या पुरुषास शहाणे । जागा कैसा म्हणतील? ॥ ११९५ ॥ आणि जों आत्मा न दिसे । तों मुख्य जागृती तुम्ही मानाल कैसे? । की जागृतीचा देह देखतां जैसे । लोक जागे जालों मानिती. ॥ ११९६ ॥ प्रत्यक्षीं आत्मा वाटे शरीर । तें देखतांच जागा होय नर । तैसा आत्मा कळतां जडाहूनि इतर । जागा म्हणावा. ॥ ११९७ ॥ स्वहिततत्पर कर्मे करी । तोही जागा न म्हणवे तोंवरी । की जों आत्मता न कळे बरी । तोंपर्यंत निद्रित. ॥ ११९८ ॥ आतां ऐसा न कळे अर्थ । म्हणूनि अगत्य तोही मानावा यथार्थ । मुख्यार्थ साधतां का व्यर्थ । गौणार्थ मानावा? ॥ ११९९ ॥ हें बोलिले वारवार । कीं जों न कळे सर्वात्मनिर्धार । तोंवरी कळला जरी जडावेळा निर्विकार । जागा तो जाला न म्हणवे. ॥ १२०० ॥ आणि आत्मा कळला । जागृतही म्हणावा त्याला । म्हणोनि जागा होऊनि असे निजेला । न निरसतां नानात्व बुद्धीचे. ॥ १२०१ ॥ एवच तोचि जागा जाला बरा । सर्वात्मज्ञान ज्या नरा । तेव्हां **ज्ञान**शब्दाचा अर्थ हाची खरा । कीं सर्व **वासुदेव**, ऐसें कळे. ॥ १२०२ ॥ हेंही असो याच **गीतें**त । चतुर्थाध्यायांत **भग**वत । लक्षण ज्ञानाचे हेंची बोलिला अत्यत । सादरपणें

---

१. केवळ शाब्दिक ज्ञान.

॥ १२०३ ॥ **'तद्विद्धि प्रणिपातेन'** । या श्लोकीं म्हणे **ज्ञान**घन । कीं ये रीतीनेंकरूनी ज्ञान । घे **अर्जुना**! संतापासुनी. ॥ १२०४ ॥ यापुढें श्लोक दुसरा । त्याच्या उत्तरार्धीं म्हणे अरे! **पांडुकुमरा**! । ज्या ज्ञानें समस्त भूतांचा पसारा । आपणामध्यें देखसी. ॥ १२०५ ॥ **'येन भूतान्यशेषेण । द्रक्ष्यस्यात्मनि'** म्हणे **क**मलेक्षण । एव ज्ञानाचे हेंची मुख्य लक्षण । कीं सर्व भूतें आपणामध्यें पाहावीं. ॥ १२०६ ॥ ऐसें ज्ञान तेंचि सगुणब्रह्म । कीं निर्गुण तें उगेंचि निर्धर्म । हे अद्वैतज्ञान आणि सधर्म । योग ऐश्वररूप विश्वरूप. ॥ १२०७ ॥ **'दिव्यं ददामि ते चक्षुः'** ऐसे बोलोनी । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । विश्वरूप दाविलें यावरूनी । विश्वची **भ**गवद्रूप चिद्रूप. ॥१२०८॥ ज्ञान याचेची नाम । ज्या ज्ञानें कळे चराचर ब्रह्म । जड जगीं पाहणे चैतन्य परम । तें ज्ञान सोनें जैसें पाहणें अलकारीं. ॥१२०९॥ ऐसेंची **यो**गवासिष्ठ । जेथें श्रोता **राम**, वक्ता **व**सिष्ट । अर्थ तेथें ऐसा स्पष्ट । **ज्ञान**शब्दाचा. ॥ १२१० ॥

**यो**गवासिष्ठश्लोक—**द्वौ क्रमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव!।**
**योगो वृत्तिनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥**

मोक्ष चित्ताच्या नाशेंकरूनी । त्यास **व**सिष्ठ म्हणे क्रम दोनी । एक **योग,** दुसरे **ज्ञान** म्हणोनी । नांवें दोन्ही क्रमाचीं. ॥१२११॥ आतां योग कशाला म्हणावें? । ज्ञान तें कैसें गणावें ? । म्हणूनि पूर्वार्धी बोलोनि नांवें । अर्थ उत्तरार्धीं बोलतो. ॥ १२१२ ॥ कीं निरोध करणे वृत्तीचा । **योग** म्हणावा तोची साचा । कल्पनेसहित चारी वाचा । निरोध जेथें पावती. ॥ १२१३ ॥ आणि **ज्ञान** म्हणिजे सम्यगवेक्षण । म्हणिजे बरे निरीक्षण । ज्या बऱ्या निरीक्षणाचें लक्षण । **क**मलेक्षण चतुर्थी बोलिला. ॥ १२१४ ॥ प्रस्तुतचि जालें त्याचें निरूपण । कीं ज्या ज्ञानें आपणामध्यें सर्व भूताचें निरीक्षण । तें ज्ञान, ऐसें म्हणे **क**मलेक्षण । **'येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि'** म्हणोनी. ॥ १२१५ ॥ एवच आत्मयामध्यें सर्व भूतें । सर्व भूतीं पाहावें आत्मयातें । ऐसें पाहणें त्या पाहण्यातें । म्हणावें ज्ञान. ॥ १२१६ ॥ तेंच **व**सिष्ठही म्हणे आपण । ज्ञान सम्यगवेक्षण । सम्यक् म्हणिजे बरे आणि अवेक्षण निरीक्षण । म्हणिजे बरे पाहणे तें ज्ञान. ॥ १२१७ ॥ नव्हे नगरूप पाहणें बरें । कीं सुवर्णत्वें पाहणें खरें । खरें पाहणेंची बरे निर्धारे । एव जडीं आत्मा पाहणें तें

१. अ० ४, श्लो० ३४. २. अ० ४, श्लो० ३५ ३. अ० ११, श्लो० ८ ४ अ० ४, श्लो० ३२–४२.

पाहणें उत्तम. ॥ १२१८ ॥ नव्हे जलबुद्धि पाहणें बरें । किरणबुद्धि पाहणें खरें । कीं खरें पाहणेंची बरे पाहणें निर्धारे । एवच जडीं आत्मा पाहणें तेंची उत्तम. ॥१२१९॥ एव ज्ञान शब्दाचा अर्थ । **सर्वात्मबोध** हा यथार्थ । कीं अद्वैतसाक्षात्कारे कृतार्थ । तोची कीं ज्ञान ऐसें जयाला. ॥ १२२० ॥ जडनिषेधें आत्मा कळला । अभ्यासीं मनोभावही वळला । तथापि नानाजडत्व देखोनि तोही खवळला । द्वैतदृष्टी. ॥ १२२१ ॥ म्हणूनि त्या अभ्यासाहुनी । श्रेय ज्ञान म्हणोनी । प्रस्तुत श्लोक प्रथमचरणीं । **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** म्हणे **श्री**कृष्ण. ॥ १२२२ ॥ नानाकार जड विश्वरूप । हें अवघे चित्स्वरूप । या ज्ञानाचेंचि नांव **योग ऐश्वररूप** । हेंचि तत्त्व सगुणा **सर्वेश्वराचें.** ॥ १२२३ ॥ या भावेंकरूनी । **'अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं'** म्हणोनी । **श्री**कृष्ण मागे बोलिला त्यावरूनी । शंका उपजली नासते ऐसी. ॥ १२२४ ॥ शका ऐसी कीं परम पुरुषार्थ । हाची कीं जाणावें चित्स्वरूप यथार्थ । त्याचा अभ्यासयोग समर्थ । मायाशबलिताच्या प्राप्तीपरीसही. ॥ १२२५ ॥ ऐसें असोनि हरी । अभ्यासयोगें कां परी । म्हणतो मज पावावयाची इच्छा करीं? । हा तों मायाशबलित. ॥ १२२६ ॥ शुद्ध स्वरूपाच्या अभ्यासें । मायाशबलितातें अपेक्षावे कैसें? । संशययुक्त चित्त ऐसें । **अर्जुनाचें** देखे **श्री**कृष्ण. ॥ १२२७ ॥ म्हणूनि आपण ऐसा सगुण । कीं सर्वात्मक ज्ञान ज्याची खूण । त्या ज्ञानातेंची भक्त निपुण । योग ऐश्वररूप उपासिती. ॥ १२२८ ॥ **'मामिच्छाप्तुं धनंजय!'** । हें याकारणें बोलिलों मी **जग**न्मय । कीं अभ्यासयोगाहूनि श्रेय । ज्ञान सर्वात्मकत्व तें मी. ॥ १२२९ ॥ नानानगीं एक सुवर्ण । तैसें चराचरीं निर्गुण । या ज्ञानाचेचि नांव सगुण । हा भक्तिमार्ग या प्रसंगीं. ॥ १२३० ॥ ऐसें ज्ञान जें श्रेय अभ्यासाहुनी । तें ज्ञान मी सगुण यावरूनी । अभ्यासें मज पावों इच्छीं म्हणोनी । बोलिलों तूतें. ॥ १२३१ ॥ ऐसा शकापरिहार । जाला कीं **अर्जुन** समजला हा विचार । या स्वल्पशब्दांत बहु फार । भाव घेतला **अर्जुनें.** ॥ १२३२ ॥ तैसें सृष्टिसंहाररूप । **गीतें**त असोनि अतिसंक्षेप । तथापि **भ**गवद्वाक्याचा प्रताप । कीं **अर्जुन** म्हणे ऐकतां जालों विस्तारे. ॥ १२३३ ॥ **'भवाप्ययौ[1] हि भूतानां'** श्लोकांत या । म्हणे **'श्रुतो विस्तरशो मया'** । असो प्रस्तुतीं पुन्हा **धनंजया** । उद्गार येऊं पाहे संशयाचा. ॥ १२३४ ॥ कीं सर्वात्मक ज्ञान । जरी **श्रेष्ठ** अभ्यासाहून । तरी तें हाची ज्ञानघन । उपदेशिता जाला मजलागीं.

१. अं० ११, श्लो० २.

॥ १२३५ ॥ **'मत्स्थानि सर्वभूतानि । न चाहं तेष्ववस्थितः'** म्हणोनी । **'नच मत्स्थानि भूतानि'** । हें सर्वात्मकत्व नवमीं दाखविलें. ॥ १२३६ ॥ रज्जूत सर्प दिसे । परी रज्जु सर्पी नसे । शेवटीं सर्पही न गवसे । रज्जु दृष्टीं पाहतां ॥ १२३७ ॥ ऐसें स्थळस्थळीं । मज हें ज्ञान वदला स्वयें याच उपदेशकाळीं । तें ज्ञान योग ऐश्वर हा वनमाळी । तरी या बोधें मी यातें पावलों असें. ॥ १२३८ ॥ मज ऐसें ज्ञान जालें असोनी । मागुती अभ्यासयोगेंकरूनी । मातें पावावयाची इच्छा करीं म्हणोनी । कां बोलतो ? ॥ १२३९ ॥ म्हणूनि प्रथम चरण । समजोनि मागुती साशंक अंतःकरण । ऐसें होतां शंका परिहरी साक्षी करुण । दुसरिया चरणेंकरूनी. ॥ १२४० ॥

द्वितीयचरण—**ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते** ॥

अगा! जे सर्वात्मक ज्ञान । अभ्यासाहूनि श्रेय ऐसें बोलिलों वचन । त्या ज्ञानाहूनि त्या ज्ञानाचें ध्यान । श्रेय बापा! अर्जुना! ॥ १२४१ ॥ कीं सर्वात्मकत्व ज्ञान । जालें आणि न करी ध्यान । तरी न पावतां स्वरूपीं समाधान । पदच्युत होणार नर तो. ॥ १२४२ ॥ रज्जूचा पडतां विसर । सर्पभयें कांपे शरीर । रज्जुत्व बिंबतां स्थिर । भय नसे. ॥ १२४३ ॥ यालागीं जालें ज्ञान । तदनंतर करावें ध्यान । तेव्हां स्वरूपीं बिंबतां समाधिसमाधान । योगारूढ तो होय. ॥ १२४४ ॥ ज्ञान बुद्धीस जाल्यावरी । ध्यान न करी त्याचें जरी । पूर्वसंस्कारें भय करी । प्रपंच त्यातें. ॥ १२४५ ॥ म्हणोनि अभ्यासाहूनि ज्ञान । श्रेष्ठ जालें तरी करावें ध्यान । तरीच पावे समाधान । ऐसें ध्यान थोर ज्ञानाहुनी. ॥ १२४६ ॥ चैतन्यकनकीं बुद्धिदृष्टी । स्मरे चराचर अलंकारसृष्टी । ब्रह्मांड एक तैशाच कोटी । अनंत ब्रह्मांडकोटीच्या. ॥ १२४७ ॥ देश देखिला आणि न देखिला । ऐकिला अथवा न ऐकला । सर्वत्र आत्मा आपुला । एका स्वदेहीं जे रीती ये रीती ध्यावा. ॥ १२४८ ॥ देहीं आत्मा बाहेर जैसा । सप्त धातूंत, नाडींतही, असे तैसा । धातु, नाडी न दिसे, तरी कैसा । त्यांत आत्मा नाहीं म्हणावा? ॥ १२४९ ॥ शिरा, नाडी, धातु, यांचें रूप । व्यापूनि नेणे चित्स्वरूप । त्याच्या ज्ञानसत्तेनें विश्वरूप । दिसे, असे परी तें निर्धर्म. ॥ १२५० ॥ त्याच्या ज्ञानसत्तेनें सचेतन । चित्त होऊनि करी चिंतन । त्यासही नसे दर्शन । शरीरीं धातुनाडीचें. ॥ १२५१ ॥ कोण धातु आहे कसी । आत्मा न जाणे, बुद्धीही नेणे तैसी । तथापि गोष्टी न घडे ऐसी । कीं

१. अ० ९, श्लो० ५.

आत्मा नसे स्वदेहीं सर्वत्र. ॥ १२५२ ॥ किंबहुना बाह्य देहाकृती । इंद्रियद्वारा ज्ञानसत्तेनें जाणे मती । सर्वत्र आत्मयाची वसती । जरीं न आठवती सर्व अंगे सर्वदा. ॥ १२५३ ॥ गुडघा, कोंपर, मनगट, । हीं अंगे ठाउकी निपट । तरी स्मरतांच त्या त्या अंगाचा पट । चित्तास चैतन्यततूनें सांपडे. ॥ १२५४ ॥ ऐसा जगांत जो देश । स्मरावा तेथेंच स्फुरे आत्मा हृषीकेश । स्मरता उरले तेथेंही बुद्धिप्रवेश । होतां आत्मा स्फुरेल. ॥ १२५५ ॥ जें जे स्वअंग स्मरे । त्या त्या अंगींच आत्मा स्फुरे । उरलियांतील काय झुरे ? । स्मरतां होय प्रत्यय तेथेंही. ॥ १२५६ ॥ एवच आपण ऐसा सर्व जगीं । कनक एक जैसें सर्वा नगीं । रज्जु जैसा मिथ्या भुजगीं । चराचरीं ऐसा चिदात्मा. ॥ १२५७ ॥ आत्मसत्ताप्रकाशेकरूनी जग । प्रकाशे दोरे जैसा भुजग । कीं सागरजळे जैसा नाना तरग । तैसा स्वयें चराचरीं. ॥१२५८॥ करितां ऐसे ध्यान । चित्त चित्स्वरूपीं पावे समाधान । ऐशा ध्यानें तें ज्ञान । परिपाकातें पावतें. ॥ १२५९ ॥ म्हणूनि या प्रकारीचे ध्यान । श्रेय, जालिया सर्वात्मकज्ञान । सर्व चिद्रूप ऐसें समाधान । ज्ञान जालिया ध्यानें पावतें. ॥ १२६० ॥ अर्जुना ! तुज सर्वात्मज्ञान । जाले, तरी करावें तुवां ध्यान । थोर गोष्टी, की मन । रमावे चित्स्वरूपीं. ॥ १२६१ ॥ जडत्वसंस्कार जावा । चैतन्यसस्कार बिंबावा । म्हणूनि अभ्यासयोगे **पां**डवा ! । मज पावों इच्छीं म्हणतसें. ॥ १२६२ ॥ जे 'सर्व **वासुदेव**' ऐसें ज्ञान । तें ज्ञानचि मी जगन्निधान । परतु माझे बिंबावें ध्यान । म्हणूनि ऐसें बोलिलों. ॥ १२६३ ॥ कीं अभ्यासयोगेकरूनी । मातें पावावें ऐसी इच्छा करीं म्हणोनी । बोलतां तू शकलास मनीं । कीं चित्स्वरूप अभ्यासची बहु थोर. ॥ १२६४ ॥ घालूनि अधिष्ठान अभ्यासीं मती । कां पावों इच्छावें मायाशबलिताप्रती ? । तरी त्याचें समाधान ये रीती । की ज्ञान श्रेय त्यापरिस. ॥ १२६५ ॥ तों तुज ऐसें वाटलें । की तें ज्ञान तरी निःसंदेह मज जालें । ऐसें असोनि कां करणें लागलें । तदर्थ अभ्यासयोगास. ॥ १२६६ ॥ तरी बापा ! जालें ज्ञान । तथापि बिंबावया करावे ध्यान । म्हणोनि तुझ्या शकेचें केले समाधान । **'ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते'** म्हणोनी. ॥ १२६७ ॥ की प्रत्यग्वृत्तीचा अभ्यास । दावी जडीं चिद्वस्तु चित्तास । जडत्व न स्फुरे मग, ज्यास । चिदात्मसंस्कार स्वरूपाभ्यासें बिंबला. ॥ १२६८ ॥ ततु पाहतां वारवार । पटीं तंतु दावितो संस्कार । म्हणोनि वदलों मी जगदाधार । अभ्यासयोगें मज पावों इच्छीं म्हणोनी. ॥ १२६९ ॥ तो अभ्यास उपयोगी । होणार या ध्यानयोगीं ।

ध्यान थोर यालागीं । सर्वापरीस. ॥ १२७० ॥ भाव ऐसा भगवताचा । तोची चाळी हे वाचा । अर्थानुरूप भावार्थ साचा । जगन्निवासाचा ये रीती. ॥ १२७१ ॥ ऐसे या श्लोकीं दोन चरण । त्याचे ऐसें विवरण । सर्वांस वद्य ज्याचे चरण । तो या यथार्थ अर्थे संतुष्ट. ॥ १२७२ ॥ आतां तृतीयचरणाची प्रवृत्ती । याच निमित्त कीं पुन्हा पार्थचित्तवृत्ती । शकित देखिली त्या संशयाची निवृत्ती । तृतीयचरणीं करीतसे. ॥ १२७३ ॥ कीं विबावें सर्वात्मकज्ञान । म्हणूनि त्याच ज्ञाननामका ऐश्वर योगाचे ध्यान । बोलिला जेव्हां जगन्निधान । अर्जुन समजोनिही शकला. ॥ १२७४ ॥ कीं आत्मा कळतां अविद्यावरण । नासे ब्रह्मात्मतेचे होतां स्फुरण । जडा कार्यात चैतन्य कारण । कळतां नासे विक्षेपही. ॥ १२७५ ॥ ऐसी द्विविध गेली अविद्या । प्रगटली व्यतिरेक, अन्वय, द्विविध विद्या । त्याहीवरी या आद्या । ध्यानीं विशेष वाटला तो कोण ? ॥ १२७६ ॥ न मोडे जरी पूर्वसंस्कार । तरी अविद्या गेली हा निर्धार । जेव्हा अविद्याग्रथिपरिहार । तेव्हां पुनर्जन्म तों घडेना. ॥ १२७७ ॥ जरी घडेना ध्यान । तरी मुक्ति सिद्ध, की जाले ज्ञान । ऐसें असे ज्याचे समाधान । ध्यान अवश्य त्यानें कां करावें ? ॥ १२७८ ॥ विचार ऐसा असोनी । ध्यान थोर ज्ञानाहूनी । कां भगवत बोलतो म्हणोनी । अर्जुन मनीं शकित देखिला. ॥ १२७९ ॥ हा समजोनि त्याचा भाव । बोलतो बुद्धिसाक्षी देव । प्रवर्त्तवी याकारणें देवाधिदेव । तृतीयचरण या श्लोकी. ॥ १२८० ॥

तृतीयचरण—**ध्यानात्कर्मफलत्यागः ॥**

अगा! ध्यान करितां त्या ध्यानापासुनी । कर्माच्या फळाचाही त्याग म्हणोनी । **'ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते'** या वचनीं । ध्यान श्रेष्ठ त्यापरीस बोलिलों. ॥ १२८१ ॥ अर्थ इतकाच या चरणाचा । परी भावार्थ याचा यथोक्त साचा । कळतां श्रोतयां जनांचा । ध्यानीं बसेल दृढ भाव. ॥ १२८२ ॥ विशद पदपदाचा अर्थ । मग यथोक्त अर्थानुरूप भावार्थ । बोलोनि मग त्याच्या दृढीकरणार्थ । विचार तत्त्वरीती करावा. ॥ १२८३ ॥ ध्यानापासाव त्याग कर्माचा । आणि फळाचाही त्याग साचा । ध्यानाचपासूनि ऐसी वाचा । सर्वज्ञाची येथें बोलते. ॥ १२८४ ॥ त्याग कर्माच्या फलाचा । हा अर्थ एक या कर्मफलत्याग शब्दाचा । तो या प्रसंगीं वाचा । बोलो शकेना. ॥१२८५॥ कीं ज्ञानाहूनि आधीं । होता जिज्ञासु जधीं । कर्माच्या फलाचा त्याग केला तधीं । तरी मुमुक्षु तो जाला जिज्ञासु. ॥ १२८६ ॥ अपरोक्षज्ञान जाले । तें ध्यानें बिबले । त्याग हा त्याग या बोलें । नये वाखाणिता. ॥ १२८७ ॥

सैंधव' शब्दें लवण। आणि 'सैंधव' सिधुदेशअश्वाचीही खूण। परि युद्धप्रसंगीं, न देती लवण। आणि न दाविती घोडा जेवितां. ॥ १२८८ ॥ यालागीं **कर्म वेदोक्त धर्म**। प्रत्यवाय जें न करितां कर्म। आणि **फलशब्दे सुखस्पृहा** हें वर्म। पूर्वश्लोकीं निरूपिलें. ॥ १२८९ ॥ अपरोक्षध्यानेंकरूनी। त्याग दोंहीचा घडे म्हणोनी। मोक्ष नव्हे ध्यानावांचुनी। या गोष्टीनें संशयपरिहार. ॥ १२९० ॥ आतां कर्माचा त्याग कैसा ?। आणि फलसुखस्पृहात्याग कैसा ? ऐसा। श्रोतयांच्या भावाचा ठसा। उमटेल येथें. ॥ १२९१ ॥ विहित कर्माचा त्याग। प्रत्यवायें करी नरकभोग। ज्या ज्ञानियासि बिंबे ध्यानयोग। प्रत्यवाय नसे त्यातें, प्रसिद्ध हें. ॥ १२९२ ॥ होऊनि सर्व ब्रह्म ऐसें ज्ञान। बाणे ऐसें जेव्हां ध्यान। त्या ध्यानें पावे समाधान। कर्मत्यागे प्रत्यवाय त्याला असेना. ॥ १२९३ ॥ राजाज्ञेचा त्याग केलियावरी। राजा अधिक सन्मान करी। तरीच राजाज्ञात्याग बोले वैखरी। की तयातेंच घडला. ॥ १२९४ ॥ कोणी आज्ञात्याग करी। राजा तयातें मारी। एक आज्ञा त्यागिली, तों दुसरी। अगीकारिली आज्ञा तदर्थ दडाची. ॥ १२९५ ॥ मारिला तैसा घे मारूनी। आज्ञेचा अगीकार कोण आणिक त्याहुनी। आज्ञात्याग काय म्हणोनी। त्यास घडला म्हणवेल? ॥ १२९६ ॥ तैसा कर्माचा त्याग करी। तो नरक भोगी तदुपरी। त्याग म्हणेल कैसी वैखरी। कर्मत्याग तयातें ? ॥ १२९७ ॥ जेव्हां त्यागितां कर्म। न स्पर्शे प्रत्यवायाचा अधर्म। तेव्हां तें म्हणों ये वर्म। त्यागाचें. ॥ १२९८ ॥ एवंच जालिया, ज्ञान। त्या ज्ञानाचे बाणतां ध्यान। नैष्कर्म्य तत्त्वीं बिंबे समाधान। मग विधिकिंकर[1] तो नव्हे. ॥ १२९९ ॥ न करितां नसे प्रत्यवाय। अथवा केलियाही पुरुषार्थ काय?। कर्मत्याग बोलिला जाय। ऐसियातें. ॥ १३०० ॥ हा विहित कर्माचा त्याग। घडे, ध्याने बाणतां योग। सुखस्पृहेचाही वियोग। सहज ऐसाच त्यातें घडतसे. ॥ १३०१ ॥ जो आत्मसुखातें जाणे। आणि ध्यानें स्वसुख ज्यास बाणे। त्यातें म्हणती तत्त्वज्ञ शाहणे। कीं बाह्यसुखस्पृहा त्याला असेना. ॥ १३०२ ॥ स्वयें जो अमृत प्याला। कांजी कां आठवेल त्याला ?। जो स्वानंदसिंहासनारूढ जाला। तो भिकेचीं खापरे कां स्मरेल ? ॥ १३०३ ॥ जो खेळे गंगाजळीं। तो कां सूर्यकिरणें तळतळी ?। ध्याननिष्ठाच्या मनीं नसे उकळी। विषयसुखस्पृहेची. ॥ १३०४ ॥ एवंच **फलशब्दें सुखस्पृहा**। पूर्वश्लोकीं निवडला अर्थ हा। ध्यानें फलत्यागही घडे महा। कर्मत्याग आणि फलत्याग तो ऐसा. ॥१३०५॥

---

१. कर्माचा दास.

सुखाकारणें करावें सकळ । ज्या गोष्टींत सुख ते गोष्टी सफळ । सुख न होतां सर्व निष्फळ । एव **फल** म्हणिजे **सुख** म्हणावें. ॥ १३०६ ॥ फलत्याग म्हणिजे सुखत्याग । परतु निरपेक्षासही सुख करी प्रारब्धभोग । त्या सुखाचा न घडे वियोग । एव **सुखत्याग** तो **सुखेच्छात्याग** बोलावा. ॥ १३०७ ॥ ऐसा सुखस्पृहात्याग । घडे, करितां ध्यानयोग । ध्यानीं चित्तास नित्य सुखसंयोग । मग सुखेच्छात्याग यत्नावाचुनी. ॥ १३०८ ॥ ध्यानें कर्मत्याग घडे । कीं पक्क ज्ञानें कर्माधिकार उडे । ध्यानी नित्यसुख सांपडे । त्याग घडे, सुखस्पृहेचा. ॥१३०९॥ जिज्ञासुदशेतही । सुखस्पृहात्याग केला जरी काहीं । त्या त्यागे त्याग घडला नाहीं । मनोनिग्रह मात्र तो त्याग ॥ १३१० ॥ मन विपयकर्दमाची मासोळी । नेतां टाकावया निर्मळ जळी । जों जळी पडे, तो तळमळी । जळीं पडता नाठवी कर्दमाते. ॥ १३११ ॥ ज्ञानाहूनि पूर्वी वैराग्य । त्यास कैचे हें भाग्य ? । जे विश्वात्मकध्यानें पावती ज्ञानी भाग्य । सहज वैराग्य तें **श्रु**ति म्हणे. ॥ १३१२ ॥

**श्रुति—आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ।**
**किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंचरेत् ॥**

**श्रु**त्यर्थ आत्मयातें जाणें जरी । कीं मी ऐसा आहे म्हणूनि तरी । काय मग इच्छी ? आणि कां करी । शरीर त्याचे संचार ? ॥ १३१३ ॥ ऐशा अनेक **श्रु**ति । ये रीती अनुभवीही बोलती । की आत्मज्ञानेंची टाकिती । ज्ञानी विषयवासनेतें. ॥ १३१४ ॥ अशेष वासनात्याग । तोची लिगदेहाचा भग । जीवन्मुक्तिप्रसंग । तेची समयीं. ॥ १३१५ ॥ याकारणें चतुर्थचरण । बोले **वि**श्ववंद्यचरण । की कर्म आणि सुखेच्छात्यागाचा जो क्षण । जीवन्मुक्तिही तेची क्षणीं. ॥ १३१६ ॥

चतुर्थचरण—**त्यागाच्छांतिरनंतरम्** ॥

कर्माधिकार न उरे । जेव्हां ध्यानी चित्त मुरे । विषयसुखवासना वोसरे । अनायासें. ॥ १३१७ ॥ त्याग ऐसा घडे । त्या त्यागास्तव शांति सांपडे । **अनंतर** म्हणिजे **अंतर उडे** । काळाचिया व्यवधानाचे. ॥ १३१८ ॥ की कामक्रोधादिकांचे मूळ । चित्तास विषयसुखेच्छामळ । तो जातां, अनतरच केवळ । शाति बाणे चित्तातें. ॥ १३१९ ॥ **जीवन्मुक्ति** तेचि **शांती** । हे प्रसिद्ध **वेदवे**दांतीं । ऐसें बोलती बहुत **श्रु**ती । प्रस्तुती पाहावी **श्रु**ति एक हे. ॥ १३२० ॥

**श्रुति—यदा सर्वे प्रमुच्यंते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥**

काम जे **ब्रह्मा**दिपर्यंत । ते सर्व काम ऐसें कीं ज्यास नाहीं अंत । जे वासनारूपें राहिले रुतोनि अत्यंत हृदयांत । आश्रित होउनी. ॥ १३२१ ॥ ते वासनारूप मळ । सुटती हृदयापासूनि सकळ । त्यानंतर मनुष्य जो मरणशीळ । तो अमृत होतो श्रुति म्हणे. ॥ १३२२ ॥ **अमृत** मोक्षातें म्हणावें । तोची **मोक्ष** जाला ऐसें गणावें । एवंच हेंची रूप जाणावें । सुखस्पृहात्यागें शांतीचें. ॥ १३२३ ॥ ध्यानें कर्माधिकारत्याग घडे । ध्यानें विषयसुखस्पृहा उडे । यालागी तदनंतर ठसा पडे । अनायासें शांतीचा. ॥ १३२४ ॥ **त्रिविध शांतीचें** व्याख्यान । एक शांति सर्वांस असतांही अज्ञान । एक जिज्ञासुदशेंत आणि जो अपक्वज्ञान । एक ज्ञानध्यानें बिंबतां. ॥ १३२५ ॥ असोनि अहंता, ममता, भ्रांति, । अज्ञ जनाची ऐसी शांति । कीं स्वबाळकाच्या लाता लागतां खंती । कोणास वाटेना. ॥ १३२६ ॥ स्त्रीपुत्रार्थ वेंचे धान्य । तें धान्य जालें म्हणे धन्य । एक दाणा भक्षी अन्य । तदर्थ मारी अथवा मारूनि घे आपणातें. ॥ १३२७ ॥ जिज्ञासु अथवा अपक्व ज्ञानी । शांति धरिती दांत चावुनी । ज्ञानी आणि शांतिही अवलंबी ऐसा होउनी । जीवन्मुक्त तोही म्हणवेना. ॥ १३२८ ॥ नुरे वासनेचा लवलेश । न लाभें हर्ष अथवा हानीनें क्लेश । जीवन्मुक्तिरूपें तो प्रवेश । हृदयांत शांतीचा म्हणावा. ॥ १३२९ ॥ नव्हे कर्माचा अधिकारी । लेश विषयवासनेचा न धरी । त्यानंतर शांति जे यापरी । जीवन्मुक्ति म्हणावी ते. ॥ १३३० ॥ हे जीवन्मुक्ति शांति त्याला । कीं कर्माचा सुखस्पृहेचा त्याग घडे ज्याला । तो त्याग तेव्हां बोलवे बोला । कीं ध्यान घडे सर्वात्मतेचें. ॥ १३३१ ॥ तें ध्यान तेव्हां घडे । कीं सर्वात्मज्ञानें अज्ञान उडे । अद्वैत तत्त्व ठायीं पडे । ज्या ज्ञानेंकरूनी. ॥ १३३२ ॥ एवंच जीवन्मुक्ति फळ । ऐसें ज्ञान जालिया निर्मळ । जडनिषेधमात्रे आत्मा समजोनि केवळ । अभ्यास केला तरी श्रेय त्यापरीस हें ज्ञान. ॥ १३३३ ॥ यालागीं जो ऐसा अभ्यास । ज्ञान श्रेय सर्वात्मक त्यापरीस । त्या ज्ञानाहूनि ध्यान सुरस । ध्यानें त्याग कर्माचा आणि वासनेचा. ॥ १३३४ ॥ त्या त्यागाउपरी । शांति जीवन्मुक्तिरूपिणी बरी । न कळतां अर्थ श्लोकाचा यापरी । मिथ्यास्तुति त्यागाची ऐसें कोण्ही बोलिले. ॥ १३३५ ॥ कर्मफलत्याग शब्दाचा । ऐसा अर्थ न कळे साचा । तोंवरी चावळे वाचा । टीकाकारांची ये स्थळीं. ॥ १३३६ ॥ ज्यास जालें ज्ञान ।

तें बिबलें करितां ध्यान । त्यास कर्मत्याग मुखेच्छात्याग ऐसें व्याख्यान । परिहरी मिथ्यात्यागस्तुतीतें. ॥ १३३७ ॥ मुख्य अर्थ ऐसा सांपडे । तो कां त्या अयोग्य अर्थी बुडे ? । कां मिथ्यास्तुति त्यागाची करणें पडे ? । भगवतास या सिद्धांतशास्त्रांत. ॥ १३३८ ॥ आता शका एक की पूर्वश्लोकीं श्रीरग । बोलिला ज्याला कर्मफलत्याग । त्या अर्जुनास ऐसा ध्यानयोग । बिबला नाहीं. ॥ १३३९ ॥ तेथेंही विहित कर्मत्यागप्रसंग । बोलिला अर्जुनाते श्रीरग । नाही रगले ज्याचे अतरग । ध्यानीं त्यास कैची हे योग्यता ? ॥ १३४० ॥ आणि फलशब्दे सुखस्पृहा । अपक्कास न घडे त्याग हा । ज्या सुखस्पृहात्यागे योगी महा महा । जीवन्मुक्तची बोलिले. ॥ १३४१ ॥ दोन्ही श्लोकीं ये रीती । कर्मफलत्याग वदला श्रीपती । त्याचाही हाची अर्थ म्हणतां मागुती । विरोध पूर्वापर हा दिसतसे. ॥ १३४२ ॥ ऐसी शका झणी । श्रोते पावती अतःकरणीं । म्हणूनि करुणासिधु चक्रपाणी । शका निवारे ऐसा त्याग बोलिला उभयत्र. ॥ १३४३ ॥ **'सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु'** । ऐसें पूर्वश्लोकी वदे जगद्गुरु । या श्लोकीं वदे भक्ताचा कल्पतरु । **'ध्यानात्कर्मफलत्यागः'** म्हणोनी. ॥ १३४४ ॥ पूर्वश्लोकी म्हणे कृष्णवाचा । की तू करीं त्याग कर्माच्या फलाचा । या श्लोकी म्हणे त्याग हा साचा । ध्यानें होतसे म्हणोनी. ॥ १३४५ ॥ **'कुरु'** म्हणिजे तू करी । पूर्वश्लोकी यापरी । भाव ऐसा अतरीं । की त्याग करीं, जरी तो त्याग बाणेना. ॥ १३४६ ॥ हा भाव यावरूनी । कीं त्याग ऐसा ध्यानेंकरूनी । ज्ञानियास बिबे म्हणोनी । या पुढिलिया श्लोकी बोलतो. ॥ १३४७ ॥ कीं जालिया ज्ञान । जेव्हां घडे ध्यान । ध्यानीं पावतां समाधान । आपेआप बिबे हा त्याग. ॥ १३४८ ॥ ऐसें या श्लोकीं म्हणे । की ध्यानानतर त्याग बाणे । पूर्वश्लोकी त्याग बोलिला परी जाणे । की हा त्याग आताची बिबेना. ॥ १३४९ ॥ परी पूर्वश्लोकोक्त जो त्याग । बोलिला बिबावया ध्यानयोग । **'ततः कुरु'** म्हणूनि श्रीरग । याच अर्थी बोलिला. ॥ १३५० ॥ **'ततः कुरु'** म्हणिजे याचा ऐसा अर्थ । की कर्मफलत्याग करीं तदर्थ । म्हणिजे या त्यागे शरणागतास वाणे यथार्थ । तें ध्यान म्हणूनि तदर्थ करीं या त्यागाते. ॥ १३५१ ॥ की तू तो त्याग करी । परी बिबेल तो जें ध्यान बिबल्यावरी । **'ततः कुरु'** म्हणिजे तदर्थ करीं हे वैखरी । सर्वज्ञ याची भावें बोलिला. ॥ १३५२ ॥ खरेची अपक्क ज्ञान । अर्जुनाचे न बिबतां ध्यान । परी हा त्याग जगन्निधान । **'ततः कुरु'** म्हणिजे म्हणे करीं त्याकारणें. ॥ १३५३ ॥ भाताकारणें काडी साळी ।

प्रथम जिव्हा[1] ऐसीच चाळी । मग म्हणे पाकानतरकाळीं । भात होणार. ॥ १३५४ ॥ स्त्री संतानाकारणे तू करी । बोलोनि ऐसी वैखरी । पुन्हा म्हणे तीस ऋतु आलियावरी । होईल संतान. ॥ १३५५ ॥ या प्रकारे हरी । आधीं म्हणे हा त्याग करी । दुसरिया श्लोकी ध्यान बिंबल्यावरीं । म्हणे होणार हा त्याग. ॥ १३५६ ॥ आणि ते ध्यान बिबायाकारणें । हा त्याग अर्जुनाकारणें । येथें **'ततः कुरु'** म्हणूनि वदतां ऐसें **ना**रायणें । त्यागीं सूचविला अधिकारही. ॥ १३५७ ॥ हें सगुणभक्तीचें प्रकरण । हें अनन्यशरणागतीचें विवरण । जो सर्वात्मभावें शरण । कर्मत्यागीं अधिकार अपक्वासही. ॥१३५८॥ **'सर्वधर्मान्परित्यज्य'**[2] या श्लोकेंकरूनी । **'मामेकं शरणं व्रज'** म्हणोनी । अष्टादशी बोलेल यावरूनी । अपक्वासही भक्तियोगीं हें योग्य. ॥ १३५९ ॥ अद्वैत ज्ञान जाले । आणि ध्यानावांचूनि पाकातें नाहीं पावलें । आणि भक्तिमार्गी चित्त लागले । त्यासही शरणागति बोलिली. ॥ १३६० ॥ की टाकूनि सर्वा धर्मातें । शरण ये एका मातें । मी संचित क्रियमाणरूपा पापापासूनि तूतें । सोडवीन ऐसें अष्टादशीं बोलेल. ॥ १३६१ ॥ आधीं **'मन्मना भव'**[3] हा श्लोक । या श्लोकी **भा**गवतधर्म बोलेल **उ**त्तमश्लोक । त्यापुढे श्लोक तेथें **श्री**वत्साक । **'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज'** म्हणेल.॥१३६२॥ प्रथम श्लोकी धर्म **भा**गवत । करू सागेल **भ**गवत । त्याहीविषयीं अशक्य अत्यत । असला, तरी उपायांतर करीं म्हणे. ॥ १३६३ ॥ टाकोनि सर्व धर्मातें । एका म्हणजे अद्वितीय मातें । शरण रिघें, मी तूते । सोडवीन सर्वा पापांपासुनी. ॥ १३६४ ॥ सर्व पापशब्दे **ना**रायण । सूचवी संचित, क्रियमाण, । येविषयीं प्रमाण । **ब्र**ह्मसूत्रवेदांतवाक्य. ॥ १३६५ ॥ मागे कांहीं जाला हा विचार । अष्टादशीं पुढें होणार । प्रस्तुत उपयोगी हा साधनप्रकार । या अध्यायांत **भ**गवत बोलिला. ॥ १३६६ ॥ **'अभ्यासेप्यसमर्थोसि'** । म्हणूनी अभ्यासयोग सांगूनि **अ**र्जुनासी । **'मत्कर्मपरमो भव'** ऐसी । गोष्टी मागे या प्रसंगीं बोलिला. ॥ १३६७ ॥ कीं अभ्यासही न करवे जरी । तरी माझीं श्रवणकीर्तनादि कर्मे करी । मदर्थ कर्मे करिता बरी । सिद्धि ज्ञानपरिपाकाची तू पावसी. ॥ १३६८ ॥ अष्टादशीं **'मन्मना भव'** । द्वादशीं म्हणे **'मत्कर्मपरमो भव'** । कीं **भा**गवतधर्मे अद्वैतानुभव । पावेल परिपाकातें. ॥ १३६९ ॥ या **भा**गवतधर्मीही अशक्त । जरी असला ज्ञानी भक्त । तरी सर्व कर्मे टाकूनि अनुरक्त । शरण सर्वात्मभावीं असावें. ॥ १३७० ॥

---

१. जीभ चाळवी, बोले. २. अ० १८, श्लो० ६६. ३. अ० १८, श्लो० ६५.

ऐसियास या शरणागतीकरूनी । ज्ञान परिपाकातें पावे म्हणोनी । **'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज'** या वचनीं । अद्वैत भावे शरणागति बोलेल. ॥ १३७१ ॥ द्वादशीं तैसेंच **मा**धव । आधीं वदला की **'मत्कर्मपरमो भव'** । जरी या गोष्टीसही शक्त नव्हे **पां**डव । तरी ते शरणागति हा करू. ॥ १३७२ ॥ म्हणूनि म्हणे **अर्जुना**सी । **'अथैतदप्यशक्तोसि'** । की मदर्थ कर्मेही करू न शकसी । तरी सर्व कर्मफलत्याग करीं तूं. ॥ १३७३ ॥ म्हणजे सर्वकर्मांचा त्याग करीं । आणि **फल**शब्दें सुखेच्छा टाकीं दूरी । **'मद्योगमाश्रित'** म्हणजे मदाश्रित होऊनि यापरी । त्याग करीं, म्हणे **भ**गवंत ॥१३७४॥ **'मामेकं शरणं व्रज'** ऐसें अष्टादशीं । **'मद्योगमाश्रित'** होई ऐसे द्वादशीं । आपण सर्व जगदाकार हें प्रतिउपदेशीं । सूचवूनि बोले. ॥ १३७५ ॥ कीं सर्वात्मता बिवली ज्याला । तो मद्रूपचि जाला । ते कळोनि बिबलें नाहीं म्हणोनि यत्न हा लागला । म्हणोनि मदाश्रित होईं, ऐसें म्हणे. ॥ १३७६ ॥ मी योग ऐश्वररूप । जो सकळ विश्वरूप । जडा तरगीं सिंधु चित्स्वरूप । हे तो कळलें तुज बरे. ॥ १३७७ ॥ हे न बिबे, तरी बिबावया । आश्रित या मद्रूपाचा होईं **ध**नजया ! । सर्व **भ**गवत या निश्चया । विसंबो नको, हा अर्थ. ॥ १३७८ ॥ ऐसा मदाश्रित होउनी । सर्व कर्मे आणि सुखेच्छा टाकुनी । मज शरण ये म्हणोनी । भाव दावी. ॥ १३७९ ॥ ऐसें बोलिला द्वादशीं । विशद हेची अष्टादशीं । म्हणोनि अष्टादशीं गोष्टी बोलेल ऐसी । कीं हें सर्व गुह्यतम पुन्हा तूतें सांगतों. ॥ १३८० ॥ **'सर्वगुह्यतमं भूयः शृणु'** म्हणोनी । सर्व गुह्यतम पुन्हा ऐक या श्लोकेंकरूनी । आधीं पुनरुक्ति बोलतो म्हणोनी । मग **'मन्मना'** हा श्लोक बोलेल. ॥ १३८१ ॥ तेथें **'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी'** इत्यादि । **भा**गवतधर्म बोलेल आधीं । जैसें **'मत्कर्मपरमो भव'** प्रस्तुतीं बोधी । अनतर मदाश्रित सर्वकर्मत्याग करीं म्हणे. ॥ १३८२ ॥ **'सर्वधर्मान्परित्यज्य'** म्हणोनी । अष्टादशीं पुन्हा या श्लोकेकरूनी । बोलेल पुनरुक्तीतें यावरूनी । सर्वांहूनि गुह्य गोष्टी म्हणूनि बोलेल. ॥ १३८३ ॥ जो विशद अष्टादशीं । तोच या प्रसंगीं द्वादशीं । त्याग कर्मांचा उपदेशी । प्रसंगें सुखस्पृहेचाही. ॥ १३८४ ॥ कीं विहितकर्मत्याग । भलता करूनि इच्छील भोग । झणी तैसा प्राप्त होय प्रसंग । म्हणोनि सुखेच्छात्यागयुक्त त्याग हा. ॥ १३८५ ॥ या द्वादशीं जे हे उक्ती । अष्टादशीं याची पुनरुक्ती । तेथें नसेल जें, तदर्थ प्रसक्ती । द्वादशाध्यायांत बोलिलेयाची होणार. ॥ १३८६ ॥

---

१. अ० १८, श्लो० ६४.

जें येथें बोलिलें । तेंची अष्टादशीं ऐसें सिद्ध जालें । तेव्हां जें अगत्य बोलणें तेथें राहिले । तें येथील तेथें योजावें या प्रसंगीं. ॥ १३८७ ॥ **'सर्वधर्मान्परित्यज्य'** या श्लोकेंकरूनी । सर्व कर्मत्याग बोलोनी । सुखस्पृहात्याग येथें वदला, यावरूनी । तेथें पुनरुक्ति म्हणतां सूचवी. ॥ १३८८ ॥ अपक्वदशेचा त्याग ऐसा । परी ध्यानयोगे उमटेल याचा ठसा । हा अर्थ सिद्ध होय तैसा । प्रभाव भगवद्वाक्याचा. ॥ १३८९ ॥ ऐसा या श्लोकाचा अर्थ । त्याग मिथ्यास्तुतिप्रसंग व्यर्थ । विचार याचा जे कृतार्थ । ते मत्सररहित जाणती. ॥१३९०॥ या अध्यायाचे वीस श्लोक । त्यांत हे श्लोक दोन उत्तमश्लोक । बोलिला या दोहींचा अर्थावलोक । असेल विरळा भक्तांत. ॥ १३९१ ॥ कठीण या दों श्लोकांचा अर्थ । न कळे म्हणूनि मिथ्यात्यागस्तुति व्यर्थ । वाखाणिती तो न साहे वाक्यार्थ । मुख्यार्थ ऐसा या श्लोकीं. ॥ १३९२ ॥ तत्रापि अध्यायांत हा श्लोक । जो बारावियात बारावा वदे उत्तमश्लोक । अति सखोल म्हणूनि सुज्ञ लोक । विचारोत दीर्घ दृष्टीकरूनी. ॥ १३९३ ॥ गीता आतां यानतर । उपदेशी कोण्या निमित्ते सर्वेश्वर । तें निमित्त भक्त आणि जे निर्मत्सर । अधिकारी या अर्थाचे परिसोत. ॥ १३९४ ॥ ऐसा बारावा श्लोक तेथें भगवत बोलिला । कीं ध्यानें सर्वकर्मत्याग जाला । आणि सुखस्पृहात्यागही बाणला । मग शांति त्यागानतर. ॥ १३९५ ॥ तों वाटलें अर्जुनातें । कीं त्यागानंतर ज्यांतें । शांति ऐसी, त्यांची लक्षणें मातें । बोलो स्वामी हा जगद्गुरू. ॥१३९६॥ हें एक अगत्य ऐकावें । आणि दुसरें त्याचें लक्षण पुसावें । जो शरण सर्वात्मभावें । टाकूनि कर्में आणि सुखस्पृहाही. ॥ १३९७ ॥ अर्जुन मनीं ऐसें अपेक्षी । तें तों मनाचा प्रकाशक देव लक्षी । तो पुसे तों स्वयें सर्वसाक्षी । अध्यायवरी हेची बोलेल. ॥ १३९८ ॥ परी हें महा विवादाचें स्थळ । कीं ज्ञान भक्तांचें झांकिती खळ । जे निर्गुणवादींच कुशळ । आत्मप्रेमें प्रेमळ सगुणीं जे नसती. ॥ १३९९ ॥ ते म्हणती हे ज्ञानहीन भक्त । निर्गुणोपासक ज्ञानयुक्त । ते येथेंही वाखाणितील अयुक्त । सर्वज्ञ भविष्य हें जाणे. ॥ १४०० ॥ म्हणूनि आत्मानुभव युक्त । कोणी पक्व, कोणी अपक्व भक्त । दोहींचीं लक्षणे भक्तानुरक्त । बोलेल आतां. ॥ १४०१ ॥ त्यांत भक्त जो ज्ञानी । त्याग बाणला ज्याला ध्यानीं । ज्या त्यागे शांति अनतर म्हणोनी । भगवत बोलिला. ॥ १४०२ ॥ ते शांति बाणली जया । ध्यानें ज्ञानिया भक्तराया । त्याच्या ज्ञानानुभवा आणि तया । आधीं वर्णितों दों श्लोकीं. ॥ १४०३ ॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**
**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

अगा! सर्वभूतीं तया । द्वेष नाहीं धनंजया! । शांति सर्वात्मकध्यानीं जया। द्वेष कोठे तया उपजेल? ॥ १४०४॥ कोणी वाईटसा वाटे । तरी मन धांवे द्वेषाचिया वाटे । सर्वत्र भगवद्भाव पोटीं दाटे । द्वेष कोठे तया उपजेल? ॥ १४०५ ॥ आत्मा आपला नित्य प्रिय । तोची सर्व भूतें जाला अद्वय । तो कोणासही जरी वाटता अप्रिय । तरी ज्ञानियास द्वेष कोठे तरी उपजता. ॥ १४०६ ॥ भगवद्रूप सर्व सृष्टी । ध्यान करिता बिबली दृष्टी । सर्वात्मकत्वीं ज्यांस तुष्टी । ते द्वेष करिती कोणाचा? ॥ १४०७ ॥ गूळ आवडे ज्याला । त्यास नावडे कोण भेला? । चाखतां जो तो जिभेला । गोडची लागे. ॥१४०८॥ ज्यास पाहिजे सुवर्ण । त्याज्य त्यास नग कवण? । जिव्हेस उदकपण। न वाटे कोणे गारेत? ॥ १४०९ ॥ अमृतसिंधूची लहरी । कोणती अमर न करी? । ज्यास आत्मा उघडा चराचरीं । तो द्वेष करील कोणाचा? ॥ १४१० ॥ आतां ऐसा कोठे द्वेष नाहीं । तो बरे वाईट न म्हणे कांहीं । परतु एका प्रकारें गोष्टी हेही । उचित सर्वज्ञातें दिसेना. ॥ १४११ ॥ कीं जो सर्वत्र सम पाहे । अधिकारी अनधिकारी पाहणें न साहे । जो ऐसाच होवूनि राहे । तो न उद्धरी बद्धातें. ॥ १४१२ ॥ ऐसी शका या काळीं । ये स्थळीं देखे वनमाळी । म्हणोनि दों पदीं तो संदेह टाळी । की तो मैत्र आणि करुण तो. ॥१४१३॥ की द्वेषवर्जित सर्वत्र । त्यांत मोक्षाधिकारियांचा मैत्र ।उरलीं भूतें तीं कृपापात्र । भगवद्भावेंकरूनी. ॥ १४१४ ॥ जे मोक्षाधिकारी । त्यांस संसारसागरीं तारी । मित्रत्व त्यासारखे कोण करी? । म्हणूनी मैत्र वाटे तैशा मुमुक्षूतें. ॥१४१५॥ यास सर्व सम । की शत्रु मित्र दोघेही पुरुषोत्तम । परतु ज्याला तारी त्यास परम । मित्रत्व वाटतें तयाचें. ॥ १४१६ ॥ वस्तुतः तो करुण । सर्वांभूतीं दयापूर्ण । कीं भोक्ता प्रतिबिंबरूपीं आपण । श्रीवासुदेव असे सर्वत्र. ॥१४१७॥ काया, वाचा, मनसा, । सर्वभूतीं जगन्निवासा । संतुष्ट करी ऐसा । करुण अत्यत. ॥१४१८॥ ऐसा अद्वेष्टा, मैत्र, करुण । सम सर्वभूतीं निपुण । कोण्या गुणें जाला ते खूण । सांगतों कीं तो निर्मम ममतारहित म्हणोनी. ॥ १४१९ ॥ हें माझे म्हणोनी । जो स्त्रीपुत्रादि आपुलीं मानी । त्यावेगळीं

चराचरें भूतें त्रिभुवनीं । पारकी वाटती तयाला. ॥ १४२० ॥ स्त्री एक अथवा पुत्र । आपुलीं म्हणतां इतकीच मात्र । भूतसृष्टि अवघी विचित्र । ईश्वरासहित पारखी. ॥ १४२१ ॥ ओंगळ ऐसी ममता । मूळ तीसही अहंता । ज्या अहंतेनें आत्मया अनंता । मानी सात विती शरीर मात्र. ॥ १४२२ ॥ म्हणतां मी एक देह । उद्भवे देहसंबंधियांचा स्नेह । माझी स्त्री, माझा पुत्र, माझें गेह, । म्हणूनी रगीं रगें तयांच्या. ॥१४२३॥ त्यास पारिखे विश्व सकळ । जो अहंते ममतेनें व्याकुळ । जो या दों वेगळा निर्मळ । अद्वेष्टा मैत्र करुण तोची भूतमात्रीं. ॥ १४२४ ॥ म्हणूनि निर्मम निरहंकार । त्यास म्हणे **सर्वेश्वर** । अहंसर्पनिषेधें चिदात्महार । सांपडला जयातें. ॥ १४२५ ॥ मी देह म्हणणे तामस । मी इंद्रियें म्हणणें राजस । दो वेगळा आत्मत्वाचा आभास । सात्विक अहंकार तो नुसता. ॥ १४२६ ॥ तोची आत्मा निखळ । बहुतेक मानिती तेंही ज्ञान विफळ । द्वितीयाध्यायटीकेंत पुष्कळ । दूषणें यावरी चालिलीं. ॥ १४२७ ॥ निखळ आत्मा अहंप्रत्यय । मानिती त्यास कैंवी ठायीं पडे अन्वय? । नेणे अकारादि ककारादि स्वरवर्णनिर्णय । तो काय वाचील पुस्तकातें? ॥१४२८॥ जे ऐसे ज्ञानी । तेची निर्गुणवादाभिमानी । भक्त तितके अज्ञानी । त्यांच्या मतें. ॥ १४२९ ॥ टाकितां अहंप्रत्यय । सत्त्व उरे चिन्मय । त्यापरतें आणि त्याचें प्रकाशक अद्वय । नेणती तया. ॥ १४३० ॥ अहंस्फूर्ती म्हणती निर्गुण । तितकें कळतां उपेक्षिती सगुण । शास्त्रें वाचूनि शब्दनिपुण । अनुभव अहंप्रत्ययस्फुरण मानिती. ॥ १४३१ ॥ **गी**तेंत या अध्यायांत । जे अव्यक्तोपासक वदे **भ**गवंत । त्यांच्या अनुभवापर्यंत । ज्ञान कैचें या वादियांला? ॥ १४३२ ॥ तैसे अपरोक्षसंपन्न ज्ञानी । भक्त थोर त्यांहीहुनी । हे तो निर्गुणवादाभिमानी । **ब्र**ह्म म्हणती सात्त्विक अहंकारातें. ॥ १४३३ ॥ देहा इंद्रियाविण । शेष उरलें अहंपण । तें सात्त्विक अहंकार निर्गुण । वाटे जयां. ॥ १४३४ ॥ नसे निर्गुणाचा अनुभव । नसे सगुणभक्तीचे वैभव । आणि मानिती कीं आम्हां नसे पुनर्भव । **'ब्रह्माहमस्मि'** हें अहंप्रत्ययावरी वर्तविती. ॥ १४३५ ॥ अहंप्रत्ययावांचुनी । शब्दे आत्मा न वदवे म्हणोनी । **'अहमस्मि ब्रह्माहमस्मि'** या शब्देंकरूनी । श्रुत्यनुभव बोलती. ॥ १४३६ ॥ अहंकारापासुनी । शब्द उत्पन्न म्हणोनी । शब्दें आत्मप्रत्यय त्यावांचुनी । बोलवेचना. ॥ १४३७ ॥ त्यांत सात्त्विक अहंकारस्वरूपीं ऐसा । कीं राहू चंद्रावरी जैसा । चंद्र प्रकाशे प्रकाशोनि जैसा । राहु आच्छादी त्या चंद्रातें. ॥ १४३८ ॥ राहु रूपे चंद्र दिसे । परि तो शुद्ध प्रकाश त्याचा नसे । ग्रस्त

चंद्रही चद्रची परी तो वसे । आच्छादिला राहूंत. ॥ १४३९ ॥ वस्त्रासहित भलता । आपणास दावी तत्वता । परी तो वस्त्रावेगळा जैसा नुसता । अह-प्रत्यये बोलावा अहप्रत्ययाचा प्रकाशक. ॥ १४४० ॥ राहुग्रस्त सुधाकर । तोही म्हणो ये शीतकर । तथापि निर्मळ रजनीकर । तो नव्हे. ॥ १४४१ ॥ **गी**ता अन्यथा वाखाणिती । म्हणूनि अगत्य दूपावी त्याची रीती । असो **भग**-वंत म्हणे प्रस्तुतीं । कीं तो निर्मम निरहकार. ॥ १४४२ ॥ की ममता कैची तयास ? । अहकार नाही जयास । ध्यानीं बिबली ज्या भक्तरायास । शुद्ध चि-दात्मता. ॥ १४४३ ॥ निषेधितां जडा तरगा । ओळखे चित्समुद्रा अतरगा । नानातरगरूपा **श्री**रगा । तोची पाहे जगदाकारेकरूनी. ॥ १४४४ ॥ ऐसा स्वयेंची जो चराचर । त्यानें कोठे धरावा अहकार ? । त्यास कैचा ममताविकार? । निर्मम निरहकार तो ऐसा. ॥ १४४५ ॥ बाणतां ध्यानयोग । ध्यानें कर्माचा सुखस्पृहेचा त्याग । त्यानतर ज्यास शांति म्हणे **श्री**रग । तो शांत भक्त ऐसा या श्लोकीं वर्णिला. ॥ १४४६ ॥ ज्ञानी शात भक्त ऐसा आपला । तीं चरणीं या श्लोकीं वर्णिला । परतु वर्णितां राहिला । एक भाग. ॥ १४४७ ॥ कीं जो ज्ञानी भक्त सर्व सम । स्वयें तोची निर्गुण सगुण ब्रह्म । परतु देहप्रारब्धाचा त्यास दु:खश्रम । सुखही पूर्वकर्मेंकरूनी. ॥ १४४८ ॥ आणि सुखदु:खसंयोग । न होता, न म्हणवे कर्मभोग । ऐसियास कैसा म्हणावा वियोग । अहं-काराचा? ॥ १४४९ ॥ सुख होतां, वाटे की मी सुखी । दु:ख होतां, वाटे की मी दु:खी । सुखदु:खभोगाची ओळखी । नव्हे अहपणावांचुनी ॥ १४५० ॥ ऐसिया शकेचें स्थळ । देखोनी येथें **मे**घनीळ । म्हणतो कीं जो ऐसा शांत केवळ । तो सम सुखीं आणि दु:खींही. ॥ १४५१ ॥ कीं प्रारब्धे सुख आणि दु:खही । जीवन्मुक्त जाला तर्‍ही सुटणार नाहीं । परी भोगितां सुख 'हो' आणि दु:ख 'न हो,' ऐसें कांहीं । न म्हणे समसुखदु:खी ये रीती. ॥ १४५२ ॥ भोगकाळीं मीपण । वाटे हा पूर्वकर्माचा गुण । की मी कर्ता, ऐसें अहंस्फुरण । अज्ञदशेंत होतें जन्मांतरीं कर्म करितां. ॥१४५३ ॥ जो जो बीजाचा संस्कार । फळीं प्रत्ययास येतो तो प्रकार । कर्मकाळीं मी कर्ता, ऐसा अहंकार । तोची भोगकाळीं भोक्ता मी, ऐसे वाटवी. ॥ १४५४ ॥ याकरितां जरी निरहंकार । भोगकाळीं स्फुरे अहकार । मी सुखदु:ख पावलो ऐसा विकार । स्फुरे निरहकारियासही. ॥ १४५५ ॥ परतु हे प्रारब्ध कर्माची शक्ती । म्हणूनि जाणे ऐसिया युक्ती । दु:खीं उद्विग्नता, सुखीं आसक्ती । न धरी, सम उभयत्र. ॥ १४५६ ॥ पूर्वश्लोकी ज्याची शांती । तो सुखदु:खीं

सम ये रीती । अहंप्रत्यये जरी भोग होती । तरी निरहंकार स्थिति तयाची अभंग. ॥ १४५७ ॥ वारा राहिला विशाळ । परी वृक्षाचें हालणें न राहे तत्काळ । अहंता गेली, तरी भोगकाळ । दावी अहंकार आहेसा. ॥ १४५८ ॥ जें ऐसें भोगीं अहंस्फुरण । त्यास नाशक समर्पण । तो भोगातीतची आपण । जो सुखदुःखीं सम ऐसा. ॥ १४५९ ॥ ऐसी सुखदुःखभोगी समता । म्हणूनि सुखीं निःस्पृहता, दुःखीं सहनता । परंतु जीवन्मुक्तासही तत्त्वता । सुखदुःख-भोग. ॥ १४६० ॥ सुखदुःखभोग घडे । तरीच समता सांपडे । दोघांस ओळखेल, तरी उभयत्र पडे । ठसा त्याच्या उभयत्र समतेचा. ॥ १४६१ ॥ नव्हे सुखदुःखाचा प्रत्यय । तो न कळे सुखदुःख हा निश्चय । एवं प्रारब्ध कर्माचा भोगें क्षय । ज्ञानियासही ये रीती. ॥ १४६२ ॥ भोगें प्रारब्धाचा क्षय । भोग तेव्हां, जेव्हां सुखदुःखाचा प्रत्यय । एवंच हा सिद्धांत निर्णय । कीं सुखदुःख असे ज्ञानियासही. ॥ १४६३ ॥ आणि एका प्रकारेंकरूनी । ज्ञानियाला नसे सुखदुःख म्हणोनी । कोठें कोठें कोणे एके दृष्टीकरूनी । नाहीं सुखदुःख, ऐसेंही बोलिलें. ॥ १४६४ ॥ कीं चैतन्य एक बिंब । एक त्याचें प्रतिबिंब । शुद्ध सत्त्वावलंब । प्रतिबिंबातें. ॥ १४६५ ॥ त्या सत्त्वास बिंबात्मा कळे । आणि ध्यानीं चित्स्वरूपी तें वळे । मग ते जीवभावें न खवळे । बिंबात्मत्वीं बाणे अनुभव. ॥१४६६॥ बिंबात्मा आत्मा कळल्यावरी । त्यास तो भोग न घडे कोणेपरी । देहास दुःख होनां कां परी । दुःख आत्मया बिंबातें म्हणावें? ॥ १४६७ ॥ आतां देह जड । आणि बिंबास भोग नाहीं हा अर्थ उघड । तेव्हां भोक्ता कोण हें कळणें अवघड । परी पंचदशीं सुगम केलें भगवंतें. ॥ १४६८ ॥ **'ममैवांशो जीवलोके'**[1] येथुनी । अंश प्रति-बिंब भोक्ता म्हणोनी । निर्णय केला त्यावरूनी । भोक्तृत्व ज्ञानियासही तद्योगें. ॥ १४६९ ॥ **'उत्क्रामंतं स्थितं वापि'**[2] या श्लोकेंकरूनी । **'भुंजानं वा गुणान्वितं'** म्हणोनी । **'पश्यंति ज्ञानचक्षुषः'** या वचनीं । ज्ञानीही देखती भोक्ता प्रतिबिंब. ॥ १४७० ॥ पुढें पंचदशीं विशद । टीका याची प्रतिपद । होईल येथें सांप्रद । भोग ज्ञानियासही प्रतिबिंबत्वीं. ॥ १४७१ ॥ ज्ञानियास बिंबात्मता । आपुली कळली तत्त्वता । त्या बिंबचैतन्यास न घडे भोक्तृता । या भावें भोक्तृत्व नसे ज्ञानियातें. ॥ १४७२ ॥ परंतु ज्या देहीं जालें ज्ञान । तो देह त्या कर्माचें भोगाचें स्थान । ज्या बुद्धीनें ओळखिला बिंबात्मा निरंजन । तेची बुद्धि जाणे सुखदुःख. ॥ १४७३ ॥ याकारणें

१. अ० १५, श्लो० ७. २. अ० १५, श्लो० १०.

ज्ञानी । प्रारब्धभोग भोगितो म्हणोनी । श्रुतिवेदांतसूत्रींकरूनी । निर्णय ऐसा. ॥ १४७४ ॥ परतु भोक्तृत्व न घडे जडातें । न घडे व्यापका विवाते । ज्ञानियासही भोगकाळीं होतें । प्रतिबिंबरूपें सुखदुःख. ॥ १४७५ ॥ कोणी प्राकृत ग्रंथकार । मनास म्हणती भोक्तृत्वप्रकार । तो तों सर्वथा विरुद्ध विचार । प्रमाण, अनुभव, युक्तीसही. ॥ १४७६ ॥ **'ममैवांशो जीवलोके'** या श्लोकापासूनी । **'अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते'**[1] म्हणोनी । मन अधिष्ठुनि अंश भोगितो यावरूनी । मन साधन मात्र भोगीं इंद्रियांसारिखें. ॥ १४७७ ॥ चाटू[2] स्वाद कांहींच नेणे । चाटूनें चाटितां रसना जाणे । तैसा चिदंश भोक्ता श्रीकृष्ण म्हणे । चाटूसारिखे मन अधिष्ठुनी. ॥ १४७८ ॥ श्रुतीही म्हणे की देहरथीं । इंद्रियें घोडे, मन वांगोरे[3], बुद्धि सारथी, । त्या रथांत आत्मा रथी । त्यास भोक्ता बुद्धिमंत म्हणती, श्रुति म्हणे. ॥ १४७९ ॥ हे मागे जालें निरूपण । पुढे होणार हेंची विवरण । प्रस्तुत हे प्रकरण । भक्त समसुखदुःखी म्हणोनी. ॥ १४८० ॥ आता दुःख होतां, समत्वे सोशी कष्ट । परतु एक ज्वरादि दुःख, त्याचें कारण अदृष्ट । एक परापराधकृत दृष्ट । दुःख ज्यानें दिधलें, तो दिसे. ॥ १४८१ ॥ ज्वरादि अदृष्टकृत । तें भलता सोसी चावूनि दांत । हा ज्ञानी विवेकी अत्यंत । घाबिरा नव्हे, नवल नाहीं. ॥ १४८२ ॥ परतु परकृत । दुःख वाटतां अत्यंत । क्रोध उपजे निश्चित । सुखदुःख समता मग कैची? ॥ १४८३ ॥ म्हणूनि म्हणे जगाचा स्वामी । अगा! अर्जुना! तो क्षमी । क्षमा ऐसी की सर्वही आत्माच मी । क्रोध कोणावरी करूं? म्हणे. ॥ १४८४ ॥ एक हाते मक्षिका वारी । तो करतळ बळे लागे गालावरी । तो दंड जरी हातातें करी । तरी ज्ञानी कोणावरी क्रुद्ध होय? ॥ १४८५ ॥ आपला दांत आपली जिव्हा रगडी । दुःख वाटे, तरी काय दांत पाडी । ज्यास सर्वभूती आत्मत्वाची आवडी । क्रोध कोणावरी करील तो? ॥ १४८६ ॥ ऐसी क्षमा जया । कां क्रोध उपजे तया? । पूर्वश्लोकोक्त शांति जया । तो अर्जुना! ये रीतीं, कृष्ण म्हणे. ॥ १४८७ ॥ ऐसा श्लोक एक जाला । दुसरिया श्लोकींही वर्णिलें त्याला । ऐक्य आणि प्रीति अन्योन्य ऐसिया बोला । बोलेल आता या श्लोकीं. ॥ १४८८ ॥

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**

बरवियापरी तुष्ट । तो म्हणावा संतुष्ट । जो निजलाभे अत्यंत पुष्ट । तोची संतुष्ट सर्वदा. ॥ १४८९ ॥ अतएव तो योगी । चित्त सर्वदा चिदात्मसं-

---

१. अ० १५, श्लो० ९ २. चमचा, पळी. ३ काढण्या.

योगी । तेव्हां भ्रांतीच्या वियोगीं । सर्वदा संतोष. ॥ १४९० ॥ सुख अनंत ज्याला दिसे । तो का सर्वदा संतुष्ट नसे ? । ज्याच्या निजसुखेची विश्व उल्लसे । त्याचा सतोष कोण गणी ? ॥ १४९१ ॥ परी ऐसाही योगयुक्त । सतुष्ट सदा योगी भक्त । जेव्हां न स्मरे चिदात्मा अव्यक्त । तेव्हां जडभ्रांतिसस्कारे च्यवेची की. ॥ १४९२ ॥ ऐसा सशयाचा ठाव । जाणे जगद्गुरु देवराव । सशयनिवृत्तीचा धरूनि भाव । म्हणे तो **यतात्मा** म्हणोनी. ॥ १४९३ ॥ **आत्म**शब्दे चित्त । ते चित्त ज्याचे **यत** । म्हणिजे स्वरूपीं योजले निश्चित । राहे सर्वदा. ॥ १४९४ ॥ आतां चित्स्वरूपी चित्त । योजणें यानें निश्चित । परी चित्त कां राहे नियत । चित्स्वरूपी ? ॥ १४९५ ॥ या शंकेचा परिहार । वदे जडसर्पचैतन्यहार । की भक्त जो एतत्प्रकार । तो दृढनिश्चय अगा! अर्जुना! ॥ १४९६ ॥ सुख आपुलें जेथें । निश्चय दृढ बसे तेथें । प्रस्तुतीं दृढनिश्चय येथें । अनुसधानीं स्वरूपाच्या. ॥ १४९७ ॥ ब्रह्मांड फुटे, बुडे भूगोल । सातां समुद्रांचा एक कल्लोळ । महाप्रलयाचा होय लोळ । तरी स्वरूपानुसधान सोडीना. ॥ १४९८ ॥ लाभ यापरता न मानी । स्वरूपविस्मृति तेची एक हानी । लाभ तोची की स्वरूपानुसधानी । रमे चित्त. ॥ १४९९ ॥ ऐसा दृढ निश्चय । म्हणूनि चित्त सर्वदा चिन्मय । म्हणूनि योगी विश्वमय । सतुष्ट सदा. ॥ १५०० ॥ ऐसीं येथवरी लक्षणें । जीं जैसीं बोलिलीं कमलेक्षणें । तैसीं अर्जुनें विचक्षणें । निर्गुणोपासकांचींही आइकिलीं. ॥ १५०१ ॥ या लक्षणीं कांही । भक्तांत अव्यक्तोपासकांत अतर नाहीं । म्हणोनी सर्वसाक्षीही । जाणतसे. ॥ १५०२ ॥ परतु लक्षणें ज्ञानाचीं । सारखीं दिसती दोन्ही पक्षांचीं । भक्ता आवडी सगुणाची । विशेष इतका. ॥ १५०३ ॥ परी लाभ या विशेषे अत्यत । की कल्पवृक्ष स्वभावें मी भगवंत । ज्यास आवडतों, तो अत्यत । आवडता माझा. ॥ १५०४ ॥ म्हणोनी जो सप्तमीं भक्त । वर्णिला ज्ञानी नित्ययुक्त । अपरोक्षसपन्न सगुणानुरक्त । तोची हा म्हणूनी वर्णितो उत्तरार्धे. ॥ १५०५ ॥

श्लोकोत्तरार्ध—**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

अगा! ज्या भक्तास अपरोक्षसाक्षात्कार । त्यास मीच सर्व जगदाकार । तो मनें चितूनी जन नानाकार । बुद्धीनें पाहे चित्स्वरूप. ॥ १५०६ ॥ स्वस्वरूप जगाचा आधार । चिंती तेथें सर्व आपल्या मनाचे आकार । पाहे ऐसे

१. अ० ७, श्लो० १७.

दोन्ही प्रकार । बुद्धीकरूनी. ॥ १५०७ ॥ उपास्य अवताररूप । तेंही ध्यातो चित्स्वरूप । मनें आकार कल्पूनी जे अरूप । ते चैतन्यची ऐसें अनुभवी बुद्धीनें. ॥ १५०८॥ दृष्टीं दिसे गार कठिण । रसनेसी तो मृदु जीवन । मनास आकार, बुद्धीस चैतन्य घन । अर्पित मनबुद्धि ये रीती. ॥ १५०९ ॥ जो ऐसा ज्ञानयुक्त । आत्मत्वे सगुणानुरक्त । तो **अर्जुना!** माझा भक्त । ह्मणिजे भक्ति माझी तयाला. ॥ १५१० ॥ भक्ति म्हणिजे प्रीति अत्यंत । त्या प्रीतीनें प्रिय ज्यास मीच भगवत । तो भक्त, मी कल्पवृक्ष अनत । जो जैसा भजे, त्यास तैसा भजतसें. ॥ १५११ ॥ ज्यास आवडी निर्गुणीं । तेही प्रीति माझी मी गणी । परतु प्रीतिगुण तो निर्गुणपणीं । मज नसे. ॥ १५१२ ॥ मी सगुण आवडतो ज्याला । तोही आवडतो भक्त मजला । की आत्मा दोघांचा एक जाला । उपाधि वेगळे दोघाचे. ॥ १५१३ ॥ नित्य युक्त उपाधिशुद्ध । माझा, आणि त्याचा नित्य बद्ध । जाला जरी अपरोक्ष द्वैतसिद्ध । देहप्रारब्ध कर्माचा. ॥ १५१४ ॥ देह त्याचा प्रारब्धरचित । माझा देह स्वेच्छाकल्पित । त्यास प्रिय आत्मा आपला अत्यत । तोची प्रिय आत्मा माझाही. ॥ १५१५ ॥ त्याची अविद्या गेली । परतु चिच्छक्ति अनुभवी उरली । तीस आवडे चिदात्मसत्ता आपुली । तोची मी. ॥ १५१६ ॥ जेथें त्याच्या प्रीतीची उडी । त्या चित्स्वरूपीं माझी आवडी । मी त्याचा आत्मा ज्याची त्यास गोडी । तोची आत्मा माझा जो प्रिय मज. ॥ १५१७ ॥ त्यास माझ्या ठायीं अनुरक्ती । त्या प्रीतीचें नाव भक्ती । ह्मणूनि तो मज **'प्रिय मद्भक्त'** ऐसी माझी उक्ती । म्हणूनि या श्लोकीं हा भाव. ॥ १५१८ ॥ मी स्वामी, तो दास । म्हणूनि भक्त म्हणावें त्यास । माझी प्रीति तो कृपाविलास । म्हणूनि तो प्रिय मातें म्हणतो, भाव हा. ॥ १५१९ ॥ तो मद्भक्त याकरितां । की मी याचा आवडता । तोही आवडता माझा **पांडुसुता!** । म्हणूनि **'स मे प्रियः'** म्हणतसें. ॥ १५२० ॥ हाची भक्त ज्ञानी सप्तमीं । वर्णिला की प्रिय तयाचा मी । आणि तोही माझा प्रिय म्हणोनी स्वामी । तैसाच या श्लोकींही बोलतो. ॥ १५२१ ॥ सप्तमीं चतुर्विध भक्त । त्यांत थोर जो ज्ञानयुक्त । ज्ञानी होउनी सगुणीं अनुरक्त । ज्ञानी भक्त तो म्हणावा. ॥ १५२२ ॥ **'प्रियो[1] हि ज्ञानिनोत्यर्थमहं स च मम प्रियः'** म्हणे समर्थ । ऐसा सप्तमीं जो अर्थ । तोची भक्त वर्णिला या श्लोकीं. ॥ १५२३ ॥ **'यो मद्भक्तः स मे प्रियः'** म्हणोनी । प्रिय आत्मा एक उपाधि दोनी । प्रिय मी त्याचा तो माझा

१. अ० ७, श्लो० १७. २. अ० ७, श्लो० १६.

प्रिय ज्ञानी । भक्त वर्णिला या श्लोकीं. ॥ १५२४ ॥ सगुणभक्त ज्ञानी । युक्ततम अव्यक्तोपासकाहुनी । आणि मज संमत म्हणोनी । प्रश्नोत्तरीं मागे बोलिला. ॥ १५२५ ॥ प्रसंगे अर्जुनाते साधनें । एकापुढे एक जगज्जीवनें । सांगीतलीं त्या अनुसंधानें । भक्तमहिमा बोलता राहिला. ॥ १५२६ ॥ तो शंकापरिहाराच्या निमित्ते । श्रेय अभ्यासाहूनि ज्ञान बोलिलें भगवतें । तो ध्यान ज्ञानाहूनी अनंते । बोलिलें श्रेय. ॥ १५२७ ॥ ध्यानानंतर त्याग घडे । शांति तदनंतर सांपडे । ज्या भक्तास शांति ऐसी जोडे । तो भक्त तोची जो प्रश्नोत्तरीं बोलता राहिला. ॥ १५२८ ॥ अद्वैतानुभवयुक्त । जे संत उपासिती अव्यक्त । महिमा त्यांचा वर्णुनीही भक्त । थोर त्यांहूनीही बोलिला. ॥१५२९॥ तितकियानेंची त्यांचा महिमा । वर्णिला तरी पुरुषोत्तमा । प्रीति त्यांची अत्यंत यालागीं महिमा । मागुती त्यांचा वर्णीतो. ॥ १५३० ॥ जे अपरोक्ष उपासिती अव्यक्त । त्याहूनी अति थोर बोलिले भक्त । कीं ज्ञानी आणि अनुरक्त । सगुणीं सर्वात्मभावेंकरूनी. ॥ १५३१ ॥ ऐसे नसे तयीं ज्ञानी । जे थोर सर्वाहुनी । त्यांपरिस थोर अज्ञानी । कैसे होती जरी भक्त जाले? ॥ १५३२ ॥ सप्तमी चतुर्विध भक्त । त्यांत थोर जो ज्ञानयुक्त । ज्ञानहीनास थोर म्हणणें हें अयुक्त । ज्ञानियाहुनी. ॥ १५३३ ॥ म्हणूनी कोण दोघांत योगवित्तम? । या प्रश्नाचे उत्तर दे सर्वोत्तम । कीं भक्त युक्ततम । आणि संमत मजलागी. ॥ १५३४ ॥ कोण योगवेत्तयांत उत्तम । या अर्थी प्रश्न कीं कोण योगवित्तम । उत्तर ऐसे कीं भक्त युक्ततम । युक्ततम म्हणजे भक्तची उत्तम योगवेत्ते. ॥ १५३५ ॥ मागुती या प्रसंगीं । स्मरोनी या श्लोकीं म्हणे भक्त योगी। आणि सर्व सम जगीं । हा सर्वात्मबोध पूर्वश्लोकीं वर्णिला. ॥ १५३६ ॥ याचा विपरीत अर्थ । करिती तो अवघा व्यर्थ । भक्त हे ज्ञानी म्हणूनी समर्थ । युक्ततम त्याहूनी आणि मज संमत बोलिला. ॥ १५३७ ॥ एवंच क्लिष्टकल्पना । करिती ऐशा जरी नाना । तरी गीतार्थ लागेना । सर्वत्र विरोधेंकरूनी. ॥ १५३८ ॥ असो आतां ये रीती । भक्त वर्णी श्रीपती । अव्यक्तोपासका ज्ञानियापरीस स्थिती । थोर ज्याची अनायासें. ॥ १५३९ ॥ तों येथेंही संशयाचें स्थळ । की ज्यां तपस्वियांस तपमात्राचे बळ । भय त्यांचें प्रबळ । शापिती म्हणोनी. ॥ १५४० ॥ भक्त तो सर्वांहीपरीस । श्रेष्ठ म्हणतो श्रीनिवास । जन तपस्वियांसारिखे तयांस । भीतीच की. ॥ १५४१ ॥ आणि भक्त अद्वेष्टा मैत्र करुण । म्हणूनी म्हणे कल्याणगुण । ते दयाळु निपुण । परी जन दुःखी असती भयें त्यांच्या. ॥ १५४२ ॥ ज्ञणीं अर्जुन

मनीं । शका ये रीती मानी । शकापरिहार म्हणूनी । करितसे आता या श्लोकी. ॥ १५४३ ॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

अगा! ज्याच्या कोण्याही हेतूकरूनी । लोक न मानिती भय मनीं । ज्यांचे वर्त्तणेंची चांगले त्यापासुनी । कोण पावे भयाते. ॥ १५४४ ॥ जो मैत्र, करुण, अद्वेष्टा । त्याच्या काया, वाचा, मनसा, ज्या चेष्टा । त्या देखता होती संतुष्टा । वृत्ति जनांच्या जे देखती. ॥ १५४५ ॥ द्वेष कोणाचा न करी । दया समान सर्वांवरी । भय तैशाचे कां परी । जनास वाटे? ॥ १५४६ ॥ पळे देखतां भवभय । त्यापासूनीही काय भय? । ज्यास देखता व्हावे निर्भय । भय का होय त्याहीपासूनी? ॥ १५४७ ॥ अग्नीपासूनी हिम । सूर्यापासूनी तम । चद्रापासूनी तापश्रम । तरी भक्तापासूनी भय होय. ॥ १५४८ ॥ जैसे सधन तैसें दुर्बल । सम भगवद्रूप सकळ । जो निस्पृह सर्वत्र सकळ । का भय वाटे तयाचे? ॥ १५४९ ॥ भगवद्भक्तीची प्रसिद्धी । आणि फिरे इच्छूनी धनसिद्धी । त्यास देखतांच धाके बुद्धी । कीं या स्वामीस काय द्यावें? ॥ १५५० ॥ तैसिया सकाम भक्तजना । देखतां भय वाटे मना । ज्यास काहींच लागेना । कृपण धनलोभीही न भी तयातें. ॥ १५५१ ॥ कळत न कळत होय मान । कळत न कळत होय अपमान । संतुष्ट दोहींपरी दोन्ही समान । कोणास भय त्याचे वाटेल? ॥ १५५२ ॥ पूजितां न पूजितांही सारिखा । न कोण्ही आप्त वा पारिखा । देखोनी त्या नित्य सुमुखा । भय वाटेल कोणातें? ॥ १५५३ ॥ जो देह आपण मानी । तो खवळे मानापमानीं । विश्व होउनी जो नव्हे ज्ञानाभिमानी । कोण भिती ऐशातें? ॥ १५५४ ॥ इत्यादि भावे उत्तमश्लोक । म्हणे त्यास न भिती कोणी लोक । या गोष्टीवरूनि अवघा श्लोक । या प्रसंगीं चालिला. ॥१५५५॥ कीं लोक न भिती तया । या गोष्टीनें वाटे धनजया । कीं सामर्थ्यलेश नसे जया । न भिती लोक त्यासही. ॥ १५५६ ॥ तरी हे आशका सम । लक्षण नव्हे ऐसें पुरुषोत्तम । दुसरिया चरणें सर्वोत्तम । बोलत असे. ॥ १५५७ ॥

द्वितीयचरण—**लोकान्नोद्विजते च यः ।**

अगा! लोकपाळांसहित लोक सारा । ज्या लोकीं कृतांतादिकांचा थारा । त्या समस्त लोकांपासूनि पांडुकुमरा! । जो न भी कधीं अणुमात्र. ॥ १५५८॥ त्यास पृथ्वीचिया रायांचें । अथवा राजद्वार लोकांचे । अथवा इतरांचेही भय

कैंचे? । भाव हा. ॥ १५५९ ॥ टाकितां धन मानाची स्पृहा मात्र । तो पुरुष निर्भय सर्वत्र । समर्थ ऐसा आणि वर्त्तणे विचित्र । की जन भय आपले न पावे. ॥ १५६० ॥ की भय आणि अभयकारण । या सर्वांपासूनी सूटले त्याचें अतःकरण । ऐसें **नारायण** । बोलतो उत्तरार्धेकरूनी. ॥ १५६१ ॥

उत्तरार्ध—**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ।**

जें अपेक्षित, तें पावला । त्या प्राप्तीचा उत्साह जाला । **हर्ष** म्हणावें त्याला । हा भक्त सुटला त्यापासूनी. ॥ १५६२ ॥ अकुर अपेक्षेचा असे । तरी हर्ष त्याच्या लाभे गवसे । हर्षापासूनि सुटला दिसे । या प्रकारे. ॥ १५६३ ॥ आतां **अमर्ष** म्हणजे न सोसवे परलाभ । दुसरियाच्या लाभे पावे क्षोभ । अविद्या स्वभाव हा स्वयभ । गेला ज्याचा. ॥ १५६४ ॥ धनमानादि अपेक्षा जया । परलाभे क्षोभ तया । भक्त माझा **धनजया!** । मुक्त तयापासुनी. ॥ १५६५ ॥ हे दोन्ही नसतां । भय कैंचे? **पांडुसुता!** । अथवा कांहीं कधीं प्राप्त होय दुश्चिता । तरी भय अवचिता मनी उद्भवे. ॥ १५६६ ॥ जें दुश्चितपण उपजतां प्रथम । त्यापासूनी भयाचे उद्गम । ते उद्गम देहात्मत्वजनित भ्रम । कांहीं नसती जयाला. ॥ १५६७ ॥ ऐसिया दुर्गुणापासुनी । असे **अर्जुना!** मुक्त होउनी । तो मद्भक्त आणि मजला प्रिय म्हणोनी । बोलिलोच मागे मी तूतें. ॥ १५६८ ॥ **'स च मे प्रियः'** या वचनी । या **च**कारे एकाक्षरें-करूनी । तोही मज प्रिय म्हणोनी । अर्थ होतो, तो लागतो दोकडे. ॥१५६९॥ प्रिय बोलिला भक्त पहिला । आतां वर्णिला तोही प्रिय मला । ऐसें म्हणतां हा वेगळा बोलिला । तो भक्त वेगळा, हे न घडे. ॥ १५७० ॥ आतां तोही प्रिय मला । म्हणिजे मीही प्रिय असेंच त्याला । अत एव मद्भक्त म्हणूनी बोलिलों बोला । की मी प्रिय तया म्हणूनी तोही प्रिय मज. ॥ १५७१ ॥ **'मे प्रियः'** म्हणिजे माझा प्रिय । **'स च'** म्हणिजे माझा प्रिय तोही की मी त्यास प्रिय । कीं तो मद्भक्त तेव्हां, जेव्हां मी त्याचा प्रिय । **'स च मे प्रियः'** याचा अर्थ ऐसा. ॥ १५७२ ॥ प्रिय माझा तोही म्हणूनी ऐसा । अर्थ होतो तो वदावा कैसा? । कीं या भक्ताच्या लक्षणाचा ठसा । नाहीं म्हणावा लागेल पूर्वोक्त भक्तास. ॥ १५७३ ॥ कीं तो प्रिय बोलिला । हाही तैसाच प्रिय मला । बोलों जातां या बोला । त्यास ही लक्षणें नव्हतीं म्हणावीं. ॥१५७४॥ जरी असतीं हींही लक्षणें । तरी हाही म्हणूनी कां वेगळा म्हणावा **कमलेक्षणें** । हीं त्यास नसतीं म्हणतां विपरीत अवलक्षणें । लागती त्या निर्दोषातें. ॥ १५७५ ॥ लोक न भिती ज्यापासूनी । भय लोकांचें नसे ज्याच्या मनीं ।

हर्षामर्ष भयोद्वेग सुटोनी । गेले ज्याचे. ॥ १५७६ ॥ या गुणीं हीन पूर्वोक्त । म्हणता नये जो वर्णिला भक्त । तेव्हा हा त्यावेगळा म्हणणे अयुक्त । तोची हा. ॥ १५७७ ॥ याकारणें मुख्यार्थ । साधत असता कां शिणावें व्यर्थ ? । बाधित अर्थ ऐसा समर्थ । बोलेल, ऐसें घडेना. ॥ १५७८ ॥ आता ऐसा श्लोकत्रयवरी । जो भक्त वर्णिता जाला हरी । तो तो ज्यास शांति बाणली बरी । त्याग बाणता ध्यानयोगें. ॥ १५७९ ॥ **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** या श्लोकें **श्री**रंग । बोलिला कर्मफलत्यागप्रसंग । त्या पक्व ज्ञानियाचें अंतरंग । पक्व, ऐसे श्लोकत्रये वर्णिलें. ॥ १५८० ॥ कर्मफलत्याग । म्हणजे कर्माचा अधिकारप्रसंग । आणि फलत्याग म्हणजे वियोग । सुखस्पृहेचा. ॥ १५८१ ॥ तरी ज्यास असे ज्ञान । आणि घडे सर्वात्मतेचें ध्यान । त्यास होता ध्याने समाधान । त्याग उचित हा घडो शके. ॥ १५८२ ॥ आणि त्याहूनी जो पूर्वश्लोक । तेथे अर्जुनासही उत्तमश्लोक । **'सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु'** म्हणे **श्री**वत्सांक । ध्यानयोग बिंबायाकारणें. ॥ १५८३ ॥ जैसा अष्टादशीं । **'सर्वधर्मान्परित्यज्य'**[1] म्हणेल. ऐसा द्वादशी । सर्व कर्म आणि फलत्याग उपदेशी । ज्ञानपरिपाक पावावया. ॥ १५८४ ॥ सर्व कर्माचा त्याग करीं । आणि सर्वात्मभावाचा आश्रय धरीं । ऐसा तदेकचित्त होय जरी । त्या त्यागे त्याग अनायासें बिंबे ध्यानें तयाते. ॥ १५८५ ॥ म्हणोनी अष्टादशी । बोलणार तोची द्वादशी । त्याग अर्जुनाते उपदेशी । की या त्यागे सर्वात्मता बिंबते. ॥ १५८६ ॥ परी हा त्याग भक्तातें उचित । म्हणूनी आधी अच्युत । सांगोनी **धर्म भागवत** । तें न ठाके तरी या त्यागे शरणागति बोलिला. ॥ १५८७ ॥ आतां भक्त ऐसा ज्ञानी । त्याग सर्वा कर्माचा करूनी । भजे सुखस्पृहा टाकूनी । तोही त्याच कोटीचा म्हणावा म्हणतसे या श्लोकी. १५८८॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

अगा! जो निरपेक्ष । शुचि सर्वदा आणि दक्ष । गेली ज्याची व्यथा म्हणे अंबुजाक्ष । आणि सर्व कर्मारंभ टाकिले ज्याणें; ॥ १५८९ ॥ तो मद्भक्त की प्रिय मी ज्याला । म्हणूनी तोही प्रिय मला । श्लोकाचा अर्थ इतका जाला । परी विशद बोलता तत्त्व कळे. ॥ १५९० ॥ सर्वारंभपरित्यागी । म्हणिजे सर्व वेदोक्त कर्मे जो त्यागी । आणि बाह्य सुखयत्नारंभही नसती ज्यालागीं । सुखस्पृहा टाकिली याकारितां. ॥ १५९१ ॥ तो न आरंभी कर्मे वैदिक । की

[1] अ० १८, श्लो० ६६.

शरण सर्वात्मभावीं साधक । अथवा न आरंभी कर्म लौकिक । कीं सुखस्पृहा ज्यानें टाकिली. ॥ १५९२ ॥ जो ऐसा सर्वारंभपरित्यागी । या श्लोकीं वर्णितो त्यालागीं । पूर्वश्लोकपर्यंत जो पक्क योगी । तो भक्त वर्णिला जाणावा. ॥ १५९३ ॥ अपक्क योगी ज्ञानी । चित्त ज्याचे न थारे ध्यानी । त्या भक्तें सर्वात्मभावें शरण येउनी । तदेकनिष्ठ व्हावे टाकूनी सर्वा धर्मातें. ॥ १५९४ ॥ तो सर्वारंभपरित्यागी म्हणावा । तोही मद्भक्त आणि माझा प्रिय गणावा । कीं अपक्क तरी तो ज्ञानीच जाणावा । जो आत्मा जाणे व्यतिरेकअन्वयेंकरूनी ॥ १५९५ ॥ प्रिय आत्मा कळला जया । मी सर्वात्मप्रिय कळलों तया । प्रिय तेंची सर्वदा धनंजया। सर्वात्मकत्व मजही आपुले. ॥ १५९६ ॥ प्रिय आत्मा एक साचा । तोची माझा आणि त्याचा । तो आणि मी ऐसी वाचा । उपाधिभेदे बोलावी. ॥ १५९७ ॥ हे बोलिलों सप्तमी । कीं प्रिय भक्ता ज्ञानियाचा मी । आणि तो प्रिय माझा ऐसेंही जगत्स्वामी । बोलिलों तेथें. ॥ १५९८ ॥ तैसाच या प्रसंगीं प्रस्तुत । प्रीति अन्योन्य वदलो अत्यंत । ती पक्कयोगी भक्त । हा साधक निश्चित परी प्रीति तैसीच परस्परे. ॥ १५९९ ॥ पुत्र जाला तरुण । तो बरा जाणे पित्याचे गुण । बाळ नेणे म्हणूनी करुण । काय उणें पाहे तयातें ? ॥ १६०० ॥ भक्त अपक्क असिला जरी । पक्कापरीस ओझें त्याचे मजवरी । त्याची सर्व चिंता मी श्रीहरी । अगा! अर्जुना! करीतसें. ॥ १६०१ ॥ जो पक्कची जाला । म्या काय सांभाळावे तयाला ? । क्षणमात्र न स्फुरे जयाला । द्वैत कांहीं. ॥ १६०२ ॥ पक्षहीन बाळ । पक्षी त्यांचाच करिती सांभाळ । देखोनी त्याचा परिपक्ककाळ । निश्चित असती. ॥ १६०३ ॥ तैसे ज्ञानी भक्त । जरी अपक्क आणि माझे ठायीं अनुरक्त । तेही पक्कासमची माझे ठायी प्रीतियुक्त । त्याचे ठायीं मीही प्रीतियुक्त तैसाची. ॥ १६०४ ॥ यालागीं मद्भक्त ऐसा । तो माझे ठायीं सप्रेम जैसा । मीही त्याचे ठायीं तैसा । प्रीतियुक्त. ॥ १६०५ ॥ कीं जरी पक्कज्ञान न बाणे । तरी आत्मत्वें मातें जाणे । प्रिय आत्माच तो मी ऐसें म्हणे । तो तोची आत्मा प्रिय आत्मा माझाही. ॥ १६०६ ॥ आणि त्या मजमाजी अखंडता । चित्तास बाणायाकारणें तत्त्वतां । सर्व कर्मांचा पांडुसुता! । आरंभ त्यागी. ॥ १६०७ ॥ प्रारब्धकर्मप्रवाहीं । देह फिरतां त्या देहीं । माझ्या शरणागतीकरूनी कांहीं । आरंभ न करी कर्माचा. ॥ १६०८ ॥ प्रारब्ध भोगितां विस्मृति पडे । तरी शीघ्र शरणागतीमधें दडे । नावेवरील पक्षी उडे । नावेमध्येंच बैसे मागुती.

---

१. अ० ७, श्लो० १७.

॥ १६०९ ॥ प्रारब्ध कर्मेंची फिरे । परंतु कर्ममार्गी न भरे । त्यागूनी सर्व कर्में उरे । शरणागत सर्वात्मभावाचा. १६१० ॥ ऐसा उत्तरार्धी वर्णणें असे । तोची पूर्वार्धी वर्णिला दिसे । पूर्वार्धलक्षणींही गवसे । सर्वारंभपरित्याग भक्ताचा. ॥ १६११ ॥ कीं तो अनपेक्ष । म्हणजे नव्हे विषयसुखाचा सापेक्ष । तरीच शुचि, तरीच दक्ष, । उदासीन, गतव्यथ तरीच तो. ॥१६१२॥ त्यागी वेदोक्तधर्मांतें । आणि करी विषयसाधका कर्मांतें । काय वाणेल ऐसियातें । ध्यान सर्वात्मभावाचे? ॥ १६१३ ॥ म्हणूनी फलत्यागसहित । त्याग बोले भगवत । फलशब्दे सुख तेव्हा निश्चित । सुखस्पृहात्याग फलशब्दे. ॥ १६१४ ॥ सुखस्पृहात्याग घडे । तरीच सर्वकर्मत्याग जोडे । तेव्हां शरणागतीचा ठसा पडे । सर्वात्मभावें. ॥ १६१५ ॥ म्हणूनी तो अनपेक्ष । ऐसें बोले कमलपत्राक्ष । आणि विषयवासना टाकी तोची दक्ष । शुचि म्हणावा. ॥ १६१६ ॥ अशुचि ते विषयवासना । शुचित्व निरपेक्ष सम असेना । ऐसा शुचि म्हणूनी अर्जुना! । दक्षही तो. ॥ १६१७ ॥ कीं न सुटती प्रारब्धकर्मभोग । जरी केला सुखस्पृहात्याग । तो भोग भोगूनी निःसंग । दक्ष ऐसा की शुचि निरपेक्ष मागुती. ॥ १६१८ ॥ बलवत वेठी धरी । नसोनी त्याची अपेक्षा ते करी । तैसा प्रारब्धे विषय भोगी, परी । सापेक्ष नव्हे. ॥ १६१९ ॥ म्हणूनी भोगूनिही विषय । अनपेक्ष शुचि तो ऐसा हा निर्णय । दक्ष म्हणतां सूचवी अव्यय । समजे कृपापात्र अर्जुनही. ॥ १६२० ॥ ऐशा भावें म्हणे दक्ष । कीं भोग भोगूनी शुचि अनपेक्ष । विशदही हा भाव अंबुजाक्ष । दावितो उदासीन म्हणोनी. ॥ १६२१ ॥ देहीं नसे अहता । नसे स्त्रीपुत्रादिकांची ममता । भोग भोगी तरी पांडुसुता! । उदासीन तो. ॥ १६२२ ॥ भोग भोगाचीं साधनें । आपुलीं न मानी गृहधनें । शरीरें भोगी, परि मनें । त्यागशील उदासीन म्हणोनी. ॥ १६२३ ॥ भोग घडतां उदास । म्हणूनी काहीं व्यथा नसे त्यास । गतव्यथ ऐसियास । म्हणावे अर्जुना! ॥ १६२४ ॥ जे भोग भोगितां गोड वाटे । मन त्याचें लागे त्याच वाटे । भोग नव्हतां ऊर फुटे । व्यथेकरूनी. ॥ १६२५ ॥ हा उदासीन सर्वथा । यासी कैची अभिलाषादि व्यथा? । ऐसी पूर्वार्धी गुणकथा । तो सर्वारंभपरित्यागी वर्णिला उत्तरार्धी. ॥ १६२६ ॥ जो ऐसा सर्वत्यागी भागवत । सर्वात्मभावे शरणागत । तोही मद्भक्त कीं मी प्रिय त्यास भगवत । म्हणूनी तोही प्रिय माझा अर्जुना! ॥ १६२७ ॥ सर्वात्मभाव बिबावा । म्हणूनी सर्वात्मभावें मज देवाधिदेवा । शरण ये रीतीचा पांडवा!। मदर्थ टाकिले

ज्यानें सकळारंभ. ॥ १६२८ ॥ ऐसा सर्वकर्मत्यागी । अनायासें होतो तैसाच पक्वयोगी । जैसा अर्जुना! तुजलागी । प्रस्तुत पूर्वश्लोकपर्यंत बोलिलो. ॥ १६२९ ॥ आतां सिद्धि पावला ऐसा साधक । ऐक त्याचें कौतुक । म्हणूनी बोलतो **श्री**वत्सांक । अध्यायवरी हेंची या श्लोकापासुनी. ॥ १६३० ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

जो न वाहे हर्ष । जो न करी कोणाचाही द्वेष । न करी शोक आणि मानूनी विष । विषयकांक्षा जो न धरी. ॥ १६३१ ॥ त्यास त्याग शुभाचा म्हणजे पुण्याचा साधला । आणि अशुभा पापाचाही त्याग जाला । ऐसा ज्ञानें परिपाकातें पावला । आणि सगुणी भक्तिमंत. ॥ १६३२ ॥ अर्जुना! जो ये रीती । होउनी पक्व सगुणप्रीती । तो प्रिय माते म्हणे **श्री**पती । संक्षेपें अर्थ ऐसा श्लोकाचा. ॥ १६३३ ॥ परंतु हर्ष, द्वेष, शोक । नसती आणि नसती अपेक्षादिक । म्हणूनी **श्री**वत्सांक । **भ**गवंत मागेंही बोलिला. ॥ १६३४ ॥ पुनरुक्ति ऐसी दिसे । परी विचारितां नसे । तेंची रीति पुन्हा या लक्षणीं गवसे । परंतु प्रसंग हा वेगळा एथूनी. ॥ १६३५ ॥ **'अद्वेष्टा सर्वभूतानां'** या श्लोकापासुनी । पक्वयोगी भक्त तीन श्लोकेंकरूनी । वर्णूनी जो सर्व धर्म त्यागुनी । सर्वात्मभावें शरण तो पूर्वश्लोकीं वर्णिला. ॥ १६३६ ॥ जो शरणागत ये रीती । ज्ञान त्याचें पावे परिपाकाप्रती । आणि ऐसा होउनी सगुणीं प्रीति । तो वर्णिजेतो या श्लोकें. ॥ १६३७ ॥ सिद्धावस्था याची । तैसीच पूर्वी बोलिला जो त्याची । म्हणूनी पुनरुक्ति होय म्हणावी साची । परंतु वेगळा हा प्रसंग. ॥ १६३८ ॥ एक अभ्यासेंची सिद्ध जाले । अमृत सर्वात्मभावाचें प्याले । कोणी भागवतधर्में पावले । ज्ञानी भक्तयोग सिद्धीतें. ॥ १६३९ ॥ कोणी टाकूनी सर्व धर्म । त्यागूनी सुखसाधनाचें कर्म । सर्वात्मभावें धरिलें वर्म । शरणागतीचें. ॥ १६४० ॥ तोही पावे योगसिद्धी । तेव्हां त्या पक्वयोगियास समृद्धी । यासही बाणे तेव्हां प्रसिद्धी । तैसीच गुणांची याचिया. ॥ १६४१ ॥ म्हणूनी पुनरुक्ती । परिहरे विचारितां ह्या युक्ती । आतां विशद **भ**गवंताची उक्ती । या श्लोकीं वाखाणावी या प्रकारें. ॥ १६४२ ॥ विषय बरा प्रारब्धेंकरूनी । प्राप्त जाला, तरी मनीं । हर्ष न पावे आणि वाईट म्हणोनी । द्वेष न करी सर्वथा. ॥ १६४३ ॥ न होतां लाभ, होतां हानी । शोक न करी तो ज्ञानी । जें नाहीं, तें प्राप्त हो म्हणोनी । कांक्षा काशाची धरीना. ॥ १६४४ ॥ आणि शुभें पुण्यें संचितें । क्रियमाण पुण्यासहितें ।

जन्मजन्मांतरकृतें । त्यागीं सकळही. ॥ १६४५ ॥ आणि अशुभे पापे जितकीं । संचिते क्रियमाणे तितकीं । त्यागी म्हणे या श्लोकीं । हेंची अष्टादशीं बोलेल. ॥ १६४६ ॥ **'सर्वधर्मान्परित्यज्य'** या श्लोकेंकरूनी । **'अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि'** म्हणोनी । म्हणेल कीं सर्वे पापापासुनी । सोडवीन मी तूतें. ॥ १६४७ ॥ कीं पाप पुण्य कर्म मात्र । बधक म्हणोनी पवित्र । तें पुण्यही पापची अपवित्र । दोन्ही ज्ञानपरिपाकें नाशती. ॥१६४८॥ पुण्य पाप संचित क्रियमाण । हें पापचि म्हणूनि शास्त्रप्रमाण । अष्टादशीं हें व्याख्यान । विशद होणार तेथें पाहावे ॥ १६४९ ॥ सर्व धर्म त्यागूनी । एका अद्वितीया मातें शरण ये म्हणोनी । म्हणे आणि मग मी सर्वा पापापासूनी । सोडवीन ज्ञानपरिपाकें. ॥ १६५० ॥ जे या द्वादशीं येविषयीं उक्ती । तेची अष्टादशी पुनरुक्ती । सर्वत्यागे अनन्यभक्ती । तेची या अध्यायात प्रस्तुती बोलतसें. ॥ १६५१ ॥ सर्वकर्मसुखस्पृहात्याग । **अर्जुनास** वदला त्या भक्ताचा प्रसंग । पूर्वश्लोकीं बोलिला **श्री**रंग । कीं तो सर्वारंभपरित्यागीही प्रिय माझा. ॥ १६५२ ॥ आता **'यो न हृष्यति'** या श्लोकीं तयाचा । होतां ज्ञानपरिपाक साचा । तो ऐसा म्हणूनि वाचा । **भगवताची** बोलते. ॥ १६५३ ॥ लक्षणें वर्णूनी पूर्वार्धी । ज्ञानपरिपाक सूचवी उत्तरार्धी । कीं ध्यानें बाणतां ज्ञानसिद्धी । नाश पुण्यपापाचा होतसे. ॥ १६५४ ॥ तृप्ति बोलिली ज्या बोलें । त्या बोलेचि जाणावें उदर भरलें । म्हणतां शुभाशुभ नाशले । ज्ञानपरिपाक ज्ञानशब्दीं. ॥ १६५५ ॥ जेव्हां ज्ञानी पक्वयोगी । तेव्हांची तो शुभाशुभपरित्यागी । कीं पुण्यपाप दोन्ही ज्यालागी । न शकती देऊ जन्मांतरातें. ॥ १६५६ ॥ संचित क्रियमाण ऐसे नुरे । आणि प्रारब्ध भोगितां सरे । तो मग कोण्या हेतूनें भरे । जन्ममृत्युमार्गी मागुती? ॥ १६५७ ॥ योगसिद्धीतें न पावले । ते आत्मा कळोनिही योगभ्रष्ट जाले । षष्ठाध्यायात श्लोक[1] उदंड बोलिले । येविषयीं **भगवतें**. ॥ १६५८ ॥ ज्ञानपरिपाकावांचूनी । संचित क्रियमाण न जळे म्हणोनी । शुभाशुभपरित्यागी तो यावरूनी । कीं ज्ञानपरिपाकातें पावला. ॥ १६५९ ॥ घडे पापपुण्याचा त्याग तेव्हां । कीं जळे ज्ञानाग्नीनें जेव्हां । परी यास हें घडलें तेधवां । जेव्हां शरण सर्वधर्मत्यागेंकरूनी. ॥ १६६० ॥ पूर्वश्लोकीं सर्वारंभपरित्यागी । या श्लोकीं शुभाशुभपरित्यागी । त्याचीच सिद्धावस्था हे म्हणूनि यालागीं । व्याख्यान ऐसें. ॥ १६६१ ॥ अष्टादशी सर्वा पापापासूनी । मी सोडवीन तूतें म्हणोनी ।

---

१. अ० ६, श्लो० ४१-४५.

म्हणे ते यावरूनी । पापशब्दें पुण्यपाप जाणावें. ॥ १६६२ ॥ सर्व पाप संचित क्रियमाण । ब्रह्मसूत्र येविषयीं प्रमाण । कीं कर्मबंधें पुन्हा होय निर्माण । पापची तें म्हणावें पुण्यही. ॥ १६६३ ॥ आणि पक्वयोगी पूर्वोक्त । जे वर्णिले देवें भक्त । तेची हे म्हणावे तरी अयुक्त । बोललीच लक्षणें कां बोले ? ॥ १६६४ ॥ एवं भिन्न प्रकरण । आणिकाचेची लेखावें विवरण । आणि पूर्वश्लोकीं श्रीचरण । वर्णी सर्वारंभपरित्यागी म्हणोनी. ॥ १६६५ ॥ आणि तोची शुचि तो दक्ष । ही साधकलक्षणेंही बोले कमलपत्राक्ष । या श्लोकीं जितांची वर्णी मोक्ष । शुभाशुभपरित्यागी तो म्हणता. ॥ १६६६ ॥ ज्याला त्याग घडला शुभाशुभाचा । तोचि शुभाशुभपरित्यागी साचा । तो जीवन्मुक्त म्हणूनि वाचा । सूचवी येथें मुकुंदाची. ॥ १६६७ ॥ जो ऐसा परिपक्व आत्मज्ञानी । भक्तिमंत ऐसाही होउनी । तो माझा प्रिय म्हणोनी । या श्लोकीं बोलिला भगवंत. ॥ १६६८ ॥ जे निर्गुणवादाभिमानी । विपरीत सर्व त्यांच्या व्याख्यानी । कीं भक्त म्हणता ऐसा ज्ञानी । पोट दुखो लागे तयाचें. ॥ १६६९ ॥ असो त्यांची काहणी । विरोध ज्यांस भगवद्वाणी । आता आणखी चक्रपाणी । याच भक्तातें वर्णितो श्लोकद्वयें. ॥ १६७० ॥

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

अगा ! तो सर्वत्र निर्वैर परी । कोणी पातकी शत्रुत्व करी । आणि कोणी यास मित्रत्व धरी । जो बहु जन्मीं कृतार्थ. ॥ १६७१ ॥ परंतु भक्ता ज्ञानियांस । सर्वं वासुदेव हा दृढ अभ्यास । म्हणूनि भगवद्रूपची पाहे उभयास । शत्रुमित्र सम ये रीती. ॥ १६७२ ॥ तैसाची मानी । तैसाची अपमानीं । मानापमान दोन्ही मानी । मृषा चित्स्वरूपीं आपुल्या. ॥ १६७३ ॥ मानापमानदाता । मानापमानांचा ग्रहीता । आणि मानापमान क्रिया वार्ता । सर्व जडवृंद प्रकाशे चित्स्वरूपें. ॥ १६७४ ॥ म्हणूनि मानें वाटेना मान । अपमानें वाटेना अपमान । दोन्ही वाटती समान । मिथ्या आपल्या सत्स्वरूपीं. ॥ १६७५ ॥ अर्थ ऐसा अर्धाचा । परंतु येथें शंका आणि परिहार त्याचा । सुचे ऐसी उत्तरार्धी भगवद्वाचा । वर्णावी ये स्थळीं. ॥ १६७६ ॥ कीं सर्वत्र वस्तू समान । पाहे सदा ऐसा वर्तमान । शत्रुमित्र मानापमान । तो काय जाणे हीं नांवें आणि भाव. ॥ १६७७ ॥ ऐसें असोनी । सम शत्रुमित्रमानापमानीं । कां म्हणे भगवद्वाणी । कीं भगवद्भावच सर्वत्र तो पाहे. ॥ १६७८ ॥ ऐसी शंका ये स्थळीं । परी प्रारब्धभोग अत्यंत बळी । प्रारब्धें वर्ततां उकले कळी ।

स्थळस्थळी बुद्धीची. ॥ १६७९ ॥ म्हणूनि शीतोष्णीं सुखदुःखीं सम । उत्तरार्धीं म्हणे पुरुषोत्तम । यात प्रारब्धक्षयाचा अवगम । सूचवी येथें. ॥ १६८० ॥ कीं पूर्वकर्में मित्र । पूर्वकर्में अमित्र । मान अपमान फळ विचित्र । सर्वही प्राचीन कर्माचे. ॥ १६८१ ॥ शत्रुमित्र मानापमान । बुद्धीस इत्यादि नव्हता ज्ञान । भोग न घडे परतु समाधान । की सर्व भगवद्रूप हा पाहे. ॥ १६८२ ॥ ततुदृष्टी भोगी पट । मृत्तिका म्हणूनि वर्तवी घट । करूनि जड खटपट । चैतन्य पाहे. ॥ १६८३ ॥ लेऊनिही अलकार । जो सुवर्णी सुवर्ण मेळवणार । ते देखूनिही भोगोनिही प्रकार । सोनेंची आहे ऐसें पाहे. ॥ १६८४ ॥ ऐसाची प्रारब्धभोग । मानी होतां शीतोष्णयोग । सुखदुःखरूपे प्रारब्धरोग । क्षय पावतो ऐसे समत्व उभयत्र. ॥ १६८५ ॥ शीतोष्ण आणि शीतोष्णापासूनी । सुख आणि दुःखही हीं दोन्ही । मिथ्या तरग आत्मसिधूवाचूनी । काहींच नसती. ॥ १६८६ ॥ तथापि शीतोष्णापासूनि सुख । तें बरे वाटे आणि वाईट दुःख । परतु सुख ज्याला विश्वतोमुख । तो सम या सुखीं आणि दुःखीही. ॥ १६८७ ॥ की फुलाचा हाणता झेला । आपण सुखी शत्रु मेला । आणि रणरंगीं झगडोनि मारिला । सुख दोहीं मारिता शत्रूते. ॥ १६८८ ॥ प्रारब्धशत्रूचा क्षय । भोगेची ऐसा निर्णय । दुःखेही प्रारब्ध सरे हा निश्चय । त्यास सुखची वाटे तें दुःखही. ॥ १६८९ ॥ रुतली देहीं नखे क्रूरे । आणि मारिला शार्दूळ शूरे । दुःख देती क्षते निष्ठुरे । तरी सुखावहे तो मानी. ॥ १६९० ॥ एवंच सुखदुःख दोन्ही । सारिती प्रारब्ध म्हणोनी । प्रारब्धरोग दोहीं भोगकेरूनी । क्षय पावतो. ॥ १६९१ ॥ याही परी सम । सुखदुःख भोगी भक्त परम । ऐसें काहीं नाहीं की विषम । जेथें पाहे हा भक्त माझा. ॥ १६९२ ॥ ऐसी समता अन्या जना । विषयसंगयोगे कधीं येईना । यालागीं जो ऐसा अर्जुना! । तो जाण सर्वथा निःसंग. ॥ १६९३ ॥ विषयसंग विवर्जित । तोची ऐसा होय ऊर्जित । संग वासना ते जाली भर्जित । तो ऐसा अर्जुना! ॥ १६९४ ॥ याही पुढे जो श्लोक । तेथेंही उत्तमश्लोक । वर्णूनि लक्षणें कितीएक । प्रिय ऐसा माते म्हणे या श्लोकीं. ॥ १६९५ ॥

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केन चित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

निंदा आणि स्तुति । दोन्ही समान ज्याला दिसती । की देहाभिमानाची मोडली वसती । गेलें तेव्हांच हें विषमत्व. ॥ १६९६ ॥ स्तुति निदा स्वदेहाची । विषम कधीं न मानी बुद्धि त्याची । आणि आपण इतराची । निदा

आणि स्तुतिही करीना. ॥ १६९७ ॥ भाव ऐसा धरूनी । **कृष्ण** म्हणे अगा! तो मौनी । अध्यात्म **भ**गवत्कथा या दोंवाचुनी । कदापि काही बोलेना. ॥ १६९८ ॥ **शु**कादि जीवन्मुक्ती । बोलिल्या ऐशाच दिव्य उक्ती । अन्य वार्त्ता केल्या भक्ती । हें तों कोठे न आढळे. ॥ १६९९ ॥ आणि स्वरूपीं चित्त लीन । हे अखड त्याचे मौन । मौन शब्दाचे व्याख्यान । म्हणूनि ऐसे ये स्थळी. ॥ १७०० ॥ स्वस्वरूपी मग्न सदा । व्यर्थ गोष्टी न वदे कदा । अध्यात्म की कथासंपदा । श्रोते सादर मिळता वदे कृपेनें. ॥ १७०१ ॥ अगा! विषयवासना तो नसे ज्याला । देहादिनिर्वाहार्थही न बोले बोला । कीं आयुष्यपर्यंत भलतयाला । अन्न आयुष्यची देतसे. ॥ १७०२ ॥ अन्नाच्छादनाहीकारणें । न पडे ज्याला बोलणे । न बोलता जे प्राप्त जाले त्यानें । संतोष त्याला. ॥ १७०३ ॥ जेव्हा मिळाले जें जैसे । तेव्हां अगीकारी तेंच तैसें । 'हें बरे,' 'हे वाईट,' ऐसे । कधीं न म्हणे पोटातही. ॥१७०४॥ इद्रियांची सहज खोडी । की त्यास गोडाच विषयाची गोडी । ते इद्रियाची वृत्ति सोडी । वृत्ती धरी प्राणाची. ॥ १७०५ ॥ कडू अथवा गोड । पोट भरतां पुरे प्राणाचे कोड । कदन्न सदन्न फाटके धड । वस्त्र मिळता संतुष्ट भलतशानें. ॥ १७०६ ॥ गृह अथवा मठ । अथवा एक खोपट । न करी अलिप्त निपट । वाटों नेदी ममतेते. ॥ १७०७ ॥ परगृही सर्पासारिखा । राहे वसे तरी पारिखा । बाह्य पदार्थ त्या अतर्मुखा । आप्त न वाटे कोणीही. ॥१७०८॥ यासही हेंची मूळ । की बुद्धि त्याची अचल । नव्हे विषयवासनेनें चचळ । बुद्धि स्वस्वरूपापासूनी. ॥ १७०९ ॥ ऐसिया लक्षणें युक्त । आणि सेवी नुसतेंचीं अव्यक्त । न म्हणवी सगुणभक्त । तो प्रिय नव्हे **स**र्वेश्वरातें. ॥ १७१० ॥ की प्रीतिवृत्तीचा धर्म । त्या प्रीतीनें युक्त तो सधर्म । ते म्हणावे सगुणब्रह्म । जे प्रिय नव्हे निर्गुणोपासकांतें. ॥ १७११ ॥ ज्याची प्रीति ज्याला नसे । ते प्रिय त्याचे होती कैसे । येविषयीं प्रसग ऐसे । वर्णिले मागे स्थळस्थळीं. ॥ १७१२ ॥ **'ये' यथा मां प्रपद्यंते'** या श्लोकेंकरूनी । **'तांस्तथैव भजाम्यहं'** म्हणोनी । चतुर्थाध्यायात नेमुनी । निर्णय केला या गोष्टीचा. ॥ १७१३ ॥ करितां निर्गुणीं अभ्यास । चित्त कांही थारे तितकाची त्यास । लाभ निर्गुणोपासकास । बोलावा. ॥ १७१४ ॥ उपासकावरी प्रीति करणे । हीं निर्गुणी नसती स्फुरणे । आणि सगुण उपेक्षिता सगुणें । प्रीति करणें घडेना. ॥ १७१५ ॥ सगुण कल्पवृक्षस्वभाव । त्यासी तैसाची

---

१. अ० ४, श्लो० ११.

ज्याचा जैसा भाव । विषम फळ देऊनि सम देव । याची गुणेंकरूनी. ॥ १७१६ ॥ म्हणोनि अव्यक्तोपासक । प्रिय न म्हणे कोठे शेषपर्यंक । **'यो मे भक्तः स मे प्रियः'** ऐसाची जो तो श्लोक । याच भावें पदोपदीं बोलतो. ॥ १७१७ ॥ प्रस्तुत भक्तांचीं लक्षणें । जीं बोलिलीं कमलेक्षणें । हींच निर्गुणोपासकातेंही असती याकारणें । चमत्कार भगवत दाखवी. ॥ १७१८ ॥ कीं ऐशा लक्षणीं युक्त । आणि जो माझा भक्त । प्रीति माझी अभिव्यक्त । त्याच्याची ठायीं. ॥ १७१९ ॥ मागे ऐसेंची विशद । देव बोलिला प्रतिपद । याही श्लोकीं मुकुंद । हेंचि चतुर्थचरणीं बोलतो. ॥१७२०॥

चतुर्थचरण—**भक्तिमान्मे प्रियो नरः ।**

अगा ! ये रीतीचा नर । आणि भक्तीनें युक्त मत्पर । तो मज प्रिय अतितर । जाण अर्जुना ! ॥ १७२१ ॥ श्लोक ऐसा एकुणिसावा । आतां यापुढें जो विसावा । तो अध्यायाचा विसावा । खडिले कल्पितार्थ ज्या श्लोकीं. ॥१७२२॥

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

अर्जुना ! या अध्यायांत । जें बोलिलों श्रवणामृत । तें म्हणावें **धर्मामृत** । कीं नुसतें निर्धर्म निर्गुणामृत हें नव्हे. ॥ १७२३ ॥ ज्यांत नाहीं मृत । त्यातें म्हणावें अमृत । मृत म्हणिजे मरणार अत्यंत । नश्वर जडभाग जाणावा. ॥ १७२४ ॥ तो जो जडभाग नश्वर । दृश्य तितकें चराचर । तें चित्स्वरूपीं नाहीं ऐसें सर्वेश्वर । नवमीं बोलिला. ॥ १७२५ ॥ **'न च मत्स्थानि भूतानि'**[1] । भूतेंही मजमाजि नाहींत म्हणोनी । बोलिला अमृत शब्द यावरूनी । चैतन्यवाचक जाणावा. ॥ १७२६ ॥ आणि वेद स्थळस्थळीं गर्जतो । कीं ज्ञानी अमृत होतो । अमृत होतो तो कीं जो उरतो । चिद्वस्तु मात्र. ॥ १७२७ ॥ एवच चैतन्य अमृत । परी निर्गुण निर्धर्म गुणधर्मरहित । भूतें दिसोनि नाहींसींच असती जयांत । तें धर्मामृत म्हणावें. ॥ १७२८ ॥ एवंच जें ऐसें चराचर । चैतन्यची दिसे तो योग ऐश्वर । नवमीं म्हणे सर्वेश्वर । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ १७२९ ॥ ऐसा जो योग ऐश्वर । तोची विश्वरूप जगदीश्वर । कीं विश्वरूप दावितांही म्हणे सर्वेश्वर । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ १७३० ॥ **'दिव्यं ददामि ते चक्षुः'**[2] या श्लोकीं । ऐसें भगवत बोलिला कीं । **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणिजे अव-

१ अ० ९, श्लो० ५ २. अ० ११. श्लो० ८

लोकीं । माझा योग ऐश्वर. ॥ १७३१ ॥ जो पाहेन म्हणे विश्वरूप । त्यास पाहें म्हणे योग ऐश्वररूप । एवंच जड पटरूपे ततु चित्स्वरूप । योग ऐश्वररूप हे देवाचें. ॥ १७३२ ॥ ऐश्वर म्हणतां सगुणा ईश्वराचें । रूप विश्वरूप हेंची साचें । तेव्हां अमृत धर्म युक्ता सगुणाचे । म्हणूनि म्हणावें हें धर्म्यामृत. ॥ १७३३ ॥ कोणास पाठ धर्मामृत । कोणास पाठ धर्म्यामृत । धर्म शब्द यकाराक्षरासहित । करूनि धर्म्यामृत म्हणती ते. ॥ १७३४ ॥ कीं धर्मेंकरूनि युक्त । तें धर्म्य सगुण जे उपासिती भक्त । माया धर्मातीत अव्यक्त । धर्म्य त्यातें म्हणवेना. ॥ १७३५ ॥ एव चैतन्य अमृत अव्यक्त । तें दिसे जगदाकारे व्यक्त । तें धर्मामृत म्हणूनि भक्त । उपासिती. ॥१७३६॥ नवमीही **'राजविद्या राजगुह्यं'**[1] या श्लोकेकरूनी । **'प्रत्यक्षावगमं धर्म्यं'** म्हणोनी । हें ज्ञान धर्म्य म्हणूनि आधीं वदोनी । **'नच मत्स्थानि भूतानि'** येथवरी बोलिला. ॥ १७३७ ॥ भूतें दावूनि आपणांत । तीही मजमाजीं नसती ऐसा सिद्धांत । नवमी बोलिला तें अमृत । की दिसोनि मृत जड नसे ज्यामध्यें. ॥ १७३८ ॥ मृत जड नाहींच परी । दिसे जैसा सर्प दोरी । म्हणूनि धर्मयुक्त अमृत ऐसी वैखरी । देवाची येथें बोलते. ॥ १७३९ ॥ माया गुणधर्मेंकरूनी । युक्त चैतन्य म्हणोनी । धर्म्यामृत म्हणावें जें तुझ्या प्रश्नावरूनी । या अध्यायात बोलिलों हा भाव. ॥ १७४० ॥ प्रश्न अर्जुनाचा ये रीती । की एक ऐसे सगुणा तूतें उपासिती । एक अक्षर अव्यक्तची भजती । या दों पक्षांत अधिक कोण योगवेत्ते? ॥ १७४१ ॥ प्रश्न **'तेषां के योगवित्तमाः'** । उत्तर **"ते मे युक्ततमाः"** । दोघेही योगवेत्ते त्यात पुरुषोत्तमा । अधिक योग वित्तम ज्ञानी स्वभक्त संमत? ॥ १७४२ ॥ कीं योगवेत्ते अधिक । अव्यक्तोपासकांपरीस सगुणोपासक । की जगची हें जगन्नायक । हा योग सगुणोपासकांचा. ॥ १७४३ ॥ तेही अन्वयज्ञानेंकरूनी । जडतरंगही चित्सिंधु म्हणोनी । भास मायांश तो त्यागुनी । उपासिती तत्प्रकाशका निर्गुणानें. ॥ १७४४ ॥ भक्त तोही मायाभास । जगद्रूपें ध्याती जगन्निवास । कीं सुवर्णास आणि अलकारास । भेद कैचा? ॥ १७४५ ॥ याचेची नांव योग ऐश्वर । उपास्य याच रूपे सर्वेश्वर । एव चिद्रूपे चराचर । धर्म्यामृत यातें म्हणावें. ॥ १७४६ ॥ **'ये[2] तु सर्वाणि कर्माणि'** । **'मयि संन्यस्य**

---

१ अ० ९, श्लो० २. २. अ० १२, श्लो० ६.

**मत्परा'** या श्लोकेंकरूनी । **'अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते'** म्हणोनी । अनन्ययोगेची भक्त उपासिती बोलिला. ॥ १७४७ ॥ जड तरंग चित्सागर । हा अनन्यची योग ऐश्वर । तेंची धर्मामृत म्हणे सर्वेश्वर । या अध्यायांत निरूपिलें. ॥ १७४८ ॥ पुटे **'मय्येव[1] मन आधत्स्व'** येथुनी । मज सगुणीं आत्मदृष्टीकरूनी । मन ठेवीं बुद्धि प्रवेशवीं म्हणूनी । सगुण धर्मामृतची बोलिला. ॥ १७४९ ॥ पुढें हेंही ने[2] ठाके जेरी । अभ्यासयोगे मज सगुणा सर्वात्मकातें पावाया तरी । अभ्यासयोग म्हणे करीं । तेंही न ठाके तरी मत्कर्मपरम होय तू. ॥ १७५० ॥ याहीपुढे साधनक्रम । सांगतां बोलिला पुरुषोत्तम । कीं माझ्या योगाचा आश्रित परम । होऊनि तदर्थ सर्वकर्मफलत्याग करीं तू. ॥ १७५१ ॥ **'अथै[3]तदप्यशक्तोसि'** । या श्लोकीही म्हणे अर्जुनासी । **'मद्योगमाश्रित'** म्हणोनी ऐसी । सर्वात्मभावे शरणागति बोलिला. ॥ १७५२ ॥ योगशब्दे योग ऐश्वर । तेंही सगुण धर्मामृतची वदला सर्वेश्वर । एवंच या अध्यायांत जगदीश्वर । सगुण धर्मामृतची बोलिला. ॥ १७५३ ॥ **'श्रेयो हि ज्ञानमभ्यासात्'** या श्लोकेंकरूनी । ज्ञान सर्वात्मक ज्ञान म्हणोनी । बोलोनि त्याचे ध्यान त्याहुनी । श्रेष्ठ वदला. ॥१७५४॥ तेंही सगुण धर्मामृत । त्यापुढे जो सगुणभक्त ज्ञानी अत्यत । त्याचीं लक्षणें भगवत । वदे सगुण धर्मामृतची येथवरी. ॥ १७५५ ॥ अव्यक्तोपासकांचे योगही । मध्यें बोलिला जे काही । ते त्यांच्या बडिवाराकारणे नाहीं । बोलिला भगवंत. ॥ १७५६ ॥ आधी अधिक योगवेत्ते भक्त । म्हणूनी मग जे उपासिती अव्यक्त । त्यांचा योग बोलोनि ते अव्यक्तासक्त । कष्टी अधिक बोलिला. ॥ १७५७ ॥ अभक्त ऐसेही कष्टी म्हणोनी । आणि भक्त थोर ऐसियाहीहुनी । योग त्यांचा या भावेकरूनी । या अध्यायांत बोलिला. ॥ १७५८ ॥ कीं योग तोची उपासिती भक्त । परतु सगुणभावें योगी अनुरक्त । एवच त्याही योगास म्हणणे युक्त । सगुण धर्मामृतची म्हणोनी. ॥ १७५९ ॥ जय वर्णितां रायाचा । शत्रुविक्रम वदे कवीची वाचा । तो पराक्रम म्हणावा साचा । वर्णिला रायाचा म्हणोनी. ॥ १७६० ॥ सांगोनि बहुधा गुळाची गोडी । म्हणे ते अमृतापुढें थोडी । या शब्दात शाहणा सोडी । महिमा गुळाचा. ॥१७६१ ॥ श्रेष्ठ निर्गुणोपासनापर । म्हणूनि या अध्यायीं वदला श्रीधर । परंतु क्लेश त्याला अधिकतर । आणि भक्त युक्ततम संमत त्याहुनी. ॥१७६२॥

---

१. अ० १२, श्लो० ८. २. होत नमल्याम. ३. अ० १२, श्लो० ११

भक्त योगवेत्ते त्याहुनी । म्हणतां महिमा त्यांचा नव्हे म्हणोनी । समजावें अवघा अध्याय यावरूनी । सगुण धर्मामृतची हें सत्य. ॥ १७६३ ॥ म्हणूनि म्हणे भगवत । जे उपासिती हें धर्मामृत । ते प्रिय मातें अत्यंत । म्हणोनी. ॥ १७६४ ॥ परि सर्वज्ञशिरोमणी । भविष्य जाणे चक्रपाणी । कीं निर्गुणवादाभिमानी यांची वाणी । अर्थ अन्यथा वदेल या अध्यायाचा. ॥ १७६५ ॥ आणि आपल्या टीकेवरूनी । कल्पिला अर्थ त्या रीतीकरूनी । उपासिती ते म्हणोनी । सर्वज्ञ जाणे. ॥ १७६६ ॥ ऐसा धरूनि भाव । या श्लोकीं देवाधिदेव । पद तीन अक्षरांचें योजी स्वयमेव । 'यथोक्त' म्हणोनी. ॥ १७६७ ॥ तरी ते नव्हती प्रिय । कीं आपण ज्यांला अप्रिय । म्हणूनि जो यथार्थाचा निर्णय । तदनुरूप उपासिती प्रिय तेची. ॥ १७६८ ॥ आणि प्रिय ते भक्त म्हणोनी । या दों अक्षरींकरूनी । निर्गुणोपासकांच्या मुखामधुनी । यथोक्त अर्थ न ये हें बोले. ॥ १७६९ ॥ जे असतील भक्त । तेची वाखाणूनि हें यथोक्त । धर्मामृत उपासिती ज्ञानयुक्त । ते प्रिय अत्यंत मज म्हणे. ॥ १७७० ॥ ज्ञानी आणि सगुणीं प्रीती । तेची यथोक्त अर्थ घेती । की भक्त ज्ञानी तरीच संतांचा पती । ज्ञानियापरीस युक्ततम संमत म्हणतसे. ॥ १७७१ ॥ जालिया आत्मज्ञान । जे निषेधिती सगुणभजन । ते म्हणती कीं ज्ञानहीन हे भक्त जन । आणि भक्त युक्ततम समत म्हणे ह्याहुनी. ॥ १७७२ ॥ दों पक्षांत कवण । अधिक योगवेत्ते हें श्रवण । करावें म्हणूनि पुसतां नारायण । भक्त अधिक योगवेत्ते बोलिला. ॥ १७७३ ॥ जे हा अर्थ घेती यथोक्त । ते ज्ञानी पुन्हा होती सगुणभक्त । जे निर्गुणीं अव्यक्तींच आसक्त । त्यांस यथोक्त अर्थ मानेना. ॥ १७७४ ॥ **यथा** म्हणिजे जसें । **उक्त** म्हणिजे बोलिलें तसें । भक्त दोघांत युक्ततम समत ऐसें । यथोक्त धर्मामृत उपासक मानिती. ॥ १७७५ ॥ कीं जैसें बोलिला भगवंत । तोची अर्थ सिद्ध जाला अत्यत । कीं हे ज्ञानी भक्त म्हणूनि भगवंत । ज्ञानियापरिस युक्ततम संमत म्हणतसे. ॥ १७७६ ॥ जरी हे भक्त जन । म्हणावे ज्ञानहीन । तरी बोलिला म्हणावा जगज्जीवन । विरुद्ध वेदवेदांत दोहींस. ॥१७७७॥ ज्ञानियाहुनी । ज्ञानहीन थोर म्हणोनी । सर्वज्ञ ये रीतीकरूनी । कधीं न बोलेल. ॥ १७७८ ॥ ज्ञानी म्हणतां या भक्तजना । न ये विरोध भगवद्वचना । यथोक्त अर्थाची रचना । भक्तची ये रीती बोलती. ॥ १७७९ ॥ ते नाना युक्ति पुढे करूनी । या भक्तांस म्हणती अज्ञानी । आणि श्रेष्ठ अव्यक्तोपासक म्हणोनी । सिद्ध करिती सिद्धांत. ॥ १७८० ॥

तेव्हां भगवत वदला जैसा । अर्थ न साधला तैसा । यथोक्त अर्थ आतां कैसा । तो म्हणावा ये स्थळीं. ॥ १७८१॥ तरीच ते न म्हणावे भक्त । जे अव्यक्तींच आसक्त । सगुणीं ते सर्वथा अभक्त । ते यथोक्त न बोलती म्हणूनि भक्त पदें सूचवी. ॥१७८२॥ म्हणोनि जे उपासिती यथोक्त । प्रिय माते म्हणे ते भक्त । भक्त म्हणतां जे अभक्त। ते यथोक्त न उपासिती ऐसें सूचवी.॥१७८३॥ एवच समग्र गीताशास्त्र । नव्हे सगुणभक्तिहीनाचें व्याख्यानपात्र। हाची एक अध्याय मात्र। काय नव्हे म्हणावा ?॥१७८४॥ हा अध्याय ज्या गीतेच्या पोटीं । ह्या गीतेचिया शेवटीं। कृष्ण म्हणे अगा! किरीटी! । हा संवाद माझा तुझा धर्म्य.॥१७८५॥ अत एव भक्ति थोर करूनी । ज्ञानयुक्त भक्तीच थोर म्हणोनी । जो गीतार्थ वदेला त्या तुल्य त्रिभुवनीं । प्रिय नव्हे कोण्ही ऐसें बोलेल. ॥ १७८६ ॥ हा अर्थ अष्टादशीं । विशद होईल, येथें द्वादशीं । यथोक्त उपासिती ते भक्त ऐसें उपदेशी । की भक्तिहीन वाखाणिती अन्यथा. ॥ १७८७ ॥ याचा अर्थ विपरीतें । वाखाणिती हें जाणे भगवंत । म्हणूनि म्हणे जे यथोक्त हें धर्मामृत । उपासिती ते अतिप्रिय मजलागीं. ॥ १७८८ ॥ एवच जो अर्थ शब्दां तींत दिसे । भाव विपरीत त्याचा जरी नसे । त्या टीकेंत यथोक्त गवसे । अर्थ या धर्मामृताचा. ॥ १७८९ ॥ यथोक्त अर्थ निवडे । तरी यथोक्त उपासना घडे । ज्यास सगुणीं प्रीतीच न घडे। अर्थ सांपडे केवी त्याला ?॥१७९०॥ येथें धर्मामृत । म्हणूनि म्हणे भगवत । याचा अर्थ करिती की धर्मरूप अमृत। अमृत मोक्ष त्याचें साधन म्हणोनी. ॥ १७९१ ॥ अष्टादशीं धर्म्यसंवाद म्हणोनी । म्हणे तेथेंही येच रीतीकरूनी । म्हणती धर्मयुक्त वचनीं । संवाद तो धर्मसंवाद. ॥ १७९२ ॥ धर्म्य सर्वात्मज्ञान सगुण। हे ठाउकीच नाहीं त्यांस खूण । नवमीं सर्वात्मबोध बोधी श्रीकृष्ण । त्यास काय न म्हणे धर्म्य म्हणोनी ? ॥ १७९३ ॥ 'राजविद्याराजगुह्यं'[1] या श्लोकेकरूनी । 'प्रत्यक्षावगमं धर्म्यं' म्हणोनी । 'मत्स्थानि सर्वभूतानि'[3] । इत्यादि वदे सर्वात्मता. ॥ १७९४ ॥ दोरीं सर्प ये रीतीकरूनी । म्हणे 'मत्स्थानि सर्वभूतानि' । परंतु दोर सर्पीं नसे म्हणोनी । म्हणे 'नचाहं तेष्ववस्थितः' ॥ १७९५ ॥ आतां सर्प नाहींच यास्तव । दोर सर्पीं नसे हा भाव । तरी नाहींच तो आहे म्हणूनि कां उद्भव । प्रथम शब्दाचा ?॥ १७९६ ॥ तैसें जग नसेच म्हणोनी।

---

१. अ० १८, श्लो० ६८–७०. २. तीन शब्दात. ३. अ० ९, श्लो० २. ४. अ० ९, श्लो० ४.

जगीं मी नसें म्हणावें ये रीतीकरूनी । तरी प्रथम **'मत्स्थानि सर्वभूतानि'** । हें कां वदावे ? ॥ १७९७ ॥ श्रोता पुसों पाहे जों ये रीती । वक्ता म्हणेल ऐसें त्याप्रती । कीं भूतें तूज दिसती । सर्प जैसा रज्जूंत. ॥ १७९८ ॥ तुझी धरूनि प्रतीती । भूतें आहेत वदलों तुजप्रती । वस्तुतः तीं भूतें कदापि नसती । मजमाजीं रज्जूत सर्प जैसा. ॥ १७९९ ॥ ऐसें सर्वात्मक ज्ञान । त्याला **धर्म्य** म्हणे जगन्निधान । या धर्म्य पदे समाधान । ते न पावती. ॥ १८०० ॥ ऐसा धर्म्यसंवाद । अष्टादशीं म्हणे **मुकुंद** । तैसेंच या अध्यायाच्या अतीं हें पद । धर्मामृत अथवा धर्म्यामृत म्हणोनी. ॥ १८०१ ॥ सगुणीं असे प्रीती । तरी त्याच्या प्रसादे हे अर्थ दिसती । निर्गुण सत्ता नुसती बोलती । हे अकळ अर्थ त्या वादियांतें. ॥ १८०२ ॥ प्रस्तुतीं यथोक्त अर्थ । सोडोनि बोलती तितके व्यर्थ । जे जे वदला **समर्थ** । भाव तद्विपरीत काढिती. ॥ १८०३ ॥ असो तें; प्रस्तुत । जे यथोक्त उपासिती हें धर्मामृत । त्यातें म्हणे **भगवत** । ते भक्त अति प्रिय मजलागीं. ॥ १८०४ ॥ ते कैसे म्हणसी? **अर्जुना** ! । तरी त्यांस अविश्वास या वचनीं असेना । श्रद्धान म्हणावे त्या जना । कीं श्रद्धा यथोक्त अर्थी तयातें. ॥ १८०५ ॥ त्या श्रद्धेस कारण । त्यांस वाटे मीच थोर सगुण । आणि विश्व **भगवद्रूपची** हे खूण । कळली जया. ॥ १८०६ ॥ नवमीं **'अश्रद्दधाना'** या श्लोकी[1] । **भगवत** ऐसें बोलिला कीं । या धर्माचे अश्रद्दधान या श्लोकी । ते मृत्युससारमार्गी परतती. ॥ १८०७ ॥ तैसे न होती अश्रद्दधान । धर्म्यामृतीं श्रद्दधान । सगुण सर्वात्मत्वज्ञान । दृढ आणि मी परम ज्याला; ॥ १८०८ ॥ ते म्हणावे मत्परम । ज्यांस विश्वची वाटे सगुण **ब्रह्म** । ज्ञानें ऐशा सगुण परम । उपास्य वाटे जयांला. ॥ १८०९ ॥ **'वासुदेवः सर्वमिति'**[2] । हें सप्तमीं बोले **श्री**पती । जे ज्ञानी भक्त ये रीती । तेच मत्परम, तेच श्रद्दधान हा, अर्थ. ॥ १८१० ॥ ऐसें द्वादशाध्यायाचे व्याख्यान । निर्मत्सरांस येथें समाधान । सगुण भजती जे सज्ञान । अथवा भक्त जिज्ञासु ते अधिकारी या ग्रथीं. ॥ १८११ ॥ प्रिय ज्यास **च**क्रपाणी । सुगम त्यांस हे **भ**गवद्वाणी । इतरां दिवांधां हा दिनमणी । दिसेची ना. ॥ १८१२ ॥ या **गी**तेचा अर्थ । स्वयें **गी**ताकार बोले समर्थ । जे स्वहिततत्पर कृतार्थ । ते सुख पावती या ग्रथीं. ॥ १८१३ ॥ तत्त्वतां अर्थ ठायीं पडो, न पडो । सर्वांस टीका आपुली आवडो । हा भाव असे तरी झडो । जिव्हाच हे. ॥ १८१४ ॥ जे निषेधिले टीकाकार । बहुतांस त्या

---

१. अ० ९, श्लो० ३. २. अ० ७, श्लो० १९.

अर्थी अत्यत आदर । ते या टीकेचा करिती अनादर । कळत ऐसें भगवत्प्रीत्यर्थ बोलतों. ॥ १८१५ ॥ अष्टादशीं म्हणे भगवत । की भक्ति थोर करूनि अत्यत । जो गीतार्थ माझ्या भक्तवृंदांत । सांगेल तैसा प्रिय न भूतो, न भविष्यति. ॥ १८१६ ॥ या वचनाकडे दृष्टि देउनी । गीतार्थ पाहतां भक्ति श्रेष्ठत्वावांचूनी । अबाधितार्थ न घडे म्हणोनी । बहुतां स्थळीं देखिले आणि दाविलें. ॥ १८१७ ॥ भक्ति थोर सर्वापरीस । तेची की अपरोक्षबोधे सुरस । ज्ञानहीन भजणे विरस । लवणावीण अन्न जैसे. ॥ १८१८ ॥ प्रथम भक्तीनें देवराया । भजे त्याची सर्वात्मभक्ति पावाया । ऐसे असोनि गेले वांया । ज्ञान होतां जिहीं सगुण सोडिलें. ॥ १८१९ ॥ सर्वात्मभक्तीचें साधन । प्रथम जें ज्ञान नसतां भजन । मुख्य भक्ति ते, जे जालिया ज्ञान । सर्वात्मभावें भक्त पावे. ॥ १८२० ॥ थोर ते भक्ति आणि भक्त । जे ये रीतीं सतत युक्त । जे उपासिती नसतेंची अव्यक्त । त्यापरीस भक्त ऐसे बहु थोर. ॥ १८२१ ॥ अर्थ गीतेचा अबाधित । याप्रकारेची आद्यत । म्हणूनि अष्टादशीं भगवंत । म्हणेल ऐसें. ॥ १८२२ ॥ कीं भक्ति थोर करूनी । माझ्या भक्तवृंदांत जो विवरूनी । गीता सांगेल तो मज आवडे फार म्हणोनी । 'य[1] इदं परमं गुह्यं' या श्लोकें बोलेल. ॥ १८२३ ॥ त्या भगवताचीया वचना । लक्षूनि या टीकेची रचना । करितो जे मत्सरयुक्त जना । आवडेची ना. ॥ १८२४ ॥ माझ्या आत्मया भगवंता आवडो । त्याची कृपादृष्टि मजवरी पडो । वरकड घडणार तें घडो । वामन म्हणे. ॥ १८२५ ॥ जे अनन्य भक्त । ते या ग्रंथीं होतीच अनुरक्त । बाधित अर्थी जे आसक्त । ते तों अभक्त लेखावे. ॥ १८२६ ॥ अबाधितार्थ कानीं । पडोनिही बाधितार्थची मानी । तो लेखावा देहाभिमानी । स्वहिततत्पर तो नव्हे. ॥ १८२७ ॥ जो स्वहिततत्पर । गीता पाहेल नर । तो अबाधितार्थ देखतांची चतुर । लुब्ध होईल भृग जैसा मकरदा. ॥ १८२८ ॥ तो अन्यदेवताभक्त । अथवा उपासी निखळ अव्यक्त । तरी होणार अनन्यभक्त । भगवताचा. ॥ १८२९ ॥ दृष्टि देऊनि लौकिकीं । आपण एक मोक्षार्थी म्हणूनि लोकीं । मिरवू जाय त्यास उत्तमश्लोकीं । भक्ति कोठोनि उपजेल? ॥ १८३० ॥ तो दभार्थ गीता पाहे । भलती एक टीका धरूनि राहे । त्या ज्ञानाभिमानप्रवाहीं वाहे । स्वहिततत्पर नव्हे म्हणोनी; ॥ १८३१ ॥ त्यास हे कां रुचेल टीका? । चोर गोड न मानी मृगांका । बाधितार्थ जरी आपणास कळला जितका । तितकाच गोड तो मानी.

---

[1] अ० १८. श्लो० ६८.

॥ १८३२ ॥ या प्रकारचे नर फार । ज्यांस सार वाटे असार । त्यांस दृष्टीं पडे जरी अर्थसार । तरी प्रिय नव्हे. ॥ १८३३ ॥ कीं जो अर्थ वदतां आपण । जनांत म्हणवी निपुण । त्यास बाध लागतां ज्ञातेपण । आपलें उडतसे. ॥ १८३४ ॥ स्वहिताची चाड असे । तरी जो अर्थ सार दिसे । त्याच अर्थी बुद्धि वसे । सोडी बाधिता अर्थातें. ॥ १८३५ ॥ जो ऐसें सार जाणे । त्यातेंची भगवद्भक्ति बाणे । तैशातेंची भगवत म्हणे । गीतार्थ वदे तो प्रिय माझा अत्यत. ॥ १८३६ ॥ **'य इदं गुह्यं परमं मद्भक्तेष्वभिधास्यति'** । ऐसें अष्टादशीं बोले श्रीपती । की जो गीतार्थ माझ्या भक्ताप्रती । सांगेल तैसा प्रिय दुजा मज नसे. ॥ १८३७ ॥ एवंच गीता नारायणें । नरास उपदेशिली भक्तांच कारणें । वामनमुखे टीकाही त्याचप्रमाणें । भक्तां श्रोतयांचकारणें प्रगटते. ॥ १८३८ ॥ भक्तचि हे टीका वदिती । अभक्त तितके निंदिती । दोन्ही समान एक जगन्मय जगत्पती । संतुष्ट होईल तेंची पुरे. ॥ १८३९ ॥ ऐसी यथार्थदीपिका । भक्तांच कारणें प्रगटली टीका । ते प्रतिपदीं अर्पिली शेषपर्यंका । श्रीवत्सांका मुकुंदातें. ॥ १८४० ॥ वामन समर्पी चरणीं । आत्मत्वे ध्यात अंतःकरणीं । तो हृदयीं धरूनि हे माझीच करणी । देव म्हणे. ॥ १८४१ ॥

---

## अध्याय तेरावा.

जय जय करुणासागर ! । जय जय जडक्षेत्रतरंगचित्सागर ! । जय जय धर्मामृतप्रकाशकर ! । अनादिगुरो ! ॥ १ ॥ जय जय जडक्षेत्रप्रकाश चित्स्वरूप ! । जय जय क्षेत्रज्ञप्रतिबिंबबिंबरूप ! । जय जयारूप ! मायारूप ! । सगुण ! निर्गुण त्रिगुण ! ॥ २ ॥ जय जय कमलेक्षण ! । जय जय सच्चिदानंदलक्षण ! । जय जय सदसद्विलक्षण ! । सर्वतःपाणिपाद ! सर्वतोक्षिशिरोमुख ! ॥ ३ ॥ जय जयाशेषहृषीकरहित ! । जय जयाशेषहृषीकसहित ! । जय जय गुणहीन ! गुणभोगयुत ! । अच्युत ! पाहि, पाहि, मां पाहि. ॥ ४ ॥ वदूनि तुझे श्रीचरण । त्रयोदशाध्यायव्याख्याविवरण । करीतसें जो अनन्यभावें शरण । सर्व विषयीं. ॥ ५ ॥ आतां श्रोते तुझ्याच मूर्ति । त्यांप्रति बोलतों जी विश्वमूर्ती । तूंची श्रोता वक्ता आणि स्फूर्ती । तूंची देसी स्ववचनार्थाची जगद्गुरो ! ॥ ६ ॥ अतिगुह्य सकळा निगमाचें । बोलिला नवमीं भगवंत त्याचे । धर्म्य म्हणोनि यथार्थ साचें । ठेविलें नाम. ॥ ७ ॥ कीं मी चित्सुवर्ण आणि जग । मज-

---

१. अ० १८, श्लो० ६८

माजी भासे जड नग । परी मी चित्स्वरूप **श्रीरंग** । नाहींच जें जड, नसे त्यामध्यें. ॥ ८ ॥ कीं तें मिथ्याभूताकृती । नसोनि भासे मायाकृती । म्हणोनि भूतेंही मजमाजी नसती; । तथापि भासती जरी तूते. ॥ ९ ॥ तरी भूतें म्हणोनि पहिले । तूज वाटत होतें; तें भूतपण गेले; । आतां नसोन साकारत्व दिसो लागले । तरी माझा योग ऐश्वर तू पाहें. ॥ १० ॥ ऐशिया भावेंकरूनी । **'पश्य मे योगमैश्वरं'**[1] म्हणोनी । आधींच **धर्म्य**[2] नाम या ज्ञानाचें ठेवूनी । बोलिला ऐसें. ॥ ११ ॥ **धर्म्य** म्हणिजे **धर्मयुक्त** । जें ज्ञान उपासिती ज्ञानी भक्त । आणि जे उपासिती नुसतें अव्यक्त । ते माया-भासमात्र म्हणती दृश्यातें. ॥ १२ ॥ हें सगुण **भ**गवद्रूप । जें जडाकारे भासे चित्स्वरूप । हें भक्तिरहस्य न कळोनि अरूप । तेंची निर्गुणोपासक उपासिती. ॥ १३ ॥ त्याज्य मायांश त्यातें । वाटे निर्गुणोपासकातें । योग ऐश्वररूप वाटे भक्तातें । म्हणोनि भक्त उपासिती ते **धर्म्य.** ॥ १४ ॥ जेंची योग ऐश्वररूप । तेंची **भ**गवद्रूप विश्वरूप । जो स्वये सागर चित्स्वरूप । तोची जडतरंगरूप मानूनि सेविती. ॥ १५ ॥ अत एव विश्वरूपाते पाहावें । **अर्जुन** प्रार्थितां या भावे । उत्तर दिधले **दे**वाधिदेवें । **'दिव्यं**[3] **ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी. ॥ १६ ॥ एवच योग ऐश्वर । **भ**गवद्रूप हेंची चराचर । या ज्ञानाचे नाम **स**र्वेश्वर । **धर्म्य** म्हणोनि आधीं नैवमीं[3] बोलिला. ॥ १७ ॥ जे उपासिती नुसते अव्यक्त । थोर त्याहूनि उपासक ऐसे भक्त । की व्यतिरेके अन्वयें, ज्ञानयुक्त । आणि भजती सगुणातें. ॥ १८ ॥ पूर्वाध्यायांत **भ**गवत । भक्त ऐसे ज्ञानवत । थोर आणि मज संमत । म्हणोनी वदला. ॥ १९ ॥ सगुण निर्गुण ठसा । ठसावला ज्यास, त्यांची प्रशसा । बोलोनि, त्यांचा भजनमार्ग ऐसा । म्हणोनि पूर्वाध्यायात बोलिला शेवटीं. ॥ २० ॥ मग अंतीं समाप्तिश्लोक । तेथे वदला **उ**त्तमश्लोक । की हें **धर्मामृत** जे भक्त लोक । यथोक्त उपासिती. ॥ २१ ॥ ते प्रिय अत्यंत । मातें म्हणे **भ**गवंत । आणि श्रद्धान मत्पर संत । तेंची यथोक्त हें **धर्मामृत** उपासिती. ॥ २२ ॥ **मृत** नव्हे ते **चैतन्यामृत** । ऐसे **चित्स्वरूप धर्मसहित** । तें म्हणावें **धर्मामृत । धर्म** तितका गुण **मायेचा.** ॥ २३ ॥ निर्धर्म म्हणजे निर्गुण । स-धर्म म्हणजे सगुण । हें सगुणज्ञान म्हणोनि **स**र्वज्ञ निपुण । धर्मामृत म्हणे. ॥ २४ ॥ जे ज्ञानी सगुणसेवक । ते म्हणावे धर्मामृतउपासक । जे निर्गुण-

---

१. अ० ११, श्लो० ८. २. अ० ११, श्लो० ८. ३ अ० ९, श्लो० १–८ ४ अ० १२, श्लो० २

मात्रचिंतक। ते उपासक अमृतमात्रा चित्स्वरूपाचे. ॥ २५ ॥ पूर्वाध्यायांत। जे उपासिती धर्मामृत। ते थोर आणि मज संमत। म्हणोनि भगवत बोलिला. ॥ २६ ॥ त्या प्रसंगेंकरूनी। **'ये तु सर्वाणि कर्माणि'** येथुनी। जे उपासिती सगुणभक्त ज्ञानी। तें धर्मामृत बोलिला संक्षेपे. ॥ २७ ॥ नवमीं, एकादशीं, योग ऐश्वर। दाविता जाला **सर्वेश्वर**। त्या ज्ञानातेंची **ईश्वरेश्वर**। धर्म्यामृत म्हणे द्वादशीं ॥ २८ ॥ पूर्वी योग ऐश्वर दाविला। तो संक्षेपे द्वादशीं स्तविला। परतु **धर्म अमृत** यांचा वेगळाला। नाहीं बोलिला विभाग **प्रकृतिपुरुषांचा**. ॥ २९ ॥ आता द्वादशी योग ऐश्वर। कोठे स्तविता जाला **सर्वेश्वर**?। म्हणोनि धुडितील चतुर। तरी उपासक स्तविता स्तविला उपास्यही. ॥ ३० ॥ भक्त म्हणोनि ज्या ज्ञानियांसी। **गी**तेत वर्णिले त्यांची उपासना ऐसी। की योग ऐश्वर दाविला **पार्था**सी। तो उपास्य भक्तांतें. ॥ ३१ ॥ नवमी दाविला ज्ञानदृष्टी। एकादशीं दिव्यदृष्टी। एवच हे चराचर सृष्टी। **भगवद्रूप** हें **धर्मामृत.** ॥ ३२ ॥ त्यांत **पुरुष** तो **अमृत**। **प्रकृति धर्मरूपिणी** तीसहित। दोहींचें ज्ञान अद्वैत। ते धर्मामृत बोलावे. ॥ ३३ ॥ हा विशद विचार। **प्रकृतिपुरुषांचा** ऐक्यप्रकार। बोलो पाहतो **गी**ताकार। या त्रयोदशी. ॥ ३४ ॥ कैसे **प्रकृ**तीचे धर्म। कैसें अमृत निर्धर्म। या दोहींचे विभाग आणि ऐक्यवर्म। या अध्यायीं बोलों पाहतो. ॥ ३५ ॥ त्या **प्रकृतिपुरुषांचा** विवेक। एक सूक्ष्म, स्थूल एक। कीं तैसाच दोंपरी अविवेक। **प्रकृतिपुरुषांचा** अनादी. ॥ ३६ ॥ प्रथम स्थूल विवेक। त्याणें आधीं हरावा स्थूल अविवेक। मग मुख्या सूक्ष्मविवेकाचे कौतुक। पाहतां देहींच अनुभव मुक्तीचा. ॥ ३७ ॥ आतां **प्रकृ**तीचे गुणधर्म। आणि **पुरु**ष चित्स्वरूप तोची **ब्रह्म**। हें बिबेल कळतां वर्म। सूक्ष्म विवेका अतिगुह्याचें. ॥ ३८ ॥ तोंवरी शरीर **प्रकृ**तीचा विकार। ज्याचा **क्षेत्र** म्हणूनि निर्धार। आणि **पुरु**ष ज्याचा **क्षेत्रज्ञ**नामें व्यवहार। याचा विवेक आधीं बोलतो श्रीभगवान्. ॥ ३९ ॥

श्रीभगवानुवाच—**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

अगा! **कुं**तीसुता! हें शरीर। **क्षेत्र** म्हणोनि बोलिजेतें, म्हणे **य**दुवीर। जो षड्गुणतरंग चित्सिंधुनीर। श्रीभगवान्. ॥ ४० ॥ शीर्ण होतें, नासतें,। **शरीर** याकारणें म्हणिजेतें। तें कर्माचीं फळें उपजवितें। म्हणोनि म्हणिजेतें

१. मागें पृष्ठ ११६, टीप १ पहा

**क्षेत्र.** ॥ ४१ ॥ **क्षेत्र** म्हणिजे **शेत** । त्यांत पेरिलें तें असे उगवत । ज्याचें क्रियमाण होउनी संचित । प्रारब्धपण पावते. ॥ ४२ ॥ सर्वां कर्मांचिया उत्पत्ती । या शरीराचपासूनि होती । म्हणोनि यातें म्हणती । **क्षेत्र** म्हणोनि **कुंतीसुता** ! ॥ ४३ ॥ हा देहकोश अन्नमय । की अन्नाचपासूनि शुक्रशोणित होय । त्या देहाचें नाम **कौंतेय** ! । कीं **कुंतीच्या** अन्नमय शोणितें उपजला. ॥ ४४ ॥ आतां हे शरीरची आपण । ऐसें मानी धरूनि तामस मीपण । तो **क्षेत्रज्ञ** म्हणोनि ज्याचा अश तोची आपण । श्री**कृष्ण सर्वेश्वर** बोलतो. ॥ ४५ ॥ की या शरीरा क्षेत्रातें । जो जाणे मी, माझें, म्हणोनि, त्यातें । **क्षेत्रज्ञ** म्हणोनि म्हणती चिदशाते । जे त्यातें बरे जाणती. ॥ ४६ ॥ हा **क्षेत्रज्ञ** म्हणिजे प्रतिबिब । भोक्ता, ज्यासी जीवोपाधीचा अवलंब । त्यातें जाणती तेच सर्वगत बिब । ते जाणती. ॥ ४७ ॥ जे बिबातें जाणती । तेच यास **क्षेत्रज्ञ** म्हणती । प्रतिबिबत्वें ज्यास वाखाणिती **श्रुती** । भोक्तया चिदशातें. ॥ ४८ ॥ जे जळातें जाणती । त्यांची तरगवेत्त्यांत गणती । जळातेंची जे नेणती । ते जाणोनि नेणती तरगातें. ॥ ४९ ॥ सूर्य गगनीं नाहीं ओळखिला । आणि प्रतिबिबरूपे जळीं देखिला । तरी तो नाहीं लेखिला । प्रतिबिबवेत्ता म्हणोनी. ॥ ५० ॥ कीं नाहींच प्रतिबिब । तथापि अवलबूनि जळावलब । प्रतिबिबरूपे स्वयें बिब । त्या उदकी दिसतसे. ॥ ५१ ॥ एवच बिब जोंवरी न सांपडे । तों प्रतिबिब ठायीं न पडे । बिंब न कळोनि बापुडे । बहुत ठकले कळोनिही प्रतिबिब. ॥ ५२ ॥ नाक न धरी मुखाचें । तों नासिक न धरवे प्रतिमुखाचें । व्यापकत्व न कळे बिबाचे । तों तत्त्व प्रतिबिंबाचे कळेना. ॥ ५३ ॥ दर्पणीं नाक ठायीं पडलें । परंतु हातास नाहीं सांपडलें । दर्शन प्रतिबिबांशाचे घडलें । परी तत्त्व याचे न समजला. ॥ ५४ ॥ कीं दीपातळीं जें जळ । तितकियातची त्याच्या प्रतिबिबाची डळमळ । प्रकाश बिबा दीपाचा निर्मळ । सर्वत्र घरीं. ॥ ५५ ॥ घर सारें प्रकाशी बिब । जळमात्र प्रकाशी प्रतिबिंब । त्या प्रतिबिबदीपास अवलब । उदकाचा. ॥ ५६ ॥ तें उदक जेथपर्यंत । प्रतिबिबदीप तेथपर्यंत । तैसा सर्वगत तो बिबस्वरूपीं अनंत । प्रतिबिंब तें, जें देहमात्रीं. ॥ ५७ ॥ बिंब न कळे जयाते । आणि देहावेगळ्या आत्मयातें । जे समजले तयांते । भोक्ता चिदशाची वाटला ब्रह्मत्वें. ॥ ५८ ॥ देहसाक्षी म्हणती ज्याला । शीतोष्ण सुखदुःखही त्याला । कीं मनआदि जडवर्ग याला । न घडेची भोक्तृत्व. ॥ ५९ ॥ हें पंचदशीं

---

१. अ० १५ श्लो० ९.

**भ**गवंत । स्पष्ट बोलेल अत्यत । कीं श्रोत्रादि पचेंद्रियासहित । अधिष्ठितो मनातें. ॥ ६० ॥ मन इद्रियाते अधिष्ठुनी । चिदश माझा विषय सेवितो म्हणूनी । म्हणतां जैसीं इद्रियें, तैसेंच मन अवलबूनी । विषय भोगितो चिदश. ॥ ६१ ॥ पुरुष चाटूकरूनि[1] रस चाटी । चाटू भोक्ता नव्हे तितकियासाठीं । तैसीं इद्रियें मनही अगा! **किरीटी!** । भोक्तीं नव्हती ऐसें पुढें सूचवील. ॥ ६२ ॥ हें पुढे होईल विशद । बोलणें इतुकेंची सांप्रद । आणि मागेही बोलिले हें प्रतिपद । कीं भोक्ता चिदश मन नव्हे, गुण **प्र**कृतीचा. ॥ ६३ ॥ तो कळला जडा देहा विलक्षण । आणि सर्वत्र न कळे सच्चिदानदलक्षण । ते न म्हणावे ज्ञानी विचक्षण । **क्षेत्रज्ञ** त्यांस केंवी कळे? ॥ ६४ ॥ की **क्षेत्रज्ञ** सुखदुःख जाणतां । तो सर्वत्र न दिसे सर्वगत मानिला तत्त्वता । जड मन, त्याला भोक्तृता । मानिती, ते ज्ञाते न म्हणावे. ॥ ६५ ॥ ज्यांस न कळे बिब । ते जाणोनिही नेणती भोक्ता प्रतिबिब । ते दंभाचेचि थोबे[2] । **क्षेत्रज्ञ** न कळे कळला तरी. ॥ ६६ ॥ कीं राजा म्हणोनि राजसुत । मानिला तेव्हां दोन्ही ज्ञानाविरहित । तो राजपुत्र राजा नव्हे निश्चित । रायाचे तों नसे दर्शनही. ॥ ६७ ॥ आता सात्विक अहंकार । निरसितां निःशब्द बिबलक्षांशसाक्षात्कार । घडला तरी जडभ्रातिपरिहार । नव्हतां, न कळे **क्षेत्रज्ञ** हा. ॥ ६८ ॥ कीं शब्द जेथें अहप्रत्ययमूळ । तो अहवाच्यांश टाकितां समूळ । तेथेंची लक्ष्यांश केवळ । निःशब्द आला अनुभवा. ॥ ६९ ॥ तथापि आपल्या शरीरीं । कळला बिबात्मा प्रत्यग्वृत्तीकरूनि, परी । सर्वगत सर्वत्र न कळे, तोंवरी । सारखीं दोन्हीं चैतन्यें. ॥ ७० ॥ प्रतिबिबदीपे जें जळ । सप्रकाश जालें उज्ज्वळ । त्या जळीं तैसेंची विमळ । तेज बिबदीपाचें. ॥ ७१ ॥ प्रकाश सारखे दोन्ही, परी । प्रतिबिब नाहीं जळाबाहेरी । बिबप्रकाश घरभरी । प्रतिबिंब न असे जळावेगळें. ॥ ७२ ॥ ऐसा बिबचैतन्यप्रकाश । उरला व्यापूनि सावरण अंडकोश[3] । एका शरीरमात्रीं प्रवेश । प्रतिबिबाचा. ॥ ७३ ॥ ऐसें कळे सर्वगत । तरी प्रतिबिब सांपडे शरीरांत । कीं अहप्रत्यय देहींच देहपर्यंत । भोक्तृत्व प्रतिबिंबास तेथवरी. ॥ ७४ ॥ एवच बिब न कळे जोंवरी अनंत । प्रतिबिब एकदेशी न कळे तोंपर्यंत । म्हणोनी म्हणतो **भ**गवंत । कीं क्षेत्रज्ञाचे जाणते, ते यास **क्षेत्रज्ञ** म्हणती. ॥ ७५ ॥ एवच तेच जाणती प्रतिबिंब । जे जाणती सर्वगत बिब । स्वदेहीं ज्यास जीवोपाधीचा अवलंब । आणि निरालब बिब दोन्ही सारखीं. ॥ ७६ ॥ पचदशीं येची रीती । स्पष्ट

---

१. चमच्यानें. २. झुबकें, गोंड. ३. ब्रह्मांडाचा पसारा.

बोलेल **श्री**पती । '**विमूढा नानुपश्यंति । पश्यंति ज्ञानचक्षुषः**'[1] ॥ ७७ ॥ की ज्ञानचक्षु असेल ज्यांला । तेची पाहती भोक्तया चिदशाला । ज्ञानचक्षु आहे म्हणावें त्यांला । ज्याला आत्मा दिसे सर्वभूतीं. ॥ ७८ ॥ चतुर्थी '**तद्विद्धि प्रणिपातेन**'[2] । या श्लोकीं **जग**ज्जीवन । संतांपासूनी घे म्हणे ज्ञान । ते कैसे म्हणसी ? तरी ऐसें म्हणे श्लोकीं दुसरिया. ॥ ७९ ॥ '**येन भूतान्यशेषेण । द्रक्ष्यस्यात्मनि**' म्हणे **क**मलेक्षण । एवंच ज्ञानचक्षूचें हेंची लक्षण । कीं आत्मा सर्वभूतीं पाहावा. ॥ ८० ॥ या भावें **जग**न्निवास । पचदर्शी म्हणेल कीं या चिदंश क्षेत्रज्ञास । तेंच पाहती, की जयांस । असे ज्ञानचक्षू. ॥ ८१ ॥ तीं असोत पूर्वोत्तर वचनें । याच पुढिलिया श्लोकीं **क**मलनयनें । उत्तरार्धी **भ**वभजनें । ज्ञान तें हेंची बोलिले आहे. ॥ ८२ ॥

उत्तरश्लोक उत्तरार्धः—**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम** ॥

की क्षेत्रांत आणि क्षेत्रज्ञात । जे ज्ञान आहे म्हणे **अ**नत । त्या ज्ञानाचें ज्ञान, तें मज संमत । हा अर्थ विशद येथेंची बोलणे असे. ॥ ८३ ॥ क्षेत्र मी, माझें, म्हणोनी । जाणतो, हें भलता जाणे, यावरूनी । ज्ञान त्यामध्ये दिसे परतु ज्ञानी । मृत क्षेत्र, शव जड, यांतही देखती ज्ञान तें. ॥ ८४ ॥ तें ज्ञान सर्वा क्षेत्रांत दिसे । तेव्हां बिंबीं अनुभव समरसे । मग सजीव क्षेत्रामध्ये गवसे । **भोक्ता क्षेत्रज्ञ पु**रुष तो. ॥ ८५ ॥ प्रतिशरीरीं प्रतिबिंब । वेगळे वेगळे अंश यांचें बिंब । शरीरमात्रीं सर्वत्र निरवलंब । तें सर्वगत जाणती, तेची जाणती यातेंही. ॥ ८६ ॥ एवंच तेंच तद्विद । जे ओळखती सर्वगत **स**च्चिदानंद । तें असो आतां **गो**विंद । काय म्हणतो ? ॥ ८७ ॥ आतां यापुढील श्लोक । किमर्थ बोलतो **उत्तम**श्लोक । त्याचें निमित्त आधीं सुज्ञ लोक । परिसोत, मग अर्थही तयाचा. ॥ ८८ ॥ **क्षेत्र** शरीराचें अभिधान । तें जड, त्याचें ज्याला असे ज्ञान । तो **क्षेत्रज्ञ** म्हणोनी अर्थानुसंधान । दावूनी पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ ८९ ॥ कीं जाणत असे क्षेत्रातें । क्षेत्रज्ञ म्हणती तयातें । उपदेशिता जाला **अ**र्जुनातें । पूर्वश्लोकीं ये रीती. ॥ ९० ॥ परतु या दोहींचे तत्त्व । दोहींस घडतें **ब्र**ह्मत्व । **क्षे**त्राचे आणि **क्षे**त्रज्ञाचे एकत्व । **चि**त्स्वरूपीं. ॥ ९१ ॥ तें उत्तरार्धी विशद । बोलेल आपण **गो**विंद । त्यांत **क्षे**त्र कार्य, कारण **स**च्चिदानंद, । कारण उदक जैसें तरगाचे. ॥ ९२ ॥ एकत्व मृत्तिकाघटा । एकत्व ततुपटा । कारण पाहतां, होतो खोटा । भास कार्याचा जे रीती. ॥ ९३ ॥ ये रीती **चित्स्वरूप** पाहे । त्यास या **क्षे**त्राचे जडत्व कैचें

१. अ० १५, श्लो० १०. २. अ० ४, श्लो० ३४.

राहे ? । **चैतन्य** सोनेंची आहे । अलंकाररूपें जड **क्षेत्र**. ॥ ९४ ॥ **चैतन्य** आणि **जड** निपट । अभिन्न, जेवीं ततु पट । नलगे कांही खटपट । **जडचै**-तन्यएकत्वीं प्रबुद्धातें. ॥ ९५ ॥ एव **क्षेत्रा**चे एकत्व आयतें जैसें । **क्षेत्रज्ञा**चे आयतें नाहीं तैसें । की जळ असे, तोंवरी वेगळेसे । तें दिसेच प्रतिबिब-रूपेकरूनी. ॥ ९६ ॥ आतां **'तत्त्वमसि'** म्हणोनि । **कूटस्थ चिदैक्य** आयतें **'असि'** पदेकरूनी । **क्षेत्र**ज्ञबिबैक्य तैसें त्यावरूनि । न म्हणवे आयतें स्वतःसिद्ध. ॥ ९७ ॥ तथापि ऐक्य घडे । कीं ज्याकरितां दिसे, ज्यांत दडे, । त्या बिबीं प्रवेशतां न निवडे । भिन्नत्वेंकरूनि प्रतिबिब. ॥ ९८ ॥ एवच ऐक्य आयतें न दिसे । तरी बिबा, प्रतिबिबा, ऐक्य असे । या उपदेशीं पूर्वार्धी शब्द ऐसे । बोलतसे या श्लोकीं. ॥ ९९ ॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

अगा ! क्षेत्रज्ञ प्रतिबिब जाला । तरी मी **सर्वे**श्वरची तो, ऐसें जाण त्याला। या भावें बोलतों या बोला । **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** म्हणोनी. ॥ १०० ॥ **'क्षेत्रज्ञं चापि'** म्हणोनी । येथें **'च'** शब्दे **'अपि'** या दों अक्षरींकरूनी । दोन्ही अर्थ सूचवी येथें, तें मनीं । सज्जनी धरावें. ॥ १०१ ॥ **क्षेत्र** आणि **क्षेत्रा**चा जाणता । दोहींतें जाण **कुं**तीसुता । म्हणोनी दोहींची भिन्नता । पूर्व-श्लोकीं बोलिली. ॥ १०२ ॥ येथें पूर्वार्धी एकत्व । उत्तरार्धी एकत्वाचें तत्त्व । बोलोनी, निरसितो भिन्नत्व । पूर्वश्लोकोक्त दोहींचें. ॥ १०३ ॥ **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** म्हणोनी । म्हणतां या एक्या अक्षरे **'च'** कारेकरूनी । **क्षेत्र** मीच आणि **अपि**शब्दे **क्षेत्र**ज्ञही मीच, ऐसें सूचवोनी । बोलतसे. ॥ १०४ ॥ कीं हा विवेक स्थूळ । पुढे सूक्ष्म विवेक बोलतां ज्ञेय केवळ । सदसद्विलक्षण बोलोनी **घ**ननीळ । म्हणेल कीं **'सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोक्षिशिरोमु-खम्.'** ॥ १०५ ॥ आधीं म्हणेल **स्वा**मी । कीं **'ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि । न सत्तन्नासदुच्यते'** म्हणोनी निर्गुणब्रह्मीं । ज्ञेयपण आधीं बोलेल. ॥ १०६ ॥ तें चैतन्य निर्धर्म । जडा अलकारीं तेंची हेम । म्हणोनी **'सर्वतः पाणिपादं'** तेंची हे वर्म । **भ**गवंत बोलेल. ॥ १०७ ॥ प्रस्तुतीं क्षेत्रज्ञ प्रतिबिब **व्याप**-काचें । आणि क्षेत्र कार्य **प्रकृ**तीचें । ऐक्य आपणासी दोहींचे । बोलतो कीं **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** म्हणोनी. ॥ १०८ ॥ कीं क्षेत्रज्ञही माझाच अश असे । जो सर्वा क्षेत्रीं क्षेत्राभिमानी दिसे । **'च'** शब्दें क्षेत्रही वेगळे नसे ।

---

१. पुढें श्लोक १३.

म्हणोनी म्हणतो क्षेत्रज्ञही मीच, हा अर्थ. ॥१०९॥ आतां **अपि**शब्दें करूनी । म्हणे क्षेत्रज्ञही मीच आहे म्हणोनी । बोले गहनभाव पोटीं धरूनी । कीं ऐक्य आयतें नसोनिही ऐक्य असे. ॥ ११० ॥ जडचैतन्यऐक्य आयतें । तैसें आयतें न प्रतिबिंब, बिंब, या दों चैतन्यातें । '**असि**'पदे '**तत्त्वमसि**' म्हणोनी '**त्वं**' पदातें । ऐक्य आयतें तो **कूटस्थ.** ॥ १११ ॥ कीं श्रुति म्हणे '**तत्त्वमसि**' । म्हणिजे आयताच '**तत्**' पदवाच्य तू अससी । ते **कूटस्था**स म्हणावें '**असि**'। न म्हणवे तैसें क्षेत्रज्ञातें. ॥११२॥ की '**तत्**' पदवाच्य **ईश्वर** मठाकाश । '**त्वं**'-पदवाच्य **कूटस्थ** जैसा घटाकाश । त्या घटजळीं प्रतिबिंबला आकाश । तो जलाकाश क्षेत्रज्ञ बोलावा. ॥ ११३ ॥ करितां मठाघटाचा निरास । आयतेंची दोन्ही आकाश । प्रतिबिंबला जळीं जळाकाश । त्यास तैसे ऐक्य आयतें न म्हणवे. ॥ ११४ ॥ की हालतां जळ । प्रतिबिंबीं होय डळमळ । तैसा कधीं नव्हे चचळ । घटाकाश मठाकाशही. ॥ ११५ ॥ म्हणोनी ऐक्यत्व आयते । जैसें या दोही आकाशातें । तैसे निर्गुणीं ऐक्य **कूटस्थ ईश्वरा**तें । **क्षेत्रज्ञा**स आयते ऐक्य तैसें असेना. ॥ ११६ ॥ येविषयीं प्रमाण । बोले ब्रम्हाडपुराण । श्रीअध्यात्मरामायण । पार्वतीप्रति **शिव** सांगे. ॥ ११७ ॥

ब्रह्मांडपुराणश्लोकः—**आकाशस्य यथा भेदस्त्रिविधो दृश्यते महान् ।**

**जलाशये महाकाशस्तदवच्छिन्न एव हि ॥ १ ॥**
**प्रतिबिंबाख्यमपरं दृश्यते त्रिविधं नभः ।**
**बुद्ध्यवच्छिन्नचैतन्यमेकं पूर्णं तथा परम् ॥ २ ॥**
**आभासस्त्वपरं बिंबभूतमेवं त्रिधा चितिः ।**
**साभासबुद्धेः कर्तृत्वमविच्छिन्नेऽविकारिणि ॥ ३ ॥**

त्रिभेद आकाशाचा । त्यात महदाकाश एक साचा । एक जळास व्यापूनि असे, जळाचा । प्रसर जेथवरी, असे त्या आकाशीं. ॥ ११८ ॥ प्रतिबिंबला त्या जळीं । तो तिसरा, जो डळमळी । ऐसे **चित्स्वरूपीं** केवळीं । त्रिविध भेद. ॥ ११९ ॥ बुद्धीमध्ये प्रतिबिंबला **चिदंश** । त्या बुद्धिजळीं व्यापक जो बिंबांश । तें बुद्ध्यवच्छिन्नचैतन्य जैसा जळीं आकाश । तैसे बुद्धींत **चैतन्य**, **कूटस्थ** तो जाणावा. ॥ १२० ॥ तेंची **चैतन्य** सर्वगत । महदाकाश जैसा सर्वत्र आणि घटींही अनुगत । तें पूर्ण **चैतन्य** वेदविहित । प्रतिबिंब जैसें बुद्धिजळीं. ॥ १२१ ॥ त्या **चैतन्या** प्रतिबिंबास । शास्त्रकार म्हणती **आभास**। कर्तृत्व बोलावें ते **बुद्धी**स । जे युक्त त्या आभासेंकरूनी. ॥ १२२ ॥ मी कर्ता

म्हणोनी । **बुद्धी** म्हणे, त्या प्रतिबिंबे युक्त होऊनी । ते **परा प्रकृति भगव**द्वचनीं । जीवभूता म्हणोनी सप्तमीं विशद. ॥ १२३ ॥ आणि ज्या चिदंशें-करूनी । मी कर्ता म्हणे सचेतन होऊनी । तो पचदशीं **'ममैवांशो जीव-लोके'** येथुनी । बोलेल **भगवान्**. ॥ १२४ ॥ प्रस्तुतीं **क्षेत्र**ज्ञही मातें । जाण सर्वा **क्षेत्रीं** म्हणे **अर्जुना**तें । की मजसी जरी नसे ऐक्य आयते । तरी **क्षेत्र**ज्ञही मीच, ऐसें तू जाण. ॥ १२५ ॥ **'क्षेत्रज्ञं चापि'** म्हणोनी । बोले या भावें-करूनी । **'अन्यथा क्षेत्रज्ञं मां विद्धि'** म्हणता तरी त्यावरूनी । **क्षेत्र**ज्ञऐक्य साधतें. ॥ १२६ ॥ **क्षेत्र**ज्ञापुढें **अपि**शब्द । यांत गूढार्थ तो ऐसा विशद । **कूटस्थ** ऐक्य बोले **असि**पद । तैसें आयतें ऐक्य नसोनिही ऐक्य असे. ॥ १२७ ॥ की **'तत्त्वमसि' श्रु**ती । ऐक्य आयतें बोलती । तें न घडे प्रतिबिंबाप्रती । तथापि घडेच ऐक्यत्व. ॥ १२८ ॥ त्याहीविषयी प्रमाण । तेंची **ब्र**ह्मांडपुराण । तेंची **अ**ध्यात्म**रा**मायण । त्याच प्रसंगीं म्हणतसे. ॥ १२९ ॥

**ब्र**ह्मांडपुराणश्लोकः—**अविच्छिन्नस्य पूर्णेन एकत्वं प्रतिपद्यते ।**
**तत्त्वमस्यादिवाक्यैश्च साभासस्याहमस्तथा ॥ ४ ॥**

प्रतिबिंबाचा उपाधि **बु**द्धिजळ । त्यात जे व्यापक **चै**तन्य केवळ । त्यास **कूटस्थ चै**तन्य म्हणोनी कुशळ । शास्त्रकार टीकाकारही बोलती. ॥१३०॥ या अविच्छिन्ना **चै**तन्यास पूर्णासी । ऐक्य बोलती **श्रु**ति की **'तत्त्वमसि'** । प्रतिबिं-बास आणि त्याच्या उपाधिबुद्धीस ऐसी । ऐक्यता न बोलती **वे**दवाक्यें. ॥१३१॥ की **'तत्त्वमसि'** उपदेश जेव्हा करावा । तेव्हां तो चिदश होऊनि असतो परावा । **असि**पदें आयता अभेद केंवी बोलावा । प्रतिबिंबातें ? ॥ १३२ ॥ परतु त्या **कूटस्थास श्रु**ती । ऐक्य पूर्ण**चै**तन्यासी बोलती । **चि**दश सारे ऐक्य पावती । अविच्छिन्नकूटस्थींच त्या. ॥१३३॥ वेगळे तुटले तें विच्छिन्न, । तुटलें नाहीं तें अविच्छिन्न । जीवोपाधीमध्येही असोनि भिन्न । न दिसे जळाकाश जैसा आकाशी **कूटस्थ** ऐसा. ॥ १३४ ॥ प्रपचाचा प्रलय । तेव्हां त्या **कू**-टस्थीं प्रतिबिंबलय । किंबहुना सुषुप्तीत जेव्हां उपाधी तमोमय । प्रवेश **कूट**-स्थींच प्रतिबिंबाचा. ॥ १३५ ॥ म्हणोनी ऐक्य आयतें **कूटस्था**चें । तेंची ऐक्य जाणावें प्रतिबिंबाचे । म्हणोनी वाक्य ऐसें **भगव**ताचे । **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** म्हणोनी. ॥ १३६ ॥ की आयतें ऐक्य न दिसे । तथापि ऐक्य मजसीं असे । **क्षेत्र** तो मीच, परी **क्षेत्र**ज्ञही गवसे । मजमाजी एकत्वें. ॥ १३७ ॥ **क्षेत्र क्षेत्र**ज्ञही मी आपण । म्हणूनी केले **निरूपण** । परंतु **पा**-

---

१. अ० ७, श्लो० ५. २. अ० १५, श्लो० ७.

र्थाचें अतःकरण । प्रस्तुत प्रवेशले नाहीं अनुभवीं. ॥ १३८ ॥ कीं **क्षेत्र** जड अचेतन । क्षेत्रज्ञा प्रतिबिंबाकरिता सचेतन । तू भगवत शुद्धज्ञान । ऐक्य कैसें या तिहींसी ? ॥ १३९ ॥ पूर्वी हे अध्यात्मरीति । जरी उपदेशिली **पा**-र्थाप्रती । तरी येथें तयाची मती । अद्वैतानुभव समजेना. ॥ १४० ॥ म्हणोनी ऐक्य आपणासी । केवी घडे क्षेत्रासि आणि क्षेत्रज्ञासी ? । हे **ब्रह्म**विद्या खु-णेची तयासी । उत्तरार्धी सांगतसे. ॥ १४१ ॥

श्लोक उत्तरार्धः—**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥**

अगा ! क्षेत्रांत आणि क्षेत्रज्ञांत । जें ज्ञान असे प्रकाशत । त्या ज्ञानाचें ज्ञान तें संमत । मजला, अर्जुना ! ॥ १४२ ॥ ज्ञान ततु, क्षेत्र पट; । ज्ञान मृत्तिका, क्षेत्र घट; । अनुभवियास ऐसें क्षेत्रीं प्रकट निपट । ज्ञान स्वयें शुद्ध स्वरूप जें माझे. ॥ १४३ ॥ तें जगाचे उपादान । सत्त्वजळीं बिंबलें ज्ञान । ज्यास त्या सत्त्वयोगे ज्ञानानुसंधान । क्षेत्राचें. ॥ १४४ ॥ त्या-मध्यें क्षेत्र जाणायाचें । मान तें ज्ञान बिंबाचेंची साचे । बिंबसूर्यावांचूनि कैचे । तेज प्रतिबिंबसूर्यात ? ॥ १४५ ॥ सूर्याचिया प्रतिबिंबात । तेज दि-सतें जें अत्यत । तें बिंब सूर्याचेंची निश्चित । म्हणावें कीं. ॥ १४६ ॥ तरी निर्धर्म बिंबज्ञान । प्रतिबिंबीं तेंच प्रतिबिंबलें उपादान । म्हणोनी **चिच्छक्ति-बुद्धि** तीकरितां अनुसंधान । क्षेत्र जाणायाचें तयाला. ॥ १४७ ॥ जो जाणे क्षेत्रातें । क्षेत्रज्ञ म्हणावें तयातें । पूर्वश्लोकीं स्वयें भगवंतें । वाखाणिलें ये रीतीं. ॥ १४८ ॥ तरी ज्ञान स्वयें निर्धर्म । क्षेत्र जाणणें वृत्तीचे धर्म । तेव्हां क्षेत्रज्ञ-तत्त्वाचे हें वर्म । कीं बुद्धियुक्त चैतन्य तें. ॥ १४९ ॥ प्रकाश अग्नीचा परी । काष्ठादियोग नव्हे जोंवरी । प्रत्यया नये तोवरी । हुताशन. ॥ १५० ॥ काष्ठांत अग्नि असे । परी काष्ठ जाळितांची दिसे । मंथन[1] केलियाविना न गवसे । काष्ठमात्रीं. ॥ १५१ ॥ तैसें प्रतिबिंब युक्त बुद्धीकरूनी । म्हणोनी कळतें कीं त्यांत ज्ञान असे म्हणोनी । जडा क्षेत्रांत गुरुकृपेवांचुनी । प्रत्यया नये. ॥ १५२ ॥ ते कृपा अर्जुनातें । केली अनादिगुरु भगवतें । म्हणोनी ठाउकें असे त्यातें । कीं ज्ञान असे क्षेत्रातही. ॥ १५३ ॥ ऐसें क्षेत्रांत आणि क्षेत्रज्ञांत । जें ज्ञान स्वप्रकाश अत्यत । त्याही ज्ञानाचें ज्ञान म्हणे भगवंत । मज संमत म्हणोनी. ॥ १५४ ॥ कीं तें स्वयें स्वरूपरूपज्ञान । वृत्तीकरूनि त्या ज्ञानाचे ज्ञान । त्यास म्हणावें **अद्वैत आत्मज्ञान** । तें मज संमत हरि म्हणे. ॥ १५५ ॥ की

१. घर्षण.

क्षेत्राचे उपादान । जे क्षेत्रीं क्षेत्रज्ञातही म्हणतो ज्ञान । त्या ज्ञानाच्या ज्ञानें समाधान । द्वैत निःशेष निरसता. ॥ १५६ ॥ की क्षेत्र जड घटाकृती । त्यात आत्मा ज्ञानस्वरूप माती ऐशा श्रुती । घटादि आकार प्रत्यया येती । मातीच-करितां. ॥ १५७ ॥ तें बुद्धीस बुद्धिपण । त्या ज्ञानें, जे ज्ञान दोहींतही निर्गुण । मग त्या बुद्धींत त्याच बुद्धीकरूनी खूण । जाणती त्याची, तो क्षेत्रज्ञ प्रति-बिंबांश. ॥ १५८ ॥ तथापि अहप्रत्यय । बुद्धीचा जो चिन्मय । वाच्यांशत्यागे अद्वय । ज्ञानबुद्धीकरितांची गवसे. ॥ १५९ ॥ तैसेंच जे क्षेत्राचे प्रकाशक । ज्ञानची अलकारीं जैसें कनक । तें एक, क्षेत्रे अनेक; । त्या ज्ञानें चित्स्फूर्ति बुद्धीते. ॥ १६० ॥ जे जडीं तत्व ऐसे देखे बुद्धी । तीसही त्या ज्ञानेंची बोद्धव्यसिद्धी । त्या ज्ञानावांचूनी प्रसिद्धी । लेशही प्रकृतीची घडेना. ॥ १६१ ॥ एवच क्षेत्रज्ञात जे ज्ञान । तेची क्षेत्रातही क्षेत्राचे उपादान । त्या ज्ञानाच्या ज्ञानें समाधान । अद्वैत एकसरे बिबता. ॥ १६२ ॥ म्हणोनी म्हणे भगवत । की त्या ज्ञानाचें ज्ञान मज संमत । जे क्षेत्रात आणि क्षेत्रज्ञात । ज्ञान असे स्वरूप माझे. ॥ १६३ ॥ बुद्धीकरूनि युक्त असे । तोची क्षेत्रज्ञ जाणता क्षे-त्राचा गवसे । आणि बुद्धीपरते क्षेत्री वसे । तें ज्ञान आकळे क्षेत्रांत. ॥ १६४ ॥ बुद्धी असे जेथें । क्षेत्रज्ञ नाव पावे तेथे । म्हणोनी जाणावे ज्ञान येथें । क्षे-त्रांत परम. ॥ १६५ ॥ हा अश चिन्मात्र, ज्यास । न म्हणवे जडत्वभास । व्यापकज्ञान रज्जु जडा सर्पास । प्रकाशी, तें क्षेत्रज्ञान अधिष्ठान त्यामध्यें. ॥ १६६ ॥ या जडा क्षेत्रापरता । क्षेत्रज्ञ बुद्धिस्थ जाणावा तत्वता । त्या ओळ-खीनें ओळखावा आयता । ज्ञानात्मा सर्वगत. ॥ १६७ ॥ मग जेवी ततु पटीं । कीं मृत्तिका जेवी घटी । ओळखावें जडा क्षेत्राचे पोटीं । गुरुमुखे सर्वत्र उघड ज्ञान. ॥ १६८ ॥ याकारणें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ । आधीं वेगळेपणें बो-धिती अभिज्ञ । म्हणोनी पूर्वश्लोकी सर्वज्ञ । आधी विभाग दोहींचे बोलिला. ॥ १६९ ॥ प्रकृतिपुरुषांचा विवेक । आधीं स्थूलरीती हा एक । ज्या कार-णें प्रथम श्लोक । उत्तमश्लोक या अध्यायात उपदेशी. ॥ १७० ॥ तदनतर सूक्ष्म प्रकार । प्रकृतिपुरुषाचा विचार । तो विशद बोलेल जगदाधार । येथेंची श्लोका बारावियापासुनी. ॥ १७१ ॥ गुह्य अद्वैतबोधाचे । जे रहस्य गुरुगम्य साचें । तें या उत्तरार्धीं वदन भगवताचे । बोले तत्त्व. ॥ १७२ ॥ हें क्षेत्ररहस्य ठाउके नसे । आणि ज्ञान क्षेत्रज्ञाचमाजीं दिसे । पांडित्यबळे कोणी ऐसे । टीकाकार जाले गीतेचे. ॥ १७३ ॥ प्रकृति जड, पुरुष जाण । इतकियाच बोधीं ते निपुण । जडीं चैतन्याची न कळोनि खूण । तिहीं टीका

केल्या या **गी**तेच्या. ॥ १७४ ॥ ज्ञान **क्षे**त्रीं जडीं कैसें पाहावें? । हें रहस्य त्यास नाहीं ठावें । पटीं ततु, घटीं माती, तैसें म्हणोनी स्वभावें । वर्णिती, परतु अनुभव नसे या गोष्टीचा. ॥ १७५ ॥ ते या उत्तरार्धाचा अर्थ । न बोलती ऐसा यथार्थ । **क्षेत्रक्षे**त्रज्ञविभागमात्र कृतार्थ । तितकेची वाखाणिती. ॥ १७६ ॥ की **क्षे**त्राचें जडपण । आणि **क्षे**त्रज्ञाचे ज्ञानलक्षण । हीं दोन्ही परस्पर विलक्षण । पूर्वश्लोकोक्त ज्ञान हे. ॥ १७७ ॥ हें ज्ञान मज संमत । म्हणतो म्हणती **भ**गवत । ऐसे वाखाणितां हे ज्ञाकले अत्यत । गुह्य अनुभवैकवेद्य **भ**गवद्वाक्याचें. ॥ १७८ ॥ अर्थ हाही घडे । परी ज्ञानशब्द पुन्हा बोलणें न पडे । एका ज्ञानशब्दे निवडे । अर्थ ऐसा. ॥ १७९ ॥ **'क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं'** म्हणोनी । जरी **भ**गवंत इतकेची बोलोनी । **'मतं मम'** म्हणता, तरी त्यावरूनी । **'यत्तत्'** पदीं होता आयता अर्थ तो. ॥ १८० ॥ की **क्षे**त्राचे आणि **क्षे**त्रज्ञाचें । जें ज्ञान, ते मज संमत साचे । इतकियानेची अर्थ सिद्ध होता; **ज्ञा**नपदाचे । दुसरियाचे न दिसे प्रयोजन त्या अर्थी. ॥ १८१ ॥ आणि इतकेची ज्ञान । जरी देतें मुमुक्षूते समाधान । **क्षे**त्र असते विना ज्ञानउपादान । तरी इतकेची संमत म्हणता श्री**कृ**ष्ण. ॥ १८२ ॥ अलकारीं जैसें सुवर्ण । तैसें जडीं उपादान कारण । तें तो शुद्ध ज्ञानलक्षण । तें न कळतां, संमत इतकेची ज्ञान केवी होय? ॥ १८३ ॥ पुढें बारावा श्लोक । तेथें निखिल तत्त्व बोलोनी उत्तमश्लोक । तेरावियांत पाणिपादादि **क्षे**त्रे अनेक । तेंही ज्ञेय तेंची म्हणोनी अद्वैत बोलेल. ॥ १८४ ॥ ते ज्ञेय उपादान अद्वैत । पाणिपादादिरूप कार्या **क्षे**त्रांत । ज्ञानस्वरूप कारण उघडें दिसे सर्वगत । ज्ञान त्याचे मज संमत म्हणो ये **गो**विंदे. ॥ १८५ ॥ **क्षे**त्रज्ञ आणि **क्षे**त्र । या दोहींचे वेगळेपणमात्र । मज संमत म्हणेल का **क**मलनेत्र? । आणि का वदेल अधिक एक ज्ञानशब्दही? ॥ १८६ ॥ हेही असो; ऐसे जे टीकाकार । त्यांस पुसावा हा विचार । कीं जडा **क्षे**त्रा पटात निर्विकार । ज्ञानतंतु समत असे, कीं नसे तुम्हां? ॥ १८७ ॥ जडीं ज्ञानस्वरूप **ब्र**ह्म नसे जरी । व्यापक जड मानावा तरी । ज्ञान व्यापक आहे म्हणती इतकियावरी । तरी ते जगत्कारण होय, कीं नव्हे? हें पुसावें. ॥ १८८ ॥ कारण नव्हे म्हणों न शकती । की घटीं मृत्तिका, तैसें तें जडीं **वे**द म्हणती । तेव्हा मृत्तिकाज्ञानें, मृत्तिकाच घटाकृती । तैसें त्या ज्ञानाच्या ज्ञानें कळे जड जग **ब्र**ह्मत्वें. ॥ १८९ ॥ ज्ञान ऐसें अद्वैत । हें **भ**गवत म्हणतो मज समत । अर्थ ऐसा सिद्ध होतां अबाधित । अर्थ तुमचा बाधित आणि मुख्य नव्हे. ॥ १९० ॥

ऐसेंची दुसरिया अध्यायांत । **'नासतो विद्यते भावो'** म्हणोनी या श्लोकांत । हाची अर्थ बोलिला भगवंत । श्रोते पाहोत ते स्थळीं **यथार्थदीपिका** हे. ॥ १९१ ॥ घटीं कारण माती । जडीं चैतन्य ये रीती । त्या ज्ञानाचे जें ज्ञान, तें जगत्पती । समत मज म्हणतसे. ॥ १९२ ॥ हाची मुख्यार्थ । हाची अबाधित परमार्थ । या **यथार्थदीपिकेंत** यथार्थ । निर्मत्सर स्वहित-तत्पर समजती. ॥ १९३ ॥ त्याच टीकांचा ज्यास अभिमान । दभार्थ ज्यांचें ज्ञान । ते कळत कळतही हें व्याख्यान । मान्य न करिती. ॥ १९४ ॥ तरी ही टीकाही त्यांकारणें । आरभिली नसे नारायणें । ते नेतील हेंची गा-ऱ्हाणें । की पूर्वटीकाकारां दूषिलें. ॥ १९५ ॥ त्यांचे मानूनि भय । न सोडवे तत्त्वार्थनिर्णय । कूप वडिलांचा म्हणोनी तोय । क्षार कैसें प्यावें टाकूनी अमृतातें? ॥ १९६ ॥ तरीच **यथार्थदीपिका** । या निजनामें ख्यात हे टीका । की लक्षूनी एका श्रीवत्साका । भीड येथें नाही कोणाची. ॥ १९७ ॥ असो ते आतां जगदाधार । सक्षेपरूपें याचाच विस्तार । बोलेन म्हणोनी एतत्प्रकार । स्वयें बोलतसे या श्लोकीं. ॥ १९८ ॥

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

अगा ! जे मी बोलिलो क्षेत्र । तें जें आणि जैसें क्षेत्रभेद विचित्र । तैसेंच तें तुज सांगेन, म्हणतो कमलनेत्र । प्रथमचरणीं. ॥ १९९ ॥ तें क्षेत्र जें जैसें आहे म्हणजे याचा । अर्थ पुढिलिया अनुसंधानातें सूचवी कृष्णवाचा । की विकार आहे प्रकृतीचा । आणि मिथ्या, ऐसा कीं नसे भासूनी. ॥ २०० ॥ आणि ज्याकरुनी । आहे विकारी होउनी । तेंही आईक आणि जें ज्यापासूनी । तेंही आईक सक्षेपें. ॥ २०१ ॥ जें म्हणिजे जे रीतीचे होऊनि राहे । आणि ज्यापासूनी उपजले आहे । तेंही सांगतों पाहें । गूढ भावे म्हणे श्रीकृष्ण. ॥ २०२ ॥ की कार्य हें प्रकृतीचें । प्रकृति कारण याचें । कारण तिचेही तें साचें । ब्रह्म चित्स्वरूप. ॥ २०३ ॥ कारणरूपिणी प्रकृती । तेची कार्यरूपें क्षेत्र म्हणती । तिचीही अनादिपणें पुनःपुन्हा उत्पत्ती । चित्स्वरूपापासूनी सर्वदा. ॥ २०४ ॥ प्रतिदिनीं सूर्यकिरणीं । दिसे, नसोनी मिथ्या पाणी । ऐसी प्रकृतीची उत्पत्ति चक्रपाणी । सूचवी येथें. ॥ २०५ ॥ ऐसें हें क्षेत्र चैतन्याचपासूनी । आणि भासतें जड अचेतन म्हणोनी । म्हणे ज्यापासूनी

---

१. अ० २, श्लो० १६.

जें जड होऊनी। आहे तेंही आइक. ॥ २०६ ॥ कीं ज्ञेय चैतन्य बाराविया श्लोकीं। बोलोनी मग तेराव्यियांत ऐसें बोलेल की । **'सर्वतः पाणिपादं'**[1] तेची श्लोकीं। आणि **'सर्वत्र अक्षिशिरोमुखम्.'** ॥ २०७ ॥ कीं ततूची जैसा पट। मातीच जेंवी घट। तैसें चित्स्वरूपची निपट । सर्वत्र जड पाणिपादादिरूपें दिसतें. ॥ २०८ ॥ एवच कार्या क्षेत्रांत कारण। जें ज्ञान, त्याचें ज्ञान मज संमत म्हणे नारायण। तेंही सांगेन म्हणोनी पण। तोची या श्लोकीं करितो जाणावे. ॥ २०९ ॥ की जडीं जे असे कारणज्ञान । त्यापासूनी या जडाचें भान। म्हणोनी ज्यापासूनी जें, याचे व्याख्यान। जडीं ज्ञानातें दाखवी. ॥ २१० ॥ आतां क्षेत्रज्ञांतही तेची ज्ञान । म्हणोनी बोलिला जगज्जीवन। तो प्रतिबिंब त्या ज्ञानाचे ऐसें व्याख्यान। पूर्वी जालें. ॥ २११ ॥ तोही तिसरिया चरणीं। या श्लोकी सागेन म्हणतो चक्रपाणी। कीं तो जो आणि ज्यापासूनी। चित्प्रकाशप्रभाव त्याचा. ॥ २१२ ॥ तें ज्ञान बिंबस्वरूप। जड तितके त्याचेची मायारूप । आणि जेथूनी दीप प्रतिबिंबाचा प्रभाव, तो बिबदीप। तैसा चित्प्रतिबिबप्रभाव बिंबाचपासूनी. ॥ २१३ ॥ बाराविया श्लोकीं ज्ञेय। सागेन म्हणोनी हार्चा स्वयें अप्रमेय। **'न सत्तन्नासदुच्यते'** म्हणोनी निर्णय। करील याचाची. ॥ २१४ ॥ तो त्याचा अंश प्रतिबिब। त्याचा प्रभाव ज्यापासूनी, तें बिंब। परी ते बिब निरवलब। अवलब त्याचा प्रतिबिंबातें. ॥ २१५ ॥ एवच सांगेन म्हणतां प्रतिबिंब। सांगेन म्हणतो बिब। की प्रतिबिबाचें कदब। बिबा वेगळे न म्हणवती. ॥ २१६ ॥ तरीच उत्तरार्धी प्रथम। **'स च यो'** म्हणे सर्वोत्तम। कीं तो जो आहे, तेंही गुह्य परम। सांगेन म्हणजे तोही बिब. ॥ २१७ ॥ तो म्हणोनी म्हणतां प्रतिबिंब। आणि तोची जो म्हणतां तोही बिब। कीं प्रतिबिंबाचा कदब। लय उद्भव बिबींच पावतो. ॥ २१८ ॥ ऐसें पुढें सांगणार। तें सांगेन म्हणोनी बोलिला सर्वेश्वर। परंतु युद्धाचा आरंभ, थोडा अवसर। म्हणूनी म्हणतो संक्षेपें आईक मजपासूनी. ॥ २१९ ॥ तरी हा संक्षेप ज्याचा। कोणता विस्तार त्याचा? । ऐसें अर्जुन पुसे, तों वाचा। बोलतसे हा श्लोक. ॥ २२० ॥

**ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

---

१. पुढें श्लोक १३.

बहुधा ऋषीश्वरीं जें निरूपिले । वेदीं जें प्रतिपादिलें । ब्रह्मसूत्रपदीं उपपादिले । सविस्तर. ॥ २२१ ॥ आणि ज्यामाजी अद्वैतसाधका युक्ती । ऐशा हेतुमता श्रुतीच्या उक्ती । आणि ज्या वचनांत निश्चयाच्या अभिव्यक्ती । तिहीकरूनी सिद्ध जो विस्तार; ॥ २२२ ॥ याचा संक्षेप तुजप्रती । सांगेन म्हणोनी ये रीती । पूर्वश्लोकीं वदला श्रीपती । अर्थ तो इतुकाची श्लोकाचा. ॥ २२३ ॥ याचा बोलतां विस्तार । वेद, शास्त्र, पुराणे, वाखाणावी वारवार। त्यास ग्रंथ वाढेल अपार । याच श्लोकीं. ॥ २२४ ॥ आणि न वदावें तें कांहीं । तरी श्रोतयांचे समाधान होणार नाही । म्हणोनी अल्प स्वल्प या प्रवाहीं । त्याही रीती दाखवणें अगत्य. ॥ २२५ ॥ ऋषि वसिष्ठादिकीं बोलिले । हे क्षेत्रक्षेत्रज्ञतत्त्व शोधिले । शेवटी हेची साधिले । की दोन्ही हें ब्रह्म चित्स्वरूप. ॥ २२६ ॥ तैसेंची बोलिले वेदीं । तात्पर्य ज्याचें केवळ अभेदीं । **'सर्वं खल्विदं'** आणि **'तत्त्वमसि'** इत्यादि । ब्रह्मींच बोलती जडैक्य आणि चिदैक्य. ॥ २२७ ॥ हे सर्वही ब्रह्म । ऐसें जडैक्य बोले निगम । तू आहेसी तेची परम । श्रुति चिदैक्य बोलती. ॥ २२८ ॥ ऐसा द्विप्रकार अभेद । विविध शाखाभेदे बोलती वेद । आणि नाहीं म्हणती भेद । **'नेह नानास्तिकिंचन'** श्रुति इत्यादि. ॥ २२९ ॥ ऐसे अनंत वेद । पृथक् पृथक् शाखाभेद । हा दों परीचा अभेद । सर्वही उपपादिती. ॥ २३० ॥ याच वेदांचा मथितार्थ । वेदव्यास बोले समर्थ । जो अद्वैततत्त्वप्रतिपादनार्थ । शेषशायी अवतरला. ॥ २३१ ॥ वेदार्थ सूचविती बहु फार । आणि शब्दांचा नसे विस्तार । ऐसीं ब्रह्मसूत्रे सूत्रकार । वेदव्यास बोलिला. ॥ २३२ ॥ सूत्रीं सूचविती श्रुती । ब्रह्मीं जडचैतन्याचें ऐक्य बोलती । तीं ब्रह्मसूत्रपदें प्रगटती । याची अर्थी. ॥ २३३ ॥ की दृश्य नश्वर । हेंही सकळ सर्वेश्वर । कनक नित्य, नासे अलंकार । आणि भोक्ता प्रतिबिंब अंश त्याचा. ॥ २३४ ॥ एवंच ब्रह्मसूत्राचीं पदें । प्रगटलीं याची अनुवादे । येथें बहुत बोलावें, परी गोविंदे । ग्रंथ पुढें चालविला. ॥ २३५ ॥ एवंच जें वेदीं बोलिलें । तें ब्रह्मसूत्रपदीं सूचविले । या सिद्धांताचें श्रवण जालें । त्यास मनन तदनंतर. ॥ २३६ ॥ वेदां सर्वांचा एक सिद्धांत । तो विशद बोले शास्त्र वेदांत । परी युक्तीकरूनी संत । अनुभवा आणिती. ॥ २३७ ॥ या युक्ति जिज्ञासुजनीं । धुंडूनी आणाव्या कोठूनी? । आणि ज्ञान तों युक्तीवांचूनी । अनुभवा न ये. ॥ २३८ ॥ म्हणोनी युक्तीही ऐशाच वेदीं । कीं अनुभव होय सद्यः गुरुमुखें अभेदीं । हेतु ऐसे ज्या श्रुतीच्या

पदीं । तीं वेदवचनें म्हणावीं हेतुमते. ॥ २३९ ॥ घट मृत्तिकेविना । दृष्टीस गोचर होईना । की सुवर्णाविण दिसेचना । तो असेचना, जो मिथ्या अलकार. ॥ २४० ॥ घट मृत्तिकेविण । नसोनी दावी घटपण । त्यास वेद म्हणती **वाचारंभण** । कीं बोलावाच घट, परी नसे विचारितां. ॥ २४१ ॥ इत्यादि युक्तिजाल । वदती वेदशाखा सकळ । की चैतन्याच्या आश्रये मायामृगजल । भास या जडा जगाचा. ॥ २४२ ॥ एव जो ऐसा अद्वैत सिद्धांत । बोलती वेदन्वेदांत । त्याच वेदी वेदाती अत्यत । अद्वैतसाधका असती युक्तीही. ॥ २४३ ॥ अशा हेतुमता वचनीं । जे उपपादिले, ते सागेन म्हणोनी । प्रतिज्ञा ऐसी करूनी । काय म्हणतो, पाहा, आणीक. ॥ २४४ ॥ मननेंकरूनी जो सिद्ध अर्थ । तो उगाच बोलती श्रुति परमार्थ । तो म्हणावा निश्चितार्थ । यथार्थ **‘एकमेवाद्वितीयं ब्रह्म’** इत्यादि. ॥ २४५ ॥ ऐसें वेदीं ब्रह्मसूत्री । आणि हेतुमत वचनीं विचित्री । आणि निश्चितार्थ ज्यांत त्या वचनमात्री । जे सिद्धांत, ते सागेन म्हणे गूढार्थ. ॥ २४६ ॥ कीं जिज्ञासुजनीं । ऐसे सर्वसंमत ज्ञान जाणावे म्हणोनी । वेगळालीं नामें उच्चारुनी । सूचविला ऐसा गूढार्थ. ॥ २४७ ॥ की वेदशास्त्रपुराणसमत । तोची अनुभव थोर अत्यत । जे आपणास म्हणोनी संत । यास विरुद्ध, बोलती ते पाखड अर्थ ऐसा. ॥ २४८ ॥ आतां क्षेत्र क्षेत्रज्ञ दोन्ही । ब्रह्मींच जाणावीं म्हणोनी । **‘क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि’** ऐसे चकारें अपिशब्देकरूनी । पूर्वीच बोलिला श्रीकृष्ण. ॥ २४९ ॥ आणि पूर्वश्लोकीं श्रीपती । बोलिला, की तें क्षेत्र जें ज्यापासूनी जे रीती । आणि तो जो ज्यापासूनी याचा प्रभाव, तेंही तुजप्रती । संक्षेपे सांगेन, म्हणोनी बोलिला. ॥ २५० ॥ त्यांत क्षेत्र जड तद्विलक्षण । क्षेत्रज्ञ चित्स्वरूप त्याचें बिबासम लक्षण । म्हणोनी बाराविया श्लोकीं कमलेक्षण । **‘न सत्तन्नासदुच्यते’** म्हणेल. ॥ २५१ ॥ कीं तें नव्हे प्रतिबिब । सकळां प्रतिबिबां क्षेत्रज्ञाचे बिब । अथवा नव्हे ते क्षेत्रकदव । जीं क्षेत्रें जडें असद्रूपे. ॥ २५२ ॥ एवच प्रतिबिबातें निषेधुनी । आणि तें क्षेत्रही नव्हे म्हणोनी । पुन्हा तेराविया श्लोकापासूनी । तेंची सर्वत्र पाणिपादादि ऐसें म्हणेल. ॥ २५३ ॥ एवच क्षेत्र नव्हे म्हणोनी । बोलेल आधीं क्षेत्रातें निषेधुनी । पुढें मागुती क्षेत्रही तेंची ऐसे विशद करूनी । बोलेल. ॥ २५४ ॥ तैसेंच चतुर्दश श्लोकीं । प्रतिबिबही तोची जीव लोकीं । म्हणोनि भगवंत बोलेल कीं । **‘निर्गुणं गुणभोक्तृ च.’** ॥ २५५ ॥ कीं तेंची निर्गुण । आणि तेंची जीवोपाधींत प्रतिबिबोनी भोगी गुण । ऐसें दोन्हीपरते आणि दोन्ही तेची

म्हणोनी खूण । सर्वज्ञ निपुण बोलेल. ॥ २५६ ॥ त्यांत बिंब प्रतिबिंब अश । चित्स्वरूपेची त्याचा जीवोपाधींत प्रवेश । तेथें विलक्षणत्व इतकें लेश । कीं भोक्तेपण नसे बिबीं, ते असे तयातें. ॥ २५७ ॥ तथापि देहत्यागस्वीकार । इत्यादि विलक्षणत्व एकदेशित्वप्रकार । तो पचदशीं जगदाधार । 'ममैवांशो जीवलोके' इत्यादि विशद बोलेल. ॥ २५८ ॥ तथापि क्षेत्रज्ञज्ञानलक्षण । क्षेत्रची जड सर्वथा तद्विलक्षण । म्हणोनी विस्तारें कमलेक्षण । क्षेत्रची आधीं सांगतो या श्लोकीं. ॥ २५९ ॥

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥**

अगा! हीं चोवीस तत्त्वें मिळोनी । जो देह होतो, म्हणावा क्षेत्र म्हणोनी। त्यांत प्रत्यक्ष आधीं स्थूलदृष्टीकरूनी । देह पचभूतांचा दिसतसे. ॥ २६० ॥ म्हणोनि आधीं महाभूतें म्हणावीं । तीं त्रिविध अहंकारांत तामसापासूनी जाणावीं । आकाशादि पांचही गणावीं । परी मूळ याचें तामस अहकार. ॥ २६१ ॥ तो महत्तत्त्वापासुनी । सर्व बुद्धि त्या महत्तत्त्वाचे अश म्हणोनी । महत्तत्त्वशब्देंकरूनी । कारण अहकाराचें सूचवी त्याचपुढें. ॥ २६२ ॥ पचभूतांउपरी । अहकार त्याचें कारण बोलोनी त्यावरी । बुद्धिशब्दें महत्तत्त्वही हरी । कारण अहकाराचे त्याचपुढे बोलिला. ॥ २६३ ॥ म्हणोनी महत्तत्त्वाची गणना । वेगळी येथें बोलेना । बुद्धिशब्देची अर्जुना । महत्तत्त्वही सूचविले. ॥ २६४ ॥ महत्तत्त्वची ब्रह्मा जाला । म्हणोनी बुद्धीचे अधिदैवतपण त्याला । जैसा रुद्र अहंकार ज्याला । दैवतपण अहकारमात्राचें. ॥ २६५ ॥ एवच कार्यापुढें कारण । पूर्वार्धी बोलतो नारायण । उरलियाचें विवरण । उत्तरार्धें क्रमेंची बोलेल. ॥ २६६ ॥ प्रस्तुत पच भूतें कार्यपण । बोलोनी त्यांचे कारण । अहकार म्हणोनी, त्याची हे सूचवूनी खूण । भूतांपुढें बोलिला तो अहकार. ॥ २६७ ॥ महत्तत्त्व याचें कारण । म्हणूनी त्यापुढें बुद्धिशब्दें ते वदला नारायण । त्या महत्तत्त्वाचेही कारणपण । अव्यक्त मायातत्त्वासी. ॥ २६८ ॥ बोलोनी बुद्धिशब्दे महत्तत्त्व । त्यापुढेंची त्याचें कारण अव्यक्ततत्त्व । बोलतो जें मायातत्त्व शुद्ध सत्त्व । त्रिगुणसूत्र ज्यापासूनी उपजलें. ॥ २६९ ॥ तेंची जालें महत्तत्त्व । याचें कारण अव्यक्त प्रकृतितत्त्व । त्याचाची अश चित्त शुद्ध सत्त्व । जें चैतन्ययोगें चेतवी, तें रज तम, कार्यातें. ॥ २७० ॥ त्या चित्ताचा देव । अव्यक्त शुद्धसत्त्वोपाधि

१. अ० १५, श्लो० ७.

**वासु**देव। ज्या **चि**त्तांत तोची स्वयमेव। **चि**त्स्वरूपे प्रतिबिंबत्वें प्रवेशला. ॥२७१ आतां **'एव च'** म्हणोनी। पूर्वार्धाच्या अर्ती हे अधिक शब्द दोनी। **बुद्धि म**हत्तत्त्वची आणि **चित्त अव्यक्त** यावरूनी । सूचवी ऐसें जाणावे. ॥ २७२ ॥ ऐसी का यापुढें कारणें। पूर्वार्धें बोलिलीं **नारायणें** । राजस **अ**हकाराचीं कारणपणें। कार्यावरूनी तृतीयचरणीं बोलतसे. ॥ २७३ ॥ कीं इंद्रियें दश । राजस **अ**हकाराचे कार्यांश। आणि एक **मन** तेही हृषीकेश। सूचवी कार्य सात्त्विकाहंकाराचे. ॥ २७४ ॥ आणि **'एकं'** म्हणोनी। **एक**शब्दे **मन**, त्यापुढें **'च'**कारेंकरूनी। इंद्रियाभिमानी दश देवताही त्याचपासूनी। जाल्या ऐसेंही सूचवी. ॥ २७५ ॥ परतु शरीरें त्या देवतांचीं। मागुती याच चोविसा तत्त्वाचीं। म्हणोनी तत्त्वांत गणना त्यांची । न करूनीही उत्पत्ति सूचवी प्रसंगें. ॥ २७६ ॥ **भूतां**पुढेची **भूतांचें**। कारण सागितले **अ**हकार नाम ज्याचें। तों क्रमेंची पुढें **बुद्धिम**हत्तत्व कारण त्याचे । त्यापुढें **अव्यक्त** बोलिलें कारण तयाचेंही. ॥ २७७ ॥ राहिले कार्य राजसाचें। आणि राहिलें जे बोलणे कार्य सात्त्विकाचें। ते उत्तरार्धे सागितले कार्य दोघांतें। **'इंद्रियाणि दशैकं च'** म्हणोनी चरणी तिसरिया. ॥ २७८ ॥ आतां **आ**काशादि **भूतां**चे। **शब्दा**दि **गुण** राहिले त्याचे । भेद जाणवितो स्वभावाचे । चतुर्थ चरणीं. ॥ २७९ ॥

चतुर्थचरणः—**पंच चेंद्रियगोचराः** ॥

इंद्रियां पांचांस गोचर। **शब्द, स्पर्श**, रूप, रस, गंध, प्रसिद्धतर। श्रोत्रादिकां इद्रियगणां निरतर। प्रत्यक्ष जे. ॥ २८० ॥ **'पंच चेंद्रियगोचराः'** म्हणोनी। येथें या **'च'**कारेंकरूनी। तन्मात्रा पांचही हेची ऐसें या वचनीं। सूचवितो. ॥ २८१ ॥ कीं **अ**हकारापासूनी **शब्द** जाला । तो **शब्द आ**काशातें व्याला। तो **शब्द**ची गुण देखिला। **आ**काशाचा ये रीती. ॥ २८२ ॥ कीं बीजापासूनी झाड जालें। तेंची बीज त्याच्या फळीं आलें। तैसें **शब्दा**पासूनी **न**भ उपजलें। तो **शब्द**ची गुण तयाचा. ॥ २८३ ॥ परतु **शब्दा**पासूनी **आ**काश होतो। तेव्हां तन्मात्र म्हणावा **शब्द** तो । तोची जेव्हां श्रोत्रास प्रत्यया येतो। तेव्हां गुण **आ**काशाचा **शब्द**विषय तोची. ॥ २८४ ॥ ऐसेच **स्पर्श**रूपादि गुण। यांसि आधीं तन्मात्रापण। आणि हेची विषय ऐसी ही खूण। हें **'च'**कारें सूचवी.॥२८५॥ एवच एक पंचक भूतांचे। दुसरे पचक

---

१. शब्दस्पर्शादि पांच विषय.

**विषयांचें** । एक पंचक **ज्ञानेंद्रियांचें** । **कर्मेंद्रियांचें** पचक एक. ॥२८६॥ ऐसीं वीसही पंचकें चारी । **अहकार, बुद्धि, मन,** ही तीन याउपरी । **अव्यक्त चित्त** चोविसावें यावरी । ऐसीं **तत्वें चोविस.** ॥ २८७ ॥ ऐसा तत्त्वसंख्याविचार । आणीक अधिक उणे नाना प्रकार । परतु चोवीस हाची जगदाधार । बोलतो येथें आणि भागवती. ॥ २८८ ॥ ऐसें **क्षेत्र** सांगीतले । जें अर्जुनास सांगतों म्हणोनी पूर्वी बोलिले । यांत इंद्रियें सांगतां तेंही निरूपिलें । कीं हें विकारी, **क्षेत्र** याकरितां. ॥ २८९ विकारी इद्रियाकरितां । **चित्त, बुद्धि, मन, अहकार,** हीं इद्रियांमध्यें मिळतां । परी ते विकार कोणतें? ते आतां । सांगत असे या श्लोकीं. ॥ २९० ॥

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्** ॥ ६ ॥

मनास अनादि वासनाबध । त्यांस इंद्रियवृत्तीचा सबंध । इंद्रियां शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, । अपेक्षित होती, हे इच्छा. ॥ २९१ ॥ शब्द गोड कानीं ऐकावा । स्पर्श गोड त्वचेसि लागावा । रूप प्रकाश उत्तम डोळां दिसावा । सुरस रस चाखावा, हुगावा सुगध. ॥ २९२ ॥ हा इच्छामय विकार । गोड विषयांची **इच्छा** फार । विषय वाईट इद्रियां वाटे निःसार । **द्वेष** त्यांचा विकार हाही. ॥ २९३ ॥ आतां किमर्थ इच्छा गोड विषयांची । आणि कां द्वेष अप्रीति वाइटाची । तरी प्रियविषयभोगे प्राप्ति सुखाची । दुःखप्राप्ति वाइटाकरितां. ॥ २९४ ॥ एवच सुखदुःख दोन्ही प्रकार । **क्षेत्रा** विकारियाचेची विकार । **क्षेत्रज्ञ** अवलबूनी **क्षेत्रा**चा अहंकार । सुखदुःखही **क्षेत्रीं**च भोगितो. ॥ २९५ ॥ म्हणोनी बाह्य सुख । आणि विषयेंद्रियजनित दुःख । शिखेपासूनी जों पदनख । इतकिया **क्षेत्रीं**च हे दोन्ही ॥ २९६ ॥ सुख जरी स्वरूप **आ**त्मयाचें । तरी विषयभोगे वाटे साचें । तें **क्षेत्रा**बाहेर कैचे? । म्हणोन **क्षेत्र**विकारींच सुखदुःख. ॥ २९७ ॥ प्रतिमा कस्तूरीचीच केली । बाळ म्हणती सुगध बाहुली । त्यास आर्धीं त्याचीच बोली । बोलावी, जों तत्त्व कळे. ॥ २९८ ॥ तत्त्व कस्तूरी कळल्यावरी । प्रतिमा असोनीही जाली दूरी । सुगध ते हे स्वयें कस्तूरी । ऐसें कळे तेधवा. ॥ २९९ ॥ तैसें **क्षेत्र** नाहींच, परी । जीवप्रतीतीनें बोलावें यापरी । सुख आत्मस्वरूप, परी न दिसे देहाबाहेरी । म्हणोनी लेखावें **क्षेत्रां**त. ॥ ३०० ॥ दुःख तों त्याच **क्षेत्रा**चा गुण । कीं सुगंध हार, परी भयंकर सर्पाचें स्फुरण । जों न कळे हाराची खूण । तों सुगधही वाटे सर्पची. ॥ ३०१ ॥ परी सर्पाचें अधिष्ठान हार । सुगंध गुण त्याचाच

हें कळे, कळतां विचार । आणि भयकपादि विकार । लटकिया सर्पाचे कळे हेंही. ॥ ३०२ ॥ परतु लोकव्यवहार । सुगंध भयकप दोन्ही सर्पाकार । तदनुरूप म्हणे प्रस्तुतीं जगदाधार । कीं सुखदुःखही विकार क्षेत्राचे. ॥ ३०३ ॥ आता या विकारांचा प्रत्यय । क्षेत्रज्ञास तेव्हां होय । कीं जेव्हा सर्वा जडां तत्त्वांचा समुदाय । एकत्र मिळे. ॥ ३०४ ॥ त्वचा, नेत्र, कर्ण, जिव्हा, घ्राण, । हीं **गोलकें** याविण । विफल इद्रिये आणि इद्रियगण । वृथा गोलकें स्थूल देहीं. ॥ ३०५ ॥ हीं गोलके आणि इद्रियविकार । व्यर्थ विना **चित्त, बुद्धि, मन, अहकार,** । या अतःकरणपचकाचाही व्यवहार । न चले इंद्रियां गोलकांवांचुनी. ॥ ३०६ ॥ एवच तत्त्वें हीं सकल एकत्र । मिळता विकारयुक्त होय **क्षेत्र** । म्हणोनी म्हणे **कमलनेत्र** । संघात समुदाय यांचा विकारची म्हणोनी. ॥ ३०७ ॥ प्रथम विकार हाची, कीं आपण । देह म्हणोनी वाटे सत्य खूण । परतु या समुदायाविण । न कळे प्रत्यय कोणाही विकाराचा. ॥ ३०८ ॥ गोलकें वृक्षास नसती । तरी इद्रियविकार तेथें प्रत्यया न येती । जीं उणीं, त्यावीण होती । उणे प्रत्यय विकारांचे. ॥ ३०९ ॥ यालागीं अवघा सघात । एकत्र मिळतां क्षेत्रांत । विकार सर्व प्रत्यया येती, हें ख्यात । **संघात**शब्दे देव करी. ॥ ३१० ॥ ऐसा सघात म्हणिजे तत्त्वसमुदाय । एकत्र मिळोनी काय । जो चेतनावृत्तीनें सचेतन होय । क्षेत्र सघात सर्वांचा. ॥ ३११ ॥ शरीर अवघें जड प्रकृती । जडची तें चेतना ही सत्ववृत्ती । परतु तीस याहूनी आधीं स्फूर्ती । **चैतन्य**सन्निधानें. ॥ ३१२ ॥ मग हें क्षेत्र सारें । सचेतन तीकरितां होय बरे । कीं शुष्का सूक्ष्मा काष्ठाविना एकसरें । न पेटे ओलें स्थूल काष्ठ. ॥ ३१३ ॥ होतां लोहपाषाणयोग । प्रकटती अग्नीचे स्फुलिग । त्याकरितां पेटे आधीं मउ अग । कापसाचें. ॥ ३१४ ॥ मग तो कापुस । पेटवी भलतियास । तैसी **चैतन्य**प्रथमचेतनावृत्तीस । सचेतनता, मग सर्वांस तीकरितां. ॥ ३१५ ॥ किंबहुना गंधकादि द्रव्यमेळा । अग्नियोगें होणें गोळा । परी रजक म्हणोनी सूक्ष्म कळा । त्याच द्रव्याची आधीं पेटते. ॥ ३१६ ॥ प्रथम रजक उजळे । मग [1]यत्रगत द्रव्य पाजळे । त्याच्या योगें तें द्रव्य आणि ते गोळे । होती अवघीं अग्निमय. ॥ ३१७ ॥ तैसी चेतनावृत्ती । सचेतन होतां, मग अवघी प्रकृती । सचेतन होय, तेव्हां विकारजाती । कळों लागती अवघिया. ॥ ३१८ ॥ प्रथम निर्विकार आत्मप्रत्यय । मग मी देह ऐसा निश्चय । तो विकार **चिन्मय**—। चेतनेकरितां. ॥ ३१९ ॥ यालागीं चेतना ।

---

१. तोफेंतील.

विकारांमध्येंची पावली गणना । या विकारांकरितां अर्जुना! । क्षेत्र हें विकारी म्हणे हा अर्थ. ॥ ३२० ॥ आतां सकळ विकाराची उत्पत्ती । चित्तीं स्फुरतां विषय इद्रियवृत्ती । तें स्फुरण तेंव्हां, कीं सूक्ष्म स्मृती । होय विषयांची चित्तातें. ॥ ३२१ ॥ ते स्मृति तरीच अतःकरणा । कीं त्या विषयाची असे धारणा । जें ठाउकेंची नाहीं तें कवणा । आठवेल[१] सांग. ॥ ३२२ ॥ कळोनीही पडे विस्मरण । ऐसें, कीं जाणों तें नेणेची अतःकरण । त्यासही त्या पदार्थाचें नव्हे स्फुरण । तान्हेपणीं देखिल्या स्थळाचें जे रीती. ॥ ३२३ ॥ आतां स्फुरे तेंची जाणा । कीं ज्याची असे धारणा । त्याचा विसर पडला, तरी आपणा । आठवे प्रसगें. ॥ ३२४ ॥ **गी**तेची धारणा जया । काय **गी**ता सर्वदा स्फुरे तया ? । तथापिही तैसिया । अकस्मात् मुखा येती श्लोक ते. ॥ ३२५ ॥ धारणेची हे जाती । चित्तीं विकार उठती ये रीती । देशांतरीं भक्षिले पदार्थ स्फुरती । चित्तीं सनिमित्त, निर्निमित्त. ॥३२६॥ ऐसी विषयांची धारणा । तोही विकारची अतःकरणा । म्हणोनी म्हणे **कृष्ण अर्जुना** । धृतीही विकार. ॥ ३२७ ॥ आतां धारणा स्वरूपाची । तेथें पदवी निर्विकारपणाची । कोणी म्हणती, तरी हे गोष्टी साची । परी तेथें धारणापण चित्तास कैचें ? ॥ ३२८॥ जेथें लागतां मन । सद्यः होतां अमन । धारणेचें कैचें जतन । धारणापणा ते ठायीं ? ॥ ३२९ ॥ असो ते ऐसे **सात विकार** । भेद यांचे अपार । यावरूनी सूचवी **ज**गदाधार । कीं विकाररूपची हें **क्षे**त्र अवघे. ॥ ३३० ॥ पूर्वार्धीं ऐसें बोलिला । आतां उत्तरार्धें बोलतो या बोला । कीं हें **क्षे**त्र सविकार तूजला । सक्षेपे बोलिलों. ॥ ३३१ ॥ ऐसे षष्ठ श्लोकपर्यंत । **क्षे**त्र आणि त्याचे विकार बोलिला अनत । त्यांत **त**त्त्वें चोवीस आणि हे विकार ऐसे **भ**गवत । निवडी **सविकार**शब्देकरूनी. ॥ ३३२ ॥ पचम श्लोकीं **त**त्त्वगणना । षष्ठ श्लोकीं **वि**कार नाना । हीं दोन्ही कळावीं **अर्जुना** । म्हणोनी सविकार **क्षे**त्र सांगीतलें म्हणतसे. ॥ ३३३ ॥ आतां हीं **त**त्त्वें आणि **वि**कार । अवघा त्रिगुणांचा विस्तार । म्हणोनी त्यांची संख्या **ज**गदाधार । या **त**त्त्वां चोविसां वेगळी नाहीं बोलिला. ॥ ३३४ ॥ परंतु शुद्धसत्त्वेंकरूनी ज्ञान । आणि रजतममिश्र सत्त्वें अज्ञान । त्यांतही अनादि विषयवासना विषयध्यान । रजोगुणवासना. ॥ ३३५॥ तेंची रज इंद्रिय । तम त्याचे विषय । सत्त्व मन रजतममय, । हे त्रिगुण विकारही नाहीं बोलिले. ॥ ३३६ ॥ म्हणोनी यावरी ज्ञान । सांगतां शुद्ध सत्त्वव्याख्यान । आणि सांगतां अज्ञान । रजतमविकार बोलेल. ॥ ३३७ ॥ विवेकें निवळे सत्त्वगुण । त्याच सत्त्वीं स्वात्मस्फुरण । ज्ञानसाधनवृत्तियुक्त अंतःकरण ।

शुद्ध सत्त्वची तेंही. ॥ ३३८ ॥ हें परोक्ष अपरोक्ष ज्ञान । आणि ज्ञानसाधनें या सर्वांचें मूळसाधन । हें **क्षेत्र**ची ज्यास जनन । मनुष्ययोनींत भूतळीं. ॥ ३३९ ॥ मनुष्यदेहींच **आ**त्मज्ञान । मनुष्यदेहींच नासे अज्ञान । मनुष्य-देहीचेंच कर्म गहन । फळ भोगवी सर्वा योनींतही. ॥ ३४० ॥ **'कर्मानुबं-धीनि मनुष्यलोके'**[1] म्हणोनी । हें स्पष्ट होईल या श्लोकेंकरूनी । कीं कर्म-बध नरदेहावांचूनी । अन्यत्र नसे. ॥ ३४१ ॥ क्षेत्र म्हणजे शेत । जें पेरिलें तें असे उगवत । तें एका मनुष्यदेहींच निश्चित । अन्यत्र नसे. ॥ ३४२ ॥ यालागीं **क्षेत्र** नाम साचे । एकाच मनुष्यदेहाचें । इतर देह फळची कर्माचे । जें पेरिले **क्षेत्रीं** मनुष्यदेहीं. ॥ ३४३ ॥ हा **क्षेत्रज्ञ** शेतकरी । पेरी काळींत भक्ति पांढरी वेरी[2] । काळी सोडूनीही भक्षी घरीं । पांढरी वरी फळ त्या का-ळ्याची भूमीचें. ॥ ३४४ ॥ तें सांडोनीही शेत । धान्य देशांतरी असे भक्षित । तैसा **क्षेत्र**ज्ञही क्रियमाणसचित । नाना योनींत भोगी, जें केले नरदेहीं. ॥ ३४५ ॥ तीं न म्हणावीं **क्षेत्रे**। कीं ती न पिकती भोगार्हमात्रें । एव प्रस्तुतीं **क्षेत्र पद्म**नेत्रे । बोलिलें तें जाणावें मनुष्यशरीर. ॥ ३४६ ॥ याच मनुष्यदेहीं ज्ञान । याच मनुष्यदेहीं अज्ञान । कीं ज्ञान बिबतां समाधान । मनुष्यदेहींच अज्ञान नासतें. ॥ ३४७ ॥ दिवस उगवे जेथें । तमास रात्रि म्हणावें तेथें । तैसें ज्ञान नरदेहींच येथें । म्हणोनी अज्ञान आहे म्हणावे येथेंची. ॥ ३४८ ॥ ज्यौं[3] तैंमीं[3] कधीं न उगवे दिवस । रात्रि न म्हणवे त्या तमास । ज्या[3] तैंमीं दिवस उगवे त्यास । रात्रि म्हणणें. ॥ ३४९ ॥ जरी इतर योनींत होतें ज्ञान । तरी तेथें त्या ज्ञानास म्हणावें अज्ञान । एवच नरदेहींच अद्वैतसुखसमाधान । द्वैत दुःख येथिल्याच कर्में सर्वत्र भोगितो. ॥ ३५० ॥ बोलिला यालागीं हेची **क्षेत्र** । **वि**कारसहित **पद्म**नेत्र । परतु शुद्ध सत्त्वें ज्ञान पवित्र । याच देहीं, हें नाहीं बोलिला. ॥ ३५१ ॥ आणि शुद्ध **सत्त्वें**करूनी ज्ञान । **रजो**गुणें वास-नाविषयानुसंधान । **तमें** मोहविषय हें अज्ञान । मिश्र सत्त्वास म्हणोनी, हेंही बोलिला. ॥ ३५२ ॥ हें ऐसें **क्षेत्र** सांगोनी । **क्षेत्रज्ञा** प्रतिबिंबाचें बिंब तें ज्ञेय म्हणोनी । पुढें बोलणें त्याच्या विस्तारेकरूनी । हीं **क्षेत्र**संबधी त्रिगुण कार्यें दूरी राहतील. ॥ ३५३ ॥ याकारणें प्रथम सांगतो ज्ञान । मग तद्विपरीत म्हणेल अज्ञान । अज्ञानांत गुणत्रयविकारांचें व्याख्यान । सहजची होणार तें.

---

१. अ० १५, श्लो०. २. 'वरी' नावाचें धान्य ३. 'ज्यात मी' असा पाठ आढळतो, पण तो उघड चुकीचा आहे.

॥ ३५४ ॥ यालागीं या क्षेत्रप्रकरणीं । उपदेशितो ज्ञानविवरणश्रेणी । श्लोक पांच येथूनी भगवद्वाणी । त्यांत पहिला हा श्लोक. ॥ ३५५ ॥

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥**

हें ज्ञान म्हणोनी । पंचम श्लोकाच्या अतीं स्वमुखेकरूनी । भगवत म्हणेल प्रस्तुत येथूनी । लक्षणें वदेल त्यांत प्रथम **अमानित्व** हें. ॥ ३५६ ॥ न करी स्वगुणाची श्लाघ्यता । तो अमानी **पांडुसुता**! । अमानित्वलक्षण तत्त्वता । पाहावें तेथें. ॥ ३५७ ॥ जो प्रवर्ते भगवद्भजनीं । सकळ सद्गुण तयापासीं, परी मनीं । मी ऐसा सद्गुणवान् म्हणोनी । स्फुरतां आधीं दिसे मुख अहकाराचे. ॥ ३५८ ॥ तो अनर्थास मूळ । तत्काळ उपजवी गर्वाचा शूळ । कांहीं जालें ज्ञान तें होय निर्मूळ । निरहकारित्व नासतां. ॥ ३५९ ॥ ज्ञानची जालें ज्याला । बधमोक्ष मिथ्याची त्याला । मृगजळीं वाहतां बुडाला । सूर्य कधीं. ? ॥ ३६० ॥ सिह स्वप्नीं मार्जार जाला । आणि मूषक त्यानें मारिला । जागरीं तें आठवे जरी त्याला । श्लाघ्य मानील तरी काय. ? ॥ ३६१ ॥ जगदधिष्ठान आपण । त्यास कैचें मीपण ? । पूर्णाचें अमानित्व लक्षण । ये रीती. ॥ ३६२ ॥ यालागीं सिद्ध साधक । न मानिती कीं मी ऐसा एक । कदाचित् कांहीं स्फुरतां स्वगुणकौतुक । म्हणती 'कृपा सर्वेश्वराची'. ॥ ३६३ ॥ लाभ भगवद्भजनाचा । निश्चय मनास वाटे साचा । तो स्फुरे काया, मनसा, वाचा, । कृपालेश सर्वेश्वराचा म्हणोनी. ॥ ३६४ ॥ ते म्हणावे अमानी । या अमानित्वगुणेंची समाधानी । सगुणभक्त अपरोक्षज्ञानी । जितांची मुक्त जे ऐसे. ॥ ३६५ ॥ श्रीभागवतीं दशमस्कंधीं ब्रह्मस्तुती । तेथें ब्रह्मा वर्णी ज्ञानी भक्त ये रीती । तो श्लोक या प्रसंगीं श्रीपती । संक्षेपे बोलतो, बोलवितो. ॥ ३६६ ॥

श्रीभागवतश्लोक—**तत्तेनुकंपां सुसमीक्ष्यमाणो**
**भुंजान एवात्मकृतं विपाकम् ।**
**हृद्वाग्वपुर्भिर्विदधन्नमस्ते**
**जीवेत यो मुक्तिपदे स दायभाक् ॥ १ ॥**

ब्रह्मा म्हणे, जो ज्ञानयुक्त । आणि तुझे चरणीं अनुरक्त । ऐसा पूर्वोक्त जो भक्त । तो बरविये तुझे दयेतें पाहतो. ॥ ३६७ ॥ कीं जो लाभ वाटे भजनीं । तो भगवत्कृपेनेंची ऐसें पाहे मनीं । आणि मनें, वाचे, शरीरेंहीकरूनी । नमस्कार करी, कृपा आठवतां. ॥ ३६८ ॥ अनुभव भगवत्स्वरूपाचा

सदा । तुझी कीर्ति गोड गाणें हाची धदा । जरी वाटे, तरी अगा! गोविंदा । कृपा हे तुझी, म्हणोनी करी नमस्कार. ॥ ३६९ ॥ आणि भोग वाईट बरा । जो प्राप्त जाला त्या नरा । तो प्रारब्ध म्हणोनी भोगून, दूसरा । भाव न धरी हृदयांत. ॥ ३७० ॥ नव्हे सुखप्रद भोगे तुष्ट । दुःखप्रद भोगें न मानी कष्ट। भगवत्कृपालाभेंची ऐसा तुष्ट । कीं व्यापून विश्व उरला आनद त्याचा. ॥ ३७१ ॥ कीं स्वकृत कर्माचा । पाक भोगावाच साचा । लाभ तो भगवद्भक्तीच्याच सुखाचा । त्यास कारण मानी कृपा त्याची. ॥ ३७२ ॥ ये रीती स्मरे करुणा । आणि त्या लाभकाळीं लागे श्रीचरणा । ब्रह्मा म्हणे, जी! नारायणा! । जों शरीर जितां ये रीती, ॥ ३७३ ॥ तों देवा तुझ्या नित्य मुक्त पदाचा । वांटेकरी दायाद साचा । की अमानित्व गुण ऐसा त्याचा । जतन जाला, पाहतां तुझ्या कृपेते. ॥ ३७४ ॥ ऐसें अमानित्व । यासही ज्ञान म्हणावें हें तत्त्व । कीं जों ऐसें नसे शुद्धसत्त्व । तोवरी मानित्व रजतममिश्रत्वेकरूनी. ॥ ३७५ ॥ यालागीं अमानित्व ते ज्ञान । तद्विपरीत मानित्व ते अज्ञान । त्या सर्वांचे मूळ उपजे अभिमान । सद्गुण कांहीं देखतां आपणातें. ॥ ३७६ ॥ यालागीं पंचम श्लोकीं । उत्तमश्लोक ऐसें बोलेल कीं । अमानित्वादि ज्ञान जाणावें या मनुष्यश्लोकीं । तदन्यथा मानित्व अज्ञान. ॥ ३७७ ॥ कांहीं देखतां स्वगुण । मानीच की ऐसा आपण । तेची मिश्रसत्त्व कळावयाची खूण । अमानी तेची, जे पाहती भगवत्कृपेतें. ॥ ३७८ ॥ आतां दुसरें ज्ञानलक्षण । **अदंभित्व** सांगे कमलेक्षण । आणि दभित्व अवलक्षण । अज्ञान, कीं अन्यथा तयाते. ॥ ३७९ ॥ नेणे ज्ञान, न प्रवर्ते भजनीं । आणि ज्ञान मिरवी जनीं । ते दंभित्व, याच्या विपर्ययेंकरूनी । अदंभित्व त्याचे बोलावें. ॥ ३८० ॥ तरी जो स्वयें परात्पर । आणि अनुभव ऐसा निरंतर । त्याचा महिमा अगोचर । वेदांसही. ॥ ३८१ ॥ अतर्क्य महिमा स्वयंभ । त्याणें कोठें म्हणूनि मिरवावा दभ? । ज्या दिनमणीच्या किरणीं जगमृगांभ[1] । तो दिवांधा दिसेना. ॥ ३८२ ॥ दिवांधातें दिनमणी । काय दावील किरणश्रेणी? । ज्याचा वर्णितां शिणली वाणी । चतु[2]:पंचषट्सहस्रवदनांची. ॥ ३८३ ॥ एवं नसे स्वहिताची कारणें भजन । नसे स्वहिताचीकारणें ज्ञान । धन, मान इच्छोनी दाखवी बकध्यान । तें अज्ञान तदन्यथा. ॥ ३८४ ॥ अदभित्वगुणें ज्ञान । दंभित्वअवगुणें अधिक अज्ञान । म्हणोनी ज्ञान बोलूनीही जगन्निधान । म्हणेल कीं अज्ञान तदन्यथा. ॥ ३८५ ॥ तिसरें ज्ञानलक्षण । **अहिंसा** म्हणे

---

१. जगरूपी मृगजळ. २. ब्रह्मा, शंकर, गुह व शेष याची. (मागें पृष्ठ १११, टीप ३ पहा.)

कमलेक्षण । तदन्यथा हिंसा अवलक्षण । अज्ञान म्हणे हिसेतें. ॥ ३८६ ॥ सर्व भूतीं भगवंत । ऐसें कळलें ज्यास अत्यंत । कोणास तो ज्ञानवत । करील दुःखी ? ॥ ३८७ ॥ काया, वाचा, मनसा, । परपीडा करणेंची हिंसा । परपीडा वर्जणें अहिंसा । हें ज्ञान आणि साधनही ज्ञानाचें. ॥ ३८८ ॥ भगवद्भाव पाहे सर्वत्र । ज्ञानफल यासम नाहीं पवित्र । या भावें कोणास लेशमात्र । दुःख नेदी. ॥ ३८९ ॥ शब्द बोलतां सावधान । की ह्मणीं पावे कोणी समाधान । उठतां, बैसतां, चालतां, अवधान । कृमिकीटक कोणी ह्मणीं दुःख पावे. ॥ ३९० ॥ पर्ण वृक्षाचें न तोडी । देंठ पुष्पाचा न मोडी । मार्गीं कृमिकीटकपिपीलिका देखतां, सोडी । मार्गची तो. ॥ ३९१ ॥ अथवा चुकवोनी टाकी चरण । आणि आस्तरणी न मारी ढेंकुण । सोसी शरीरीं दश दारुण । परी करुणेनें त्याते मारीना. ॥ ३९२ ॥ मलमूत्रविसर्जनीं । येथें ह्मणी पिपीलिका दिसती म्हणोनी । पुनःपुन्हा कारुण्यनयनीं । पाहे, टाकी ते स्थळ. ॥ ३९३ ॥ क्षेत्रज्ञरूपें सर्वेश्वर । देहधारी चराचर । म्हणोनी दुःख नेदी सादर । स्वदृष्टांते सुखदुःख जो पाहे. ॥ ३९४ ॥ सर्व भगवत ऐसें समाधान । कोणी दुःख पावेल म्हणोनी सावधान । ऐसी अहिंसा तेची ज्ञान । अज्ञान तदन्यथा हिसा परपीडा जे म्हणवी. ॥ ३९५ ॥ कोणास बिबलें ज्ञान ये रीती । अहिंसा त्याची ज्ञानस्थिती । कोणी जाणोनीही विसरती । त्यास ज्ञान बिबाया अहिंसा हे. ॥ ३९६ ॥ क्षेत्रज्ञ भगवताचे अंश । यांस दुःखी न करावें लवलेश । म्हणोनी वर्ते त्यातें हृषीकेश । प्रसन्न होतो त्वरेनें. ॥ ३९७ ॥ तो प्रसन्न जालियावरी । मग तें ज्ञान बिबावया काय उरी ? । अज्ञान संस्कार होती दूरी । न लागतां क्षण. ॥ ३९८ ॥ नसेल बिंबलें ज्ञान । अहिंसा त्यास ज्ञानसाधन । भजना सर्वांत थोर भजन । अहिंसा कीं न करणें परपीडा. ॥ ३९९ ॥ सर्वभूतीं स्वयें भगवत । परंतु तो अलिप्त सुखदुःखातीत । तेची सुखी दुःखी अत्यत । प्रतिबिंबरूपेकरूनी. ॥ ४०० ॥ तो स्व अशेंकरूनी क्षेत्रज्ञ । चराचरीं स्वयें सर्वज्ञ । म्हणोनी क्षेत्रज्ञतत्व समजोनी अभिज्ञ । भलतियास सुखची देती, न देती दुःखातें. ॥ ४०१ ॥ सुखी करावा सर्वेश्वर ! ऐसा ज्यास उपजे आदर । त्याणे क्षेत्रज्ञरूपे जगदीश्वर । सुखी करावा. ॥ ४०२ ॥ असेल ज्यास वैभव कांहीं । भवन त्यास याहूनी थोर नाहीं । कीं अन्नें, उदकें, वस्त्रे, धनें, भलतियाही देहीं । संतुष्ट करावा ईश्वर चिदशरूपें. ॥ ४०३ ॥ ईश्वराचा अंशही ईश्वर । हें पंचदशीं

---

१. 'कीं मी' असा पाठ आढळतो; पण तो केवळ चुकीचा आहे. २. अथरुणांत.

वदेल सर्वेश्वर । **'ममैवांशो जीव'** येथुनी ईश्वरेश्वर । **'शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः'** म्हणोनी. ॥ ४०४ ॥ या कारणें ईश्वरांश । तोही ईश्वरची हृषीकेश । त्यास दुःख नेदूनी, सुख देतां लेश । सुखी जगदीश होतसे. ॥ ४०५ ॥ ज्यास नसती धान्यधनें । त्याने भजावें काया, वाचा, मने; । अहिंसागुणमात्रे धन्य सज्जनें । कृतकृत्य करावें जीवित्व. ॥ ४०६ ॥ न वेंचतां कांही वित्त । अहिंसायुक्त करिता चित्त । परम दुर्लभ जो अच्युत । तो सुलभ अनायासें होतसे. ॥ ४०७ ॥ षष्ठाध्यायात कमलनेत्र । म्हणे कीं **'आत्मौपम्येन सर्वत्र । समं पश्यति योऽर्जुन'** म्हणोनी अति पवित्र । अहिंसातत्पर योगीच[4] वर्णिता जाला. ॥ ४०८ ॥ कीं आपण ज्या ज्या गोष्टीनें सुखी । त्या त्या रीतीं सुखी करी जीव आणखी । आपण ज्या ज्या गोष्टीनें दुःखी । ते ते परिहरी इतराचे. ॥ ४०९ ॥ अर्जुना! सर्वा योगियांहुनी । तो मज बहुत आवडे म्हणोनी । स्थळस्थळीं येची रीतीकरूनी । ज्यास भूतदया, वर्णी तयाते. ॥ ४१० ॥ फुका जगदीश जोडे । परतु ऐसे दयाळु थोडे । जैसे अर्जुनाचे हाकी घोडे । सुलभ तया, जया दया सर्वाभूतीं. ॥ ४११ ॥ पाय टाकी दणादणा । न पाहे सूक्ष्म जीवगणा । न उपजे फुकाची करुणा । कीं पाउलं न टाकी विचारूनी. ॥ ४१२ ॥ परपीडेनेंची चालणे । परपीडा होय ऐसें बोलणें । त्याचे जिणे नाशी बहुतांचे जिणें । तें त्याचे पापाचकारणें आयुष्य. ॥ ४१३ ॥ यालागीं हिंसाच अज्ञान । अहिंसा तें ज्ञान । **'अज्ञानं यदतोन्यथा'** याचे व्याख्यान । सर्वेच्या सवेची ऐसें पाहावे. ॥ ४१४ ॥ आता चतुर्थ लक्षण **क्षांती** । क्षाति क्षमेस म्हणती । क्षमेची मूर्ति स्वयें लक्ष्मीपती । बोले तो, हृदयीं भृगुपद जयाच्या. ॥ ४१५ ॥ सहज सर्वात्मभाव । तो साकार देवाधिदेव । म्हणोनी सोसी ब्रह्मण्यदेव । स्वये लात उरीं ब्राह्मणाची. ॥ ४१६ ॥ त्याचे करिता भजन । सर्वात्मभाव पावती सज्जन । क्षमाशील त्याचेची मन । क्षमा सर्वात्मभावे तयांला. ॥ ४१७ ॥ स्वजिव्हा स्वदांतांखाले रगडे । तेव्हां कोण दांतांसी झगडे । जिव्हा दुखता तळमळे रडे । तरी क्षोभ न करी दांतावरी. ॥ ४१८ ॥ दांतात जिभेत, आपण । म्हणोनी भलता क्षमा धरी, तैसा निपुण । पाहे सर्वभूतीं स्वात्मखूण । तो कोणीं पीडिला, तरी क्षोभेना. ॥ ४१९ ॥ परापराधीं क्षमा । हा सर्वात्मभक्तीचा महिमा । तो प्रगट करणें लागलें पुरुषोत्तमा ।

१. अ० १५, श्लो० ७. २ अ० १५, श्लो० ८. ३. अ० ६, श्लो० ३२. ४. 'योगी' असा पाठ आढळतो

लात हाणतां उरीं भृगूनें. ॥ ४२० ॥ ऐसा सहज सर्वात्म देव । जे न सेविती देवाधिदेव । ते दुर्वासादि ज्ञानी भूदेव । नाहीं लाधले क्षमेतें. ॥ ४२१ ॥ तोची हे गीताशास्त्र । उपदेशितो कमलनेत्र । आणि इतरदेवताभजनमात्र । अविधिपूर्वक म्हणतसे. ॥ ४२२ ॥ आणि तोची म्हणतो श्रीपती । कीं ज्ञान म्हणावी क्षांती । तेव्हां सूचवी रीती । कीं क्षमा स्वभक्तीविण दुर्लभ. ॥ ४२३ ॥ हे क्षमा म्हणावी ज्ञान । आणि क्षमा नसणें अज्ञान। **'अज्ञानं यदतोन्यथा'** याचें व्याख्यान । सर्वेंच्या सर्वेंची ऐसें जाणावें. ॥ ४२४ ॥ आता पांचवे **आर्जव** । म्हणजे नीट सरळ स्वभाव । कोणासही वक्रभाव । न दाखवणे काया, वाचा, मनेही. ॥ ४२५ ॥ सर्वांसीं नीट सरळ। वर्ते, बोले कुशल । वक्र बोलणें वर्तणें शब्दच्छळ । तें अनार्जव वक्रता. ॥ ४२६ ॥ ऐसी पांच, आतां **आचार्योपासन** । म्हणोनी साहावें लक्षण कमलनयन । सांगतो कीं आचार्य गुरु त्याचें समीप सेवन । ते आचार्योपासन म्हणिजेते. ॥ ४२७ ॥ गुरूसमीप असणे । देव नसे गुरुविणें । जो देव सर्वांचा सर्वेश्वर आपण । तोचि हा श्रीगुरु, भाव ऐसा. ॥ ४२८ ॥ अनन्यभावे शरण । जों जो प्रेमें सेवी श्रीगुरुचरण । तो तों निर्मळ होय अंतःकरण । तसतसे बिंबे ज्ञान, गुरूने जे बोधिले. ॥ ४२९ ॥ यालागीं गुरूची सेवा । ज्ञान म्हणावे गा! पांडवा! । कीं ज्ञान उपदेशिल्यावीण गुरुत्वभावा । ठाव नाहीं मुख्यत्वे. ॥ ४३० ॥ ज्यानें ब्रह्मात्मता द्यावी । तो गुरु म्हणावा गोंसावी । जोवरी नाही गुरुत्वपदवी । तों कैंवी घडे गुरुसेवा? ॥ ४३१ ॥ तथापि हें ज्ञान म्हणोनी सांगे धनंजया । कीं ज्ञानपरिपाकार्थ सेवणे गुरुराया । परंतु ज्ञान उपदेशी, तेव्हां तया । पदवी गुरुत्वाची. ॥ ४३२ ॥ गुरूपासूनि घ्यावें ज्ञान । मग तो ईश्वर म्हणोनी त्याचे भजन । त्या भजनें बाणतसे समाधान । जे उपदेशिले, तें ज्ञानची बिंबते श्रुति म्हणे. ॥ ४३३ ॥

**श्रुति—यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाश्यंते महात्मनः ॥**

मागे बहुतां स्थळीं हे श्रुती । वाखाणिली, आतां प्रस्तुतीं । गुरुभजनें प्रकाशती उक्ती । गुरूच्या, म्हणोनी तात्पर्य येथें बोलणे. ॥ ४३४ ॥ आतां आचार्योपासन । म्हणोनी भगवद्वचन । अर्थ याचा गुरूचे समीप सेवन । प्रकार दोनी त्या सेवनाचे. ॥ ४३५ ॥ त्यांत गुरुमूर्ति भाग्येकरूनी । प्रत्यक्ष जरी दिसे नयनीं । तरी त्याच्या आसनी भोजनी, शयनीं, । समीप असोनी सेवा करवेल. ॥ ४३६ ॥ आठही प्रहर गुरुदेवा-। समीप असोनी करवेल

सेवा । स्वनिद्राआहारविहारादि त्या देवाधिदेवा । अर्पवेल. ॥ ४३७ ॥ पादप्रक्षालनजळ । गंगा प्रत्यक्ष केवळ । म्हणोनी सेविनाची भक्ति निर्मळ । घडो शके भक्तानें. ॥ ४३८ ॥ श्रीगुरु चालतां चरणीं । अंकित देखोनी धन्य धरणी । प्रेमें तया रजीं लोटांगणीं । लोळवेल. ॥ ४३९ ॥ पादुकापादरक्षांची धूळी । सर्वांगीं लावूनी अबोळी । करूनी अविद्यासंस्काराची होळी । गुरुभक्तास करवेल. ॥ ४४० ॥ त्याचे जालिया भोजन । उरलें त्याचें शेषची ते अन्न । ऐसें प्रेमें करिती चिंतन । उच्छिष्टभोजन घडो शके. ॥४४१॥ व्यंजन करू ये आसनीं । चामर आसनीं गमनीं । पादसंवाहनादि सेवा शयनीं । सद्भावें करूये. ॥ ४४२ ॥ गडूपपात्रादि क्षालनीं । नीच सेवे हर्ष अत्यंत मनीं । श्रीगुरु आरूढ होतां वाहनीं । पादचारी समागमें धावों ये. ॥ ४४३ ॥ प्रारब्धे मिळे वित्त । ते श्रीगुरूचेंची निश्चित । स्त्रीपुत्रादि दास दासी त्याचीं म्हणोनी एकचित्त । त्याच्या वित्तें प्रजा त्याची पाळू ये. ॥ ४४४ ॥ अतिथि अभ्यागत । मूर्ति त्याच्याच संत । त्याऱ्याच त्या धनें, धान्ये, अत्यंत । आतिथ्य त्याचें करू ये. ॥ ४४५ ॥ वित्त उरले तेंही त्याचें । उरले राज्यधन पाळूनी सैन्य रायाचे । लोभ टाकुनी त्याचेची साचें । वित्त उरले समर्पू ये अथवा रक्षू ये. ॥ ४४६ ॥ गुरुमूर्ति दिसतां प्रत्यक्ष । इत्यादि सेवा करू शके भक्त दक्ष । परंतु अदृश्य नेत्रांस होतां परोक्ष । आचार्योपासन कैसें घडे हे? ॥ ४४७ ॥ ऐसा संदेह ये स्थळीं । उपजेल श्रोतयांच्या हृदयकमळीं । म्हणोनी गीताकार भगवंतची मुळीं । आचार्योपासन म्हणतसे. ॥ ४४८ ॥ की आचार्याची उपासना । जैसी ईश्वराची उपासना अर्जुना! । की मी न दिसें मुमुक्षुजनां । तरी उपासना तो घडतसे. ॥ ४४९ ॥ प्रत्यक्षही गुरुसेवन । तरीच घडेल की त्यासमीप सेवन । कारण नव्हे इंद्रियदर्शन । चित्त त्यासमीप ठेवावें. ॥ ४५० ॥ डोळियांस डोळेपण । बुद्धीच करूनी जाणती निपुण । तेव्हां बुद्धीच मुख्य डोळे, ऐसी खूण । सर्वज्ञ जाणती. ॥ ४५१ ॥ ध्यान करूनिया गुरुवराचे । पूजन मानस[1] करावें त्याचें । कीं गुरुतत्त्व तेंची साचे । ज्या तत्त्वे ध्यानीं मूर्ति स्फुरतसे. ॥ ४५२ ॥ ध्येयमूर्ति आणि पूजारचना । अवघी मनाची आपल्या कल्पना । परंतु आत्मचैतन्या अधिष्ठानाविना । न स्फुरे तें किमपिही. ॥ ४५३ ॥ येथें श्रीगुरूचा उपदेश । की विना अधिष्ठान न स्फुरे लेश । या स्मृतीनेंची नाशती क्लेश । जडभ्रांतिअविद्यासंस्काराचे. ॥ ४५४ ॥ याभावें गुरुरूप । चित्स्वरूपची

१. मनाची, मानसिक

आपला आत्मदीप । आणि पूजाद्रव्यें सर्वही, पूजा चित्स्वरूप । हेंची गुरुत्व जें कळलें गुरुमुखे. ॥ ४५५ ॥ ऐसें अनुभवैकवेद्य चित्स्वरूप । त्या प्रत्ययें चित्त जों तत्समीप । तोपर्यंत तें उपासनारूप । आचार्योपासन तें हेंची. ॥ ४५६ ॥ आपण आणि आपलें मन । ते श्रीगुरुमूर्ति आणि मानस पूजन । गुरूच आपण होणे, त्याणें भजन । ऐसें करावें ? ॥ ४५७ ॥ भ्रमर होय कीटकाचे अंग । तन्मयपणें स्मरतां भृंग । श्रीगुरुरूप ज्याचें अंतरंग । तो गुरूच तो कां नव्हे ? ॥ ४५८ ॥ ऐसें ध्यातां गुरुसत्तमा । बाणे यास, जो त्या गुरूचा महिमा । यालागीं ज्याचा अनुभव अतर्क्य निगमा । तैसा गुरु असावा. ॥ ४५९ ॥ एवं गुरुमूर्ति नेत्रांतें परोक्ष । तरी ये रीती गुरुत्व सेवावें अपरोक्ष । आणि नेत्रास असिले जरी प्रत्यक्ष । स्वरूप रूपची ते मूर्ति लक्षावी. ॥ ४६० ॥ या अनुसंधानें चराचर । दिसे श्रीगुरूची सर्वेश्वर । परी ते पदवी तेंव्हां, जेंव्हां सादर । आचार्योपासन घडे ये रीती. ॥ ४६१ ॥ ज्ञान बिंबावया ये रीती । गुरुभक्ति बोलती श्रुती । ज्ञानदृष्टीं सेवितां गुरुमूर्ती । ठसावे चित्स्फूर्ति सर्वत्र. ॥ ४६२ ॥ चित्स्वरूपे मूर्ति त्याची । स्फुरे ते चित्स्वरूपची साची । कनकमूर्तीची स्फूर्ति कैची । कनकाविणे ? ॥ ४६३ ॥ प्रत्यक्ष नसतां, ऐसें स्मरावे । प्रत्यक्ष दिसतां, ऐसे पाहावे । याची भावें भजावें । पदोपदीं. ॥ ४६४ ॥ जे भूमी धन्य त्याच्या चरणीं । अनुभवें आयता स्वयें ते धरणी । तो पाय टाकितां अंतःकरणीं । आपणची धन्य ऐसें मानावें. ॥ ४६५ ॥ श्रीगुरूच्या पादुका पादरक्षा । न येती स्वरूपावांचूनी लक्षा । म्हणोनी गुरुभक्ताच्या मना ऐसी शिक्षा । कीं त्या रूपे आपणातें लाभ चरणांचा. ॥ ४६६ ॥ श्रीगुरु श्रीकांत त्याचें आसन । श्रीगुरु श्रीपती त्याचें शयन । मायानिषेध शेषशयन त्याचें अधिष्ठान । स्वरूप आपणची कीं ऐसें पाहावे. ॥ ४६७ ॥ जिकडे श्रीगुरूची दृष्टी । तिकडे वाटे कृपावृष्टी । तों आत्मभावे ते ते सृष्टी । आपणची म्हणोनी मानावें. ॥ ४६८ ॥ जेथें जेथें गुरुकृपा वर्षे । तेथें तेथें आपण म्हणूनी चित्त हर्षे । गुरुमूर्ति सेवितां, ऐसें स्पर्शे । मन गुरुतत्वास ये रीती. ॥ ४६९ ॥ सेवेसी योग्यता ये रीतीची । हेही कृपा श्रीगुरूची । अद्भुत शक्ति सुखसुरतरूची । स्मरोनी वदावें क्षणक्षणा सप्रेमें. ॥ ४७० ॥ हें बोलीं काय बोलावे ? । शिकवणारें काय शिकवावें ? । प्रेमें भजोनी पाहावें । झरा लागतां, फुटती उकळ्या आपोआप. ॥ ४७१ ॥ ऐसे सर्वात्मभावें गुरुचरण । जो सेवी अनन्यशरण । त्याच्या कृपाकटाक्षें चुके जन्ममरण । बहुतां जनांचें. ॥ ४७२ ॥ असो हा अपार

विस्तार । परतु प्रस्तुतीं आचार्योपासनप्रकार । बहु बहु सूचवी गीताकार । सारथि अर्जुनाचा. ॥ ४७३ ॥ ऐसें अनन्य गुरुभजन । याचेंच नांव परम ज्ञान । यावेगळे तेंच अज्ञान । दमे दावी गुरुभक्ति. ॥ ४७४ ॥ आतां सातवें लक्षण । शौच म्हणे कमलेक्षण । त्यांत अतरीं शुद्ध अतःकरण । शौच मुख्य उत्तम हें. ॥ ४७५ ॥ विपयासक्तीचा मळ । हें रजतमवासना-मूळ । तोची विवेकउदकें धुता केवळ । शुद्धसत्त्व उरे, शौच तें. ॥ ४७६ ॥ परतु वर्णाश्रमोचित । कर्म आचरता विहित । विवेकें आठवे स्वहित । शुद्ध अतरीं तेधवां. ॥ ४७७ ॥ त्या विहित कर्मास अधिकार । उपजे, करितां शौच वारवार । तो मृत्तिकाजळे उक्त प्रकार । होता, उपजे त्या शौचे अधि-कार कर्माचा. ॥ ४७८ ॥ शौचपूर्वक कर्म करी । आज्ञा ईश्वराची शिरीं धरी । तरी ते जन्मीं अथवा जन्मातरीं । चित्तशुद्धि दे ईश्वर तयातें. ॥ ४७९ ॥ त्या चित्तशुद्धीनें ज्ञान । ज्ञान जालिया बाणे ध्यान । म्हणोनी शौचही ज्ञानसाधन । साधकातें. ॥ ४८० ॥ सिद्धाचे तो ज्ञान केवळ । शौच कीं न स्पर्शे जडत्वमळ । सर्वही चित्स्वरूप आत्माची निर्मळ । सदा सों-वळा ये रीती. ॥ ४८१ ॥ म्हणोनी शेवटीं हीं लक्षणें सकळ । ज्ञान म्हणेल मेघनीळ । यास अन्यथा अशुभपण ओगळ । तें अज्ञान कीं दृढीकरण अज्ञानाचें. ॥ ४८२ ॥ आतां लक्षण अष्टम । बोलतसे पुरुषोत्तम । तें स्थैर्य म्हणजे स्थिरत्व परम । स्थिरा स्वरूपीं स्थिरता बुद्धीची. ॥ ४८३ ॥ देह चचळ कर्माचा । परी आपण स्थिर म्हणूनी अनुभव ज्याचा । चचळीं अचचळ भाव बुद्धीचा । कुलालचक्रीं माशी जैसी बैसली. ॥ ४८४ ॥ ज्या विषय-वासनेनें मन । सर्वत्र करी गमन । ते मायापदार्थ मानूनी वमन । कटाळे तो स्थिरा स्वरूपीं स्थिर सर्वदा. ॥ ४८५ ॥ स्वरूपीं नसे विषयवासना । तन्मय ज्यानें केले मना । तें रजतमातीत तेथून चळेना । स्थैर्य मुख्य हें ऐसें. ॥ ४८६ ॥ परतु हें स्थिरपण । जरी भजनीं आधीं लागे स्थिर गुण । कीं अरिष्टांच्या कोटीही जालिया, न पावे चलन । भजनापासूनी या. ॥ ४८७ ॥ त्रैलोक्याचे आधिपत्य । फुका होतां येत असिलें सत्य । क्षणभरी तदर्थही अगत्य । चचळ नव्हे भजनापासूनी या. ॥ ४८८ ॥ अथवा त्रैलोक्यराज्य आपले जातें । क्षण न सोडितां भजनातें । तन्ही चंचळ न करी मनातें । स्थैर्य न सोडी सर्वथा. ॥ ४८९ ॥ त्या स्थैर्यें सर्वेश्वर । कृपा करी कृपासागर । तरी आत्मज्ञान होऊनी निरतर । स्थिरत्व बाणे स्वस्वरूपीं. ॥ ४९० ॥ एका स्थिरत्वावांचूनी । सकळ वृथा म्हणोनी । ज्ञानसाधन भगवद्भजनीं । हें ज्ञान

म्हणोनी नाम पावले. ॥ ४९१ ॥ आणि यास जें अन्यथा । चचलत्व तें अज्ञानची सर्वथा । की ज्ञानाची काय कथा [१] । चचलत्व स्वभाव ज्यापासीं. ॥४९२॥ भजे नाना देवतांतर । सकाम कर्मी कधीं सादर । कधीं निष्कामीं होय तत्पर । भगवद्भजनीं मुमुक्षु होऊनी. ॥ ४९३ ॥ घडीभरी धरी निवृत्ती । पुन्हा आरभी प्रवृत्ती । कोणे एके मार्गी चित्तवृत्ती । स्थिर नसे. ॥ ४९४ ॥ त्याची प्रवृत्ति नव्हे धड । निवृत्ति तों अत्यतची अवघड । नागवण हे उघड । चचलता. ॥ ४९५ ॥ यालागीं स्थैर्य तें ज्ञान । तदन्यथा चांचल्य अज्ञान । **'अज्ञानं यदतोन्यथा'** याचे व्याख्यान । लागलेंची ऐसें. ॥ ४९६ ॥ ऐसीं आठ, यानतर नवम । या श्लोकाच्या अतीं **पु**रुषोत्तम । सांगे तयाचे नाम । **आत्मविनिग्रह** म्हणोनी. ॥ ४९७ ॥ **आत्म**शब्दे मन । त्याचा विशेषें निग्रह म्हणे मधुसूदन । स्वरूप लक्षी न करी विषयचिंतन । निग्रह ऐसा मनाचा. ॥ ४९८ ॥ जों न आटोपे मन । तों नव्हे ज्ञान जतन । ज्या विषयाचे करी चिंतन । तेथें विस्मृति स्वरूपाची. ॥ ४९९ ॥ जोवरी चैतन्यरज्जूची स्मृती । तोंवरी विषयसर्पाची कैची ख्याती ? । मनोनिग्रहावांचूनी विस्मृति । तेव्हां अविद्यासंस्कारीं मन बुडे. ॥ ५०० ॥ यालागीं निग्रहयुक्त जों मन । तोंची वरी आठवे ज्ञान । अविद्यासंस्कारे यथापूर्व अज्ञान । जडात्मता जडसत्यता वाटतां. ॥५०१॥ आत्मा कळलियावरी । स्मृति धरावी कां परी ? । ऐसें म्हणती ते तरी । शब्दज्ञानी बहुधा दूषिले. ॥ ५०२ ॥ यालागीं आत्मविनिग्रह ज्ञान । तदन्यथा अज्ञान । **"अज्ञानं यदतोन्यथा"** याचें व्याख्यान । लागलेंची ऐसें. ॥ ५०३ ॥ एका श्लोकी नव लक्षणे । ऐसीं बोललीं **क**मलेक्षणें । आतां भवपाशमोक्षणें । ज्ञानलक्षणें आणखींही बोलिलीं या श्लोकी. ॥ ५०४ ॥

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

इंद्रियांचे अर्थ । विषय शब्दस्पर्शरूपादि पदार्थ । **वैराग्य** यांचे ठायीं समर्थ । दशम लक्षण हें ज्ञानाचें. ॥ ५०५ ॥ अनादि विषयांचा अनुराग । प्रीति विषयांची ते म्हणावी **राग** । त्यांच्या ठायीं अप्रीति तो विराग । त्या विरागपणास वैराग्य बोलावें. ॥ ५०६ ॥ या वैराग्यशब्दांत ऐसा भाव । स्पष्ट दावी **दे**वाधिदेव । की आवडीनें भक्षूनी स्वयमेव । वमन केलिया कांटाळे. ॥ ५०७ ॥ विषय आधी आवडीकरूनी । वासनारूपें वाहे मनीं । दुःखकोटि विषयसेवनीं म्हणोनी । भोगेच्छा सोडी विवेकें. ॥ ५०८ ॥ विषय सेवितां

१. फटफजिती.

एक एक । मृत्यु पावले अनेक । भवबध हे वासनाच ऐसा विवेक । कळतां वमनतुल्य टाकी इच्छा भोगाची. ॥ ५०९ ॥ पतग देखे वैश्वानर । तो त्यास वाटे मनोहर । उडी टाकी भोगतत्पर । तत्काळ मरे एकाच विषयें. ॥ ५१० ॥ स्पर्श हस्तिनीचा होतां हस्ती । पडे क्षुद्र व्याधाचे हस्तीं । जो तत्पर भोगीं समस्तीं । तो बध पावे काय आश्चर्य. ॥ ५११ ॥ शब्द तो पडतां श्रवणीं । मोह उपजोनी अतःकरणीं । भोगेच्छेकरूनी हरिणीं । प्राण दीधले. ॥ ५१२ ॥ कमलमकरंदें भ्रमर । गुतला कमळीं सादर । तों सूर्यास्तमानीं मधुकर । कमळासहित भक्षिला हस्तीनें. ॥ ५१३ ॥ रसनेंद्रियाचा वळसा । आमिषलोभे गळास लागे मासा । एकाच रसनेद्रियें ऐसा । मासा मरे. ॥ ५१४ ॥ ऐसे विषय पांचही सकळ । सेवी मानी जन्म सफळ । त्यास जन्ममृत्यु कां न होती पुष्कळ? । लक्ष चौऱ्यायशी योनि भोंवतां. ॥ ५१५ ॥ जननी सर्वा अनर्थाची । भोगवासना विषयाची । हेची क्रियमाणेकरूनी साची। संचितें प्रारब्धाकारणे. ॥ ५१६ ॥ रजोगुण या वासनेचे मूळ । तामस विषय ध्यातां चचळ । ईकरितांच घडती सकळ । पापे आणि पुण्ये, स्वर्गादि काम्यें हीं. ॥ ५१७ ॥ विषयवासनेनें एक घडी । जे कर्मी काया वाचा, मनाची उडी । त्या कर्मेकरूनी जोडी । कोटि नानायोनींत जन्ममरणाच्या. ॥ ५१८ ॥ आणि भोगूनी भोग सकळ । जे क्षणी नाहीं ते क्षणींच विफळ । जाणों आजन्म ऐसाची विकळ । विषयासाठीं हा होता. ॥ ५१९ ॥ भोगितांही हळहळ । सरेल, नासेल, पुढें मिळेल, कीं न मिळेल, ऐसी तळमळ । रांधितां, रक्षितां, भक्षितां, खळखळ । क्लेशाची अवघे. ॥ ५२० ॥ अविवेकेची विषयांचा अनुराग । विवेके टाकी पोटांतिल रोग । मग वमनतुल्य मानी तो ऐसा विराग । वैराग्यभाव त्या विरागाचा. ॥ ५२१ ॥ या अर्थे यथायोग्य । बोले विषयांचे ठायीं वैराग्य । ऐसें वैराग्य तेंची भाग्य । अपरोक्षसाक्षात्कारसंपन्नाचें. ॥ ५२२ ॥ वैराग्य नसे मनीं । त्यास आवडी कैची ज्ञानीं? । वैराग्यची ज्ञान म्हणोनी । आणि तदन्यथा अज्ञान म्हणतसे. ॥ ५२३ ॥ ज्ञान सत्त्ववृत्तीकरूनी । तें रजतमें विषयानुरागें मलिन म्हणोनी । ज्ञान नव्हे यावरूनी । निर्मळ वैराग्यची ज्ञान बोलावें. ॥ ५२४ ॥ ज्याची अत्यंत आवडी । त्यावरी सत्त्ववृत्तीची उडी । विषयवैराग्य, तोंवरी बुडी । निजानदीं वृत्ति सत्त्वाचिया. ॥ ५२५ ॥ सत्त्वास विषयप्रीति जोपर्यत । तोवरी रजतमीं बुडाले असे अत्यत । यालागीं म्हणे भगवत । **"अज्ञानं यदतोन्यथा"** म्हणोनी

---

१. अग्नि.

॥ ५२६ ॥ सर्वांत आवडी आपणा आपली । प्रकट असोनिही झांकली । अनादि वासनेनें संचली । प्रीति विषयांची. ॥ ५२७ ॥ विचारिता आवडी साची । मुख्य आपल्या आत्मयाची । तदर्थ आवडी विषयांची । परी अविवेके ऐसें कळेना. ॥ ५२८ ॥ आत्माच गोड ऐसें कळे । तरी कां विषयानुरागे चित्त मळे? । स्वअधिष्ठानीं चित्तवृत्ति वळे । म्हणोनी ज्ञानची वैराग्य म्हणे श्रुती. ॥ ५२९ ॥

**श्रुति—आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ।**
**किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंचरेत् ॥ १ ॥**

श्रुत्यर्थ ॥ श्रुति म्हणे प्राणी जरी । आपण ऐसा म्हणोनी आपणातें जाणे तरी । शरीर त्याचे कां परी । सचरे कासया एका कारणें? ॥ ५३० ॥ कीं ज्याची अत्यत आवडी । त्यावरी शरीराची पडे उडी । तरी नावडी नये ज्याची घडी । तो आवडता कळला तेधवा आपणां. ॥ ५३१ ॥ ज्यास सुख व्हावयाकारणे । लागे भलतयाची प्रीति धरणें । तो प्रियची सुख ऐसें अनुभवी अतःकरणे । मग देह सचरे कोणाचिया कामानिमित्त? ॥ ५३२ ॥ मुख्य सुखाची आवडी । कीं ज्यांत सुख त्याचीच गोडी । तरी मुख्य आत्मयाची आवडी जे, कोणे घडी । नावडी त्याची उपजेना. ॥ ५३३ ॥ तो आत्माच सर्वोत्कृष्ट सुख । सुषुप्तींत त्यावीण कोण आणिक? । इद्रिया विषयांचें सुख । न दिसोनी अत्यत ते काळीं. ॥ ५३४ ॥ सर्वांची उपजे नावडी । परी सुखाचा वीट नये घडी । तो आत्मा गोष्टी हे उघडी । म्हणोनीच आवडे सर्वांते. ॥ ५३५ ॥ त्यावेगळे जे अत्यत प्रिय । तें क्षणांत होतें अप्रिय । परतु आत्मा आनद अव्यय । अप्रिय नव्हे निमेषही. ॥ ५३६ ॥ श्रुति म्हणे की तो जरी कळे । तरी मग किमर्थ देह चळे? । एवंच मुख्य वैराग्य तेव्हा उचंबळे । स्वात्मानुभव जेव्हां कोंदे अतरी. ॥ ५३७ ॥ यालागी या प्रकरणीं । अंतीं म्हणेल चक्रपाणी । कीं हें ज्ञान याच्या अन्यथापणीं । अज्ञान जाणावे. ॥ ५३८ ॥ तरी ज्यास आत्मा न कळे आपला । विषयची आवडती त्याला । म्हणोनी अज्ञानभाव प्राप्त जाला । विषयानुरागातें. ॥ ५३९ ॥ एव मनुष्यदेहची क्षेत्र । ज्ञान नव्हे अन्यत्र । म्हणोनी ज्ञानलक्षणें कमलनेत्र । क्षेत्रप्रकरणीं हीं सांगे. ॥ ५४० ॥ त्यांत शुद्धसत्त्वें ज्ञान । रजतम मिश्रसत्त्वे अज्ञान । त्यास अज्ञानांत व्याख्यान । रजतममिश्रसत्त्व या विकाराचे. ॥ ५४१ ॥ कीं वैराग्य गुणाचा उॅलथा[1] । अवैराग्य गुण तदन्यथा । वासना विषयप्रीति हे

१. उलट.

कथा । रजतमिश्र सत्त्वाची. ॥ ५४२ ॥ एवंच उत्तम लक्षणजाती । या श्लोकीं ये रीती । बोलोनी आता जगत्पती । अनहंकार लक्षण अकरावें बोलतो. ॥ ५४३ ॥ गळे त्रिविध अहकार । तें ज्ञान म्हणावें अनहकार । त्रिविध त्या अहकाराचे विकार । तामस राजस, सात्त्विक, म्हणोनी. ॥ ५४४ ॥ देह पच भूताचा रचला । तेथे तामस अहकार संचरला । की पच भूताचा उद्भव जाला । तामस अहकाराचपासूनी. ॥ ५४५ ॥ मी स्थूळ, मी कृश । मी दीर्घ, मी खुजा, इत्यादि बुद्धिभ्रंश । धरूनी, तामस अहकारे चिंदश । साहकार जाला ससारी. ॥ ५४६ ॥ स्वप्न शरीर स्वप्नमय । तेथेंही ऐसाच आत्मप्रत्यय । तो मिथ्या, तैसा हाही, म्हणोनी, निश्चय । गुरुमुखे कळतां. हा सुटे. ॥ ५४७ ॥ आता राजस अहकार । त्यापासूनी इद्रियविस्तार । मी पाहतो मी चाखतो, हुगतो, ऐसा प्रकार । राजस अहकाराचा. ॥ ५४८ ॥ येथें इद्रियगण । अहकारे वाटे आपण । की आत्मप्रयत्ने मीपण । हे रूप अविवेचें अनादि. ॥ ५४९ ॥ ते गुरुमुखे निरसे । की चक्षुरिद्रियावीण रूप न दिसे । आत्मा कोण शब्द घेतसे । श्रोत्रेद्रियावाचोनी. ॥ ५५० ॥ घ्राणावीण गध न कळे । रस रसनेवाचूनी न गिळे । त्वचेवीण न आकळे । स्पर्श कांहीं. ॥ ५५१ ॥ आत्मा असता एक इद्रिय । तरी त्याला न कळते चारी विषय । एवंच त्या सत्तेनें निश्चय । इद्रियद्वारा बुद्धीस विषयांचा. ॥ ५५२ ॥ किंबहुना आत्मा श्रोत्र असता । तरी रूपविषय त्याला न दिसता । कीं श्रोत्रेद्रिया सर्वथा । रूप न दिसे. ॥ ५५३ ॥ इत्यादि उपदेशरीती । श्रीगुरु सागतां शिष्याची मती । राजस अहकारापरती । ते होय, आत्मा तीहीपरता. ॥ ५५४ ॥ तिसरा सात्त्विक अहंकार । त्याच्या निरासे स्वरूपाचा निर्धार । मीच देह, मीच इद्रिये, हे विकार । नसती सात्त्विक अहकारीं. ॥ ५५५ ॥ तो नुसता अहप्रत्यय । कित्येकाच्या मतें तोची शुद्ध आत्मा अद्वय । परी चंद्र जैसा राहुमय । राहुयुक्त एकची दिसतसे. ॥ ५५६ ॥ चंद्रप्रकाशें राहु दिसे । परतु प्रकाश त्याचा तैसाच त्या चंद्राचा नसे । राहूवेगळा होतां गवसे । शुद्ध प्रकाश चंद्राचा. ॥ ५५७ ॥ राहूस [illegible] चंद्राचा महिमा । परी राहूकरितां लपाला चंद्रमा । अनुपमासि स्थूळ उपमा । येथें ये रीती. ॥ ५५८ ॥ राहूवेगळा चंद्र जैसा । राहुयुक्तही प्रकाश [illegible] त्याचा तैसा । परतु दृष्टीं दिसे ऐसा । की राहूनेच झांकिला चंद्रप्रकाश. ॥ ५५९ ॥ तैसा



१. अहकारेंचि दश—असा पाठ आढळतो.

चित्प्रकाश । यथापूर्व असेची सावकाश । परी बुद्धीस दिसे गुप्त प्रकाश । अहंप्रत्ययेंकरूनी. ॥ ५६० ॥ येथें वाच्यांशनिरास । गुरु बोधी शिष्यास । लक्ष्यांशीं शाखाचंद्रन्यायें तयास । साक्षात्कारस्वरूपाचा. ॥ ५६१ ॥ क्षेत्र तरु, शाखा रजतम, । देहात्मत्व इंद्रियात्मत्वभ्रम । त्यांत पाहता तत्त्व उत्तम । प्रत्यया नये. ॥ ५६२ ॥ शाखा सात्त्विका अहंप्रत्ययाची । जे बहुतांच्या मतें आत्मता साची । तिच्याही निषेधें निःशब्द आत्मयाची । सत्य चित्प्रभा दिसे बुद्धीतें. ॥ ५६३ ॥ तें अशब्द, अस्पर्श, अरूप, । अरस, अगंध, चित्स्वरूप । आणि ज्यावीण शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, रूप, । न कळती कांहीं. ॥ ५६४ ॥ ऐसा अनहंकार । यास ज्ञान म्हणे जगदाधार । याचा अन्यथा प्रकार । अज्ञान म्हणे तयातें. ॥ ५६५ मी देह ऐसी प्रतीती । हे देहात्मता तामसग्रथीं कुमती । इंद्रियें आत्मत्वें स्फुरती । मी पाहतों, ऐकतों, इत्यादि राजसाहंकार. ॥ ५६६ ॥ या दोहीं अहंकारावेगळा । मी म्हणूनी मानी निराळा । हे अविद्येची अतर्क्य कळा । कीं शुद्ध आत्मा तो हाची वाटे ऐसें. ॥ ५६७ ॥ वाटे आत्माच हा इतका । हा अविद्येचा थोर धका । इतकियानें अनेका । ज्ञानगर्व दिधला अविद्येनें. ॥ ५६८ ॥ हाची आत्मा मानिती तार्किक । हाची शुद्ध आत्मा म्हणती मीमांसक । हेची चित्स्फूर्ति मानिती चार्वाक । जे पंचभूतयोगे उत्पन्न म्हणती. ॥ ५६९ ॥ नवल त्याचें न वाटे । कीं ते चालतीच अविद्येचेची वाटे । विस्मय मनीं हा थोर वाटे । कीं अद्वैतवेत्तेही कोणी म्हणती हा आत्मा. ॥ ५७० ॥ चित्प्रत्यय मीपणीं । तो नसे काय तूपणीं ? । मी आणि तू म्हणतां अंतःकरणीं । चित्स्फूर्ति सारखीच स्फुरतसे. ॥ ५७१ ॥ कामधेनूचे स्तनी । रुधिर सेविती दुग्ध मानूनी । या गोष्टीस दूषणें किती म्हणोनी । बोलावीं ग्रंथ वाढतसे ॥ ५७२ ॥ द्वितीयाध्यायापासूनी । हें अहंस्फुरण शुद्धात्मा नव्हे म्हणोनी । स्थळस्थळीं निषेधिले भीड टाकुनी । यथार्थदीपिकेंत. ॥ ५७३ ॥ भीड हे कीं हाची अपरोक्षसाक्षात्कार । म्हणूनी बहुतीं केला निर्धार । तऱ्ही आत्मा चित्स्वरूप म्हणोनी दृढ संस्कार । जोडिला तिहीं. ॥ ५७४ ॥ तो संस्कार उत्तम । म्हणोनी तेही वाटती परम । ते या गोष्टीनें झणी पावोनी भ्रम । थिंता[1] अद्वैतविचार सोडिती. ॥ ५७५ ॥ त्यांची झणी उडे श्रद्धा । झणी ज्ञानमार्गी उपजे अश्रद्धा । ते भलेच, परंतु ज्ञानवृद्धा । गुरूची कृपा न पावले. ॥ ५७६ ॥ ज्यांची ज्ञानीं प्रवृत्ति दिसे । भीड कैसी त्यांची नसे ? । परी यथार्थदीपिका हे सम-

१. तोकडा, कोता.

रसे। यथार्थतत्त्वप्रकाशींच. ॥ ५७७ ॥ एवंच जे श्रद्धायुक्त । आणि प्रपंचीं विरक्त। ते स्थूलदृष्टी जरी आत्मत्वीं अनुरक्त। तरी थोर भलेची ते म्हणावे, ॥ ५७८ ॥ ते ही टीका पाहतील। तेव्हां जिज्ञासा पुन्हा धरतील। यत्न अत्यत करतील। अहप्रत्ययरहित शुद्धात्मा कळायाचा. ॥ ५७९ ॥ जे दांभिक ज्ञानाभिमानी। प्रतिष्ठार्थ म्हणविती ज्ञानी। शूलरूप त्यांच्या कानीं। होतील हे शब्द. ॥ ५८० ॥ तरी त्यांकारणे ही टीका। प्रगट होत नाहीं **यथार्थदीपिका**। **वे**दांस **बौ**द्ध तितका। न म्हणे काय अप्रमाण? ॥ ५८१ ॥ असो तें बोलणें प्रस्तुत। अनहकार भाव ऐसा अत्यत। त्यास ज्ञान म्हणे **भ**गवत। आणि म्हणे अज्ञान याहूनी अन्यथा. ॥ ५८२ ॥ जोंवरी **अह**प्रत्यय। तोंवरी **आ**त्मा **अ**हमय। तोंवरी अज्ञान की आत्मा अद्वय। तो नव्हे सिद्ध सर्वथा. ॥५८३॥ सांगावया **अ**हप्रत्यय। का पाहिजे शाखाचंद्रन्याय ? । एवच उपदेश नव्हे हा अन्याय। अज्ञान हे यालागीं. ॥ ५८४ ॥ आतां लक्षण बारावें। तें सर्वदा हृदयी स्मरावें। त्या स्मरणें करूनी भरावे। मोक्षमार्गी. ॥ ५८५ ॥ तें बारावे लक्षण। अनादि भवभावाचें मोक्षण। बोलतसे **क**मलेक्षण। या श्लोकीं सकळ उत्तरार्धें. ॥ ५८६ ॥

उत्तरार्ध—**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥**

जन्म आणि मरण। जरा म्हणिजे म्हातारपण। व्याधि रोग नानालक्षण। दुःखरूपची सर्व हें. ॥ ५८७ ॥ आणि दुःखांत दोषप्रकार। यांचे अनुदर्शन वारंवार। हें ज्ञान म्हणे **ज**गदाधार। यास अन्यथा **अ**ज्ञान तें. ॥ ५८८ ॥ कीं हें दुःखदोषानुदर्शन। करी अनुतप्त आणि विवेकसंपन्न। तेव्हां विवेकें करूनि **भ**गवद्भजन। ज्ञानें सुटे या दुःखापासुनी. ॥ ५८९ ॥ जन्म नव मास। मातेच्या उदरीं गर्भवास। रेतोद्वारा प्रवेश जीवास। रजस्वले उदरीं मळमूत्रीं. ॥ ५९० ॥ तेथें मातेचा जठरानळ। जों जो पेटे प्रबळ। तों तो शुक्रशोणिताचा पिड अमगळ। दृढ होय. ॥ ५९१ ॥ रस उसाचा लोहाचे कैढे[1]। जों जों अग्निज्वाळा करितां कढे। तों तो दृढत्व त्यास चढे। पातळपण मोडे रसाचें. ॥ ५९२ ॥ ऐसा गर्भाचिये खोळे[2]। जों जों जठराग्नि मातेचा प्रबळे। तों तों कठिण डोहळे। मातेस होती. ॥५९३॥ त्या कट्वाम्लतिक्ते पोळे। तो मांसपिड गर्भखोळे। निघती कर्ण, नासिक, डोळे। उकडे दाँथरांत[3] मळमूत्राच्या. ॥ ५९४ ॥ कुंभीपाक[4] वर्षकोटी। तैसें निमिष वाटे मातेचिया पोटीं। कुंभीपाकीं उकडिती घटीं। मोठ्या आणि

१. कढईंत, काहलीत २. पिशवीत, झोळीत. ३. उबाऱ्यात, उकाड्यात ४. नरक.

दृढ देह यातनेयोग्य. ॥ ५९५ ॥ गर्भी देहीं नसतां त्वचा । पोळे, उकडे पिंड मांसाचा । उदरविस्तार अंगनेचा । बहु तों वीतभरी. ॥ ५९६ ॥ त्यांत गर्भचर्माचे वेष्टन । नाळबद्ध अधोवदन । होऊनी मळमूत्राचे सदन । दुःखकोटी भोगवी. ॥ ५९७ ॥ नरककोटीहुनी कोटिगुण । दारुण गर्भवास एक क्षण । स्वर्गादि लोक भोगूनीही निपुण । हे गर्भवासनरक पावेच तो. ॥ ५९८ ॥ मास नव ऐसे क्रमती । तों प्रसूतिवायूचे चपेटे उठती । कांहीं व्यग पडतां काढिती । कापून शस्त्रे खडखडा. ॥ ५९९ ॥ जरी प्रसूति होय बरी । बाहेर येतां शरीरीं । जे क्लेश पावे त्यांवरी । ओवाळिले क्लेश नरकाचे. ॥ ६०० ॥ स्थूळ कनकाची तार । सूक्ष्मरध्रांतूनी ओढी सोनार । वेणा येतां वारवार । निघे बाहेर ऐसिया कष्टे शिरमात्र. ॥ ६०१ ॥ तों पूर्वील निघणियाहूनी कठिण । पुढें शिराहूनी शरीर घन । ऐशा कष्टे जन । जन्म पावती. ॥ ६०२ ॥ परी हें दूरदृष्टी कोणी न पाहे । जो तो मायामृगजळीं पोहे । पुण्ये अगण्य केलीं, तरी राहे । नव मास गर्भी मातेच्या. ॥ ६०३ ॥ एक आत्मसाक्षात्कार । त्या ज्ञानावांचूनी जन्माचा परिहार । सर्वथा नव्हे, परतु दुःखे ऐसीं अपार । न स्मरे, तों मुमुक्षा उपजेना. ॥ ६०४ ॥ दुःखरूप ऐसें जनन । पुनःपुन्हा पावे जन । म्हणोनी घाबरें होय मन । तरीच उपजे मुमुक्षा. ॥ ६०५ ॥ त्या मुमुक्षेंकरूनी । शरण गुरुवर्यास जाऊनी । ज्ञान संपादुनियां दुःखापासूनी । मोक्ष पावे. ॥ ६०६ ॥ यालागीं ऐसें दुःखदर्शन । तें ज्ञान म्हणे जगज्जीवन । आणि दोषानुदर्शनही म्हणोनी म्हणे मधुसूदन । कीं हें दुःखची दोष दुःख भोगणाराचा. ॥ ६०७ ॥ अर्थ ऐसा होतो । परंतु यासही दोष लागतो । मग परिहारितां दोष तो । अर्थ पावतो सिद्धीतें. ॥ ६०८ ॥ गर्भवासादि दुःखभोग । याचा न इच्छितांही होतो योग । त्या दुःखें केवी संयोग । दोषाचा म्हणावा? ॥ ६०९ ॥ न इच्छितां बळवत मारी । जो मारून घे, तो काय दोषकारी? । हीं जन्मादि दुःखें सारी । भोगितां दोष कवणयासी लागे? ॥ ६१० ॥ या गोष्टीनें दोष उडता तरी । कीं या दुःखास परिहारमार्ग नसता जरी । नाव असतां, बुडे नीरीं । तो आत्महत्यारा कैसा न ह्मणावा? ॥ ६११ ॥ ज्ञानें चुके गर्भवास । पुन्हा जन्म नाहीं ज्ञानियास । तो उपाय न करी तयास । दोष आत्महत्येचा कैसा लागेना? ॥ ६१२ ॥ यालागीं या दुःखाचें दर्शन । आणि या दोषाचे अवलोकन । करिती ते सज्जन । ज्ञान संपादिती. ॥ ६१३ ॥ यालागीं हें दर्शन

ज्ञान । म्हणोनी म्हणे ज्ञानघन । आणि यास[1] अन्यथा तें अज्ञान, अदर्शन । या दुःखाचें आणि दोषाचें. ॥ ६१४ ॥ पूर्वे दुःखाचे नसे स्मरण । न दिसे दृष्टीपुढील मरण । नव्हे अनुतप्त ज्याचे अतःकरण । त्यास दर्शन कैचे या दोषाचे[2] ॥ ६१५ ॥ आपले आत्महत्यारेपण । जो देखेल विवेकनिपुण । तोची आपणातें आपण । सोडवील दुःखापासूनी. ॥ ६१६ ॥ त्यालाच होय आत्मज्ञान । ज्यास दुःखदोषानुदर्शन । अन्यथा तें अज्ञान । जे विवेकदृष्टीं न पाहणें ऐसें. ॥ ६१७ ॥ आतां एक जन्मकाळींच दुःख । वरकड जगीं[3]असके सुख । तरी न पाहतां या विवेकाचें मुख । दोष बहुतसा न लागता. ॥ ६१८ ॥ तरी ऐसा हाच एक अनर्थ नाही । नसेच दुःखावांचूनीं कांहीं । प्रथम जन्म, शेवटीं देहीं । मृत्यु अत्यत दारुण. ॥ ६१९ ॥ दुःखकोटि देह धरितां । तैशाच दुःखकोटि तो सोडितां । प्राण देहाबाहेर जाता । अत्यत कष्ट. ॥ ६२० ॥ प्राण आजन्म देही आहे । तो जेव्हा निघो पाहे । त्या दुःखास उपमा साहे । त्याच दुःखाची. ॥ ६२१ ॥ सहस्र वृश्चिकांची व्यथा । तेथें इतर काय कथा[2] । शिरा नाडीमधूनी बाह्य पंथा । प्राण निघती. ॥ ६२२ ॥ वातप्रकोप होतां कांही । उठती कोटि तिडका देहीं । प्राण-प्रयाणाच्या प्रवाहीं । दुःख सर्व शरीरीं एकसरां. ॥ ६२३ ॥ कठीं कफपित्त दाटे । बोलणें वाचेचे खुंटे । स्थळस्थळीं शरीर फुटे । प्राण निघतां बाहेरी. ॥ ६२४ ॥ ऐसा प्रथम गर्भवास । मग अतीं मृत्यु ऐसा प्राणियास । हे आदिअतींच आयास । सुख असेल मध्यकाळीं. ॥ ६२५ ॥ तरी त्या सुखा-निमित्त । ही दुःखे अगीकारील चित्त । तो आयुष्याचा मध्यभागही अत्यत । दुःखची अवघा. ॥ ६२६ ॥ जरा म्हातारपण । सकळ शक्ति होती क्षीण । जाती नेत्र, जाती श्रवण, । वाणी काय मग दुःखासी[2] ॥ ६२७ ॥ दतवि-हीन वदन । नाकास हनवटीसंघट्टन । मौज[3] वांकला जन । हांसती चालतां. ॥ ६२८ ॥ कांपती उठता चरण । मळमूत्रे भरे आस्तरण[4] । स्त्रीपुत्र दास-दासी तयां शरण । जी स्वशासनें[5] वर्तविलीं. ॥ ६२९ ॥ इत्यादि दुःखाच्या कोटी । एके जरेच्यिा पोटीं । आतां तारुण्यसुखासाठी । अंगीकारावी हीं दुःखे. ॥ ६३० ॥ तरी तोही तारुण्यकाळ । सुखाचाची निश्चित करतां सु-काळ । तरी तितकियासाठीं फटकाळ[6] । संसार अवघा न होता. ॥ ६३१ ॥

---

१. 'प्राणियासा' असा पाठभेद. २. सर्व, सगळे. ३. कबर. ४. अथरूण. ५. आपल्या हुकमाने. ६ वाईट.

तरी उपजलिया दिवसापासूनी । वेष्टिला नानाव्याधींकरूनी । मरण बरे याहुनी । म्हणोनी रडती दुखतां पोटमात्र. ॥ ६३२ ॥ कफपित्तवाताचा वेंळला । देहची हा नाना रोगांचा पुतळा । एव संसार दुःखाचाच सगळा । तथापि कोणी ऐसें न पाहती. ॥ ६३३ ॥ अविद्येचा मोह ऐसा । विवेक उपजों नेदी मानसा । एवंच हा अज्ञानाचा ठसा । की अदर्शन दुःखाचें आणि आत्महत्या दोषाचे. ॥ ६३४ ॥ यालागीं हे दुःखदोषानुदर्शन । भगवत म्हणे की ज्ञान । आणि अज्ञान म्हणे याचे अदर्शन । **'अज्ञानं यदतोन्यथा'** म्हणोनी. ॥ ६३५ ॥ ऐसीं लक्षणें बारा । सांगीतलीं पांडुकुमरा । ज्या ज्ञान-लक्षणीं येरझारा । संसाराच्या चुकती. ॥ ६३६ ॥ आतां या श्रवणें मन । करू लागे दुःखदोपानुदर्शन । मग वैराग्य उपजतां, स्त्री, पुत्र, धन, सदन, । सोडूनी वनातेंची जावे. ॥ ६३७ ॥ ऐसें असोनी मागुती । जनकादि कैसे गृहीं वर्तती ? । ऐशी शका येथें चित्ती । अर्जुनादिकांच्या उपजेल. ॥ ६३८ ॥ म्हणोनी ज्यास दुःखदोषानुदर्शन । असोनीही प्रारब्धें सुटेना सदन । त्या पुरुषींही ऐसे असावें म्हणूनी करुणाघन । बोलतसे हा श्लोक ॥ ६३९ ॥

**असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

पुत्र, स्त्रिया, सदन, । यांच्या ठायीं गुतले नसे मन । वसे त्यांत जैसे वाटसरू जन । रात्र एक परसदनीं कठिती. ॥ ६४० ॥ पुत्रदारागृहादी । आदिशब्दें ममतास्पदें अनादी । त्यांत असोनीही कधीं । लपट नसणें, ज्ञान हें. ॥ ६४१ ॥ स्वप्नींचे पुत्र, स्वप्नींच्या स्त्रिया, । स्वप्नींचे गृह, स्वप्नींची क्रिया, । जागृतींत आठवी तया । दिसतीच स्वप्नदृष्टी हीं तैसी. ॥ ६४२ ॥ स्वप्नीं दिसत होती जैसीं । जागरीं स्मरतां दिसतीच तैसीं । पुत्रदारादि साचीं कैसीं । वाटती ज्ञानिया प्रबुद्धातें ? ॥ ६४३ ॥ स्वप्नदृष्टी हेंची आपुलें मन । स्वप्न गेलें, परतु तें मन असे जतन । करितां स्वप्नाचे चिंतन । स्त्री, पुत्र, गृह, धन, धान्य, वाहनें, दिसती. ॥ ६४४ ॥ स्वप्नदृष्टीं सर्व दिसती । जागृती दृष्टीस कांहींच नसती । प्रारब्धें कुटुंबांत वसती । ज्ञानी ऐसे. ॥ ६४५ ॥ जागृतीचें स्वशरीर । दिसे, त्या नांव जागर । अन्यथा स्वप्नांतही नर । जागा चहूंकडे धांवतसे. ॥ ६४६ ॥ तैसा तुर्येत आत्मानुभव । तेंची मुख्य जागृतीचें वैभव । तथापि प्रपच अविद्यासंभव । प्रारब्धयोगे दिसतसे.

---

१. वळलेला, रचलेला, बनविलेला.

॥ ६४७ ॥ स्वप्न दिसे स्वप्नदृष्टी । प्रपचदृष्टीं दिसे प्रपंचसृष्टी । जेव्हा जाली गुरुकृपावृष्टी । तेव्हां नाहीच जड जग. ॥ ६४८ ॥ तरी ज्ञानियास जोंवरी । प्रारब्धाचा देह, तोंवरी । प्रपचदृष्टि, प्रपचसृष्टि सारी । शरीरयोगे दिसतसे. ॥ ६४९ ॥ प्राप्त होतां जागृती । स्वप्नगृहपुत्रधनयुवती । स्मरतां यथापूर्व स्वप्नदृष्टी दिसती । परी लपट जागृत होईना. ॥ ६५० ॥ तैसा **आत्मनिष्ठ** ज्ञानी । प्रारब्धे पुत्रदारागृहादिकी असोनी । लपट नव्हे, तें ज्ञान म्हणोनी । या भावें म्हणे **भ**गवत. ॥ ६५१ ॥ प्रारब्धबळ हे आगळे । की चित्त जालें जरी प्रपचावेगळे । तरी भोगवी प्रारब्ध फळे । तथापि **आत्मज्ञ** मोहेना ये रीती. ॥ ६५२ ॥ म्हणोनी म्हणावें हें ज्ञान । आणि तदन्यथा अज्ञान । कीं **आ**त्मा कळोनीही **मा**याभान । सत्य वाटे अविद्यासंस्कारे. ॥ ६५३ ॥ ज्यास अभ्यासवैराग्याचे बळ. । तो अलिप्त पुत्रदारादिकीं कुशळ । अभ्यासवैराग्यावाचूनी दुर्बळ । **आ**त्मज्ञ होऊनीही गुतले गृहदारीं. ॥ ६५४ ॥ ते पुत्रदारादिदुःखे दुःखी । त्यांच्या सुखें होती सुखी । वायां गेली स्वरूपाची ओळखी । पुत्रदारादिकीं होती लपट. ॥ ६५५ ॥ म्हणूनी **असक्ति** आणि **अनभिष्वंग** । दोन्ही ज्ञान म्हणतो **श्री**रग । कीं सुखी नव्हे आणि दुःखीही नव्हे अतरग । पुत्रदारादिसुखदुःखे. ॥ ६५६ ॥ प्रस्तुतीं तेरावें लक्षण । ऐसें बोलिला **क**मलेक्षण । आतां भवपाशविमोक्षण । चौदावें बोलतो उत्तरार्धे. ॥ ६५७ ॥

उत्तरार्ध श्लोक—**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु** ॥

आतां कधीं घडोनी ये इष्ट । कधीं घडे अनिष्ट । परी या दोहीं गोष्टींत नित्य संतुष्ट । समचित्त असे. ॥ ६५८ ॥ ऐसें **समचित्तपण** । तें ज्ञान म्हणे सर्वज्ञ निपुण । की जों नसे स्वरूपाचे विस्मरण । इष्ट अनिष्ट कैचें तोंवरी? ॥ ६५९ ॥ आपण **आ**त्मा निर्विकार । त्या आपणास नसती इष्टानिष्ट विकार । जोंवरी ऐसा निर्धार । इष्ट अनिष्ट कैचें तोंवरी? ॥ ६६० ॥ आतां चित्तास अनुभव । तें जाणे इष्टानिष्ट उद्भव । तथापि तें अनुभवी **आ**त्मवैभव । म्हणोनी सम इष्ट अनिष्ट त्या चित्तातें. ॥ ६६१ ॥ **आ**त्मा वाटता देह । तरी त्याचाच असता स्नेह । अनिष्ट निःसंदेह । देहास दोन्ही. ॥ ६६२ ॥ त्या शरीराच्या योगें । **क्षे**त्रज्ञ सुखी दुःखी भोगे । म्हणोनी इष्टानिष्टसंयोगे । सम नसावें चित्तें जरी; ॥ ६६३ ॥ तरी प्रारब्धाचा क्षय । भोगेची होतो हा निर्णय । प्रारब्ध सरता पद अद्वय । तरी कां चित्ते सम नसावें? ॥ ६६४ ॥ साम्राज्यपदवी हस्तगत । परी खोळंबा पडला ऋणा-

निमित्त । ऋण फिटतां पदप्राप्ति निश्चित । प्रारब्ध सरतां कैवल्य तैसें. ॥ ६६५ ॥ सुखे काही फिटे ऋण । दुःखे कांही होय अनृण । परी साम्राज्यलाभ लक्षूनी निपुण । समची दोहींपरी ऋण फिटतां. ॥ ६६६ ॥ ऐसें सविवेक चित्त । तें इष्टानिष्ट सम पाहे निश्चित । म्हणोनी म्हणे **भ**गवत । कीं ज्ञानची **समचित्तत्त्व** ये रीती. ॥ ६६७ ॥ समचित्तत्त्व ऐसें ज्ञान । यास अन्यथा तें अज्ञान । तें स्पष्ट त्याचे व्याख्यान । करणेंची नलगे. ॥ ६६८ ॥ ऐसीं चौदा लक्षणें ज्ञानाची । तद्विपरीत अज्ञानाचीं । बोलोनी आतां वाणी **ज**गज्जीवनाची । परम गुह्यलक्षण पधरावे बोलते. ॥ ६६९ ॥ ज्या लक्षणें ज्ञान होय प्रबळ । तें ज्ञान म्हणतो **मे**घनीळ । त्याच्या विपरीत लक्षणें अधिक बळ । अज्ञानातें, म्हणोनी तें अज्ञान म्हणतसे. ॥ ६७० ॥ चौदा लक्षणें ये रीती । येथवरी बोलिला **श्री**पती । आतां ज्ञानयोगे भक्तिस्थिती । पधराविया लक्षणी बोलतो. ॥ ६७१ ॥ पूर्वाध्यायांत **भ**गवदुक्त । थोर ज्ञानी सगुणभक्त । जे उपासिती नुसतें अव्यक्त । क्लेशी होती अधिक ते; ॥ ६७२ ॥ क्लेशाधिक्यप्रकार । हाची की सबळ होती अज्ञानसंस्कार । चित्तीं उपजती विकार । निर्विकारीं योजितां. ॥ ६७३ ॥ भक्तियोगे सुगम । होतोची तो परम । त्यावांचूनी अतिदुर्गम । आत्मयोगसिद्धि अव्यक्तोपासकां. ॥ ६७४ ॥ यालागीं **आ**त्मज्ञानेंकरूनी । सगुणभक्तीतें ज्ञान म्हणोनी । बोलेल तद्विपरीत त्यावरूनी । अभक्ति ऐसें सुचवील. ॥ ६७५ ॥ द्वादशीं बोलिलें धर्मामृत । तें विशद या त्रयोदशी बोले **भ**गवत । म्हणोनी सगुणामृत अत्यत । तें पधरावें लक्षण बोलतसे. ॥ ६७६ ॥

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

मी जो सगुण **स**र्वेश्वर । त्या माझ्या ठायीं सादर । **भक्ति अव्यभिचारिणी** जीस व्यभिचार । इतर भक्तीचा असेना. ॥ ६७७ ॥ भक्ति माझी **अं**तःकरणीं । आणि लोळे इतर देवतांचेही चरणीं । ते भक्ति म्हणावी व्यभिचारिणी । जैसी जारिणी कुलवधू. ॥ ६७८ ॥ आवडीनें सेवी पती । आणि पुरुषांतराचीही प्रीती । व्यभिचारिणी तीस म्हणती । अव्यभिचारिणी पतिव्रता. ॥६७९॥ पुरुष नाना दिसती । परी पतीच पुरुषत्वें पाहे सती । विषय कामिनीचा पुरुषाकृती । ते विषयदृष्टि न पाहे परपुरुषा. ॥ ६८० ॥ देखे पुरुष नाना । परी पुरुष नाठवी पतीविना । तैसा मीच दैवत वाटे भक्तजना । मीच कारण अनादि सर्वांचा म्हणोनी. ॥ ६८१ ॥ मीच सगुण, मीच निर्गुण, । सर्वही

मीच सर्वगुण, । तथापि मी कारण म्हणूनी निपुण । जाणे खूण माझिया सर्वेश्वरत्वाची. ॥ ६८२ ॥ की नानाअलकारजाती । नांवें सुवर्णाच्या विकृती । कुडले इच्छिती ते न पावती । कुडलावेगळे इतर अलकार. ॥ ६८३ ॥ तैसा मी जगत्कारण सर्वेश्वर । मज सेविता सेविले सचराचर । देवता भजतां इतर । मजची सेविले, परी न सेविले सर्वातें. ॥ ६८४ ॥ मी स्वयें अनादी । सकळ जगास मीच आदी । ऋषि आणि देव ब्रह्मादी । मजपासूनी उद्भव या सर्वांचा. ॥ ६८५ ॥ यालागीं जो सर्वांचे कारण । तोची सर्वांसी पूज्य नारायण । सर्वही तोची, परी निपुण । भक्ति करिती एकाच त्याची. ॥६८६॥ जे भक्ति माझी ये रीती । ते अव्यभिचारिणी भक्ति म्हणतो श्रीपती । परतु कोणी भिन्न मानूनी भजती । कोणी त्यजिती सगुणभक्ति, अद्वैत कळतां. ॥ ६८७ ॥ त्यांत जे भेद मानिती । भक्ति त्याची निंदी श्रुती । तें भजन वेद बोलती । पशुतुल्य. ॥ ६८८ ॥ आणि अद्वैत कळल्यावरी । जे न सेविती सगुण श्रीहरी । ते क्लेशी होती नानापरी । हे द्वादशी बोलिले. ॥ ६८९ ॥ म्हणूनी भेदभक्तीतें निपेधी । आणि अद्वैतसाक्षात्कारसंपन्न ते भक्ति बोधी । ऐसे सिद्धांत या भक्तिलक्षणीं साधी । **'अनन्ययोगेन'** म्हणूनी बोलतां. ॥ ६९० ॥ **'मयि चानन्ययोगेन । भक्तिरव्यभिचारिणी'** म्हणे मधुसूदन । या शब्दीं निर्गुणवादाभिमान । छेदूनी टाकी. ॥ ६९१ ॥ ज्या योगीं अनन्य दिसे । त्यास अनन्ययोग म्हणतसे । येथें कोणी म्हणती ऐसें । कीं अन्य दैवत नाहीं ज्या भजनीं, तो अनन्ययोग. ॥ ६९२ ॥ इतरदेवताभक्तीचें अनन्यपण । निषेधी, भक्तीचें अव्यभिचारित्वलक्षण । अनन्ययोगें म्हणे कमलेक्षण । अद्वैतसाक्षात्कारयोगे. ॥ ६९३ ॥ द्वादशी बोलिला चक्रपाणी । की **'ये[1] तु सर्वाणि कर्माणि । मयि संन्यस्य मत्परा'** म्हणे आणि । **'अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते.'** ॥ ६९४ ॥ तेथें अनन्ययोगाचा अर्थ । अन्यदेवतानिषेध म्हणती स्वमतसिद्ध्यर्थ । कीं त्यांच्या मतें ज्ञानी कृतार्थ । सगुणभक्ति न लगे तयातें. ॥ ६९५ ॥ तोची अर्थ अनन्य योगाचा । येथेंही बोलेल त्यांची वाचा । म्हणूनी अव्यभिचारिणी म्हणतां त्या अन्वयाचा । अर्थ दावूनी, मागुती म्हणे की **'मयि चानन्ययोगेन.'** ॥ ६९६ ॥ **चित्तचैतन्ययोग** । तो मुख्यत्वें म्हणावा **योग** । ज्या योगीं वियोग । अन्यपणाचा. ॥ ६९७ ॥ या अनन्ययोगेकरूनी । माझ्या ठायीं

१ अ० १२, श्लो० ६.

भक्ति अव्यभिचारिणी म्हणोनी । निर्गुणाभिमानियाचें टाकिलें खडूनी । वाचा-चापल्य सर्व येथें. ॥ ६९८ ॥ एवच जो सप्तमी, नवमीं, द्वादशीं, । अर्थ वाखाणावा तो येथें त्रयोदशीं । सुचवुनी सूत्रप्राय उपदेशी । **'मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी'** या अर्धे. ॥ ६९९ ॥ टाकूनी देवतांतर । आत्मसाक्षात्कारें **सर्वेश्वर** । सेवावा म्हणूनी जेथें **जगदीश्वर** । अभक्तां निरवकाश करूनी बोलिला. ॥ ७०० ॥ आतां अनन्ययोग निराकारीं । घडेल, तो केवी घडे साकारीं ? । म्हणूनी ज्ञणी येथें यापरी । संशय पडे. ॥ ७०१ ॥ न पडावा ऐसा संदेह । कीं **चै**तन्य केंवी होय **भ**गवद्देह[१] । धरावा स्वात्मभावें स्नेह । जडत्व न भावितां, हें सुचवी. ॥ ७०२ ॥ **'मयि चानन्ययोगेन'** म्हणोनी । म्हणे कीं मज सगुणाच्या ठायींही भक्ति अद्वैतयोगेंकरूनी । घडे, अलकारींही सुवर्णची लक्षुनी । पाहतां अनन्य सोनेंची जैसें दिसे. ॥ ७०३ ॥ कीं मी साकार जालो तरी काय ? । जो निराकार **चि**न्मात्र तोची विश्वकाय । म्हणूनी **'च'**कारे सुचवी न्याय । ज्या न्यायें सगुण निर्गुण एकत्व साधे. ॥ ७०४ ॥ तरंगास पाहतां कांहीं । अन्यत्व सागरासी नाहीं । अनन्ययोग लहरियांच्या ठायींही । पाहोंच ये समुद्राच्या. ॥ ७०५ ॥ अलकारास पाहतां कांहीं । अन्यत्व कनकासी नाहीं । अनन्ययोग भूषणांच्या ठायींही । पाहोंची ये सुवर्णाच्या. ॥ ७०६ ॥ इत्यादि दृष्टांत दावूनी कोटी । एकाक्षरा **'च'**शब्दाच्या पोटीं । म्हणे अगा ! **कि**रीटी ! । माझ्याही ठायीं अनन्ययोगें भक्ति घडे. ॥ ७०७ ॥ तंतु पाहावा पटीं । कीं माती पाहावी घटीं । ऐसें चराचरीं आणि गोमटी । मूर्ति माझी तीमध्येंही पहावें एकत्व. ॥ ७०८ ॥ आतां मीच जेव्हां चराचर । तेव्हां मीच देवतान्तर । म्हणूनी दैवत ज्ञणी सेविती इतर । यालागीं म्हणे अव्यभिचारिणी ते भक्ती. ॥ ७०९ ॥ मीच स्वयें चराचर । परी त्या शृखला, मी शस्त्र शृखला तोडणार, । शृंखलाबंधक आणि शस्त्र छेदणार । लोखंडची जरी दोनीही. ॥ ७१० ॥ शृखलाबध तोडावया । शृखलाची ती कामा नये **ध**नंजया ! । यालागीं बधापासूनी सुटणें जया । शस्त्र बेडी तोडी, तें जोडावें. ॥ ७११ ॥ या भावेंकरूनी । म्हणे भक्ति अव्यभिचारिणी म्हणोनी । भेदभक्ति आणि भक्तित्याग ज्ञानियांचा निषेधुनी । अनन्ययोगे ते भक्ति बोलतसे. ॥ ७१२ ॥ आणि सगुणीं निर्गुण पाहावें । **'मयि च'** म्हणोनी हा **'च'**कार या भावें । आणि यास अन्यथा तितकें म्हणावें । अज्ञान म्हणोनी. ॥ ७१३ ॥ जोंवरी भक्ती सव्यभिचार ।

---

१. विश्वमूर्ति.

तों संतुष्ट नव्हे सर्वेश्वर । त्याच्या प्रसादावीण नव्हे परिहार । अनादि अज्ञानबधाचा. ॥ ७१४ ॥ अज्ञान ज्याणे न नासे । तें भजनही अज्ञान असे । यालागीं अज्ञानची दिसे । व्यभिचारिणी भगवद्भक्तीही. ॥ ७१५ ॥ परतु ते व्यभिचारिणी । जे क्षणीं होय अव्यभिचारिणी । ते क्षणीं भवभयनिवारिणी । कृपावृष्टि करुणाघनाची होणार. ॥ ७१६ ॥ म्हणोनी अन्यदेवताभजन । करीत असोनीही जे जन । रामकृष्णनृसिंहदेवतादि भवभजन । सेविती ते उत्तमत्त्वेंची मानावे. ॥ ७१७ ॥ की घर पुसत कैवल्य आले । परी कवाड भक्तीच्या व्यभिचाराचे अडकलें । तें निघतां, असे बैसलें । द्वारीं कैवल्य तिष्ठत. ॥ ७१८ ॥ जे भगवद्भक्तीस सर्वथा विमुख । ते न देखती ज्ञानाचें मुख । शब्दज्ञानी होती, तरी सुख । दुर्लभ तयां समाधीचें. ॥ ७१९ ॥ त्यांची इतर भक्ती तें अज्ञान । हें करणेंची नलगे व्याख्यान । अव्यभिचारिणी भगवद्भक्ति जेव्हा ज्ञान । तेव्हा भगवद्भक्तीही व्यभिचारिणी तदन्यथा. ॥ ७२० ॥ व्यभिचारिणी भक्ति मोक्षप्रदाची । तीही अज्ञान, तेव्हां काम्यप्रदा इतरांची । भक्ति अज्ञान म्हणे, याची । अपूर्वता काय ? ॥ ७२१ ॥ अव्यभिचारिणी या हरीचीही भक्ती । भेदे नेदी कधीं मुक्ती । ऐसेंही सुचवी येथें भगवदुक्ती । म्हणतां 'अनन्ययोगेन' ॥ ७२२ ॥ जे भक्ति अनन्ययोगेंकरूनी । ते बोलिली ज्ञान म्हणोनी । तेव्हां अज्ञान अन्यथा तीहुनी । जे भक्ति अन्ययोगे. ॥ ७२३ ॥ जिज्ञासु नेणे अनन्ययोगातें । परी जाणों इच्छितों अद्वैतातें । इतरही जे न निदिती वेदांतातें । ते ईश्वरकृपेनें कधीं तरी जाणती. ॥ ७२४ ॥ जे केवळ भेदरत । द्वैतची खरे म्हणती निश्चित । त्यांचें भजन सुचवी भगवत । अज्ञान की अनन्ययोगास अन्यथा. ॥ ७२५ ॥ आणि अनन्ययोग असोनीही । अव्यभिचारिणी सगुणभक्ति नाहीं । त्यास अज्ञानसस्कार बहुत कांहीं । देती क्लेश. ॥ ७२६ ॥ म्हणोनी तेही अज्ञानांत पडे । की वृथा कष्टती बापुडे । अनायासें समाधिसुख सांपडे । ते भक्ति वर्जणें नव्हे काय अज्ञान ? ॥ ७२७ ॥ विना भगवद्भक्ती जे ज्ञान । तेंही म्हणावे अज्ञान । स्पष्ट जाले व्याख्यान । या गूढ भावाचें. ॥ ७२८ ॥ स्थळींस्थळीं भागवतीं । ऐसें की जे अच्युतभक्ति वर्जिती । त्यांचें ज्ञानही न शोभे ये रीती । त्यांत हा श्लोक एक. ॥ ७२९ ॥

श्रीभागवतश्लोक—

**नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ॥**
**कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥१॥**

प्रस्तुत उपयोगी अर्थ । तो स्पष्ट असता कां वाखाणावा व्यर्थ ? । हें **गी**तेंत सुचवी **स**मर्थ । की भक्तीवीण ज्ञानही अज्ञान लेखावें. ॥ ७३० ॥ ऐसें पध- रावें ज्ञानलक्षण । संसारभयविमोक्षण । बोलिला श्री**क**मलेक्षण । आता लक्षण सोळावें बोलतो उत्तरार्धे. ॥ ७३१ ॥

उत्तरार्ध—**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥**

**विविक्तदेश** एकांत स्थळ । तेथें राहणें निश्चळ । आणि जनसभेंत मन चचळ । होणार, अप्रीति तेथें बसायाची. ॥ ७३२ ॥ हीं दोन्हीं लक्षणे दिसती । परी सकामही एकांत सेविती । पुढें जनसभे बसावें ऐसी प्रीति । जनसभेची चित्तांत. ॥ ७३३ ॥ यालागीं बैसणें एकांतीं । आणि **जनसभेची अरति** म्हणजे अप्रीती । दोन्ही लक्षणें एकचीं ये रीती । येथें जाणावीं. ॥ ७३४ ॥ जनवार्ता करिती जन । काय तेथें घडेल भजन ? । म्हणोनी कांटाळे मन । एकांतवास तरी घडे. ॥ ७३५ ॥ आणि ते म्हणावी **जनसभा** । जे- थें विसरले **श्री**वल्लभा । ज्या सभेत तो सादर उभा । ते **ह**रिकीर्तनसभा जनसभा न म्हणवे. ॥ ७३६ ॥ जो असोनी **वै**कुंठीं नसे । वसोनी योगि- याच्या हृदयीं जो न वसे । तो स्वकीर्तनी वसे की तेथें गवसे । कामधेनूचे स्तनींच जेंवी दुग्ध. ॥ ७३७ ॥ ऐसा **ह**रिकथासमाज । ते जनसभा म्हणतां वाटे लाज । श्रवणरध्रे निघे हृदयीं महाराज । **दे**वाधिदेव **श्री**पति जे सभे. ॥ ७३८ ॥ श्र**वण** करितां **प**रिक्षिती । न पुरे योगिया भक्ता क्षिती । श्रीम- **द्भा**गवतार्थ लक्षिती । की सर्वभूतीं **वा**सुदेव. ॥ ७३९ ॥ **भी**ष्माचिया देहा- वसानीं । शरपंजराभोंवते योगी मुनी । ते जनसभा काय म्हणोनी । म्हणवेल ? ॥ ७४० ॥ इत्यादि भक्तांचिया सभा । जेथें गाती ऐकती **श्री**- वल्लभा । सुकृतकोटीसही दुर्लभा । सभा ऐशा भक्तांच्या. ॥ ७४१ ॥ सज्जन बैसले कोटिकोटी । आणि **ह**रीच मुखी, कानीं, पोटीं, । क्षण ते सभे बसावयासाठी । वन गिरिगुहा सोडोनी धांवले विरक्त. ॥ ७४२ ॥ वक्ता **सू**त जातिहीन । श्रोते **शौ**नकादि मुनि सज्जन । श्रोते **ब**दरीस तपोधन । वक्ता **ना**रायण **न**रसखा. ॥ ७४३ ॥ एवच जेथें अध्यात्म **भ**गवत्कथा । ते जन- सभा नव्हे सर्वथा । गाती ऐकती **ज**गन्नाथा । जे सभेमध्यें. ॥ ७४४ ॥ तेंच वर्जावी जनसभा । जेथें न वर्णीती **प**द्मनाभा । एकांतीं ध्यावे **श्री**वल्लभा । यदर्थ विविक्तदेशसेवित्व. ॥ ७४५ ॥ ऐसें स्थळ एकांत सेवणें । आन जन- सभा ऐसी न रुचणें । हें ज्ञान, यांच्या अन्यथापणे । जाणावे अज्ञान. ॥ ७४६ ॥ क्षण एकांतीं न बैसवे । जनसभे बैसतां न उठवे । जनवार्तेपुढें

केंवी आठवे । **कै**वल्यनाथ ? ॥ ७४७ ॥ सदा रुचे लोकवार्ता । त्यास कैंचा विश्वभर्ता ? । **का**ळरूपे जीवित्वहर्ता । तोची त्याचा. ॥ ७४८ ॥ सरलियाही संसारधदा । क्षण नाठवी **मु**कुदा । देखोनी ग्राम्यजनवृंदा । त्यांत कठी तो काळ. ॥ ७४९ ॥ जरी जनसभा न सांपडे । तरी निजे, उलथा पालथा पडे। समानशीळ मिळतां गडे । द्यूतकर्म सोंगटीं आरभीं. ॥ ७५० ॥ परी बैसोनी एकांतीं । न लावी मन **र**माकांतीं । ज्यावीण कोणी अती आकांतीं । कामा नये. ॥ ७५१ ॥ पुरे त्याचें व्याख्यान । प्रत्यक्ष मूर्तिमत अज्ञान । यालागींच या अर्धश्लोकीं ज्ञान । तदन्यथा अज्ञान ये रीती. ॥ ७५२ ॥ ज्ञानलक्षणें सोळा ये रीती । येथपर्यंत वदला **श्री**पती । अज्ञानलक्षणें होतीं । तदन्यथा. ॥ ७५३ ॥ पचश्लोकीं हें प्रकरण । त्यांत चौ श्लोकीं हे विवरण । बोलिला आता **ना**रायण । उरलीं दोन लक्षणें बोलतो या श्लोकी. ॥ ७५४ ॥

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

**अध्यात्म** म्हणजे स्वभाव । **'[1]स्वभावोऽध्यात्ममुच्यते'** म्हणे अष्टमीं **दे**व । स्वभाव म्हणिजे आपला भाव । आपण कोण ऐसा प्रत्यय आपला. ॥ ७५५ ॥ ऐशा स्वभावाभीतरीं । म्हणिजे आपला प्रत्यय जेथवरी । त्या आत्मप्रत्ययांत म्हणे **ह**री । जें ज्ञान, त्याचें **नित्यत्व** समजणें. ॥ ७५६ ॥ यास म्हणावें ज्ञान । यास विपरीत तें अज्ञान । की देहादिकीं आत्मानुसंधान । अनित्यत्व तितकियांसही. ॥ ७५७ ॥ प्रथम चरणीं हा व्यतिरेकबोध । की करितां आपल्या भावाचा शोध । जडात्मप्रत्यय तितका अबोध । ज्ञानस्वरूप नित्य निजभाव आकळे बोध हा. ॥ ७५८ ॥ अन्नमय कोशापासूनी । प्राण, इद्रियें, मन, आपण म्हणोनी । आत्मभाव जो जो वाटे, तो निषेधुनी । ज्ञानात्मत्व निखळ आपलें नित्यत्वें जाणावे. ॥ ७५९ ॥ नित्य तो एक **आ**त्मा । अनित्य वेगळा अनात्मा । जो **चि**त्स्वरूप निगमागमा । न वदवे, कळे गुरुमुखे. ॥ ७६० ॥ तो कळला ज्याला । नित्यत्व कळले त्याला । तो ज्ञानस्वरूप ऐसा बोध जाला । ज्ञाननित्यत्व त्या अनुभवाला म्हणावें. ॥ ७६१ ॥ अध्यात्माभीतरीं । ज्ञाननित्यत्व म्हणे **ह**री । **अध्यात्म**शब्द तरी । स्वभाव म्हणिजे भाव आपला. ॥ ७६२ ॥ **अध्यात्म**शब्दाचा अर्थ । अष्टमीं पुसे **पा**र्थ । **'[2]किमध्यात्म'** म्हणूनी पुसतां सांगे **स**मर्थ । **'स्वभावोऽध्या-**

---

१. अ० ८, श्लो० ३. २ अ० ८ श्लो० १

त्ममुच्यते' म्हणोनी. ॥ ७६३ ॥ आपला भाव स्वभाव । त्यांत अज्ञानें वाटे अन्यथाभाव । यथार्थ भाव आपला जो गुरुराव । चिदात्मभाव उपदेशी. ॥ ७६४ ॥ कीं भाव अन्यथा वाटे तो असत्य । त्यांत ज्ञानभाव आपला सत्य । असत्य जडभाव तितका अनित्य । त्या स्वभावीं नित्य चित्स्वरूपची आपले. ॥ ७६५ ॥ स्वभावीं ज्ञाननित्यत्व जें म्हणावें । तें अध्यात्मीं बोलिले देवें । एवच आपले जे विविध भाव त्यांत जाणावें । ज्ञानस्वरूपीं नित्यत्व, हें ज्ञान. ॥ ७६६ ॥ तेव्हां तदन्यथा । जें देहात्मत्व वाटे वृथा । तें अज्ञान की अनित्य सर्वथा । नित्य आत्मा घडों शके हें कैसें? ॥ ७६७ ॥ आत्मा म्हणूनी मानिले ज्याला । नित्यत्व मानिलेची त्याला । तदन्यथा शोध आला । कीं अनित्यास नित्य आत्मा न मानणें. ॥ ७६८ ॥ ऐसा अध्यात्मशब्दें स्वभाव । स्वभाव म्हणिजे आपला भाव । त्यांत जें ज्ञान, त्यास म्हणतो देव । नित्यत्व समजणें ज्ञान हे. ॥ ७६९ ॥ अर्थ अध्यात्मशब्दाचा । अष्टमीं बोलली भगवंताची वाचा । त्यावरूनी अर्थ या वाक्याचा । जाला ये रीती. ॥ ७७० ॥ आतां शास्त्रज्ञ जे म्हणविती । तेही अध्यात्मशब्दे ज्ञानची वाखाणिती । त्या अध्यात्मरीतीनेंही बोलती । ज्ञानस्वरूपातेंची नित्यत्व. ॥ ७७१ ॥ टाकूनी हा अर्थ सार । अध्यात्मज्ञान म्हणिजे आत्मविचार । त्याचे नित्यत्व म्हणिजे तन्निष्ठत्व एतत्प्रकार । अर्थ कोणी बोलती. ॥ ७७२ ॥ प्रगट होतां मुख्य अर्थ । इतर अर्थ उगाची दिसतो अनर्थ । ऐसें असतां किमर्थ । विस्तार करावा ग्रंथाचा? ॥ ७७३ ॥ ऐसा व्यतिरेक करूनी । ज्ञानस्वरूप आत्मा नित्य म्हणोनी । हें ज्ञानलक्षण बोलतां, यावरूनी । उरला अनित्य अनात्मा जडभाग. ॥७७४॥ जेव्हां एक चित्स्वरूप नित्य । जड तत्त्ववर्ग दुसरा अनित्य । तेव्हां द्वैत मानावे अगत्य । एक नित्य, एक अनित्य, अनादि म्हणोनी. ॥ ७७५ ॥ आतां जें अनित्य । तें म्हणावे असत्य । तरी असत्यात न दिसे जों सत्य । तोंवरी असत्य त्यांत म्हणवेना. ॥ ७७६ ॥ अलंकारीं दिसे हेम । तैसें जडीं दिसे ब्रह्म । तेव्हां अलकार मिथ्यात्वासारिखे सुगम । मिथ्यात्व होय जडतत्ववर्गातें. ॥ ७७७ ॥ म्हणोनी या श्लोकीं प्रथम चरणीं । जडाजड-विवेक संज्ञा वदला चक्रपाणी । दुसऱ्या चरणीं वाणी । अन्वयज्ञानाविषयीं बोलतो. ॥ ७७८ ॥ अध्यायारभीं दुसरिया श्लोकीं । उत्तरार्धी देव बोलिला कीं । क्षेत्र क्षेत्रज्ञ या दोन्हीमध्यें या लोकी । जें ज्ञान त्याचे, ज्ञान मज संमत. ॥ ७७९ ॥ त्यांत अध्यात्मज्ञाननित्यत्व म्हणोनी । क्षेत्रज्ञांत ज्ञानपद दावुनी । आतां जडीं क्षेत्रांत तें ज्या रीतीकरूनी । असे, तें ज्ञानलक्षण प्रसंगे बोलेल.

॥ ७८० ॥ प्रथम चरणीं सतरावें । ज्ञानलक्षण व्यतिरेकभावें । बोलोनी आतां अन्वयज्ञान अठरावें । बोलतसे चरणीं दुसरिया. ॥ ७८१ ॥

द्वितीय चरण—**तत्त्वज्ञानार्थदर्शनं**

तत्त्वें जड तितकीं अनर्थ । की अर्थ नसोनी भासती व्यर्थ । त्या जडा तत्त्वीं ज्ञान अर्थ । त्याचे दर्शन साक्षात्कारेकरूनी. ॥ ७८२ ॥ अर्थ इतकाच, परी । विशद नव्हे जोवरी । अर्थ अनुभवारूढ, तोंवरी । बरा नव्हे. ॥ ७८३ ॥ अर्थ म्हणावा जो सत्य असे । अनर्थ तो, जो नसोनी भासे । नसोनी भासे परी त्यांत दिसे । सत्य अर्थ ज्ञानियाला. ॥ ७८४ ॥ आतां क्षेत्रीं तत्त्वे जडें जितकीं । वर्णिलीं तीं ऐसीं की । अलंकार जैसे कनकीं । तेव्हां अनर्थ नग, त्यांत अर्थ कनक. ॥७८५॥ डेरे, रांजण, घागरी । यांमाजी एक मातीच खरी । या न्यायें जडा तत्त्वीं वेदवैखरी । म्हणे **'वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्.'** ॥ ७८६ ॥ एवं माती वेगळे लटके पदार्थ । ते अर्थ नव्हती, अनर्थ । त्या अनर्थरूपीं यथार्थ । अर्थ माती, श्रुति म्हणे. ॥ ७८७ ॥ तैसे जडमात्र अनर्थ । ज्ञान एकची त्या तत्त्वांत अर्थ । त्याचें दर्शन तें म्हणे समर्थ । ज्ञान म्हणोनी. ॥ ७८८ ॥ ज्ञान अर्थ ऐसा, त्याचें दर्शन । त्यास म्हणावें ज्ञान । तदन्यथा अज्ञान । जडा तत्त्वीं न पाहतें अर्थ तो. ॥ ७८९ ॥ सुवर्णाचीं केलीं केळें । बाळ म्हणे पक्व कदलीफळें । त्यांत सुवर्ण अर्थ, त्याच्या दर्शनावेगळें । केळची म्हणोनी पाहणें अज्ञान. ॥ ७९० ॥ पट जाणे, परंतु । बाळ नेणे उघडा ततु । तैसा अनर्थी जडीं अर्थ त्याचा उपादानहेतू । न कळणें अज्ञान. ॥ ७९१ ॥ ऐसा जडत्वभाग अनर्थ । ज्ञानस्वरूप त्यात अर्थ । त्याचें अदर्शन तें अनर्थ । आत्मज्ञानस्वरूप कळोनीही. ॥ ७९२ ॥ कळले कीं देहावेगळा आपण । तो आपण सर्वत्र कैसा असे निर्गुण । ऐसें न कळतां उगीच आत्मखूण । तीस अद्वयबोध । म्हणवेना. ॥ ७९३ ॥ आपणास देखे सर्वत्र । तेव्हां आपण समुद्र, तरंग जडमात्र । आपण अर्थ, अनर्थ जग विचित्र । वाटे ऐसें तेधवां. ॥ ७९४ ॥ यालागीं यास अन्यथा । तें ज्ञान ही अज्ञानची सर्वथा । आतां असो हे रहस्यप्रकाशकथा । ज्ञानलक्षणें अठरा ये रीती. ॥ ७९५ ॥ या अठरांत हें अठरावें । शेवटीं बोलिलें गूढ भावें । कीं शेवटींच देवालयावरी ठेवावे । कलशातें जे रीती. ॥ ७९६ ॥ ये रीती जरी जालें आत्मज्ञान । शेवटीं या सर्वात्मभावें समाधान । हें ज्ञान न कळे तों ज्ञानही

अज्ञान । कीं जडभ्रांति आहेच ते अविद्या. ॥ ७९७ ॥ ऐसें व्यतिरेक आणि अन्वयज्ञान । पूर्वार्धीं बोलिला जगन्निदान । उत्तरार्धीं हें ज्ञान आणि तें अज्ञान । जें याहूनी अन्यथा. ॥ ७९८ ॥ तरी लागलीच टीका त्याची । प्रतिलक्षणीं जाली अज्ञानाची । सर्व करणी जगन्निवासाची । यास साक्षी हेंच लक्षण अठरावें. ॥ ७९९ ॥ जीं तत्वे वामनाकृती । त्यांत जो ज्ञानार्थ देखती कृती । तोची आकृति आणि आकृतीच्या कृती । प्राकृतीं संस्कृती तोची अर्थ. ॥ ८०० ॥ हींच अष्टादश लक्षणे । अष्टादशाध्यायीं बोलिलीं कमलेक्षणें । तींत जगदज्ञानमोक्षणें । व्यासें अष्टादश पुराणें बोलिलीं. ॥ ८०१ ॥ हें क्षेत्रप्रकरण । येथवरी त्या क्षेत्राचें विवरण । की तुटे अविद्येचें आवरण । आणि विक्षेपही क्षेत्रींच या. ॥ ८०२ ॥ नरदेहची हा क्षेत्र । इतर योनी यांचीं फळे विचित्र । देवयोनी आणि नरकही अपवित्र । फळें तीं याच क्षेत्राचीं. ॥ ८०३ ॥ त्यांत या क्षेत्राचे मुख्य फळ । भक्तियुक्त ज्ञान केवळ । तें या अठरा लक्षणीं निवळ । बोलिलें संक्षेपें जगद्गुरूनें. ॥ ८०४ ॥ **'मद्भक्त एतद्विज्ञाय'** म्हणोनी । येथेंची बोलेल भगवद्वाणी । असो, हे आतां चक्रपाणी । काय वदेल तें पाहावें. ॥ ८०५ ॥ अध्यायारभीं सर्वज्ञ । आधीं क्षेत्र मग क्षेत्रज्ञ । बोलिला तें ऐके अभिज्ञ । अर्जुन कृपापात्र देवाचें. ॥ ८०६ ॥ त्या क्रमेंची आधीं क्षेत्र । येथें वर्णिले ऐसे विचित्र । त्यांत विकार जे, तेही वर्णिले अपवित्र । आणि ज्ञान पवित्र त्यांतची तें, ऐसें वर्णिले. ॥ ८०७ ॥ आता क्षेत्र विशद केले जैसें । क्षेत्रज्ञ तत्त्वही वदावे तैसें । तो तें तत्त्व ऐसें । कीं सर्वविगळे आणि सर्वही. ॥ ८०८ ॥ या कारणें जें ऐसें जाणावें । तें क्षेत्रज्ञ तत्त्वची ज्ञेय ऐसें बोलावें । तो प्रतिबिब, परी तत्त्व याचें म्हणावें । ज्या बिबाचें प्रतिबिब तें. ॥ ८०९ ॥ आरभीं द्वितीय श्लोकेकरूनी । **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** म्हणोनी । बोलिला की मीच क्षेत्रज्ञ यावरूनी । क्षेत्रज्ञ तत्त्व तेंची, जें अधिष्ठान विश्वाचें. ॥ ८१० ॥ तेंची अप्रमेय । तेंची वेदांतगेय । तेंची योगिध्येय । तेंची ज्ञेय जाणावें. ॥ ८११ ॥ याकारणें याउपरी । क्षेत्रज्ञ बोलोनी, आतां हरी । ज्ञेय सागणें तें सागेन, म्हणूनी वैखरी । बोलोनी ज्ञेय शुद्ध बोलतसे या श्लोकीं. ॥ ८१२ ॥

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥**

अगा ! ज्याच्या ज्ञानें ज्ञान होय । ते तत्त्व म्हणावें ज्ञेय । ऐसें जें स्वरूप

अप्रमेय । तें तुजप्रति सांगतों. ॥ ८१३ ॥ ज्याचें ज्ञान जालिया । ज्ञाता अमृत सेवी गा! **धन**जया! । म्हणजे नित्य अमृतस्वरूप देहींच या । ज्ञाता भोगीं. ॥ ८१४ ॥ मृत नव्हे ते अमृत । मृत म्हणजे मेलेंच असें जे अशाश्वत । जे न म्हणवे कधीं जिवत । मृत ऐसें शरीर हें. ॥ ८१५ ॥ अचळें **तृणपर्णें** समीरे चळती । तीं काय चचळें स्वभावे होती । काळ **कितेक** देह जिंती[1] । जीवयोगे तरी काय? ॥ ८१६ ॥ वस्तुता शाश्वत । स्वस्वभावें देह मृत । त्या जडास विलेक्षण[2] **अमृत** । **चि**त्स्वरूप निज आत्मा. ॥ ८१७ ॥ त्या अमृतातें अनुभवितो । जो या ज्ञेयातें जाणतो । एव ज्ञाताच हा ज्ञेय होतो । अर्थ ऐसा. ॥ ८१८ ॥ ज्ञानफळ बोलोनी ये रीती । **ज्ञेय** बोलतो **श्री**पती । की तें अनादि **'मत्परं ब्रह्म'** गा! **सुभ**द्रापती! । न तें सत् असत् ऐसें बोलिजेतें. ॥ ८१९ ॥ आदि ज्यास तें आदिवत । तें जड; तैसें जें नव्हतें म्हणावें अनादिवत । एव व्यतिरेक उपदेशी **भ**गवत । कीं जड नव्हे, तें **ज्ञेय**. **चि**दात्मा आपला. ॥ ८२० ॥ एव जड नव्हे तो **चि**दात्मा । प्रत्यग्वृत्ति दिसे प्रत्यगात्मा[3] । अनादिवत म्हणतां **कृष्ण** परमात्मा । ज्ञेय जडनिषेधशेष हें उपदेशी. ॥ ८२१ ॥ ऐसा शुद्ध आत्मा आपला । परब्रह्म म्हणावें त्याला । अन्वयें लक्षावें ज्याला । प्रपचाकारें. ॥ ८२२ ॥ तेंची हें **मा**यानिषेधशेष परम । म्हणूनी **मा**येपरतें **पर**ब्रह्म । तें न सत्, न असत् ऐसें **नि**गम । बोलती. ॥ ८२३ ॥ **सच्छब्दें** येथें प्रतिबिब । कीं ज्याचा अंश तें चित्स्वरूपबिब । परी तयास **मा**योपाधी अवलब । त्याहीवेगळें सत्स्वरूप हें **ज्ञेय** निरुपाधी. ॥ ८२४ ॥ परतु **ज्ञेय** **चि**त्स्वरूप जाणावें । तेव्हां भोक्तयास काय म्हणावें? । **ज्ञेयास** भोक्तृत्व कैसें गणावें? । अथवा भोक्तृत्व जडास न घडे सर्वथा. ॥ ८२५ ॥ यालागीं भोक्ता प्रतिबिब । तें प्रतिबिबापरतें बिब । उपाधिवृदीं अशकदब । प्रतिबिबे तयाचीं. ॥ ८२६ ॥ एवच **ज्ञेय** भोगरहित । तें प्रतिबिब उपाधियोगे असे भोगीत । ज्ञेय हें सर्वगत । तें देहमात्रीं. ॥ ८२७ ॥ यालागीं जें सत्प्रतिबिब म्हणावें । तेंही तें नव्हे, ऐसें गणावें । आणि जड असद्रूप जें त्याकरितां जाणावे । तेही तें नव्हे. ॥ ८२८ ॥ ऐसें सदसद्विलक्षण । **ज्ञेय** सच्चिदानदलक्षण । व्यतिरेक **क**मलेक्षण । बोलिला या श्लोकी. ॥ ८२९ ॥ ततूची अवधी पासोडी । म्हणूनी सांगणें त्यास आधीं दाखवावी दशोडी[4] । ततु ओळखोनी मग न सोडी ।

---

१. जीवत राहतात. २ भिन्न, उलटें. ३. देहामध्यें व्यापून राहिलेलें ब्रह्म. ४. दशी, झिरमिळी, आंचळी.

दृष्टि पासोडीमाजी ततूतें. ॥ ८३० ॥ ऐसा चैतन्यजडाचाही अन्वय । सांगणें, तेव्हां आधीं निष्कळ ज्ञेय । सांगोनी, मग जडींही तें अप्रमेय । पटीं ततु ये रीती दाखवावें. ॥ ८३१ ॥ म्हणूनी हा बारावा श्लोक । येथें व्यतिरेक वदला उत्तमश्लोक । आतां करूनी कृपावलोक । अन्वयें ज्ञेय तेंची बोलतो या श्लोकी. ॥ ८३२ ॥

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

अर्जुना! सर्वत्र हात, पाय, । डोळे, शिरे, मुखें, तेंची ज्ञेय । अगा! तरग स्वयें सागर न होय । तरी तरग कोठूनी उपजती? ॥ ८३३ ॥ सोनें नव्हे अलंकार । तरी कोठूनी आले ते आकार? । एव चराचर प्रकार । तेंची म्हणावें, जें उपादान कारण जगाचें. ॥ ८३४ ॥ कार्यास कारण विलक्षण । आणि कार्याकारणास एकपण । व्यतिरेक पाहतां, भिन्न लक्षण; । एकपण अन्वयें. ॥ ८३५ ॥ अलकाराचा आकार । तो नव्हे सुवर्णाचा सुवर्णत्वप्रकार । तथापि सोनें अलकार । कैसीं निवडावीं वेगळीं? ॥ ८३६ ॥ म्हणोनी अन्वये सोनेंची नग । तैसें अन्वयें ब्रह्मची जग । व्यतिरेके पुन्हा दोहींचा वियोग । नगाकनकाचा जडाचैतन्याचा. ॥ ८३७ ॥ की एकासारिखे एक नसे । आणि संयोग दोहींचा दिसे । तेव्हां योग दोहीचा म्हणावा समरसें । एवच चैतन्य जडयुक्तही म्हणावें. ॥ ८३८ ॥ हृदयी धरूनी ऐसा भाव । पूर्वार्धी अन्वय बोलिला देव । आतां अन्वयांतही व्यतिरेक देवाधिदेव । सुचवितो. ॥ ८३९ ॥

उत्तरार्ध—**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥**

श्रवणेंद्रिययुक्त सर्वत्र । तें असे ज्ञेय चिन्मात्र । आणि जग सर्व जें विचित्र । व्यापूनियां ज्ञेय तेंची असे. ॥ ८४० ॥ पाणिपादादि इंद्रियगण । तेंची म्हणोनी पूर्वार्धी बोलिला सर्वज्ञ निपुण । येथें श्रवणेंद्रिययुक्त म्हणतां खूण । दावी की पाणिपादादियुक्तही तें म्हणावें. ॥ ८४१ ॥ आणि पाणिपादादि तेंची म्हणोनी । बोलिला त्या अन्वयेंकरूनी । श्रवणेंद्रियही यावरूनी । सुचवी की तेंची जाणावें. ॥ ८४२ ॥ कीं आधीं जडावेगळे । बोलोनी तेंची जड विश्व सगळे । बोलतां व्यतिरेक अन्वयबळें । उपादानपण प्राप्त जालें ये स्थळीं. ॥ ८४३ ॥ विना उपादानकारण । न घडे वेगळेपण, एकपण; । व्य-

१. पाठभेद—निष्फळ.

तिरेके वेगळेपणाची खूण । एकत्वाची अन्वयें. ॥ ८४४ ॥ नगाचें उपादान सुवर्ण । दोहींस विलक्षणत्वे भिन्नपण । तेंव्हा व्याप्यव्यापकनिरूपण । प्राप्त जाले. ॥ ८४५ ॥ जेव्हां अन्वयें बोलावे एकत्व । आणि व्यतिरेके बोलावें युक्तत्व । तेव्हां युक्तपण बोलता व्यापकत्व । बोलावेंची लागले. ॥ ८४६ ॥ याकरितां **श्री**पती । म्हणे की **'सर्वमावृत्य तिष्ठति'** । चतुर्थचरणीं ये रीती । ऐक्य वदोनी वदे व्यापकत्व. ॥ ८४७ ॥ बोलतां व्यापकत्व । बोलावें दोहींचें युक्तत्व । म्हणोनी एका **श्रुतिमत्**शब्दे हें तत्त्व । सुचविले. ॥ ८४८ ॥ हेही **ज्ञेयविवरण** । पच श्लोकी प्रकरण । दुसरिया श्लोकीं **श्री**सेव्यचरण । एकत्व युक्तत्व व्यापकत्वही सुचवी. ॥ ८४९ ॥ ऐसे अध्यायीं त्रयोदशीं । बोलिला श्लोकीं त्रयोदशी । हेची रीती मागुती उपदेशी । या चौदाविया श्लोकात. ॥ ८५० ॥

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥**

सर्वेंद्रियांचे गण । आणि विषय इद्रियांचे गुण । या सर्वांच्या रूपे भासे तें निर्गुण । आणि सर्वेंद्रियविवर्जित त्या वेगळेही. ॥ ८५१ ॥ अन्वयें त्या त्या रूपे भासे । व्यतिरेके विवर्जित दिसे । सर्वांत युक्त समरसे । मागुती व्यापक वेगळे सर्वांहूनी. ॥ ८५२ ॥ जें ज्या रूपे भासे । आणि त्यावेगळे असे । तें पाहतां गवसे । अधिष्ठान त्याचे. ॥ ८५३ ॥ तें कोठे नसोनी सक्त । सर्व धरी सर्वयुक्त । एक होऊनी मागुती विभक्त । की रज्जूच सर्प आणि वेगळाही. ॥ ८५४ ॥ तेंची **ज्ञेय** निर्गुण । आणि तेंची भोगी गुण । हें गुणभोक्तृत्वपण । प्रतिबिंबरूपेकरूनी. ॥ ८५५ ॥ **'न सत्तन्नासदुच्यते'**[1] म्हणोनी । सत्प्रतिबिंब ते नव्हे, ऐसें पूर्वी वदोनी । गुणभोक्तृपणेकरूनी । तेंही हेंची म्हणोनी बोलिला येथें. ॥ ८५६ ॥ अर्थी न दिसतां ऐसी खूण । निर्गुण केवी भोगील गुण ? । जडास तों भोक्तेपण । न घडे कधीं. ॥ ८५७ ॥ ऐसे बोलतां जडैक्य । प्रसंगे बोलतो **चि**दैक्य । कीं ज्यास सर्वैक्य । **ज्ञेय** तें. ॥ ८५८ ॥ की **ज्ञेय** तें अद्वैत । तेथें भोक्तेपणाचें कैंचें द्वैत ? । आतां आणखीही भगवत । **ज्ञेय**लक्षणें बोलतो या श्लोकी. ॥ ८५९ ॥

**बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥**

---

१. मागे श्लोक १२.

असोनी भूतांच्या सबाह्यांतर । स्वयेंची भूतें चराचर । तरंगांस जैसा सागर । अंतर्बाह्य आणि आपणची ते तरंग. ॥ ८६० ॥ पूर्वार्धी ऐसें बोलिला । परी येथें एक संशय असे लागला । कीं ऐसें सर्व आणि सर्वत्र, त्याला । कां सर्वेही न जाणती? ॥ ८६१ ॥ म्हणूनी उत्तरार्धेकरूनी । **'सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं'** म्हणोनी । म्हणतो कीं सूक्ष्मत्वास्तव सर्वत्र असोनी । सर्व होऊनीही न जाणवे. ॥ ८६२ ॥ **सूक्ष्मत्व** म्हणिजे अतींद्रियपण । कीं इंद्रियां न दिसे निर्गुण । गुरुकृपे जाणती निपुण । बुद्धीकरूनी. ॥ ८६३ ॥ अवलंबितां इंद्रियगण । बुद्धिदृष्टीस येतें स्थूलपण । त्या स्थूलदृष्टीं निर्गुण । न दिसे कधीं. ॥ ८६४ ॥ बुद्धिदृष्टी ते जेंवी नेत्र । इंद्रियें तीस उपनेत्र । दृष्टीस दिसे गोरेंगात्र । कांचेच्या उपनेत्रांस हिरवें तें. ॥ ८६५ ॥ इंद्रियांउपनेत्रावेगळी दृष्टी । करूनी पाहतां **चिद्रूप** सृष्टी । दिसे ऐसी कृपामेघवृष्टी । श्रीगुरूची जरी घडे. ॥ ८६६ ॥ श्रोत्रादि एक एक इंद्रिय । घे जरी शब्दादि आपला विषय । तरी त्या विषयांत विषयप्रकाशक अद्वय । तें न कळे इंद्रियांतें सूक्ष्मत्वेंकरूनी. ॥ ८६७ ॥ निरसूनी इंद्रियसमुदाय । बुद्धि देखे अतींद्रिय अद्वय । ते बुद्धि जे विद्यामय । ब्रह्मची सर्व देखे. ॥ ८६८ ॥ गुळाचा भेला । दृष्टीस भेंडा[1] वाटला । परी रसना चाखितां त्याला । गूळची म्हणे. ॥ ८६९ ॥ दृष्टीस गार, हातास कठिण । तथापि रसना म्हणे जीवन[2] । एवंच इंद्रियां दिसोनीही जन वन । सूक्ष्म बुद्धि सूक्ष्म ब्रह्मची पाहते. ॥ ८७० ॥ सूक्ष्म बुद्धि ज्यांची असे । त्यांस त्या दृष्टीं सूक्ष्म दिसे । ते सूक्ष्मदर्शी जे असे । सूक्ष्म पाहती, म्हणे **वेदश्रुती.** ॥ ८७१ ॥

**श्रुति—दृश्यते त्वग्रया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥**

**श्रुति** म्हणे सूक्ष्मबुद्धीकरूनी । ब्रह्म दिसतें म्हणोनी । कीं भ्रमाचें स्थूलत्व जातां, सूक्ष्म नयनीं । रज्जु दिसे, जाय सर्पत्व. ॥ ८७२ ॥ चित्त, बुद्धि, मन । नाम सत्त्ववृत्तीचेंची भिन्नभिन्न । स्थळस्थळीं **श्रुति ब्रह्म**दर्शन । भेद त्या सत्त्ववृत्तीनें बोलती. ॥ ८७३ ॥ **वेदीं** ऐसा निश्चय । कोणी न मानिती हा निर्णय । म्हणती **ब्रह्म** बुद्धीचा विषय । होय जरी बुद्धि जाणे **ब्रह्मातें.** ॥ ८७४ ॥ ते भरले कुमार्गी ऐसे । जरी बुद्धिगत **चैतन्य** दुसरें असे । तरी तिचा विषय होऊनी तीस दिसे । **परब्रह्म.** ॥ ८७५ ॥

---

१. मातीचें ढेंकूळ. २. पाणी.

तरग सागरीं निमाला । तरी काय सागर त्याचा विषय जाला ? । सिधूच सिधूमध्यें मिळाला । होऊनीही तरग. ॥ ८७६ ॥ एवच कदापिही श्रुती । न्यायविरुद्ध न बोलती । हें न कळोनीही स्थूळमती । करिती कल्पूनी पांडित्य. ॥ ८७७ ॥ गुरुकृपा होतां निर्गुण । म्हणती जाणे आपणाआपण । तेंव्हां त्याहूनी पहिलें अज्ञानपण । ब्रह्मीं ब्रह्मस्वरूप होतें म्हणावें. ॥ ८७८ ॥ तेंव्हा स्वरूपची केवळ होतें अविद्या । गुरुकृपेनें तें निर्गुणची जाले विद्या । टाकूनी आपल्या रूपा आद्या । पावलें दुसरिया रूपातें. ॥ ८७९ ॥ दुग्धाचें दुग्धत्व गेले । त्यास जेंव्हां दधित्व आले । भात होतां, जैसें नासले । तदुलत्व. ॥ ८८० ॥ हें बोलणें वेदविरुद्ध । बोलतां, नुरे ब्रह्मत्व शुद्ध । निजेला स्वप्नीं म्हणे मी प्रबुद्ध । ज्ञानाभिमानी हे ऐसे. ॥ ८८१ ॥ एवच सूक्ष्मदृष्टि होय जरी । सूक्ष्म तत्त्व दिसे तरी । स्थूलदृष्टीं न दिसे, म्हणे हरी । ऐशा सूक्ष्मत्त्वेंकरूनिया. ॥ ८८२ ॥ इद्रियां वेगळें आधी । बुद्धीकरूनी ज्ञान साधीं । मग इद्रियें विषय अन्वयबोधीं । दिसती ब्रह्म चित्स्वरूप. ॥ ८८३ ॥ रज्जूच्या अज्ञानेंकरूनी । भ्रम उपजे जो का नयनीं । तो स्थूल तद्युक्त म्हणोनी । रज्जु स्थूळा भ्रमापरता तो सूक्ष्म. ॥ ८८४ ॥ तो स्थूळ जातां भ्रम । सूक्ष्म नेत्र देखती तो रज्जु सूक्ष्म । बुद्धि ऐसी देखे ब्रह्म । इद्रियातीत होऊनी इद्रियातीतातें. ॥ ८८५ ॥ एव रज्जूच्या अज्ञानें दृष्टीस भ्रम । बुद्धीस इद्रियें न कळे तें ब्रह्म । ते इद्रियवृत्तिपरती जों नव्हे सूक्ष्म । तों तें सूक्ष्म न दिसे. ॥ ८८६ ॥ तें स्थूळत्व निरसे । तेंव्हां सूक्ष्मबुद्धीस सूक्ष्म दिसे । जे सर्वत्रही असे । परब्रह्म. ॥ ८८७ ॥ मग तेची दूरी, तेंची जवळी । दृष्टी आकाशातें जेंवी कवळी । बुद्धि ऐसी त्या केवळीं । तन्मयपणें फिरों लागे. ॥ ८८८ ॥ दृष्टी सूर्याच्या प्रकाशावरी । धांवे तों तोची जवळी, तोची दूरी । बुद्धीस बुद्धि प्रकाशक यापरी । जवळीही, दूरीही, चिदात्मा. ॥ ८८९ ॥ मन देहीं देहास पाहे । तों मनांत देहांत तेंची आहे । ब्रह्मांडकोटि कल्पूनी राहे । भागे न पावतां अत त्याचा. ॥ ८९० ॥ दृष्टीजवळी जो तरग । त्यांत जें उदक सबाह्य अतरग । लक्ष योजनेंपर्यत अग । तेंची जळ सर्वां तरगांचें. ॥ ८९१ ॥ ज्ञेय या श्लोकीं ये रीती । बोलतां श्रोता शकितमती । कीं भूतीं व्यापक सबाह्य बोलोनी मागुती । अचर चर तेंची म्हणतो, हें कैसें ? ॥ ८९२ ॥ कीं जरी दोहींस ऐक्य मानावें । तरी व्याप्यव्यापकत्व कां म्हणावे ? । जरी व्याप्यव्यापकत्व अगत्य बोलावे । तरी मानू नये एकत्व. ॥८९३॥

व्यापकत्वीं घडेना एकत्व । भिन्नत्व न दिसे तो न बोलवे व्यापकत्व । ऐसें ये स्थळीं सशकत्व । समजला साक्षी बुद्धीचा. ॥ ८९४ ॥ तरी वस्तुतः असोनी एकत्व । नसोनी भासे भिन्नत्व । हें अनादि सिद्ध ऐसेंची तत्त्व । म्हणूनी बोलतसे या श्लोकी. ॥ ८९५ ॥

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**

भूतांच्या ठायी अविभक्त । असोनीही असे जे भूतांसी विभक्त । की तत्त्वता ऐक्य परी तें अव्यक्त । वाटे प्रपचावेगळेसें यालागीं. ॥ ८९६ ॥ की वर्षतां मेघधारा । बुडाल्या ज्या महान्हदीं गारा । तेथें जलैक्य सिद्ध असतां, कठोरा । गारा भिन्न भिन्नही दिसती. ॥ ८९७ ॥ तरग नाना दिसती । त्यांत अभेदे जळाची वसती । आणि आकार भिन्नसेही भासती । म्हणूनी वेगळेंसें उदकही दिसतसे. ॥ ८९८ ॥ की मृगजळाचा भास । काय वेगळा वदवेल सूर्यास । तथापि भिन्न नाही किरणास । जळरूपपण कदापि. ॥ ८९९ ॥ परतु किरणावेगळें काय । वेगळेपणें असे मृषा तोय? । म्हणूनी तें म्हणावे होय । किरणची तें ॥ ९०० ॥ किरणावेगळे कांहीं । जळाभासासी असणेंची नाही । रज्जूवेगळा मिथ्या सर्प तोही । कोठे असे? ॥ ९०१ ॥ सोन्यावेगळा असे नग । की जळावेगळा असे तरग । तरी चैतन्यावेगळे जड जग । कांहीं आहे म्हणावे. ॥ ९०२ ॥ याकारणें भूतीं असोनी भूतांसी अविभक्त । परी दिसे ऐसें, की असे जाणों विभक्त । की व्यक्तिहीन अव्यक्त । सर्पाकारवर्जित दोर जैसा. ॥ ९०३ ॥ किरण न जाले जळाभास । यथापूर्व किरणपण किरणास । म्हणूनी वेगळेंची मानावें, तरी मिथ्याजळास । कोठे पाहावें? ॥ ९०४ ॥ एक म्हणतां तें विलक्षण । म्हणूनी भेद नसोनी भेदासारिखे हें लक्षण । ऐसें म्हणावें म्हणोनी कमलेक्षण । म्हणे विभक्त ऐसें असे. ॥९०५॥ आधीं म्हणे अविभक्तची असे । मागुती म्हणे विभक्त असे ऐसें दिसे । कीं रज्जुच सर्प, परी भिन्नसाही गवसे । की रज्जु सर्पपणावेगळा अखंड. ॥ ९०६ ॥ एव वस्तुतः भूतांशीं अभेद । तथापि दिसे जेंवीं भेद । म्हणूनी सर्वांवेगळें वर्णूनी वेद । सर्वही ब्रह्मची ऐसें बोलती. ॥ ९०७ ॥ असोनीही एकत्व । नसोनी भासे भिन्नत्त्व । म्हणूनी व्याप्यव्यापकत्व । वेदही स्थळस्थळीं बोलती. ॥ ९०८ ॥ एवच भूतें ब्रह्मावेगळीं नसती । ऐसें निश्चयें बोले श्रीपती । आणि वेगळींशींच दिसती । कीं भेद दिसे तो असेना. ॥ ९०९ ॥ तरीच असोनी एकत्व । बोलावें लागतें व्याप्यव्यापकत्व । एव अनादिसिद्ध अद्वैततत्त्व । ऐसेंची असे समाधान शकेचें. ॥ ९१० ॥ ऐसा मायामात्र भेद ।

आणि वस्तुतः अभेद । कोण्या गोष्टीकरूनि बोलती **वेद** । तें उत्तरार्धीं बोलतसे. ॥ ९११ ॥

**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥**

तें **ज्ञेय** भूतें धरणार । आणि तें **ज्ञेय** भूतांतें गिळणार । आणि तेंची भूताकारे भासणार । सृष्टिकाळीं. ॥ ९१२ ॥ येथें **'भूतभर्तृ च'**शब्देंकरूनी । होती व्याकरणे अर्थ दोन्ही । भूतें पाळणार, धरणार, म्हणोनी । परी निर्गुणपणीं पालन घडेना; ॥ ९१३ ॥ आणि उपदेशकाळीं स्थितिकाळ । म्हणोनी आधीं **विश्व**पाळ । की भूतें धरणार तें **ज्ञेय** केवळ । गिळणार यापुढे प्रलयकाळी. ॥ ९१४ ॥ सृष्टिकाळी मागुती तें **ज्ञेय** । भूताकारें भासेल अप्रमेय । ऐसें गहनभावे हें प्रमेय । **भ**गवत बोले ये स्थळी. ॥ ९१५ ॥ आणि **ज्ञेय** तें जे जाणावें । तें भूतातें धरणार ऐसें पाहावे । तो त्या भूतवर्गें दिसावें । त्याचकरितां की धरी, प्रकाशी, उपादानची कार्यास. ॥ ९१६ ॥ सुवर्णाकरितां दिसे नग । जळ किरणाकरितांची देखती मृग । **चै**तन्याकरितांची जग । दिसे सारे. ॥ ८१७ ॥ रज्जूकरितां सर्प दिसे । तो तों सर्प रज्जूमध्यें वसे । आणि त्या सर्पाचा धरणार गवसे । रज्जूच तो. ॥ ९१८ ॥ तरग सागरे दिसती । सागरींच त्यांची वसती । सागरींच लय पावती । उपजती त्याचपासूनी ते. ॥ ९१९ ॥ तरग धरी सागर । सागरची गिळी तरंगाकार । मागुती तरगाकारे होणार । सागरची तो. ॥ ९२० ॥ कालत्रयीं सिधु असे । तरग आदिअतीं नसे । मध्यें तदाश्रयें एके काळीं दिसे । तरी न गवसे विना सिधू. ॥ ९२१ ॥ ऐसें कालत्रयीं **ब्रह्म** असे । विश्व आदिअती नसे । स्थितिकाळींच विश्व दिसे । तरी न गवसे विना **ब्रह्म**. ॥ ९२२ ॥ म्हणोनी जें **ज्ञेय** म्हणावें । तें भूतें धरणार ऐसें जाणावे । की त्याचकरितां प्रत्ययास आणावें । त्या भूतांतें. ॥ ९२३ ॥ ऐसें ज्यावाचूनी न दिसे । ज्यावांचूनी कोठे न प्रवेशे । ज्यापासूनी उत्पन्न होत असे । तेंची तें. ॥ ९२४ ॥ तथापि तें स्वप्रकाश । कालत्रयीं असे सावकाश । हें विश्व परप्रकाश । आणि उपजे, नासे, नसे तिहीं काळीं. ॥ ९२५ ॥ एवच त्या **ज्ञेया**वांचूनी न दिसे । त्या **ज्ञेया**वांचूनी न असे । ऐसें म्हणतां उल्लसे । विश्वप्रकाशपणकरूनी ॥ ९२६ ॥ जे विश्वाचें प्रकाशक । तें चराचर तरगांचें उदक । **ज्ञेय** उपदेशितां **शे**षपर्यंक । सुचवी ऐसें. ॥ ९२७ ॥ कीं कार्याचे प्रकाशक । उपादानकारणची एक । ज्या एकाचे जे पदार्थ अनेक । ते न दिसती त्यावीण, नसतीही त्याविना. ॥ ९२८ ॥ ततूच तंतूचा पट । मातीच मातीचा

घट । दृष्टांतकोटीकरूनी ऐसेंची निपट । आणि तें तें कार्य न दिसे त्या त्याविना. ९२९ ॥ ऐसे येथें सिद्ध जाले । कालत्रयी विद्यमानत्व जेव्हा आले । पार्थचित्त अनुभवें धाले । परी शका एक उपजली. ॥ ९३० ॥ की प्रकाशपणें एकत्व । तरी ज्योतीसही विश्वप्रकाशकत्व । तेव्हा सूर्यचद्रअनलांसही कारणत्व । कां न घडे जगाचे? ॥ ९३१ ॥ या संशयाचे स्थळ दिसे । कीं तेजमात्रीं प्रकाशत्व गवसे । म्हणोनी या शकेचा परिहार बोलतसे । या श्लोकीं. ॥ ९३२ ॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**

अगा ! याही ज्योती होती । परी या ज्योतींतही ते ज्योती । ते या ज्योतीहूनी आणि तमाहूनी परती । बोलिजेते. ॥ ९३३ ॥ अर्थ इतका या अर्धी दिसे । परी वरच्यावरी पाहतां न दिसे । बरा विचार करितां गवसे । तो ऐसा. ॥ ९३४ ॥ की ज्योति जितकिया त्याच्या अतरी । ते ज्योति असे म्हणे हरी । तरी ते काय अधकारीं । नाही म्हणवेल? ॥ ९३५ ॥ आणि तमापरती । म्हणे ते ज्योती । तरी काय येच रीती । ज्योतीपरती ते नव्हे. ॥ ९३६ ॥ एवच ज्योतीत आणि तमांतही ते ज्योती । आणि ज्योतीहूनी आणि तमाहूनीही परती । अर्थ सिद्ध होतां ये रीती । न ध्यावा कैसा? ९३७ ॥ दोन्ही गोष्टी सुचवी श्रीपती । म्हणतां **'ज्योतिषामपि तज्जोती'** । **अपि**-शब्दे येथें ये रीती । दाखवी अर्थ. ॥ ९३८ ॥ की सर्वा ज्योतीतही ते ज्योती । तेव्हां अधकारींही ते ज्योती असे ये रीती । सुचवी, कीं द्वद्वें [1]जोडे विलक्षण बोलती । त्यांत तम जोडाच तेजाचा. ॥ ९३९ ॥ द्वद्वें सुखदुःख जोडा जैसा । शीतोष्णही जोडा तैसा । लाभालाभ, मानापमान, ऐसा । जोडा विलक्षण तेजातमाचाही. ॥ ९४० ॥ सुखही द्यावे म्हणती ज्याला । जाणावें कीं दु.खभोगही प्राप्तची त्याला । मानही द्यावा ऐसें म्हणती ज्याला । जाणावें कीं जाला अपमानही तयातें. ॥ ९४१ ॥ तैसें ज्योतींतही ते ज्योती । म्हणोनी सर्वेची म्हणे तमापरती । तेव्हा तमातही ते आणि वरती । ज्योतीही परती सुचवी ज्योति ते. ॥ ९४२ ॥ ज्योतींतही ज्योति जैसी । तमांतही ज्योति ते तैसी । तेव्हां तमापरती म्हणतां कैसी । ज्योतीहीपरती न बोलावी? ॥९४३॥ इतकी खटपट किमर्थ । श्रोते म्हणते, तरी एतदर्थ । की ज्योतींतही ते ज्योति म्हणतो समर्थ । तेव्हां **ज्ञेय** तें वाटेल कांहीं एक ज्योतीचसारिखे. ॥ ९४४ ॥

---

१. जोड्या, 'जोडा' असा पाठभेद.

ज्योतींसारखें जालें । तेव्हां दृष्टिगोचरत्व आलें । तों हें इतकेंही बोलणें उडालें । म्हणतां तमांतही म्हणोनी. ॥ ९४५ ॥ कीं तमास नाशी ज्योती । ते तमीं असेल कोणे रीती ? । आदित्यवर्ण म्हणती श्रुती । तें सगुणत्व वर्णिती लेखावें. ॥ ९४६ ॥ आदित्यवर्ण तमापरता । अविद्यावाचक ते तमोवार्ता । येथें ज्ञेय निष्कल तत्त्वतां । तेंची सांगतों. ॥ ९४७ ॥ येथें ज्योतींतही ते ज्योती । यालागीं म्हणे **श्री**पती । कीं ज्योति त्यास म्हणावें ज्यानें प्रकाशती । पदार्थ सर्व. ॥ ९४८ ॥ तरी नेत्र आणि रूपमात्र ज्योती । सूर्यादिकांच्या प्रकाशती । अधकारास न लागती । ज्योति कांहीं प्रकाशाया. ॥ ९४९ ॥ तरी ते ज्योति त्याही तमातें । प्रकाशी म्हणोनी **भ**गवंतें । **'ज्योतिषामपि'** म्हणोनी या **अपि**शब्दातें । योजूनी हा अर्थ दावी कीं तमांतही ते ज्योती. ॥ ९५० ॥ आणि नेत्रा रूपविण । इतरां इद्रियां विषयांची खूण । ज्या **चित्**प्रकाश ज्योतीनें जाणती जीवगण । तें ज्योति या ज्योतींत, ऐसें बोले. ॥ ९५१ ॥ तें ज्योति म्हणोनी । या **तत्**शब्देंकरूनी । तें ज्योति म्हणतां संकेतेंकरूनी । ऐसें सूचवी. ॥ ९५२ ॥ परी ते ऐसी कोणती ? । म्हणोनी **अर्जुन** पुसे तों **श्री**पती । **'ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं'** म्हणोनी ये रीती । उत्तरार्धें स्पष्टही बोलेल. ॥ ९५३ ॥ आतां नेत्र, रूप, हीं दोन्ही । या ज्योतीनें प्रकाशती म्हणोनी । या प्रकाशका ज्योति ऐसें मनीं । झणीं वाटे श्रोतयांच्या. ॥ ९५४ ॥ म्हणोनी याही ज्योती । अगा! नेत्रांस ज्या ज्योतीनें दिसती । तें ज्योति या ज्योतींत असे गा! **सु**भद्रापती ! । म्हणोनी खूण दावी नेत्रानें. ॥ ९५५ ॥ कीं या ज्योतीस ज्योति म्हणे । या ज्योतींस ज्योति या ऐसिया म्हणोनी जाणे । ते ज्योति या ज्योतींत शाहाणे । या ज्योतींचीही ज्योति ते म्हणती. ॥ ९५६ ॥ जे सर्वत्र सर्वांवेगळी । असोनीही तेजीं, तमीं, निराळी । तेची अगा ! आदि-अंतमध्यकाळीं । कारण सर्वा भूतांचें. ॥ ९५७ ॥ या ज्योति जडा म्हणोनी । जनांस दिसती लोचनीं । तें ज्ञानज्योती उमजे वनीं । ऐसें उत्तरार्धें बोलतसे. ॥ ९५८ ॥

**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥**

अगा! तें ज्ञान निखळ । जें जाणावें तें तेंची कीं ज्ञेय केवळ । जें ज्ञानगम्य गुरूवांचूनी अकळ । **'ज्ञानगम्यं'** म्हणतां सूचवी ऐसें. ॥ ९५९ ॥ कीं ज्या ज्ञानाकारणें श्रुती । गुरूतेंची शरण जावें म्हणती । तें ज्ञान स्वस्वरूप, ऐसें स्पष्ट बोलती । परी तें न कळे म्हणती गुरूविणें. ॥ ९६० ॥ उघड तें ज्ञानस्वरूप । तरी काय व्यतिरेकाचें रूप ? आणि कैसें चराचररूप तें

अरूप ?। हा अन्वयही गुरूविना कळेना. ॥ ९६१ ॥ याकारणें म्हणे भगवत। कीं ज्ञानची तें ज्ञेय निश्चित। परतु अकळ अत्यत। ज्ञानगम्य जें गुरूनेंची बोधावें. ॥ ९६२ ॥ आत्मा ज्ञानस्वरूप म्हणोनी। भेदवादीही वदती वदनीं। चार्वाक तेही भूतांशयोगेंकरूनी। उपजतें आणि नाशतें म्हणती ऐसें. ॥ ९६३ ॥ शब्दज्ञानी शास्त्रज्ञ। तेही इतके गोष्टीनें अभिज्ञ। परतु यास जाणोनी सर्वज्ञ। एक गुरुभक्तची जाले. ॥ ९६४ ॥ असो तें प्रस्तुतीं। ज्ञानरूप ज्योती। आणि ज्ञेय त्यातेंची म्हणती। कीं ज्ञानगम्य. ॥ ९६५ ॥ जेथवरी इंद्रियगोचर। तें जड अगा! चराचर। सूर्यचद्रादिकांसारिख्या ज्योतींचा पसर। दृष्टिगोचर जड नश्वर सर्वेही. ॥ ९६६ ॥ तें ज्ञान, ज्ञेय, ज्ञानगम्य,। इंद्रियां सर्वांसही अगम्य। कळे हृदयास जे शांत सौम्य। **हृदय**शब्दें चित्त तेंची हृदय जाणावें. ॥ ९६७ ॥ कीं हृदयीं चित्तींच तें अधिष्ठित। सर्वांचिया म्हणे अच्युत यास दृष्टांत। कीं तेज सर्वत्र परी नेत्रीं असे दिसत। म्हणोनी नेत्रींच आहे म्हणावें. ॥ ९६८ ॥ अधिष्ठुनी सर्वत्र असे। परी तें हृदयीं चित्तींच चित्प्रकाशक दिसे। यालागीं कीं जे जेथें गवसे, तें तेथें असे ऐसें म्हणावें. ॥ ९६९ ॥ येथें पाठ दोनी असती। कोठे **'हृदि सर्वस्य धिष्ठितं'** म्हणती। कोणी ऐसें पढती। कीं **'हृदि सर्वस्य विष्ठितं'**। ॥ ९७० ॥ त्यांत अधिष्ठुनि असे तें **'धिष्ठितं'**। कोठे म्हणती **'विष्ठितं'**। **'विष्ठितं'** म्हणजे **'विशेषेण स्थितं'**। एवच हृदयीं गवसे हा अर्थ. ॥ ९७१ ॥ कीं श्रुति म्हणती हृदयेंकरूनी। आणि बुद्धीनें, मनें, आत्मा जाणोनीं। अमृत होती, मोक्ष पावती म्हणोनी,। त्यांत **हृदय**शब्द सुचवी येथें श्रुति हे. ॥ ९७२ ॥

**श्रुति—न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चिदेनम्।**
**हृदा मनीषी मनसाभिक्लृप्तो य एवं विदुरमृतास्ते भवंति ॥**

श्रुति म्हणे याचें रूप। दृष्टी दिसेना कीं अरूप। जाणती चित्स्वरूप। हृदयें बुद्धियुक्त मन त्या मनेंकरूनी. ॥ ९७३ ॥ ऐसा संक्षेप श्रुत्यर्थ। आणि ऐसेंची अनुभविती ज्ञानी समर्थ। परी कोणी शब्दज्ञानी म्हणवती कृतार्थ। आत्मानात्मविवेकमात्रें जे फुगले. ॥ ९७४ ॥ जडावेगळा आत्माही त्यास। कळोनी, सोडिला तिहीं अभ्यास। ते म्हणविती आत्माच ओळखे आत्मयास। नव्हे विषय बुद्धीचा. ॥ ९७५ ॥ तरी मन, बुद्धि, हृदय,। हें सत्त्व आत्मचैतन्यें चिन्मय। स्वस्वरूपेंची स्वस्वरूप तें अद्वय। कळे परतु ओळखणें धर्म वृत्तीचा. ॥ ९७६ ॥ जरी वृत्तीवेगळें निर्गुण। जाणे आपली

आपण खूण । तरी आपणास आपण नेणे हें आवरण । वृत्तीपरतें त्याचें स्वरूपची लेखावें. ॥ ९७७ ॥ तेव्हां अविद्या विद्याविकाररूप । जालें म्हणावें निर्विकारस्वरूप । असो तें आतां अध्यात्मदीप । सर्वज्ञ भगवत काय बोले ? ॥ ९७८ ॥ ऐसें येथपर्यंत । जें बोलिला भगवंत । याचा अधिकारी आणि फळ अत्यत । तें बोलतो या श्लोकीं. ॥ ९७९ ॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥**

अर्जुना ! ये रीती । **क्षेत्र** सांगितलें तुजप्रती । आणि **ज्ञान ज्ञेय**ही संक्षेपें अती । सांगितले. ॥ ९८० ॥ **'इति क्षेत्रं तथा । ज्ञानं ज्ञेयं चोक्तं'** म्हणूनी **पार्था** । **तथा**शब्दें पूर्वोक्तरीतीं या अर्था । सुचवी येथें. ॥ ९८१ ॥ **तथा** म्हणिजे तैसें । पूर्वी विकारासहित सांगितलें जैसें । आतां सांगितलें ऐसें । की **ज्ञान ज्ञेय** यांसहित. ॥ ९८२ ॥ जैसें वाईट विकारांसहित । तैसेंची उत्तम ज्ञानज्ञेयसमन्वित । क्षेत्र मानवशरीर हें निश्चित । अधम आणि उत्तमोत्तम ये रीती. ॥ ९८३ ॥ विकारासहित क्षेत्र । नरक दे आणि स्वर्गही अपवित्र । ज्ञानही येथेंची अतिपवित्र । जें **ज्ञेय** दावुनी नेदी येऊं गर्भवासा. ॥ ९८४ ॥ एवं, ऐसें, हें येथपर्यंत । क्षेत्रप्रकरणची बोलिला **भगवंत** । हेंची वाईट आणि बरेंही अत्यत । कीं क्षेत्र शेत जें पेरिलें, तें उगवे. ॥ ९८५ ॥ आतां या क्षेत्रप्रकरणीं । **ज्ञान ज्ञेय** वदला **चक्रपाणी** । हे पूर्वाध्यायाचे अनुसंधानेंची वाणी । **भगवताची** वदतसे. ॥ ९८६ ॥ धर्मामृत उपासना । ठळक सांगितली **अर्जुना** । त्याचा विस्तार हा **करुणाघना** । बोलणें लागला ये रीती; ॥ ९८७ ॥ की धर्म तितके **प्रकृती** । **क्षेत्र** जिची आकृती । नव्हे आकृती, न विकृती । **पुरुष** तो **चिन्मात्र** अमृत. ॥ ९८८ ॥ हें वदतो **उत्तमश्लोक** । ऐसेंच **वेदांत सांख्य** जाणती सुज्ञ लोक । एक ह्या **सांख्यशास्त्रीं**चा श्लोक । प्रसगें पाहावा सज्जनीं. ॥ ९८९ ॥

**सांख्यश्लोक–आर्यावृत्तः—**

**मूलप्रकृतिरविकृतिर्महदाद्याः प्रकृतिविकृतयः सप्त ।**
**षोडशकश्च विकारो न प्रकृतिर्न विकृतिः पुरुषः ॥**

जे मूळ **प्रकृती** । ते म्हणावी अविकृती । कीं गुणत्रय **विकृती** । तीपासूनी ते स्वयें अविकृति शुद्धसत्त्व. ॥ ९९० ॥ ते शुद्धसत्त्व **प्रकृती** । तीपासूनी सात महदादिविकृती । **विकृती**पासूनी सोळा **विकारांची** उत्पत्ती ।

इतकियांवेगळा **पुरुष** तो. ॥९९१॥ तो नव्हे प्रकृती । तो नव्हे विकृती । तो नव्हे जडाकृती । निर्धर्म प्रकृतिधर्मापलीकडे. ॥ ९९२ ॥ एक **महत्तत्त्व**, दुसरी **अहकृती** । शब्द, स्पर्श, रूप, रस, गध, या पांच **विकृती** । व्याली शुद्ध **प्रकृती** । त्या सातांपासूनी सोळा **विकार**. ॥ ९९३ ॥ **महत्तत्त्वापासूनी अहंकार** । त्यापासूनि पचभूतांचे पांच प्रकार । परी **आकाशादि** पांच **विकार**। शब्दस्पर्शरूपरसगधापासुनी. ॥ ९९४ ॥ सातांत तामस **अहकृती** । तीपासूनी शब्दादि पांच **विकृती** । पांचांपासूनी पंचभूतांची उत्पत्ती । इंद्रियें दहा राजसापासूनी. ॥ ९९५ ॥ मन सात्त्विकापासुनी । **सोळा विकार** ऐसे मिळोनी । पच **भूतें**, दश इद्रियें, मन, लेखुनी । सातांपासूनी हे सोळा. ॥ ९९६ ॥ **पुरुष** नव्हे **प्रकृती** । **पुरुष** नव्हे **विकृती** । **पुरुष** नव्हे आकृती । जे सोळा **विकारांची**, निर्विकारची तो. ॥ ९९७ ॥ **पुरुषाकरितां** हे जिवत । तथापि यांस म्हणावें मृत । मृत नव्हे तो अमृत । **पुरुष** यावेगळा. ॥ ९९८ ॥ दोंपरी **पुरुष** तो म्हणती । आणि दोंची परी **प्रकृति** ते गणिती । ज्ञानी तेची जे **पुरुष** दोनी जाणती । एक प्रतिबिंब, एक बिंब. ॥ ९९९ ॥ एक शुद्ध **प्रकृती** । दुसरी त्रिगुण जे सप्तधा **विकृती** । आणि सोळा आकृती । **विकारांच्या**. ॥ १००० ॥ त्यांत **पुरुष** भोक्ता प्रतिबिंब । जो व्यापक तो तयांचें बिब । सर्वां **प्रकृतितत्त्वांस** तो अवलब । अमृत म्हणावें **पुरुष** तो. ॥ १००१ ॥ **प्रकृति** त्रिगुणीं अविद्या । शुद्ध सत्त्वीं विद्या । जातां शरण **भवरोगवैद्या** । अविद्या नासे विद्येनें. ॥ १००२ ॥ याच **क्षेत्रीं** हे प्रकार दोनी । **क्षेत्र** बोलिलें म्हणोनी । हें **धर्म** आणि **अमृत** शब्देंकरूनी । **पुरुष** दोहीं **प्रकृतीवेगळा**. ॥ १००३ ॥ तो धर्मावेगळा ऐसा । की रज्जु सर्पावेगळा जैसा । परंतु सर्प रज्जूवेगळा कैसा । म्हणावा ? असे म्हणोनी. ॥ १००४ ॥ रज्जूच सर्पाकार भासे । **पुरुष प्रकृतिधर्मरूपे** दिसे । ज्ञानी भक्त भजती ऐसे । जे विश्व **भगवद्रूप** पाहती. ॥ १००५ ॥ ज्ञानें ऐसिया भजती सुव्रत । तें ज्ञान म्हणावें **धर्मामृत** । कीं धर्म मिथ्या प्रकृतीचे ते मृत । प्रकाशक तिचा अमृत तो. ॥ १००६ ॥ ऐसें **धर्मामृत** । भक्त सेविती सुव्रत । आणि सेविती नुसतेंची अमृत । जे निर्गुण मात्र उपासिती. ॥ १००७ ॥ मिथ्याभास प्रकृतीचे धर्म । म्हणोनी ते टाकूनी नुसतें **ब्रह्म** । उपासिती, । नेणती वर्म । कीं हें सर्व सगुण जगदात्मा. ॥ १००८ ॥ यालागीं ते सेविती नुसतें अमृत । भक्त सेविती धर्मामृत । ये रीती म्हणोनी **गीतामृत** । **मेघश्याम** ऐसें वर्षला. ॥ १००९ ॥ याभावें येथपर्यंत । जें बोलिला **भगवत** । तें **क्षेत्र ज्ञान ज्ञेय**-

सहित । ऐसें बोलिलों म्हणूनी पूर्वार्धी बोलिला. ॥ १०१० ॥ पूर्वार्धानुसंधानें येथवरी । ऐसें बोलोनी याउपरी । तेच ज्ञानी भक्त याचे अधिकारी । म्हणोनी उत्तरार्धे बोलतो. ॥ १०११ ॥

श्लोक उत्तरार्ध—**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥**

जो जाणोनी ये रीती । जो ज्ञानी भक्त माझा सुमती । तो मद्भावाकारणें अगा ! सुभद्रापती ! शीघ्र पावतो, पावतां ज्ञानपरिपाकातें.॥१०१२॥ **'सर्वतःपाणिपादं तत्'** म्हणोनी । ज्ञेयेची तें प्रकृतिधर्म म्हणोनी । बोलिलों ये रीतीकरूनी । विश्व मद्रूप या स्थितीतें पावतो. ॥१०१३॥ **'उपपद्यते'** म्हणे कृष्णवाचा । अर्थ ऐसा या दों शब्दांचा । कीं अतिशीघ्र पावतो, जो साचा । माझा भक्त. ॥ १०१४ ॥ **'उप'** म्हणिजे समीप । **'पद्यते'** म्हणजे पावतो म्हणे अध्यात्मदीप । काशाकारणें म्हणसी तरी मद्रूप । जो मद्भाव सारूप्य माझें त्याकारणें. ॥ १०१५ ॥ ऐसें जाणोनी म्हणे जो युक्त । या ज्ञानेंकरूनी होऊनी मद्भक्त । तो माझ्या सगुणरूपीं अनुरक्त । तो मद्भावाकारणें शीघ्र पावतो. ॥ १०१६ ॥ पावतो ज्ञान परिपाकालागीं । जो हें धर्मामृत उपासितो योगी । मग प्रारब्ध सरे तों असतो जगीं । योगसिद्धि पावोनी असतो मद्भावाकारणें. ॥ १०१७ ॥ या भावें म्हणे हरी । हें क्षेत्र ज्ञानज्ञेय कळल्यावरी । जो मद्भक्त, त्यास नाहीं दूरी । पावणें ज्ञान परिपाकातें. ॥ १०१८ ॥ **'उपपद्यते'** म्हणिजे समीपची तो । अगा ! अर्जुना ! पावतो । मद्भावाकारणें असतो । पावोनियां. ॥१०१९॥ म्हणजे पडतां प्रारब्धाचा देह । मद्भाव माझा सगुणभाव निःसंदेह । पावतो कीं ज्ञानी आणि मोठा स्नेह । चरणीं माझिया. ॥ १०२० ॥ पावतो माझ्या भावाकारणें । म्हणोनी या भावें बोलिलें नारायणे । की ब्रह्मभाव आपला तरी त्याणें । ओळखिलाची जाणतां हें रहस्य. ॥ १०२१ ॥ आधीं ब्रह्मात्मत्व कळे । मग तन्निष्ठ चित्त वळे । तेव्हां भक्तास फळे । सगुणमोक्ष. ॥ १०२२॥ त्या सगुणमोक्षास देव । येथें म्हणे मद्भाव । त्याकारणें म्हणे देवाधिदेव । शीघ्र पावतो, म्हणिजे ज्ञानपरिपाकातें पावतो. ॥ १०२३ ॥ येथें निर्गुणवादाभिमानी । म्हणती ब्रह्मत्वाकारणें योग्य होतो म्हणोनी । ती दूषणें बोलावीं येथुनी । तरी ग्रंथ वाढेल बहु फार. ॥ १०२४ ॥ ज्ञान जालियावरी । म्हणती भक्ति कां परी? । तें सर्वही परोपरी । खडिलेंची मागें. ॥ १०२५ ॥ असो तें यानतर श्लोक । तो कां बोलेल उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ १०२६ ॥ सागावया धर्मामृत । प्रकृतिपुरुष सांगे

१. अ० १३, श्लो० १३.

अच्युत । त्यांत क्षेत्र प्रकृति निश्चित । क्षेत्रज्ञ पुरुष तो. ॥ १०२७ ॥ पुरुष अमृत चित्स्वरूप । जड तें मृत नश्वर रूप । त्या मायारूपासहित अरूप । चित्स्वरूप धर्मामृत म्हणावें. ॥ १०२८ ॥ परी तोची या क्षेत्राभीतरी । प्रतिबिंबरूपें जाला शरीरी । त्यातें आधीं हरी । प्रथमश्लोकीं क्षेत्रज्ञशब्दे बोलिला. १०२९ ॥ दुसरिया श्लोकीं क्षेत्रज्ञही मीच जाण । म्हणोनी बोलिला सुजाण । परतु त्याची वेगळी खूण । सांगितली नाहीं. ॥ १०३० ॥ तरी तो प्रकृतियोगेंकरूनी । अंश वेगळा प्रतिबिंबोनी । भोक्ता क्षेत्राचा जाला म्हणोनी । सांगावा प्रकृतीवेगळा. ॥ १०३१ ॥ तो तों सांगों जातां आपण । कृपाहीन दिसतो करुण । कीं त्यास दुःखभोक्तेपण । देणार कोण ईश्वरावांचुनी? ॥ १०३२ ॥ तो ईश्वर आपण । आपणास लागे निर्दयपण । म्हणोनी तें परिहरूनी करुण । अनादि हें भोक्तृत्व बोलतो दों श्लोकीं. ॥ १०३३ ॥

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥**

अगा! अर्जुना! प्रकृतीतें । आणि पुरुषातें । अनादि म्हणोनी दोघांतें । जाण तूं. ॥ १०३४ ॥ कीं ब्रह्म जैसें आदिरहित । तैसीं हीं दोन्ही आदिवर्जित । किरण जधींचे तधींचाची निश्चित । मृगजळाभासही. ॥ १०३५ ॥ कधींपासूनी ब्रह्म असे! । ऐसें विचारितां आदीच नसे । तरी प्रकृतिपुरुषांचें केवीं गवसे । आदिपण? कीं जधींचे ते, तधींचीं हीं. ॥ १०३६ ॥ वस्तुमहिमाच ये रीती । कीं अनादिपणेंची त्यापासूनी दोन्ही उपजती । त्याचमध्यें असती । लय पावती त्यामध्यें. ॥ १०३७ ॥ अनादिप्रवाह ऐसा । तेव्हां ईश्वर निर्दय म्हणावा कैसा? । कीं प्रकृतियोगेची ठसा । ईश्वत्वाचा ब्रह्मीं उमटतो. ॥ १०३८ ॥ जीवोपाधि कोटि कोटी । प्रगट होती तिच्या पोटीं । उदके जैसीं लहान मोठीं । प्रतिबिंबे तैसीं नभाचीं. ॥ १०३९ ॥ सूर्यापासूनी होती जळें । त्यांत प्रतिबिंबती सूर्यमंडळें । तीं सूर्यची शोषी जळें सकळे । तेव्हां प्रतिबिंबेही त्याची बिंबीं. ॥ १०४० ॥ ऐसीं ब्रह्मीं लय पावती । तेथूनी मागुतीं उपजती । अनादिप्रवाह ये रीती । प्रकृतिपुरुषांचा. ॥ १०४१ ॥ प्रलयीं उरे ब्रह्म मात्र । सृष्टि त्याचपासूनी हें विचित्र । जेंवी मुद्रिका, कटक, कटिसूत्र, । सुवर्णापासुनी. ॥ १०४२ ॥ नलगे ईश्वरीं निर्दयपण । तो स्वतःसिद्ध करुण । या भावें म्हणे तोची आपण । कीं अनादि जाण हीं दोन्ही. ॥ १०४३ ॥ त्यांत विकार आणि गुण । प्रकृतीपासूनी होती हे खूण । जाणोनी होईं निपुण । अगा! अर्जुना! ॥ १०४४ ॥

विकार इच्छाद्वेषादिक। गुण त्रिगुण, त्यांचे भेदही अनेक। इंद्रियें दहा, मन एक। इत्यादि सर्व गुण हे म्हणावे. ॥ १०४५ ॥ ऐसें एका श्लोकाचें प्रमेय। आतां या उपरी तो अप्रमेय। काय बोलतो वेदांतगेय। या दुसरिया श्लोकीं. ॥ १०४६ ॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥**

कार्य म्हणजे प्रयोजन। जें वासना संकल्पे करी जन। त्याचीं कारणें वृद्धि, इंद्रियें, मन,। कर्तृत्व अहंबुद्धीचें. ॥ १०४७ ॥ हीं अवघीं जडपणें। बुधा एका पुरुषाविणें। परंतु त्यांच्या ठायीं इतकीं स्फुरणें। होती निमित्तें प्रकृतीच्या. ॥ १०४८ ॥ म्हणूनी जे प्रकृती। अनादि बोलिली तुजप्रती। तीस हेतु म्हणती। या कार्यकारणकर्तृत्वीं अर्जुना! ॥ १०४९ ॥ जैसा निर्मळ स्फटिक। तो रक्त पीत दिसे, तें लटिक। परी त्यावरी ठेवितां वर्ण कांहीं एक। असोनी शुभ्र तद्रूप तो दिसतसे. ॥ १०५० ॥ स्फटिकाचिया लिंगा। जो अर्पी जैशा रंगा। लिंग तैसेंची, परी अतरंगा। शुभ्रपण न सोडी जें स्वतःसिद्ध. ॥ १०५१ ॥ तैसी हे प्रकृती। अनादि ईची उत्पत्ती। इच्यायोगें उपपत्ती। कार्यादिकांची पुरुषातें. ॥ १०५२ ॥ हे कार्यकारण-कर्तृत्वधर्म। प्रतिक्षणीं निर्मिती कर्म। पुण्य पाप धर्माधर्म। सुखदुःख फळें निर्मिती. ॥ १०५३ ॥ ते भोग देहींच होती। परी जडदेह तेची जाली प्रकृती। जडास भोग न घडती। परी घडती जडयोगे पुरुषातें. ॥ १०५४॥ कंचुकीस भिजवी नीर। परंतु शैत्य कचुकीचें भोगी शरीर। काठी हाणतां दुखे शिर। काठी लागे शिरोवेष्टणातें.[१] ॥ १०५५ ॥ मुंडासा दुखवला अचे-तन। परी भोग जाणे मस्तक सचेतन। तैसे देहीं भोग भोगी मन। परी तें अचेतन, भोग पुरुषाते. ॥ १०५६ ॥ 'ममैवांशो जीव'[२] म्हणोनी। पचदशीं या श्लोकापासूनी। भोक्तृत्व आपल्या चिदशाते स्फुट करूनी। भगवंत बोलेल. ॥ १०५७ ॥ परंतु भोग देहाविना। अर्जुना! सर्वथा घडेना। केवळ आत्मया निरजना। न घडती भोग. ॥ १०५८ ॥ आंगास लागावें चदन। तैसे भोग इंद्रियद्वारा घेतें मन। तथापि देह जड, तैसें मन अचेतन। भोग पुरुषा आत्मयाते. ॥ ॥ १०५९ ॥ भोग आत्मयातें, परी। भोग घडती अवघे शरीरीं। त्यास हेतु म्हणे श्रीहरी। बोलिजे तो पुरुष हा. ॥ १०६० ॥ चदनें चर्चिलें शव। परी भोग नेणे निर्जीव। जीव असतांही भोगविभव।

१. पागोटी, शिरोवेष्टन. २. अ० १५, श्लो० ७.

त्याच देहीं. ॥ १०६१ ॥ एव पुरुषाचा योग । तोंचीवरी देहास भोग । म्हणूनी भोक्तृत्वीं हेतु पुरुष, बोले श्रीरग । कीं तत्त्वता भोक्तृत्व पुरुषातें. ॥ १०६२ ॥ कोणी मनास भोक्तेपण । बोलती शब्दनिपुण । परी अधिष्ठूनी मन हा पुरुष आपण । विषय सेवितो, ऐसें पचदशी. ॥ १०६३ ॥ **'अधिष्ठाय मनश्चायं'** या चरणेंकरूनी । **'विषयानुपसेवते'** म्हणोनी । पचदशीं स्ववचनी । बोलेल भगवत. ॥ १०६४ ॥ **'भुंजानं वा गुणान्वितं'** म्हणोनी । भोक्तृत्व अंशातेंची स्वमुखेकरूनी । भगवंत बोलेल जेथें श्रुतींहींकरूनी । हेंची सिद्ध होतसे. ॥ १०६५ ॥ हें पंचदशीं निपट । होईल याच टीकेमध्यें स्फुट । मनास भोक्तृत्व बोलणें खटपट । व्यर्थ अवघी. ॥ १०६६ ॥ दुःखभोक्तेपण जयाला । मोक्षही बोलावा तयाला । निरोगी ह्मणावा तोची जाला । रोग ज्याणें अनुभविले. ॥ १०६७ ॥ रोग होता देवदत्ता । आरोग्य जालें विष्णुदत्ता । हे बालभाषा कैसी चित्ता । वृद्धाचिया मानेल ? ॥ १०६८ ॥ मोक्ष बोलावा ज्या मना । तें कैवल्यमोक्षीं असेना । भोग न घडे पुरुषाविना । तो मोक्षीं असे बिबैक्य पावोनी. ॥ १०६९ ॥ तो सुषुप्तीच्या काळीं । तो प्रतिदिनीं मिळे ब्रह्मीं केवळीं । जो उपाधि तों असे गोंधळीं । संसाराचिया. ॥ १०७० ॥ उपाधीचें सत्त्वजळ । त्यांत प्रतिबिंबाची डळमळ । तोंपर्यंत, जों तमें नाहीं गढूळ । गढूळ होतां, बिंबीं मिळे. ॥ १०७१ ॥ प्रलयकाळींही ऐसाच तो । उपाधिलयें लीन होतो । मोक्षीं उपाधि नाशिला असतो । पुन्हा न निघे ये रीती एकत्वें. ॥ १०७२ ॥ त्या उपाधींत एक मन । ते जड त्या पुरुषाकरितां सचेतन । त्या मनाच्या नाशें अक्षय धन । कैवल्यमोक्षाचें. ॥ १०७३ ॥ प्रतिबिंबांशें पुरुष । भोक्ता म्हणोनी वेदपुराणांचा घोष । मनास भोग म्हणतां दोष । अल्पदृष्टींचा. ॥ १०७४ ॥ असो ते, प्रस्तुतीं । पुरुष हेतु सुखदुःखभोक्तृत्वाप्रती । म्हणोनी ऐसें श्रीपती । उत्तरार्धीं बोलिला. ॥ १०७५ ॥ तेंही संशयाचें स्थळ । कीं सुखदुःखभोक्तृत्वीं हेतूच केवळ । हा पुरुष म्हणतो मेघनीळ । तरी भोक्ता नव्हे ऐसें कोणी बोलती. ॥ १०७६ ॥ म्हणोनी सर्वेश्वर । या संशयाचा परिहार । आणि स्पष्ट भोक्तृत्वनिर्धार । पुरुषातेंची बोलतो या श्लोकीं. ॥ १०७७ ॥

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान् गुणान् ।**

पुरुष प्रकृतीमध्यें असोनी । भोगितो प्रकृतीचे गुण तीन्ही । ज्या तीन्ही गुणेंकरोनी । मन, बुद्धि, इंद्रियें, अहकार. ॥ १०७८ ॥ चित्त, बुद्धि, मीपण ।

---

१. अ० १५, श्लो० ९. २. अ० १५, श्लो० १०.

देह इंद्रियविषयांचे गुण, । इतकेही प्रकृतीचे गुण । पुरुष अनुभविता या नांवें भोगितो. ॥ १०७९ ॥ जाणे मन, बुद्धि, मीपण । हेंची त्याच्या भोगाचें लक्षण । इंद्रियद्वारा विषयांचे गण । जाणे, हें भोगणें विषय इंद्रियांचे. ॥ १०८० ॥ देहाचें जाणे दुःख । शरीराचें सुख । त्या रूपे पापपुण्यमुख । देखे, होय सुखी दुःखी पुरुष तो. ॥ १०८१ ॥ जों प्रकृतिस्थ । तों पुरुष भोगी हें समस्त । या गोष्टीनें जालें नेमस्त । कीं भोग जितका, तितकीच प्रकृतिही त्याची. ॥ १०८२ ॥ पादांगुष्ठापासूनी शिर । इतकेंची सुखदुःख भोगी शरीर । इतकेंच प्रकृतीमध्यें चर अचर । शरीर भलतें. ॥ १०८३ ॥ तें शरीरची म्हणावें प्रकृती । कीं प्रकर्षें पूर्वकर्माची कृती । कर्मानुरूप उच खुजी आकृती । पुरुष तितकीच व्यापूनी भोगी सुखदुःख. ॥ १०८४ ॥ ऐसा प्रकृतीमध्यें स्थित । सुखदुःख भोगी पुरुष निश्चित । म्हणोनी सिद्धांत बोले अच्युत । कीं भोक्ता या पुरुषाविणें असेना. ॥ १०८५ ॥ प्रकृतीच कार्यरूपेकरूनी । देह जाली म्हणोनी । मनआदिकां यावरूनी । भोक्तेपण न घडे सर्वथा. ॥ १०८६ ॥ की मनआदि तत्त्वगण । प्रकृतीचेच अवघे गुण । त्या प्रकृतीमध्यें जेव्हां तो भोक्ता आपण । तेव्हां भोक्तृत्व प्रकृतीच्या भागीं लागेना. ॥ १०८७ ॥ स्पष्ट भोक्ता पुरुष ऐसें प्रमाण । प्रकृतिस्थ तो म्हणे सुजाण । प्रकृतिभागाचें भोक्तेपण । स्पष्ट येथें खंडिलें. ॥ १०८८ ॥ स्पष्ट पचदर्शी याहूनी । '[1]अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते' म्हणोनी । कीं हा पुरुषअंश अधिष्ठुनी । विषय सेवितो. ॥ १०८९ ॥ [2]चाटु काष्ठाचा अधिष्ठुनी । रस चाखे रसना ये रीतीकरूनी । मन अधिष्ठुनी हा सेवी विषय म्हणोनी । स्पष्ट पचदर्शी होणार. ॥ १०९० ॥ प्रकृतींत प्रस्तुत प्रकृतिस्थ । भोगितो म्हणे तोची हृदिस्थ । अर्जुनास अर्जुनरथस्थ । स्पष्ट म्हणे पुरुष भोक्ता. ॥ १०९१ ॥ परी हा पुरुष प्रतिबिंब । देहमात्रची ज्यास अवलंब । हा ज्याचा अंश तो पुरुष बिंब । सर्व होऊनी सर्वगतही. ॥ १०९२ ॥ हा अंश त्याचा । जैसा तो तैसाच चिद्रूप साचा । कीं तेजोमंडला सूर्याचा । तेजोरूपची आभास उदकांत. ॥ १०९३ ॥ चित्स्वरूप निर्धर्म ब्रह्म । तैसाची अंशचिद्रूप निर्धर्म । तथापि भोक्तृत्वगुण अधर्म । कोणा कारणास्तव तयाला? ॥ १०९४ ॥ आणि नाना योनी । कां हा पावतो? म्हणोनी । शंका ऐसी पार्थमनीं । ते निवारितो उत्तरार्धें. ॥ १०९५ ॥

---

१. अ० १५, श्लो० ९. २. चाटण्याचें साधन, चमचा.

**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥**

अगा! गुणसंग यास म्हणोनी । हेंची कारण, कीं त्याकारणेंकरूनी । उत्तमा अधमा योनी । या होती. ॥ १०९६ ॥ गुण अहकार त्याचा संग । त्या संगें अहकर्तृत्वप्रसंग । मीच स्थूळ आणि लिंग । अभिमान गुणसंग हा याचा. ॥ १०९७ ॥ हाही गुणसंग त्यास । न घडे केवला, चित्प्रतिबिंबास । ज्या सत्त्वयोगें पावला जीवत्वास । हा गुणसंग त्या तत्त्वातें. ॥ १०९८ ॥ जो शुद्ध सत्त्व गुण । तेंची चित्त, मन, बुद्धि, अतःकरण। त्या सत्त्वयोगें जीवपण । प्रतिबिंबा चिदशातें. ॥ १०९९ ॥ ते सत्त्वाची वृत्ती । अहकारयोगें धरी प्रवृत्ती । आत्मप्रत्ययें धरी निवृत्ती । पुरुष भोक्ता दोहींचा. ॥ ११०० ॥ ते प्रवर्ततां हा प्रवृत्त । ते निवर्ततां हा निवृत्त । मन अथवा बुद्धि अथवा चित्त । म्हणावें तीतें. ॥ ११०१ ते परा प्रकृती । तेची जीव जाली, म्हणे श्रीपती । प्रतिबिंबला गभस्ती । तें उदकची दिसे सूर्यरूप. ॥ ११०२ ॥ तथापि सूर्यबिंबाचकरूनी । दिसे प्रतिबिंब म्हणोनी । 'ममैवांशो जीवलोके'[2] या श्लोकापासूनी । अश तोची जीव हें सिद्ध केलें. ॥ ११०३ ॥ तथापि जळ हालतां हालतसे । जळ स्थिरत्वें स्थिर दिसे । जळावांचूनी न गवसे । एवं जळ जैसें, सत्त्व तैसें प्रतिबिबपुरुषाचें. ॥ ११०४ ॥ तें सत्त्व आत्माकार । गुरुकृपें होतां, नुरे संसार । तें सत्त्व धरितां अहंकार । भोगी नानायोनि कर्मफळें. ॥ ११०५ ॥ ऐसें जें अहपण प्रस्तुतीं तोची प्रकृतीचा गुण । त्याच्या संगें सत्त्वास कर्म स्फुरण । भोगी त्या कर्में योनि अधमा उत्तमा पुरुष हा. ॥ ११०६ ॥ सत्त्वास ज्याचा प्रसंग । पुरुषास त्याचा म्हणावा संग । म्हणोनी म्हणे श्रीरग । कारण गुणसंग नानायोनींत या पुरुषातें. ॥ ११०७ ॥ गुणसगें कर्में घडती । तीं तीं त्या त्या योनींत फळती । सुखें दुःखे आढळती । त्यास कारण गुणसग ऐसा. ॥ ११०८ ॥ ऐसी गुणसंगप्रवृत्ती । तुटे, बुद्धीस जरी लागे निवृत्ती । तेव्हां तेची सत्त्ववृत्ती । ओळखे तया पुरुषातें. ॥ ११०९ ॥ हा मोक्षप्रातीचा । स्थळस्थळीं क्रम बोलिला साचा । तरी काय बोध प्रतिबिबपुरुषाचा । मोक्ष दे? ऐसा संशय या स्थळीं. ॥ १११० ॥ कीं याच देहीं सत्त्व । आणि याच देहीं पुरुषत्व । तरी काय तें ज्ञेयत्व । बोलावें याच भोक्तयातें? ॥ ११११ ॥ तरी पुरुष जीव, पुरुष ईश्वर । दोघे व्यापूनि असती हें शरीर । ज्ञान दोहींचें ज्यास तो चतुर । मोक्ष पावे सर्वथा. ॥ १११२ ॥ ऐसे आतां श्लोक दोनी । त्यांत ज्ञान आणि मोक्ष

---

१. सूक्ष्म. २. अ० १५, श्लो० ७.

दुसरिया श्लोकेंकरूनी । आतां बिंब ईश्वरची, प्रतिबिंब **जीव** म्हणोनी । आधीं या श्लोकीं बोलतो. ॥ १११३ ॥

**उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥**

अगा! उपद्रष्टा तो ईश्वर । अनुमंता तो **स**र्वेश्वर । तोची भर्ता, तोची भोक्ता **म**हेश्वर । **प**रमात्मा म्हणोनी बोलिला या देहीं. ॥ १११४ ॥ **उप** म्हणजे समीप बाह्यांतर । **द्रष्टा** देखणार साक्षी **ई**श्वर । तोही द्रष्टा जो भोगी एकची शरीर । परी हा **ई**श्वर **उपद्रष्टा** साक्षी तयाचा. ॥ १११५ ॥ साक्षी होऊनी काय करी? । तरी तो **अनुमंता** म्हणे हरी । अनुमोदनातें देणार यापरी । अर्थ या शब्दाचा. ॥ १११६ ॥ कीं भोक्ता पुरुष जे रीती । वर्ते, करी प्रवृत्ति अथवा निवृत्ती । अनुमोदन तयाचें **वि**श्वपती । देत तदनुरूप. ॥ १११७ ॥ की ग्राहक जें जें विकत घेतो । विकणार ते ते त्यालागीं देतो । कांहीं एक नेदी म्हणोनी तो । न म्हणे, हेंची अनुमोदन.॥१११८॥ जें मागणारे मागितलें । तें देणारे दिधलें । याचे नांव बोलिलें । अनुमोदन. ॥ १११९ ॥ जेधवां अनुमोदन दिधलें । त्याचें मागणें अगीकारिलें । तेव्हां द्यावें तें दिधलें । एतद्रूप अनुमोदन या प्रसंगीं. ॥ ११२० ॥ एवच उपद्रष्टा साक्षी केवळ । दे कर्मानुरूप फळ । म्हणोनी अनुमता म्हणे **मे**घनीळ । अर्थ त्याचा ये रीती. ॥ ११२१ ॥ कां ऐसा अनुमता? । म्हणसील, तरी तो **भर्ता** । म्हणजे सर्वांचा पालनकर्ता । सहज अनादिसिद्ध तो एक. ॥ ११२२ ॥ त्याच्या उपाधीचा स्वभाव । ऐसा कीं त्याणें पाळावेंच जीव । तथापि सम **दे**वाधिदेव । विषम नव्हे. ॥ ११२३ ॥ एकास राज्य देऊनी । पाळी एकास भिक्षान्नें-करूनी । तथापि कर्मानुरूप फळें दे म्हणोनी । विषम नव्हे. ॥ ११२४ ॥ म्हणोनी उपद्रष्टा **ई**श्वर । अनुमता **ज**गदीश्वर । तथापि त्या सर्वांचा धनी **स**र्वेश्वर । म्हणोनी **भो**क्ता तोची ऐसें बोलोनी, **महेश्वर** । तो, ऐसें त्याचपुढें **दे**व बोलिला. ॥ ११२५ ॥ होऊनी उपद्रष्टा अनुमता । होऊनी भर्ता स्वयेंची भोक्ता । तोची महेश्वर म्हणोनी **पा**र्था स्वभक्ता । **भ**गवत सांगे. ॥ ११२६ ॥ आणि **'परमात्मेति चापि'** म्हणोनी । या **'च'**कारें **अपि**शब्देंकरूनी । बोले ऐसें ऐसाही होऊनी । तोची भक्त. ॥ ११२७ ॥ **प**रमात्मा तो याची देहीं । आणि याची देहीं भोक्ता तोही । हा अर्थही बोले शब्दप्रवाहीं । योजूनी **'च'**कार आणि **अपि**शब्द. ॥ ११२८ ॥ आणि बोलूनी ऐशिया बोला ।

म्हणे ऐसा परमात्माही याच देहीं असें बोलिला । यावरूनी वेद बोलती, ऐसें म्हणोनी अर्जुनाला । सुचवूनी दे येथें हे श्रुती. ॥ ११२९ ॥

**श्रुति—तस्य प्रकृतिलीनस्य यः परः स महेश्वरः ॥**

प्रकृतींत जो लीन । भोक्ता प्रकृतीअधीन । याही परता जगज्जीवन । तो महेश्वर ऐसें श्रुति म्हणे. ॥ ११३० ॥ प्रस्तुतीं प्रकृतिस्थ म्हणोनी । बोलिला पूर्वश्लोकेंकरूनी । तो प्रकृतिलीन म्हणे श्रुति, यावरूनी । श्रुत्यर्थेची हा बोलिला. ॥ ११३१ ॥ आणि त्या प्रकृतिलीनाहूनी । परता महेश्वर म्हणे श्रुति, म्हणोनी । भोक्ता बोलोनी महेश्वर म्हणे यावरूनी । त्याचपुढें. ॥ ११३२ ॥ एवंच हे श्रुती । सुचवी येथें श्रीपती । आणि भर्ता भोक्ता दोन्ही याच देहीं असती। ऐसें बोलती. ॥११३३॥ 'द्वासुपर्णा' श्रुती । येथें दावी जगत्पती । कीं दोन पक्षी असती । एका पिप्पलवृक्षीं, श्रुति म्हणे. ॥ ११३४ ॥ त्यांत एक पक्षी । कांहीं न भक्षी, सर्व लक्षी । एक त्या पिप्पलवृक्षासी भक्षी । श्रुति म्हणे. ॥ ११३५ ॥ कांहीं न भक्षी तो सर्वेश्वर । जीव तो भक्षितो तोची तरुवर । पिप्पलवृक्ष व्यष्टिरूपें शरीर । चराचर प्रपच अवघा समष्टिरूपें. ॥ ११३६ ॥ एका देहाचें नाम व्यष्टी । सकळा देहाचें नाम समष्टी । परतु देहवाचक दोन्ही गोष्टी। पिप्पलशब्दें चराचर प्रपच. ॥ ११३७ ॥ या श्रुत्यर्थावरूनी । परमात्मा आणि भोक्ता पुरुष या देहीं म्हणोनी । बोलिला कीं जीवेश्वर दोन्ही । असती, होऊनि ऐसे द्विविध पुरुष. ॥ ११३८ ॥ ऐसे द्विविध पुरुष आणि प्रकृति जो जाणे । त्यास प्रवृत्तींतही निवृत्ति बाणे । म्हणोनी भगवत ऐसें म्हणे । अतःपर या श्लोकीं. ॥ ११३९॥

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोपि न स भूयोभिजायते ॥ २३ ॥**

जो एवं या प्रकारें गुरुपासुनी । दोघेही पुरुष एकची म्हणोनी । जाणे आणि गुणसमुदायेंकरूनी । सहित जाणे प्रकृतीतें. ॥ ११४० ॥ तो सर्वथा सर्वा प्रकारीं । वर्तला जरी प्रकृतीच्या विकारीं । तरी पुन्हा तो या दुःखसंसारीं । न पावे जन्म. ॥ ११४१ ॥ भर्ता भोक्ता दोघे पुरुष । एकची म्हणोनी परमपुरुष । पूर्वश्लोकी बोलोनी निस्तुष[1]। 'य एवं वेत्ति' म्हणे या श्लोकीं. ॥ ११४२ ॥ एवं म्हणजे ऐसें । पूर्वश्लोकीं बोलिलें जैसें । जो जाणेल तैसें । तो न पावेल सर्वथा पुनर्जन्म. ॥ ११४३ ॥ पूर्वश्लोकीं तरी । पुरुष बोलिला दों परी । यावरूनी भाव अतरीं । कीं प्रतिबिंबासहित बिंब जाणे. ॥ ११४४ ॥

---

१. स्पष्ट.

कीं पंचदशीं ये रीती । '**उत्क्रामंतं स्थितं वापि**' या श्लोकीं **श्री**पती । '**विमूढा नानुपश्यंति । पश्यंति ज्ञानचक्षुषः**' ऐसें म्हणेल. ॥ ११४५ ॥ कीं भोक्ता जों न कळे । संशय भोक्तेपणाचा न ढळे । आणि बिंबप्रतिबिंबै-क्यही न आढळे । यालागीं तोही कळावा. ॥ ११४६ ॥ तरीच तो न कळे ज्या जना । ते भोक्तेपण मानिती जडा मना । '**विमूढा नानुपश्यंति**' म्हणे कीं अगा! अर्जुना! । मूढ या भोक्तयातें न पाहती. ॥ ११४७ ॥ आणि '**पश्यंति ज्ञानचक्षुषः**' म्हणोनी । म्हणे कीं ज्ञानी पाहती ज्ञानदृष्टीकरूनी । जो '**ममैवांशो जीव**' येथुनी । भोक्ता प्रतिबिंबांश बोलिला. ॥ ११४८ ॥ तें असो, आतां प्रस्तुतीं । ऐसें बोलिला **श्री**पती । कीं तो नये पुन्हा जन्माप्रती । जो ऐसें जाणे **पुरु**षातें आणि **प्रकृ**तीतें. ॥ ११४९ ॥ तरी जाणणें द्विप्रकार । एक अपरोक्ष साक्षात्कार । दुसरे बोलती अनुभवी शास्त्रकार । श्रवणें जाणणें परोक्षरीती ही. ॥ ११५० ॥ त्यांत अपरोक्ष गुरुमुखें । तत्त्व जाणतो सुखे । पुन्हा जन्मा नये ऐसें **विश्व**तोमुखें । बोलिलें स्पष्ट. ॥ ११५१ ॥ तरी जन्मांतरीं । योग अभ्यासितां भ्रष्टला असला जरी । जाणतांच **प्रकृ**ति**पुरु**षातें संसारीं । न पावे जन्म, कीं तत्काळ ते बिंबे. ॥ ११५२ ॥ कीं तो **पुरु**ष आणि **प्रकृ**ती । कळतांची अपरोक्षरीती । जें ज्ञान बिंबे, पावे स्थिति । पूर्वजन्माभ्यासें. ॥ ११५३ ॥ परि या जन्मींचा जो शुद्धमती । जाणेल ऐसी अपरोक्ष रीती । त्यास ध्यानाभ्यासें स्थिति । न बाणतां, कैसा न पावे पुनर्जन्म? ॥ ११५४ ॥ ऐसी शंका ये स्थळीं **दे**व । जाणोनियां **दे**वाधिदेव । **अर्जु**न पुसे तो स्वयमेव । समाधान बोलतो दों श्लोकीं. ॥ ११५५ ॥

> **ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।**
> **अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥**
> **अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
> **तेपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

कोणी ध्यानें ध्याती । बुद्धींत बुद्धीनें **आ**त्मयातें पाहती । कोणी **सांख्यें**, कोणी **यो**गरीती । कोणी **क**र्मयोगे. ॥ ११५६ ॥ चारी हे वेगळे प्रकार । त्या चौघांसही स्वरूपसाक्षात्कार । चौघांस चौपरी यथाधिकार । **आ**त्मनिष्ठा. ॥ ११५७ ॥ प्रथम यांत ध्यानेंकरूनी । बुद्धींत बुद्धीनें पाहती म्हणोनी । निर्विशेष आत्मध्यान यावरूनी । ध्यानलक्षण दावूनी बोलिला. ॥ ११५८ ॥ बुद्धि प्रकाशी जें चित्स्वरूप । बुद्धींत आत्मा आपण अरूप । बुद्धीतेची क-

१. अ० १५, श्लोक० १०. २. अ० १५, श्लो० ७.

रूनी तद्रूप । ध्याती ध्यानरीतीकरूनी. ॥ ११५९ ॥ जे बुद्धींत स्फुरे चिदात्मसत्तास्फूर्ती । जे देखिली करूनी त्याची बुद्धीची प्रत्यग्वृत्ती । बुद्धीनेंची त्या वस्तूतें पाहतां, निवृत्ती । होय चहू वाचांची एकसरे. ॥ ११६० ॥ निखळ चिदात्मप्रत्यय । ज्या बुद्धीस, ते तन्मय । जेथें स्मृति विस्मृति द्वय अद्वय । कांहींच नसे. ॥ ११६१ ॥ नव्हे सुषुप्ति की स्वात्मस्मृती । नव्हे स्वप्न, कीं कल्पित जडें न दिसती । न ते जागृति, की नसे देहादिप्रतीती । ते म्हणावी शुद्ध तुर्या. ॥ ११६२ ॥ ध्यानी आत्मयातें ये रीती । बुद्धीनें पाहती । जों बाणे, तों अभ्यास करिती । बाणतां सदा ध्याननिष्ठ. ॥ ११६३ ॥ आतां कोणी सांख्येंकरूनी पाहती म्हणोनी । म्हणे तें वेदांतसंमत सांख्येकरूनी । आत्मयाते पाहती ऐसें या वचनीं । समजावें तत्व.॥११६४॥कीं सांख्य ईश्वर न मानिती । कोणी आहे परी अजागलस्तन म्हणती । कर्त्री अवघी प्रकृती । वेदवेदांतविरुद्ध हें सांख्य ॥११६५॥ प्रकृति कर्त्री हें घडे साच । कीं अकर्तात्मबोध ऐसाच । परतु ईश्वरत्वाविषयीं अहाच । इत्यादि त्यांचें बोलणें. ॥ ११६६ ॥ कीं ईश्वरोपाधि ही प्रकृती । परतु तीस सर्वदा ब्रह्मस्फूर्ति । स्वये प्रकृति ऐसी प्रतीती । प्रवृत्तीते म्हणावें. ॥ ११६७ ॥ दोही अनुभवीं एक चैतन्य । परी ईश्वरोपाधि सर्वदा अनन्य । अखड चिन्मय करी धन्य । त्या अनुभवाअशें अनुभवी जनाते. ॥ ११६८ ॥ ते ब्रह्मीं चिच्छक्ती । ब्रह्म तिचेंची स्फूर्ती । चिदात्मत्वाची अखडत्वें स्मृती । तें ब्रह्म, म्हणे आपण. ॥ ११६९ ॥ आपण ब्रह्म ऐसी खूण । प्रकृतीचा शुद्ध सत्त्वगुण । ते प्रतीतीचें स्फुरण । चैतन्य निर्गुण ब्रह्म ते. ॥ ११७० ॥ लहरी चैतन्य सिंधुजळीं । ते आपणास आपण न म्हणे मी वेगळी । ब्रह्म ते ब्रह्मानुभवरूपिणी[1] सगळी । म्हणती सर्वज्ञ. ॥ ११७१ ॥ किंबहुना सर्वेही ब्रह्म निर्गुण । परी हे ज्ञानियास ठावी खूण । त्यास काय प्रकृति म्हणतील निपुण । किंवा ब्रह्म म्हणती तयाला ? ॥ ११७२ ॥ सुवर्णी अलकाराकार करणार शक्ती । आणि अलकार जालिया ते व्यक्ती । दोहीं शक्तींची अभिव्यक्ती । गिळोनी हेमची उघडें दिसतसे. ॥ ११७३ ॥ की हेमावीण शक्ति न दिसे । त्यावीण अलकारही कोठे असे ? । सोनेंची अलकारींही गवसे । एव कपट ते शक्ति, कपट ते अलंकारही. ॥ ११७४ ॥ कपटपण त्या मूळ हेमशक्तीचें । कपट कटकादि व्यक्तीचें । कारण दोहींच्या अभिव्यक्तीचे । सुवर्णाची तें. ॥ ११७५ ॥

१. परा, पश्यती, मध्यमा व वैखरी या चार वाणी. या अनुक्रमें स्मरणात्मक, भासात्मक, मननात्मक व प्रत्यक्ष उच्चारात्मक असतात. २. वरवर.

पाहतां सोनेंची असे । नसोनी त्यांत आकृति भासे । त्या सुवर्णास पाहतां निरसे । कापट्य दोहीं प्रकाराचे. ॥ ११७६ ॥ ब्रह्म सुवर्णऐसें सोडी । आणि प्रकृति नाही, लटिकी, तिला जोडी । याही अवघ्या प्रकृतीच्या खोडी । ब्रह्मची होती, ब्रह्म कळतां. ॥ ११७७ ॥ ऐसें ब्रह्म आपण । सदा अनुभवी ऐसा शुद्ध मायागुण । त्याचें सत्य स्फुरण टाकूनी खूण । त्याच्या मिथ्यापणाचीच बोलती. ॥११७८ ॥ ते शुद्ध प्रकृती । नित्य जिला ब्रह्मात्मसत्तास्फूर्ती । ते सोडोनी प्राकृतरीती । प्रकृति म्हणती तीस ते. ॥ ११७९ ॥ हे अल्प दृष्टीची सांख्यरीती । कां मानितील वेदांती[१] । ते या अनुभवीं श्रीपती । कां वर्णील मुख्यत्वें[२] ॥ ११८० ॥ आतां या प्रस्तुतीं । सांख्य म्हणे कोणी पाहती । ते पहायाची हेची रीती । की कर्तृत्व पाहणें प्रकृतीचे. ॥ ११८१ ॥ **'प्रकृत्यैव च कर्माणि । क्रियमाणानि सर्वशः'** ऐसी वाणी । बोलेल याच अध्यायीं चक्रपाणी । **'यः पश्यति तदात्मानमकर्तारं स पश्यति.'** ॥ ११८२ ॥ कोणी सर्वदा आत्मा अकर्ता । पाहती, की प्रकृतीहूनि परता । समग्र कर्तृत्ववार्ता । ठेविती प्रकृतीवरी. ॥ ११८३ ॥ कोणी सांख्यें आत्मा पाहती । म्हणूनी प्रस्तुतीं बोले श्रीपती । ते ऐसी वदावी सांख्यरीती । उपयोगी ज्ञानपरिपाकातें. ॥ ११८४ ॥ आतां कोणी योगें आत्मा पाहती । म्हणे भगवताची भारती । हे जडा चैतन्याची ऐक्यानुभूति । म्हणावी योग. ॥ ११८५ ॥ योग तंतूचा पटाचा । योग मातीचा घटाचा । योग सागरातरंगांचा । जडचैतन्ययोग ऐसा एकत्वें. ॥ ११८६ ॥ दोन्ही एकत्र मिळती । योग त्यालागीं बोलती । जडा जगाचा चैतन्याचा ये रीती । योग उपासिती आत्मज्ञ. ॥ ११८७ ॥ आतां कोणी कर्मयोगेंकरूनी । म्हणे आत्मा पहाती म्हणोनी । कीं कर्मबुद्बुदीं चिदबु लक्षूनी । कर्महि पाहती आत्मत्वें. ॥ ११८८ ॥ चतुर्थाध्यायांत विशद । ब्रह्मार्पण श्लोकीं प्रतिपद । वाखाणिलें, येथें सांप्रद । कोणी त्या कर्मयोगे म्हणे आत्मा पाहती म्हणोनी. ॥ ११८९ ॥ एवच पूर्वश्लोकीं म्हणे भगवंत । की जो पुरुष आणि प्रकृति गुणांसहित । एव रीति जाणेल निश्चित । पुन्हा नये गर्भवासा. ॥ ११९० ॥ तरी प्रकृतिपुरुषातें यापरी । जाणोनी अभ्यास न करी । आणि बाधित पूर्व अज्ञान संस्कारीं । तोही नये काय गर्भवासातें? ॥ ११९१ ॥ या शकेचा परिहार । करी ऐसा जगत्सर्पहार । कीं भलतैसा द्वैतसंस्कारसंहार । करिती आत्मा पाहतां. ॥ ११९२ ॥ ते आत्मज्ञानी पुरुष । ऐसा लक्षिती पुरीं पुरुष ।

१. पुढें श्लोक २९. २. वाणी, वाचा.

म्हणोनी बोलिला परमपुरुष । ज्ञानपरिपाकलक्षणें चारी. ॥ ११९३ ॥ आतां ज्यास साक्षात्कार नाहीं । आणि श्रवणें जाणे हें सकळ कांहीं । तरेल तो कैसा? म्हणसील तरी तैसाही । साधकसमूह तरेसें बोलतो या श्लोकीं. ॥११९४॥

**अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

आणखी यावेगळे इतर । जे ऐसे प्रकृतिपुरुषांतें न जाणती नर । आणि होऊनी स्वहिततत्पर । श्रवण करिती इतरांपासूनी. ॥ ११९५ ॥ ते आयकोनी उपासिती । उपद्रष्टा, अनुमता, भर्ता, तोची जगत्पती । ऐसें श्रवणमात्रें जाणती । भजती श्रवणादि भक्तीनें. ॥ ११९६ ॥ जे ऐसे उपासिती । तेही तरतीच गा! सुभद्रापती! । मृत्युसागरातें लंघिती । तेही अगा! ॥ ११९७ ॥ की ज्या श्रवणें आत्मखूण । जाणोनी होय सर्वज्ञ निपुण । त्या श्रवणातें तत्परायण । नारायण म्हणे. ॥ ११९८ ॥ ऐसें प्रकृतिपुरुषाचें प्रकरण । आणि त्याच्या ज्ञानाचे फळ निरूपण । केलें देवें कीं, जो जाणे ऐसें निपुण । तो पुन्हा जन्मा येना. ॥ ११९९ ॥ त्या प्रसगे जगत्पती । त्या ज्ञानाच्या परिपाकरीती । बोलिला की ज्या साधनीं स्थिती । बाणे ज्ञानियातें. ॥ १२०० ॥ या प्रसगे मागुती । जे अपरोक्ष आत्मा नेणती । आणि श्रवण मात्र करिती । तेही तरती ऐसें बोलिला. ॥ १२०१ ॥ आतां प्रसग ज्याचा । पुन्हा उपदेश त्या प्रकृतिपुरुषांचा । विशद बोलों पाहे देववाचा । बोलतां जें जें राहिलें. ॥ १२०२ ॥ जे प्रस्तुती श्रवणपर । आणि साक्षात्कारवर्जित नर । तेही पावोनी साक्षात्कार । मृत्यु तरती, ऐसें सर्वज्ञ बोलिला. ॥ १२०३ ॥ एव तें नव्हे जों ज्ञान । न फिटे जों अज्ञान । प्राणी तोंवरी वर्तमान । प्रवाहीं जन्ममरणाच्या. १२०४ ॥ म्हणोनी ससाराचें निदान । जे रीतीचें तें अज्ञान । आणि जे रीति त्याचें निवर्तकज्ञान । हीं दोन्हीं दों श्लोकीं बोलतों. ॥ १२०५॥ त्यांत प्रकृतिपुरुषांचा अविवेक । जन्महेतु हाची एक । म्हणोनी आधीं शेषपर्यंक । हें बोलतो या श्लोकीं. ॥ १२०६ ॥

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजंगमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

जेथवरी जैसें उत्तम अधम । शरीर, तें स्थावर हो अथवा जंगम । यास कारण सगम । क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाचा. ॥ १२०७ ॥ क्षेत्रांत क्षेत्रज्ञ जोंवरी । मी म्हणोनी मीपण तयाचें धरी । क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग तोंवरी । आहे म्हणावा. ॥ १२०८ ॥ त्या जडाजडसंयोगास्तव । होय कर्माचा संभव । त्या कर्मे-

करूनी उद्भव । स्थावरजगमरूपे होतसे. ॥ १२०९ ॥ यालागीं म्हणे देव । की जेथवरी जैसा कांहीं सभव । तो क्षेत्रक्षेत्रज्ञयोगास्तव । जाण ऐसे अगा ! भरतर्षभा. ॥ १२१० ॥ क्षेत्रज्ञ म्हणे मी देह । कर्मे आचरे धरूनी त्याचा स्नेह । त्या कर्मास्तव निःसदेह । स्थावरजगमशरीर तो पावतो. ॥ १२११ ॥ कर्मयोनि स्थावरजंगम । त्यास कारण क्षेत्रक्षेत्रज्ञसगम । म्हणोनी यास्तव म्हणे पुरुषोत्तम । देह भलता चराचरीं. ॥ १२१२ ॥ परतु नरदेहींच जे उपजे कर्म । पापपुण्य धर्माधर्म । त्यानेंच नानायोनि हें वर्म । क्षेत्र शब्द स्मरोनी ऐसें बोलतो. ॥ १२१३ ॥ कीं नरदेहावांचूनी । कर्मफळ नाहींच म्हणोनी । त्या क्षेत्राच्याच कर्मेंकरूनी । योनि नाना. ॥ १२१४ ॥ मी क्षेत्र म्हणे क्षेत्रज्ञ । तोची संयोग जोंपर्यत तो अज्ञ । म्हणूनी म्हणे सर्वज्ञ । की दोहींच्या योगास्तव देह भलता. ॥ १२१५ ॥ देह तितका कर्ममूळ । कर्म देहाभिमानेंची सफळ । तो अभिमान केवळ । क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगे जाणावा. ॥ १२१६ ॥ त्याच नर-देहीं होतां ज्ञान । फिटे क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग अज्ञान । धन्य म्हणावा सज्ञान । मनुष्यदेही जो ऐसा. ॥ १२१७ ॥ अतरीं ऐसा भाव । धरूनी हे बोले देव । तों पाहे कृपेनें देवाधिदेव । अर्जुनाकडे. ॥ १२१८ ॥ पाहतां धन्य वाटला । म्हणूनी देऊ पाहे सन्मान त्याला । तदर्थ भरतर्षभ म्हणूनी बोलिला । अर्जुनातें. ॥ १२१९ ॥ भरतकुळांत अत्यत । श्रेष्ठ तू कुंतीसुत । म्हणूनी म्हणे भगवत । अगा ! भरतर्षभा ! म्हणोनी. ॥ १२२० ॥ भाव कीं भलता । जो ज्ञान ऐसें पावे पांडुसुता ? । त्यानें स्वकुल तारिलें तत्त्वतां । स्वकुलश्रेष्ठ तो यालागीं. ॥ १२२१ ॥ तैसा भरतवशीं अर्जुना ! । श्रेष्ठ वाटसी माझ्या मना । म्हणूनी या भावें या संबोधना । वदला स्वमुखेकरूनी ॥ १२२२ ॥ या नतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक ? । निमित्त त्याचे कुशळ लोक । परिसोत आधीं. ॥ १२२३ ॥ पूर्वश्लोकीं बोलिला सर्वज्ञ । कीं क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ । यांचा विवेक नेणे तो अज्ञ । देह पावतो क्षेत्रक्षेत्रज्ञस-योगेंचीकरूनी. ॥ १२२४ ॥ तेव्हां क्षेत्रक्षेत्रज्ञवेगळेपण । कळणें इतकेंची ज्ञानलक्षण । तरी कां बोले कमलेक्षण । भगवद्भाव सर्वभूती. ॥ १२२५ ॥ नानायोनींत देहयोग । त्यांस कारण क्षेत्रक्षेत्रज्ञसयोग । तरी क्षेत्रक्षेत्रज्ञवियोग । कळणेंची पुरे. ॥ १२२६ ॥ क्षेत्र वेगळे पाहे । आपण निराळा होऊनी राहे । मोक्ष तितकियानेंची होत आहे । क्षेत्रक्षेत्रज्ञयोगे संसार जेव्हां. ॥ १२२७ ॥ श्रोता जालिया दक्ष । करीच ऐसा पूर्वपक्ष । म्हणूनी याचे समाधान जलजाक्ष । बोलतसे या श्लोकी. ॥ १२२८ ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥**

अगा! समान सर्वा भूतीं । जो परमेश्वर जगत्पती । जो समदर्शी पाहे तया सुमती । तोची पाहे. ॥ १२२९ ॥ म्हणजे क्षेत्रक्षेत्रज्ञ याचा वियोग । तोची पाहेल, जो पाहेल सर्वात्मयोग । कीं क्षेत्रक्षेत्रज्ञसयोग । वियोग देहमात्राचा कळतां नासेना. ॥ १२३० ॥ कीं क्षेत्र शरीर जड । क्षेत्रज्ञ त्याचा जाणता, हें उघड । या दोहींचा वियोगही काय अवघड । शव दृष्टांतें प्रत्यक्ष दिसतसे. ॥ १२३१ ॥ कीं क्षेत्राचा जाणता । तो क्षेत्रज्ञ गेला आतां । हें निर्जीव क्षेत्र तत्त्वता । त्या वेगळें हें कळे भलतियातें. ॥ १२३२ ॥ परी तें निर्जीव शव । व्यापुनी असे जो देवाधिदेव । सोनेंची नग ऐसा स्वयमेव । तोची सजीव निर्जीव देहींही. ॥ १२३३ ॥ तोही क्षेत्रज्ञची बिब । की उपाधीचा धरूनी अवलब । क्षेत्रज्ञ चिदश म्हणवी होउनी प्रतिबिंब । मुख्य क्षेत्रज्ञ तो विश्वात्मा. ॥ १२३४ ॥ शवांत नाहीं जीव । परी तो असे क्षेत्रज्ञ देवाधिदेव । त्या क्षेत्रज्ञाचें आणि क्षेत्राचें वियोगविभव । कळे, तरीच कळे वियोगबोध दोघांचा. ॥ १२३५ ॥ की जडही स्वयें सर्वेश्वर । स्त्रीवेष दावी जैसा नर । तो नित्य नट आणि वेष त्याचा नश्वर । ऐसें कळे, तेव्हां हें कळे. ॥ १२३६ ॥ कीं दिसोनी नाहीं देह । आपण आत्माच निःसंदेह । ऐसें पाहे जो विदेह । क्रियाकर्तृत्व मिथ्या तो देखे. ॥ १२३७ ॥ क्षेत्र नाहीं, क्षेत्रज्ञची असे । तेथें क्रियाधर्म कोठे दिसे ? । तथापि मिथ्या होऊनी वसे । मिथ्या शरीरीं. ॥ १२३८ ॥ ऐसें तत्त्व जेव्हां पाहे । तेव्हां सम सर्वत्र तें स्वयें होऊनी राहे । त्यास देहपदवी न साहे । जो क्षेत्रसत्यत्व पाहे वेगळें. ॥ १२३९ ॥ पाहे सर्व मिथ्या म्हणोनी । तथापि वेगळा आपण त्यापासूनी । द्रष्टा सूर्य होऊनी । पाहे मिथ्या जळाभासाते. ॥ १२४० ॥ कळतां ऐसा सर्वात्मयोग । तुटे क्षेत्रक्षेत्रज्ञसयोग । पाहे ऐसा क्षेत्रक्षेत्रज्ञवियोग । तोची, जो समदृष्टि सर्वत्र पाहे ईश्वरातें. ॥ १२४१ ॥ या अर्थी हा श्लोक । बोले उत्तमश्लोक । आणि त्याचाच करुणावलोक । कीं कळे अर्थ ये रीती. ॥ १२४२ ॥ कीं सम सर्व भूतीं । जो ईश्वर जगत्पती । त्यातें समची पाहे जो सुमती । तोची पाहे. ॥१२४३॥ चराचर भूतांचा पसर । या नश्वरा तरगीं अविनाशी सागर । सम सर्व भूती ऐसा सर्वेश्वर । सम पाहे, तोची पाहे. ॥ १२४४ ॥ म्हणिजे क्षेत्रक्षेत्रज्ञसयोग । यास्तव भलते योनींत देहयोग । तेव्हां जो पाहे त्याचा वियोग । तो न पावे जन्म पुन्हा. ॥ १२४५ ॥ तरी ऐसा क्षेत्रक्षेत्रज्ञवियोग । तोची

पाहे म्हणे श्रीरंग । जो क्षणभंगुरा जडीं अभंग । समदृष्टि पाहे त्या ईश्वरातें. ॥ १२४६ ॥ सम सर्वभूतीं सर्वेश्वर । समदृष्टि त्यास पाहे जो नर । तोची पाहे म्हणूनी वदता सर्वेश्वर । सूचवी सगुणभक्ति ज्ञानियाची. ॥ १२४७ ॥ की परमेश्वर तोची जो सगुण । तो न म्हणवे निर्गुण । सगुणत्वाची निर्गुणीं हे खूण । की सर्वज्ञत्व आणि कल्पकत्व सृष्टीचे. ॥ १२४८ ॥ त्यासही नसे आकार । सगुण होऊनीही निराकार । येविषयीं प्रमाणे अपार । विना चक्षु पाहे श्रुति म्हणे. ॥ १२४९ ॥ नेत्रांवांचूनी पाहे । कर्णांवांचूनी ऐकताहे । पाहे आयके तो न साहे । निर्धर्म निर्गुणत्व. ॥ १२५० ॥ आतां पद्मनाभादि आकार । ते अवघे या सगुणाचे अवतार । तेही कल्पूनी कल्पी जगदाधार । चराचर भूतातें. ॥ १२५१ ॥ नट दावी नारीपण । त्या नारीपणीं तोची आपण । ऐसें हें चराचर त्रिगुण । शुद्ध तत्त्वोपाधि परमेश्वर तोची कल्पी. ॥ १२५२ ॥ त्या कल्पित भूती । चिदंश त्याचेची प्रतिबिंबती । ते अविद्येनें अभिमानिती । साहंकार त्या सूतांतें. ॥ १२५३ ॥ तो क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग । यास्तव नाना शरीराचे योग । त्या क्षेत्रक्षेत्रज्ञाचा पाहे वियोग । न पावे देह तो पुन्हा. ॥ १२५४ ॥ तरी ऐसें पाहे कवण ? । ऐसे भुकेले श्रोतयांचे श्रवण । म्हणोनियां पूर्वोक्त भक्तीची आठवण । देऊनी म्हणतो कीं तो पाहे. ॥ १२५५ ॥ जो समदृष्टि त्या परमेश्वरातें । पाहे कीं व्यापून आहे सर्व भूतें । नश्वरीं त्या अविनाशियातें । तरंगांत सिंधु पाहे ये रीती. ॥ १२५६ ॥ एवंच जो परमेश्वरातें पाहे । तो निर्गुणतत्परची म्हणणें न साहे । कीं निर्गुणोपासक न लाहे । परमेश्वरा सगुणाचें पाहणें. ॥ १२५७ ॥ या गीतेमध्यें सर्वत्र । भक्तची वर्णी कमलनेत्र । जे सेविती निर्गुण मात्र । प्रसंगे वर्णी तयातेंही. ॥ १२५८ ॥ जे निर्गुणोपासक ज्ञानी । ज्ञानी भक्त थोर थोर त्यांहीहुनी । भक्त ऐसें समत योगवित्तम म्हणोनी । भक्तमहिमेनिमित्त वर्णी तयातें. ॥ १२५९ ॥ असो तें बोलणें जालें । प्रमेय प्रस्तुतीं हेंची आलें । कीं चित्त समदर्शनीं ज्याचें निमालें । तोची पाहे. ॥ १२६० ॥ तरी काय पाहे म्हणोनी । पाहतां पूर्वसंगतीवरूनी । देहमात्र पावणें संयोगेकरूनी । क्षेत्रक्षेत्रज्ञ या दोघांच्या. ॥ १२६१ ॥ तेव्हां दोघांचा वियोग । पाहतां तुटे हा अनादिसंयोग । ज्या संयोगें कर्मभोग । नानादेहीं. ॥१२६२॥ तरी तोची योग कोण पाहे । येथें ऐसी प्रश्नापेक्षा होत आहे । म्हणोनी हें पाहणें म्हणावें तो लाहे । कीं जो पाहे सर्वत्र परमेश्वरातें. ॥ १२६३ ॥ जो ऐसें पाहे, तोची पाहे । म्हणोनी भगवत बोलताहे । तरी

या पाहण्याची टीका हे। कीं पाहे वियोग क्षेत्रक्षेत्रज्ञांचा. ॥ १२६४ ॥ कीं ससार जेव्हां पाहतां सयोग। मोक्ष तेव्हां पाहतां वियोग। तरी जो पाहे जगीं भगवद्योग। तोची पाहे म्हणजे पाहे वियोग या दोहींचा. ॥ १२६५ ॥ अत एव जो ऐसें ईश्वरातें न पाहे। तो आत्मघात आपला करिताहे। कीं ऐसें पाहतां न लाहे। जन्ममरणातें पुनःपुन्हा. ॥ १२६६ ॥ की ऐसें न पाहे जोंवरी। वियोग क्षेत्रक्षेत्रज्ञाचा न देखे तोंवरी। या क्षेत्रीं ऐसें न पाहे, तो करी। आत्मघात. ॥ १२६७ ॥ तरी तोची आत्मघातपरिहार। जो क्षेत्रक्षेत्रज्ञविवेक निर्धार। ऐसें पाहे तोची नर। जो सर्वभूतीं देखे ईश्वरातें. ॥ १२६८ ॥ एव नव्हे तोची आत्महत्यारा। जो सर्व भूतीं देखे सर्वेश्वरा। म्हणोनी आतां या प्रकारा। बोलतसे या श्लोकी. ॥ १२६९ ॥

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्॥ २८॥**

सर्वत्र सम ईश्वर। त्यास समदृष्टि जो पाहे नर। नाहीं करीत तोची चतुर। घात आपला. ॥ १२७० ॥ की क्षेत्रक्षेत्रज्ञसयोग। करी जन्ममरणाचा योग। मृत्यु चुके पाहतां दोहीचा वियोग। तो तो पाहे जो सर्वत्र पाहे ईश्वरातें. ॥ १२७१ ॥ म्हणूनी सम सर्वत्र परमेश्वर। त्यातें पाहे जो तत्पर। आत्मघात न करी तोची नर। परम गतीतेंची तो पावे.॥ १२७२ ॥ जो बुडे तरणोपायाविण। त्यातें आत्मघाती म्हणती प्रवीण। मनुष्यदेह नौका सुलक्षण। पावोनी न तरे तरीच आत्महत्यारा. ॥ १२७३ ॥ मनुष्यदेहींच तरणें। आणि मनुष्यदेहकर्मैंची जन्ममरणे। येथें तराया आळस करणें। तें दाटूनी बुडणें आत्महत्या. ॥ १२७४ ॥ तरी या नावेसी नावपण। यानेंची कीं सर्वत्र पाहणें स्वात्मखूण। तरणोपाय ऐसा करी निपुण। घात तोची न करी आपुला. ॥ १२७५ ॥ जो ऐसें पाहे। तो परम गतीतेंची पावताहे। तोची एक फल न लाहे। क्षेत्रक्षेत्रज्ञसयोगाचें. ॥ १२७६ ॥ आतां पूर्वश्लोकी श्रीपती। म्हणे **'यः पश्यति स पश्यति'**। तोची नव्हे आत्मघाती। म्हणूनी या श्लोकीं तोची वदे. ॥ १२७७ ॥ एवच **पश्यति** म्हणजे तोची ऐसें पाहे। कीं क्षेत्रक्षेत्रज्ञ वियोग सर्वदा आहे। तो मृत्यूपासूनी सुटतां न लाहे। आत्मघातकपण. ॥ १२७८ ॥ कीं संयोग जडचैतन्याचा। करी कर्ममार्ग अवघा सफल साचा। त्या कर्में भोग नानादेहांचा। मृत्यु लागलाच प्रतिदेहीं. ॥ १२७९ ॥ हें क्षेत्रक्षेत्रज्ञसयोगें घडे। तेव्हां त्याच्या वियोगेंची क्विडे। तो वियोग ठायीं पडे। सर्वत्र ईश्वर पाहतां. ॥ १२८० ॥ आत्म-

हत्या क्रमें । चुकविली ऐसी **त्रिविक्रमें** । परी नानाजन्म होती पराक्रमें । कर्माचिया. ॥ १२८१ ॥ तें कर्म जों शरीर । लागलें जरी ज्ञानगभीर । या कर्मांची प्रतिक्रिया **यदुवीर** । बोलिलाही या प्रसगीं. ॥ १२८२ ॥ की जों **क्षेत्रक्षे**त्रज्ञसयोग । त्याची प्रतिक्रिया त्याचा वियोग । तैसाच सयोगामुळें कर्मभोग । प्रतिक्रिया त्याची न बोलिली. ॥ १२८३ ॥ म्हणोनी झणीं ऐसें यानिमित्त । शंकित होय **पार्थ**चित्त । म्हणोनी निष्किचनाचे वित्त । **भग**वंत हेंही बोलतो या श्लोकीं. ॥ १२८४ ॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥**

अगा! क्रियमाणें कर्मे । घडती सर्वही **प्रकृ**तिधर्में । ऐसें पाहोनियां वर्मे । अकर्ता **आ**त्मा म्हणोनी आपणातें पाहतो. ॥ १२८५ ॥ परी कर्मे करी ते **प्रकृ**ती । आणि **आ**त्मा अकर्ता ये रीती । दोन्ही पाहे सुमती । तरीच अकर्तेपण ठसावे तें. ॥ १२८६ ॥ या अर्थाते दावुनी । **'तथात्मानमकर्तारं स पश्यति'** म्हणोनी । **तथा**शब्देंकरूनी । **यथा**शब्दही बोलिला न बोलतां. ॥ १२८७ ॥ कीं जेथें **तथा** । तेथें आहेची **यथा** । हे व्याकरणरीति सर्वथा । सशय नसे. ॥ १२८८ ॥ एव अर्थ ऐसा । **प्र**कृतीच कर्त्री म्हणोनी जैसा । पाहे तो **आ**त्मा अकर्ता म्हणोनीही तैसा । तोची पाहतो. ॥ १२८९ ॥ जो कर्तृत्व **प्रकृ**तीचें पाहतो । तैसें पाहतो अकर्तृत्व **आ**त्मयाचेही तो । **दे**व येथें ऐसें सूचवितो । की हीं दोन्ही पाहे तरी अकर्ता. ॥ १२९० ॥ कीं कर्तृत्व पाहणें **प्रकृ**तीचें । हेही **प्रकृ**तिसत्त्वयोगेची साचे । प्रकाशकत्व मात्र त्याही सत्त्वाचें । तो सत्तामात्र **आ**त्मा म्हणूनी जो पाहे. ॥ १२९१ ॥ तोची देखे अकर्तृत्व । अन्यथा कर्तृत्व **प्र**कृतीचे पाहणे हेंही कर्तृत्व । म्हणोनी सूचविलें ऐसें तत्त्व । की साक्षित्व धर्मापरताही पहावा **चि**दात्मा. ॥ १२९२ ॥ सत्त्ववृत्ती **चि**न्मय । **आ**त्मा अनुभवी ऐसा **श्रु**तिनिर्णय । तेव्हां ते वृत्ति आणि **आ**त्मा अद्वय । एव अकर्ती तेव्हां ते वृत्तिही. ॥ १२९३ ॥ ऐसें अकर्तेपण । पाहेल तोची निपुण । जो **क्षे**त्रसर्पावेगळी खूण । पाहे रज्जु **क्षे**त्रज्ञ ऐसी आपली. ॥ १२९४ ॥ हे खूणही तोची पाहे । जो **ई**श्वरास सर्व भूती पाहताहे । आत्मघातित्व तो न लाहे । सुटतां मृत्युपासूनी. ॥ १२९५ ॥ अतरीं धरूनी हा भाव । सर्व भूतीं पाहावा **दे**वाधिदेव । म्हणोनी तोची सर्वभूतस्थ **दे**व । बोलिला ऐसें. ॥ १२९६ ॥ या ज्ञानाहीवांचूनी । **क्षेत्रक्षे**-

त्रज्ञवियोगमात्रेंकरूनी । म्हणती सुटों मृत्यूपासूनी । तरी त्यांस ज्ञानची नाहीं म्हणावें. ॥ १२९७ ॥ कीं कळतांची ऐसें सांपडे ब्रह्म । ब्रह्म कळता कळे अकर्तृत्वधर्म । भोक्तया क्षेत्रज्ञास तो सिद्ध भोक्तृत्वधर्म । काय तो अकर्ता म्हणोनी पाहिला जरी. ॥ १२९८ ॥ ऐसें दों श्लोकेंकरूनी । तत्त्व बोलेल येथुनी । त्यांत ब्रह्म कळणें तें ऐसें म्हणोनी । बोलतो या श्लोकीं भगवंत. ॥ १२९९ ॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥**

तेव्हां नाना भूतांचा वेगळा भाव । एका ईश्वरीं देखे ज्ञानियांचा राव । आणि त्याचपासूनी विस्तार म्हणजे उद्भव । पाहे, तेव्हांच तो ब्रह्म पावतो. ॥१३००॥ इतकाच उत्तानार्थ। परी अर्थ बहुत सूचवी समर्थ । तो समजती जे त्याचे कृपेनें कृतार्थ । तरी आतां तो ऐसा. ॥ १३०१ ॥ की ब्रह्म निर्गुण । ब्रह्मची ईश्वर सगुण । ब्रह्मची विश्व त्रिगुण । ऐसें कळेल, तरीच ब्रह्म कळले. ॥ १३०२ ॥ श्रुतीही बोलती निर्गुण ब्रह्म । की **'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म'** । आणि **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** । हेंही श्रुति बोलती. ॥ १३०३ ॥ ऐसेंच सप्तमाध्यायाचे अंती । **'ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं'**[1] म्हणे श्रीपती । की ब्रह्म जाणती आणि ऐसे जाणती । की सर्वही ब्रह्म तें. ॥ १३०४ ॥ चतुर्थी **'तद्विद्धि प्रणिपातेन'**[2] । या श्लोकी, ज्ञान ऐसें जाण म्हणे मधुसूदन । तें ज्ञान कैसें म्हणसी? तरी म्हणे जगज्जीवन । त्या पुढिल्या[3] श्लोकीं उत्तरार्धीं; ॥ १३०५ ॥

श्लोकोत्तरार्धः—**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥**

ज्या ज्ञानें भूतें सकळ । आपणामध्यें देखसी निवळ । मग ऐक्य मजसीं केवळ । तेंची म्हणे चतुर्थी. ॥ १३०६ ॥ म्हणोनी प्रस्तुत । येथें म्हणे भगवत । कीं ब्रह्म पावतो निश्चित । जेव्हां भूतपृथग्भाव एकस्थ देखतो. ॥१३०७॥ आणि त्याचपासूनी । विस्तार भूतांचा म्हणोनी । जाणतो जेव्हां ये रीतीकरूनी । ब्रह्म पावतो तेधवां. ॥ १३०८ ॥ भूतांत पृथग्भाव । एकस्थ पाहतो म्हणे देव । जो एकची सर्वांचा ठाव । तो तों चित्स्वरूप आत्माच आपला. ॥ १३०९ ॥ पृथग्भाव त्या एकीं पाहणें । तें त्या चैतन्याच्या प्रकाशपणें । चैतन्यावांचूनी कोणें । भूतें जाणावीं, प्रकाशावीं? ॥ १३१० ॥ तेव्हां चैतन्य

---

१. अ० ७, श्लो० २९. २. अ० ४, श्लो० ३४. ३. अ० ४, श्लो० ३५.

ततु निपट । भूतपृथग्भाव पट । भूतपृथग्भाव भिन्न घट । एका **चैतन्य**मृत्तिकेमाजी. ॥ १३११ ॥ तेव्हां **चैतन्य**सागर । तरग पृथग्भाव चराचर । जेव्हा ऐसें पाहेल नर । **ब्रह्म** पावला तेधवां. ॥ १३१२ ॥ याच भावे म्हणे **श्री**पती । की **'एकस्थमनुपश्यति'** । अनुपश्यति म्हणजे अनुलक्षेकरूनी ये रीती । अनुभवें पाहतो. ॥ १३१३ ॥ की जगत्प्रकाशक तें **ब्रह्म** । आणि प्रकाश्य जगही तेंची **ब्रह्म** परम । कीं ततूच पट, मातीच घट, हें वर्म । अनुभवा आलें. ॥ १३१४ ॥ की ततूविणें कळेना पट । कळेना मातीवांचूनी घट । कळेना सुवर्णाविण निपट । खूण भलतिया नगाची. ॥ १३१५ ॥ तेव्हां एकची ततु, नाना पट । एकची माती, नाना घट । एकची सोनें, अलकार, तैसें निपट । एकची जडचैतन्यही. ॥ १३१६ ॥ एव जे ज्याचे प्रकाश्य । तें त्याचेची कारण उपादान एक । जे असोनी एकत्वे अनेक । भासे पृथग्भावेंकरूनी. ॥ १३१७ ॥ एवच ऐसें कळता प्रकाशक **ब्रह्म** । जगत्प्रकाशक तेंची, ऐसें कळे वर्म । तेव्हा **ब्रह्म** कळोनीही, कळले सर्व **ब्रह्म** सम । **ब्रह्म** पावला तो म्हणावा तेधवां. ॥ १३१८ ॥ ऐसें **एकस्थ** आणि **अनुपश्यति** । म्हणे या अर्थी **यदु**पती । की एका स्वरूपीं भूते ये रीती । अनुलक्षेकरूनी पाहतो. ॥ १३१९ ॥ ऐसें सर्व **ब्रह्म** कळावया । प्रकाशकत्व सांगे **धनं**जया । याचें दुसरें लक्षणही भक्तराया । सागे **'तत एव च विस्तारं'** म्हणोनी. ॥ १३२० ॥ की त्याचपासूनी भूतांचा विस्तार । म्हणतां कारणपणाचा दुसरा विचार । दाखवी येथें **जगदाधार** । की तरग विस्तार सिंधूपासूनी. ॥ १३२१ ॥ कुडलादि अलंकार । सुवर्णाचपासूनी यांचा विस्तार । आणि डेरे, राजण, घटादि, आकार । विस्तार याचा मातीचपासूनी. ॥ १३२२ ॥ आतां दोंपरी कारण । त्यांत हे उपादानकारणविवरण । कीं कार्य न प्रकाशे ज्याविण । तें **उपादानकारण** म्हणावें. ॥ १३२३ ॥ आतां नगाचा **निमित्तकारण** सोनार । कीं त्याणे केले अलकार । परी तो न राहे विस्तार । सोनाराचमध्ये सर्वदा. ॥ १३२४ ॥ कार्य सोडोनी वर्ते कारण । हें निमित्तकारणाचे विवरण । कारणींच असे, न दिसे त्याविण । हें लक्षण उपादानकारणाचें. ॥ १३२५ ॥ म्हणूनी **'भूतपृथग्भाव एकस्थ'** । ऐसें पूर्वार्धी वदे **हृदयस्थ** । या एका लक्षणे चित्त त्याचे स्वस्थ । **'तत एव च विस्तारं'** मग म्हणे. ॥ १३२६ ॥ परी ज्या उपादानापासूनी । उद्भव बोलिला **'तत एव च विस्तारं'** म्हणोनी । त्या कार्याचा लय त्याच अधिष्ठानीं । आणि स्थितिही, ऐसें बोलावें. ॥ १३२७ ॥ तरी म्हणता जेथूनी

विस्तार ज्याचा । तेथेंची लय न बोलतांही बोलिलाच त्याचा । आणि त्यांतची स्थितीतें स्ववाचा । बोलिलाच म्हणतां एकस्थ. ॥ १३२८ ॥ कीं एकस्थ आणि तत एव जो पृथग्भाव । तो एके सागरीं नाना तरग जेंवी हा भाव । तेंव्हां सागरीच लय जेथें विस्तारलाच उद्भव । **ब्रह्मीं** भूतलय, उद्भवही, ये रीती. ॥ १३२९ ॥ एवं कार्य उपजे कारणापासूनी । लय तेथेंची असे म्हणोनी । त्या कार्यकारणास ऐक्य या न्यायेंकरूनी । ऐसीं **ब्रह्मीं** भूतें बोलिलीं. ॥ १३३० ॥ आतां ऐसेंही कळे । आणि चित्त चित्स्वरूपीं न वळे । तरी ते पूर्वसंस्कारें खवळे । **ब्रह्म** पावला म्हणावा तो कैसा ? ॥ १३३१ ॥ एवच असें पाहे । तेंव्हां तेंची होऊनी राहे । म्हणूनी **देव** बोलताहे । **'ब्रह्म संपद्यते तदा'** म्हणोनी. ॥ १३३२ ॥ **संपद्यते** म्हणिजे ऐसें कीं तो । बरविया प्रकारे पावतो । परी तेंव्हां, कीं जेंव्हां अनुभवें पाहतो । पृथग्भाव एकस्थ. ॥ १३३३ ॥ आता ऐसें अनुभवे पावे **ब्रह्म** । तो आत्माच आपला निर्धर्म । तेंव्हां सांपडे स्वअकर्तृत्व-अलिप्तत्ववर्म । म्हणूनी बोलतो हा श्लोक. ॥ १३३४ ॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥**

अगा ! **पार्था** ! अनादित्वास्तव । आणि निर्गुणत्वास्तव वास्तव । शरीरस्थही म्हणे **देव** । करीत नाहीं, होत नाहीं लिप्तही. ॥ १३३५ ॥ हा अव्यय परमात्मा शरीरी । अनादिपणें निर्गुणपणें कांहींच न करी । की सर्वा गुणां आदि त्याचपासूनी परी । तो निर्गुण, अकर्ता, अलिप्त. ॥ १३३६ ॥ ज्यास आदि तें त्रिगुण । त्रिगुणींच कर्तेपण । जो अनादि, तो निर्गुण । करणेंची सर्वथा घडेना तयाला. ॥ १३३७ ॥ आतां **क्षेत्रज्ञ** **चिद**श देही । उपाधीवांचूनी कर्ता नव्हे तोही । परी भोगितो सर्व कांहीं । लिप्त उपाधियोगें होतसे ऐसा. ॥ १३३८ ॥ हा अनादि निर्गुण, परी । व्यापूनी असे त्या शरीरीं । म्हणूनी म्हणावा की कांहीं जरी न करी । लिप्त होतसेल जैसा क्षेत्रज्ञ, ॥ १३३९ ॥ तरी तो लिप्त होतो जैसा । हा निर्गुण अनादि लिप्त होत नाहीं तैसा । म्हणूनी संदेह निरसिला ऐसा । की **'न करोति'** म्हणूनीही, **'न लिप्यते'** म्हणतसे. ॥ १३४० ॥ कांही न करी या बोले । अलिप्तत्व आपणची आलें । ऐसे असोनीही बोलणें लागलें । **'न लिप्यते'** म्हणूनी याकरितां. ॥ १३४१ ॥ आणि **'शरीरस्थोपि'** म्हणोनी । **'न लिप्यते'**

म्हणे यावरूनी । शरीरस्थ एक लिप्त होतो स्वयें न करोनी । तैसा हा नव्हे, कीं लिप्तही होत नसे. ॥ १३४२ ॥ एवं अकर्ता, अलिप्त, आत्मा आपला । तो अनादि निर्गुण बोलिला । यालागीं जो सर्वभूतीं पाहे त्याला । तोची पाहे म्हणूनी बोलिलों ये रीती. ॥ १३४३ ॥ कीं आपली अकर्तृता । तोची देखेल तत्त्वता । जो क्षेत्रक्षेत्रज्ञभिन्नता । स्वयें पाहे. ॥ १३४४ ॥ अन्यथा क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग । यास्तव भलता देहयोग । म्हणूनी त्याचा कळतां वियोग । कळे आपली अकर्तृता. ॥ १३४५ ॥ तो आपण सर्वभूतीं अनादि निर्गुण । जो चिदात्मा ईश्वरोपाधियोगें सगुण । त्यास पाहे तोची निपुण । न करी आत्मघात, कीं मुक्ति मृत्यूपासूनी पावतो. ॥ १३४६ ॥ ऐसें मागें बोलिलें । तें स्पष्ट येथें सिद्ध झालें । अकर्तृत्व, अलिप्तत्व, आत्मयासि आलें । जो अनादि निर्गुण परमात्मा. ॥ १३४७ ॥ आतां क्षेत्रज्ञ कां लिप्त ? । आणि अनादि, निर्गुण, आत्मा कां अलिप्त ? । आणि देहीं अलिप्त कैसा ? हेंही अतिगुप्त । दृष्टांतमुखें सुचवितो या श्लोकीं. ॥ १३४८ ॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥**

जैसा सर्वगत आकाश । लिप्त नव्हे कोठे लेश । तैसा सर्वत्र सर्वदेहीं सावकाश । तो आत्मा लिप्त नव्हे. ॥ १३४९ ॥ जैसा आकाश सर्वगत । तैसा लिप्त नव्हे म्हणे भगवंत । या भावें कीं जळीं अवकाश जो प्रतिबिंबित । तो जळसंगें हालतां लिप्त दिसे. ॥ १३५० ॥ तो क्षेत्रज्ञ एक देहस्थित । न म्हणवे तो सर्वगत । कीं दिसे प्रतिबिंबित । जळाची पुरता. ॥ १३५१ ॥ जें सर्वगत नभ । सर्वा घटीं स्वयंभ । हालतां सजळ कुंभ । न हाले ऐसें अलिप्त तें. ॥ १३५२ ॥ अलिप्त सूक्ष्मत्वास्तव । परी सर्वगत वास्तव । लिप्त नव्हे यास्तव । कीं एक देहीं सूक्ष्मत्वेंही अलिप्त तें. ॥ १३५३ ॥ सूक्ष्मत्वास्तव अलिप्त अत्यंत । तें तेंची, जें सर्वगत । तैसा चिदात्मा सर्वत्र जो भगवंत । तोची अलिप्त आणि लिप्त एकदेशी जीवात्मा. ॥ १३५४ ॥ कीं एकची घट जलमात्रीं दिसे । प्रतिबिंबात्मा देहींच एका वसे । लिप्तत्व याचें गवसे । सुखदुःख भोगीं. ॥ १३५५ ॥ एव ज्याला अनादित्व । आणि ज्याला निर्गुणत्व । त्या सर्वगतास अलिप्तत्व । तेव्हां अकर्तृत्वही तयातें. ॥ १३५६ ॥ कीं पूर्वश्लोकीं नारायण । अनादित्व आणि निर्गुणपण । अकर्तेपणास अलिप्तपणास कारण । नेमूनी बोलिला. ॥ १३५७ ॥ आतां लिप्त नव्हे, न करी

क्रिया। तथापि देह जड, तया। प्रकाशी, तेव्हां अक्रिया। हे क्रिया तों लागली. ॥ १३५८ ॥ ऐसाही येथें पूर्वपक्ष। करीलच श्रोता दक्ष। म्हणोनी याचा परिहार जलजाक्ष। दृष्टांतें करितसे या श्लोकीं. ॥ १३५९ ॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

अगा! एकची भास्कर। प्रकाशी लोक सचराचर। क्षेत्रासी तैसा क्षेत्रज्ञ निरंतर। प्रकाशितो अगा! भरतवंशोत्पन्ना! ॥ १३६० ॥ तरी सूर्याच्या प्रकाशें लोक। करिती पाप आणि पुण्यही पुण्यश्लोक। दोन्ही गोष्टींस अवलोक। सूर्याचीकरितां. ॥ १३६१ ॥ परतु लिप्त तो होईना। अगा! पाहे भरतवशोत्पन्ना! । प्रकाशूनी सर्वा रूपां नाना । स्वयें अकर्ता अलिप्त. ॥ १३६२ ॥ आतां समाप्तिश्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञलोक। परिसोत आधी. ॥ १३६३ ॥ मागें क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगेंकरूनी। क्षेत्रज्ञास देह भलता म्हणोनी। बोलतां, त्या दोघांच्या वियोगे मोक्ष म्हणोनी। सिद्ध जालें. ॥ १३६४ ॥ तरी कोण पाहे ये रीती? । ऐसें पुसे, तों श्रीपती। म्हणे सम परमेश्वर सर्वभूतीं। त्यातें पाहतो, तो पाहतो. ॥ १३६५ ॥ कीं सर्वा भूतीं सम। तो पाहतां सर्वोत्तम। उडे क्षेत्र जडाचा आणि त्याचा संगम। रज्जु पाहतां सर्प जैसा. ॥ १३६६ ॥ जो ये रीतीं पाहे। तोची क्षेत्रक्षेत्रज्ञवियोगदर्शन लाहे। म्हणोनी ये रीती गीता हे। टीकाकारांस सुचवी; ॥ १३६७ ॥ कीं अनादि निर्गुण। त्यातेंची अकर्त्तेपण, अलिप्तपण, । म्हणोनी बोलिला आपण। जगद्गुरु या प्रसंगीं. ॥ १३६८ ॥ एवं क्षेत्र हा एक देह याला। आणि याचें सुखदुःख भोगी त्याला। वेगळे पाहेल ऐसियाला। वियोग क्षेत्रक्षेत्रज्ञाचा न सांपडे. ॥ १३६९ ॥ अज्ञानें रज्जुसर्पसंयोग। रज्जुज्ञानें दोहींचा वियोग। म्हणोनी सर्व भूतीं म्हणे श्रीरग। पाहे परमेश्वरातें, तोची पाहे. ॥ १३७० ॥ तेंची प्रकरण। येथवरी बोले जगद्वंद्यचरण। कीं जो अनादि, निर्गुण, । तोची न करी, लिप्तही नव्हे. ॥ १३७१ ॥ एवच जो ऐसा अनादि, अलिप्त, अकर्ता, । त्याच क्षेत्रज्ञाची येथें वार्ता। म्हणोनी हेंची शेवटीं विश्वभर्ता। अध्यायोक्त अर्थ फलसहित बोलतो या श्लोकीं. ॥ १३७२ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥**

क्षेत्रक्षेत्रज्ञ या दोहींमध्यें अतर। जे ज्ञानदृष्टी पाहती नर। आणि भूत-

प्रकृति मोक्ष जाणती चतुर । परमपदातें ते पावती. ॥ १३७३ ॥ अर्थ इतकाच परी । विशद नव्हे जोंवरी । श्रोते न पावती तोंवरी । समाधान. ॥ १३७४ ॥ **क्षेत्रक्षेत्रज्ञांत अतर** । एवंप्रकारे म्हणे **सर्वेश्वर** । आणि ज्ञान-दृष्टीकरूनी जाणती नर । यांत प्रकरणार्थ सुचवी. ॥ १३७५ ॥ **एवं** म्हणिजे याप्रकारें । अतर दोहींचे जाणती बरे । कीं प्रस्तुतीं म्यां **सर्वेश्वरे** । बोलिलें जे रीती. ॥ १३७६ ॥ कीं अनादित्वास्तव । आणि निर्गुण यास्तव । अलिप्त म्हणतां वास्तव । **ब्रह्माची** अकर्तात्मपणें वर्णिले. ॥ १३७७ ॥ आणि **प्रकृतीच** करिते कर्म । ऐसें पाहे, तेव्हां अकर्ता निर्धर्म । **आत्मा** आपला देखे म्हणोनी हें वर्म । बोलता जाला यामागें. ॥ १३७८ ॥ तो **प्रकृतीवेगळा क्षेत्रज्ञ** । **प्रकृति क्षेत्र** बोले सर्वज्ञ । ऐसें अतर दोहींचें जाणती अभिज्ञ । ते परमपद पावती या श्लोकी. ॥ १३७९ ॥ तत्त्व ऐसें म्हणोनी । म्हणे ज्ञानचक्षूकरूनी । पाहती, तेव्हां यावरूनी । सर्वात्मत्वदृष्टीच ज्ञानचक्षु. ॥ १३८० ॥ चतुर्थाध्या-यांत आपण । बोले सांगतां ज्ञानलक्षण । कीं **"येन भूतान्यशेषेण । द्रक्ष्य-स्यात्मन्यथो मयि"** म्हणोनी. ॥ १३८१ ॥ क्षेत्रज्ञ भोक्ता क्षेत्रावेगळा । पाहणे, नव्हे हा ज्ञानाचा डोळा । आपणांत भूतसमुदाय सगळा । पाहणें हा ज्ञानचक्षु. ॥ १३८२ ॥ या ज्ञानचक्षूकरूनी । वियोग जडचैतन्याचा पाहती ते, ऐसे म्हणोनी । **एवंशब्दे** वदोनी । परमपद पावती ते म्हणे. ॥ १३८३ ॥ आणि जे भूतप्रकृती । मोक्ष तीपासूनीही जाणती । ते परमपदातें जाती । ऐसें म्हणे. ॥ १३८४ ॥ भूतप्रकृतीपासूनी मोक्ष । त्या नांव **भूतप्रकृति-मोक्ष** । पूर्वसंस्कारापासूनी जे दक्ष । सुटका जाणती, ते पावती अर्थ ऐसा. ॥ १३८५ ॥ रज्जुसर्पाचा योग । तैसा **क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोग** । रज्जूचा आणि सर्पाचा वियोग । अतर **क्षेत्रक्षेत्रज्ञाचे** ये रीती. ॥ १३८६॥ ऐसें जे जाणती। ते परमपदातें पावती । म्हणोनी बोलतां **जगत्पती** । शब्दज्ञानीच श्रोता होईल. ॥ १३८७ ॥ कीं गुरुमुखें हे कळे । आणि चित्त **चिन्मयत्वीं न** वळे । तो निश्चयेंसी खवळे । विषयभोगीं. ॥ १३८८ ॥ मग **अध्यात्माची** बडबड । शब्दज्ञानानें करी लडबड । अनुभवीं म्हणावें ऐसी तडफड । तत्त्व जाणोनीही होय ऐसा. ॥ १३८९ ॥ जों ध्यानाभ्यासें अनुभव । दृढ नव्हे, तोंवरी पुन-र्भव । ऐसियासी कैचें वैभव[१] । की पावे परमपदातें. ॥ १३९० ॥ तेव्हां अपुनरावृत्तिस्थान । की बिंबे हें ज्ञान । तें बिंबे, करितां ध्यान । **चित्समु-द्रदृष्टी** चराचरतरगांचें. ॥ १३९१ ॥ तेव्हा जडत्वसंस्कार । मोडे, ध्यातां

१. अ० ४, श्लो० ३५.

ऐसें वारवार । साकारीं दिसे एक निराकार । तो म्हणावा **मोक्ष भूतप्रकृतीपासूनी.** ॥ १३९२ ॥ ही जडें म्हणोनी भूतीं । दृष्टी पडे हे अनादि भूतप्रकृती । कीं हीं भूतें म्हणोनी मती । इतकेंची पाहे. ॥ १३९३ ॥ जरी जालें ज्ञान । कीं विवर्त नाहींच, आहे अधिष्ठान । तथापि न घडे जों ध्यान । तों भूतप्रकृति पूर्वसस्कार न सुटे. ॥ १३९४ ॥ त्यांत भूतप्रकृतीपासूनी । मोक्ष जाणती म्हणोनी । भगवत बोले यावरूनी । जडत्वसंस्कारापासूनी सुटो जाणावें. ॥ १३९५ ॥ जे **चिद्रूपें** जडा जगातें ध्याती । ते जडत्वसंस्कारापासूनी सुटती । ते भूतप्रकृतिमोक्षही जाणती । अर्थ ऐसा. ॥ १३९६ ॥ एवंच व्यतिरेकअन्वयज्ञान । आणि **चिद्रूपें** जड चराचरध्यान । या दोहींपरी पावती समाधान । तेंची पावती परमपदातें. ॥ १३९७ ॥ ऐसा तेरावा अध्याय । **धर्मामृत** हें म्हणोनी भगवताचा अभिप्राय । कीं **प्रकृति** धर्म आणि **पुरुष** अद्वय । तो अमृत, म्हणोनी धर्मामृत हें ऐसें. ॥ १३९८ ॥ **क्षेत्र**ची **प्रकृती** । ते **क्षेत्रज्ञ** कनकाची आकृती । दोन्ही मिळोनी एक ऐसें ध्याती । पूर्वोक्त भक्त धर्मामृतोपासक. ॥ १३९९ ॥ ऐसी त्रयोदशाध्यायटीका । जी म्हणावी **यथार्थदीपिका** । ते समर्पिली **शेषपर्यंका** । **वामन** म्हणे. ॥ १४०० ॥

---

## अध्याय चवदावा.

जय जय जगन्नायक ! । जय जय निजबोधदायक ! । जय जय मुनिवृंदसिद्धिविधायका ! । सद्भक्तिमूर्ते ! ॥ १ ॥ जय जय **वैकुंठ** ! **वैकुंठपद** ! । जय जय सद्भक्तसत्पदप्रद ! । जय जय बुधभक्तवद्यपद ! । **मुकुंद** ! सद्वृंदपते. ! ॥ २ ॥ जय जय महज्जगज्जननीपते ! । जय जगज्जनकसद्गते ! । जय जय नित्यमुक्तिमते ! । स्थिरचरपते ! **श्री**पते ! श्री**कृष्ण** ! ॥ ३ ॥ जय जय त्रिगुणरहित ! । जय जय गुणातीत ! । जय जय गुणप्रतीत ! । कारुण्यनिधे ! ॥ ४ ॥ जय जयाज्ञानेंधमन[1] ! । जय जय त्रिगुणसंतापशमन ! । जय जयाशेष ! **शेषशयन** ! । कमलनयन ! दीनबंधो ! ॥ ५ ॥ करूनी ऐसें तुझें ध्यान । चतुर्दशाध्यायांत जें ज्ञान । तूं स्वयें वदसी व्याख्यान । करीन त्याचें तूंची कर्ता. ॥ ६ ॥ तू सर्व, तूं सर्वकर्ता, । तूं विश्व, तू विश्वभर्ता, । मी तू आणि मीतूपणाची वार्ता । **देवाधिदेवा** सर्व तू ॥ ७ ॥ आतां जे श्रोतेजन । मूर्ति तुझ्या

---

१. अविद्येचें भस्म करणाऱ्या !

सज्जन । त्यांसी बोलतों हेंही भजन । तुझें म्हणोनी. ॥ ८ ॥ अहो द्वादशाध्यायाचे अंतीं । **हें धर्म्यामृत** म्हणे लक्ष्मीपती । विशद तेंची अर्जुनाप्रती । त्रयोदशीं बोलिला भगवत. ॥ ९ ॥ कीं प्रकृतिभाग तितकाही धर्म । पुरुष निर्गुण निर्धर्म । धर्मामृताचें हें वर्म । क्षेत्रक्षेत्रज्ञनामें बोलिला. ॥ १० ॥ त्या ज्ञानाचें फल । बाविसावे श्लोकी घननीळ । बोलतां बोलिला कीं ऐसा पुरुष केवळ । आणि प्रकृति गुणसहित जो जाणे, ॥ ११ ॥ तो सर्वथा सर्व प्रकारेंकरूनी । वर्तला प्रवृत्तीतें धरूनी । तरी हें ज्ञान जाणे म्हणोनी । पुन्हा गर्भवासा तो ये ना. ॥ १२ ॥ **'य एवं वेत्ति पुरुषं'**[1] या श्लोकेंकरूनी । **'प्रकृतिं च गुणैः सह'** म्हणोनी । बोलिला ऐसें त्यावरूनी । प्रकृतिगुणभेद जाणावे. ॥ १३ ॥ ऐसें तेथें सिद्ध जालें । परतु अर्जुनातें स्मरण नाहीं राहिलें । कीं प्रकृतीच्या अलंकारीं प्रत्यया आलें । चैतन्यकनक. ॥ १४ ॥ पुरुष दिसे प्रकृतीवेगळा । तों अतर्बाह्य तोची सगळा । प्रकृतीच्या जडा तरंगां सकळां । ज्ञानानंदसिंधु पुरुषची दिसे. ॥ १५ ॥ बोध ऐसा ठसावला । अर्जुन अनुभवातें पावला । पोवडा[2] पाय ऐशा समयात फावला । ब्रह्मविद्येचा उपदेश. ॥ १६ ॥ बाण सुटती सणसणा । शस्त्रे वाजती खणखणा । मदगजघंटा घणघणा । दोहीं दळीं वाजती. ॥ १७ ॥ बाप करुणासिंधु हरी । उपदेश ऐशा काळीं करी । समय ऐसा युद्धाचा परी । श्रवण होतांच अनुभव बाणला. ॥ १८ ॥ प्रकृति कळली, पुरुष कळला । बोध तत्काळची तो फळला । कीं पुरुषची तंतुदृष्टी कवळला । पट चराचरप्रकृतीचा ॥१९॥ आतां प्रकृतीचे गुण । त्यांची पुसावी खूण । कीं स्वयें बोलिला सर्वज्ञ निपुण । **'य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह'** म्हणोनी. ॥२०॥ तें पुसणे विसरला । अर्जुन अनुभवीं भरला । द्वैतभाव निःशेष सरला । पुसावें काय? हें न कळे. ॥ २१ ॥ होतां गुरुकृपा । अनुभव तत्काळ वाटे सोपा । परतु प्रारब्धें पुण्यपापा । भोगितां गुण खवळती. ॥ २२ ॥ जरी ज्ञानी जाला । प्रारब्ध सहसा न सोडी त्याला । तेव्हां गुणांच्या वृत्ती न कळती ज्याला । त्यास वचिती त्रिगुण ते. ॥ २३ ॥ ऐसेंची तृतीयाध्यायांत । **'सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि'**[3] म्हणे भगवंत । कीं प्रकृति प्रारब्धरूपिणी अत्यंत । क्षण एक ज्ञानियासही नाचवी. ॥२४॥ तेथें त्रिगुणवृत्तिविवेक । जाणे तोची एक । गुणवृत्तीवेगळा पाहे सविवेक । आत्मयातें. ॥ २५ ॥ प्रारब्धाचें क्षेत्र । भोक्ता

---

१. अ० १३, श्लो० २३. २. पांगळा. ३. अ० ३, श्लो० ३३.

क्षेत्रज्ञ अंशमात्र । कीं चैतन्यावांचूनी जड गात्र । जड मन, जड सर्व इत्यादि. ॥ २६ ॥ आणि कळला आत्मा सर्वगत । त्यास तों भोग न घडे निश्चित । ऐसें जाणे तो जाणे गुह्य अत्यत । की भोक्ता क्षेत्रज्ञ अश त्याचा. ॥ २७ ॥ भोगकाळीं भोगीं प्रवृत्ती । तेथें न पाहतां गुणाच्या वृत्ति । न थारे साधकाची निवृत्ती । अविद्याची ते अवघे अविद्यासंस्कार. ॥ २८ ॥ भोगणे प्रारब्धफळ । तें अविद्येचेंची कर्म अमगळ । ज्ञान जालें तरी सुमगळ । मोह उपजे ते वेळे. ॥२९॥ **'सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि'** म्हणोनी । भगवंत याचवरूनी । तेथें प्रकृतिगुणभेददृष्टीचकरूनी । भोगूनी अभोक्ता ज्ञानी, अकर्ता. ॥ ३० ॥ यालागीं गुणप्रकृतिभेद । न कळतां उपजे भोक्तृत्वखेद । ज्यास अनुभवा आला अभेद । सर्वगत स्वरूपासीं. ॥ ३१ ॥ प्रारब्धें भोगी प्रवृत्ती । तेथें साक्षी होऊनी लक्षी गुणाच्या वृत्ती । तों त्या प्रवृत्तींतही निवृत्ती । सांपडे तया. ॥ ३२ ॥ कीं प्रारब्धही प्रकृतिधर्म । **'बुद्धिः कर्मानुसारिणी'** हें वर्म । ते बुद्धि, इद्रिये, भोगकर्म, । सर्वही प्रकृति; आपण अकर्ता; हें पाहे. ॥ ३३ ॥ आणि भोग प्रत्यया आला । तो जाणे, कीं हें भोक्तृत्व आपल्या प्रतिबिबाला । भोगूनीही अभोक्ता म्हणावें तयाला । आणि अकर्ता करूनिही. ॥ ३४ ॥ विचार ऐसा म्हणोनी । **'य एवं वेत्ति पुरुषं'** या श्लोकेंकरूनी । **'प्रकृतिं च गुणैः सह'** ऐसें बोलोनी । सुचविले कीं भोक्ता पुरुष प्रकृतिगुणही कळावे. ॥ ३५ ॥ दुसरिया श्लोकी **'क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि'** । म्हणूनी पूर्वीच शिकविली हे बुद्धी । कीं क्षेत्रज्ञ तो ज्यास भोगसिद्धी । तोही मीच, ऐसें जाण तू. ॥ ३६ ॥ प्रकरणाचे शेवटीं **'य एवं वेत्ति'** हा श्लोक । बोलिला उत्तमश्लोक । कीं प्रकृतीच्या गुणांसहित विवेक । प्रकृतिपुरुषांचा जाणावा. ॥ ३७ ॥ आणि **'य एवं वेत्ति पुरुषं'** म्हणे । कीं ऐसें जो पुरुषातें जाणे । तेथें एवंशब्दार्थ शाहाणे । 'पूर्वश्लोकरीती' म्हणूनी वाखाणिती. ॥ ३८ ॥ पूर्वश्लोकीं उपद्रष्टा, अनुमता, भर्ता, । आणि तोची भोक्ता ऐसीही वार्ता । बोलिला अशेषभर्ता । म्हणूनी **'य एवं'** ऐसा जाणावा पूर्वरीती. ॥ ३९ ॥ की उपद्रष्टा, अनुमंता, भर्ता, । तो ईश्वरची विश्वभर्ता । आणि तोची भोक्ता म्हणतां वार्ता । प्रतिबिबपुरुषाची दाखवी. ॥ ४० ॥ एवं पुरुष दोंपरी श्रुतिश्रुत । तो एवप्रकारे जाणावा निश्चित । आणि जाणावी प्रकृति गुणवृत्तीसहित । की जो जाणे, तो नये पुन्हा गर्भवासा. ॥ ४१ ॥ जैसी

---

१. अ० १३, श्लो० २३. २. अ० १३, श्लो० २. ३. अ० १३, श्लो० २२.

गुणांसह प्रकृती। पुरुष प्रतिबिंबासहित ये रीती। जाणावा, म्हणूनी म्हणे **'य एवं वेत्ति । पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह'.** ॥ ४२ ॥ भगवंत ऐसें बोलिला। परतु अनुभवसुखीं श्रोता बुडाला। प्रकृति जडभाग प्रत्यया आला। कीं सर्वही पुरुष सर्वगत चिन्मात्र. ॥ ४३ ॥ ज्याला व्हावा जो अनुभव। भोगिलें भोगावें जें वैभव। परतु पूर्वसंस्काराचें तांडव। पांडव नाहीं समजला. ॥ ४४ ॥ अभिमन्युनामपुत्रमरणीं। देखेल प्रारब्धभोगीं गुणांची करणी। साभिमान मारील रणीं। जयद्रथातें न होतां सूर्यअस्त. ॥ ४५ ॥ ज्ञान ऐसें जालें। श्रवणमात्रे अनुभवा आलें। अनुभवें चित्त तत्काळ धालें। परी पूर्वसंस्कार मोडावे. ॥ ४६ ॥ तेथें आपलें भोक्तेपण। उडे कळतां चिदंशाचें लक्षण। आणि कळतां वेगळे तिन्ही गुण। अकर्तेपण आपलें सांपडे. ॥४७॥ म्हणूनी कळले जें ज्ञान। त्याचेंची विशद व्याख्यान। पुन्हां सांगेन म्हणूनी सावधान। करितो प्रथम पार्थास भगवत या श्लोकीं. ॥ ४८ ॥

श्रीभगवानुवाच—**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥**

भगवान् षड्गुण म्हणावें ज्याला। तो ऐसें बोलता जाला। कीं पुन्हा सांगतों तुजला। जें बोलिलों पूर्वाध्यायांत. ॥ ४९ ॥ तें ज्ञान इतरां सर्वांत। ज्ञान उत्तम अत्यत। तें जाणोनियां मुनि मननशील संत। परम सिद्धि कैवल्य पावले. ॥ ५० ॥ जें ज्ञान पावोनी मुनी। परम सिद्धि पावले म्हणोनी। भगवंत म्हणे यावरूनी। सुचवी कीं ज्ञानियांसही उपयोगीं हें ज्ञान. ॥ ५१ ॥ कीं मननशील ते मुनी। आत्मा ओळखोनी वर्तती मननीं। प्रारब्धभोगी कर्मीही ते ज्ञानी। या ज्ञानें पाहती अभोक्तेपण, अकर्तेपण. ॥ ५२ ॥ जरी पूर्वी बोलिलों हें ज्ञान। तरी त्याचें हें विशद व्याख्यान। कीं देहप्रारब्धें वर्ततां समाधान। अकर्तेपण, अभोक्तेपण, या बोधें होतसे. ॥ ५३ ॥ अतएव तें ज्ञान पर। म्हणजे या जडा प्रकृतिपरतें म्हणे सर्वेश्वर। कीं ज्यां ज्ञानें पाहे नर। प्रकृतिपरतें अकर्तृत्व, अभोक्तृत्व, आपलें. ॥ ५४ ॥ म्हणोनी **'परां सिद्धिमितो गताः'**। येथें इतकेंची पुरे कीं **'परां सिद्धिं गताः'**। **'इतो'** म्हणोनी हा शब्द रिता। ये स्थळीं वृथा नव्हे येथील. ॥ ५५ ॥ **'इतो गताः'** म्हणजे या देहादिबंधापासूनी। सुटोनी पावले म्हणोनी। कोणी वाखाणिती तरी या शब्दांवांचूनी। काय न घडे हा अर्थ? ॥ ५६ ॥ म्हणतां

१. मागें, पृ० १४२, टी० १ व पृ० ११६, टी० १ पहा.

सुटला म्हणोनी । कळेच कीं सुटला बंधापासुनी । येथें कां दाटूनी । योजावा हा शब्द? ॥ ५७ ॥ जे मुक्तीतें पावले । ते याच बधापासूनी सुटले । जरी 'यापासूनी' म्हणोनी न बोले । तरी तो अर्थ साधतो. ॥ ५८ ॥ आणि यापासूनी म्हणिजे कोणापासुनी? । मागुती विचार ऐसा करूनी । प्रकृतिकार्या देहादिकापासूनी । म्हणोनि अर्थ समजावा. ॥ ५९ ॥ तो अर्थ या श्लोकीं न दिसे । अन्य स्थळींच गवसे । तरी वचनांतरावरूनी काय होत नसे । हा अर्थ सिद्ध? ॥ ६० ॥ यालागीं **'इतो'** म्हणिजे या प्रकृतीपासूनी । **पर** म्हणिजे निराळें ज्ञान म्हणोनी । अर्थ ऐसा बोलतां यावरूनी । या ज्ञानाची पुनरुक्ति शोभते. ॥ ६१ ॥ पुन्हा हें ज्ञान सांगतों म्हणोनी । म्हणे भगवंत या श्लोकीं, यावरूनी । हें ज्ञान पूर्वीच सांगोनी । पुन्हा सांगतो, हें सिद्ध. ॥ ६२ ॥ आणि ज्ञानांत उत्तम ज्ञान । हें ज्ञान सांगतों म्हणे जगज्जीवन । तरी काय पूर्वी बोलिला तें न्यून? । त्याहूनी उत्तम अधिक बोलों पाहतो? ॥ ६३ ॥ यावरूनी अध्याय तेरा । ज्ञान बोलिला त्याचा मातेरा । जाला या शब्देंकरूनि सारा । एव नव्हे हा अर्थ. ॥ ६४ ॥ म्हणोनी पुन्हा सांगतों म्हणतसे । या शब्दांत अर्थ ऐसा दिसे । कीं मागें बोलिलों तेंची हें असे । परंतु पुनरपि तूतें सांगेन. ॥ ६५ ॥ तरी पुन्हा बोलायाचें प्रयोजन । तेंही बोले भवभजन । किवा देहादिकापरतें ज्ञान । तें सांगेन तुज आतां. ॥ ६६ ॥ कीं प्रकृतीच सर्व करी । मी अकर्ता साक्षी, यापरी । ज्ञानी न पाहे, तोंवरी । अकर्तात्मत्व वर्णेना. ॥ ६७ ॥ हें मागें स्थळस्थळीं । बोलिला स्वयेंची वनमाळी । परंतु गुणवृत्तीची वेगळी वेगळी । विशद रीति नाहीं बोलिला. ॥ ६८ ॥ प्रस्तुतीं पूर्वाध्यायांत । **'प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि'** या श्लोकीं भगवंत । म्हणे प्रकृतीचेंची कर्तृत्व पाहे तोची अत्यंत । अकर्तेपण देखे आपलें. ॥ ६९ ॥ ऐसे जे न पाहती । ते आपणची कर्ता म्हणती । ते प्रकृतीच्या गुणीं बद्ध होती । ते गुण विचित्र नेणे अर्जुन. ॥ ७० ॥ कोणे रीती कोण गुण । बद्ध करितो? हे खूण । जाणोनी पाहे द्रष्टा त्यांचा निपुण । तरी तो अकर्ता लिप्त नव्हे. ॥७१॥ हें आतां सांगों पाहे । परंतु संक्षेपें पूर्वींही बोलिला आहे । म्हणोनी झणी श्रोता मोहे । कीं सांगितलेंची कां सांगतो? ॥ ७२ ॥ तरी मागेंची सांगितलें, परी । पुन्हा सांगतों याउपरी । कीं मुनि, ज्ञानी, तेही बरी । सिद्धि या ज्ञानें

१. अ० १३, श्लो० २९.

पावले. ॥ ७३ ॥ जालासी तूही ज्ञानी । तथापि ज्ञानेंकरूनी । अकर्तात्म-स्थिति पावसी म्हणोनी । पुन्हा हें ज्ञान सांगतों. ॥ ७४ ॥ पोटीं अभिप्राय ऐसा । तो **अर्जुनास** समजे जैसा । शब्दप्रयोग योजी तैसा । **'परं'** म्हणोनी आणि **'इतो'** म्हणोनी. ॥ ७५ ॥ **'इतो'** म्हणजे या देहादिरूपा **प्र**कृतीपासूनी । **'परं'** म्हणिजे परतें ये रीतीकरूनी । तें ज्ञान, तें तुज सांगेन म्हणोनी । बोलतसे हा अर्थ. ॥ ७६ ॥ आतां या ज्ञानेंकरूनी । परा सिद्धि पावले मुनि म्हणोनी । बोलतसे उत्तरार्धीं जो **पर**शब्द त्या शब्देंकरूनी । **निर्गुणमुक्ति** बोलिला. ॥ ७७ ॥ कीं **'परा सिद्धि'** म्हणिजे जे **प्र**कृतीपरती । ते सिद्धि मुनि या ज्ञानें पावती । नव्हे सगुण मुक्ति हे कैवल्यगती । अनु-भवास **स**त्त्वही नुरे जेथें. ॥ ७८ ॥ ऐसा मोक्ष केवळ । बोलतां या ज्ञानाचें फळ । **अर्जुन** भक्त मुखकमल । पाहे होऊनी चकितसा. ॥ ७९ ॥ कीं भक्तांस पाहिजे भक्ति । परतु देव देऊ पाहे मुक्ति । म्हणूनी अनादि **ई**श्वराची युक्ति । की हीं दोन्ही घडती सगुणमोक्षांत. ॥ ८० ॥ प्रस्तुतीं या ज्ञानाचें फळ । मोक्ष निर्गुण केवळ । आयकोनी चित्तीं तळमळ । उपजली **अर्जुनाच्या.** ॥ ८१ ॥ कीं होतां गुणातीत मुक्ति । सत्त्व नुरतां, कैची भक्ति ? । सर्वात्मभावें अनुरक्ती[1] । सगुणचरणीं मग कैची तेथें? ॥ ८२ ॥ या भावें विव्हळ । भक्तास देखे **घ**ननीळ । म्हणोनी याच ज्ञानाचें फळ । सगुण-मुक्तीही म्हणतसे या श्लोकीं. ॥ ८३ ॥

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**

अगा! **अर्जुना!** याची ज्ञानेंकरूनी । याच ज्ञानाचा आश्रय धरूनी । निकट अत्यत याच ज्ञानीं चित्त करूनी । साधर्म्य माझे पावले. ॥ ८४ ॥ हें ज्ञान मोक्षसत्र । सत्रीं जैसीं अन्ने विचित्र । त्यांत ज्यास जें इष्ट, तेंच तो पवित्र । जेवितसे. ॥ ८५ ॥ जे नुसते ज्ञानी । कुशल मननादिकींच, ऐसे मुनी । सगुणभक्ति टाकिती, म्हणोनी । पावती **प्र**कृतिपरती परा सिद्धीतें. ॥ ८६ ॥ माझी शुद्धसत्त्वप्रकृती । जिला अखड **ब्र**ह्मस्थिती । तेही नव्हे तेथें सरती । तीपरती मुक्ती ते. ॥ ८७ ॥ ज्ञानी होऊनी सगुणभक्त । जे सर्वात्मभावें सगुणीं अनुरक्त । ते जरी जाले मुक्त । तरी माझी सधर्मता पावती. ॥ ८८ ॥ **धर्म** तितका **प्र**कृतीचा गुण । **आ**त्मा अद्वय निर्गुण । तें अद्वैत तों ते निपुण । ज्ञान होतांच पावले. ॥ ८९ ॥ परंतु अज्ञानदशेंत कर्म घडलें । प्रारब्ध त्या संचिताचें आरभले । तें ज्ञानयुक्त भक्ति करितां

---

१ गाढ प्रेम.

सरले । तेव्हां माझें साधर्म्य. ॥ ९० ॥ ते माझे साधर्म्य पावले । जे या ज्ञानातेंची जडले । परतु सगुणाचे चरण नाहीं सोडिले । म्हणूनी ते पावले माझे साधर्म्य. ॥ ९१ ॥ **साधर्म्य** माझे म्हणतां, या बोले । ईश्वरत्व सगुणत्व आपले दाविले । ते पावले म्हणतां बोलिले ।जीवत्व त्यांचे पूर्वील.॥९२॥ म्हणतां या ज्ञानाच्या आश्रयेंकरूनी । साधर्म्य पावले म्हणोनी । अविद्यानिवृत्तीनें ते ज्ञानी । **जीवेश्वरऐक्य** सुचवी की तेही पावले. ॥ ९३ ॥ परतु जोंवरी पूर्वसस्कार । आणि होते पूर्वकर्म देहाकार । तोंवरी होतीच विकार । कांडिल्या तदुळासारिखे. ॥ ९४ ॥ तांदूळ भक्षावया योग्य होती । परतु पेरिल्या न उगवती । कीं अनादि अज्ञानत्वचा होती । ते नसे. ॥ ९५ ॥ तैसें अनादि अज्ञान । जातां, या ज्ञानरीतीं समाधान । तथापि प्रारब्धशरीरेंसन्निधान[1] । तोंवरी अखडानदानुभव न होय. ॥ ९६ ॥ अखडानदानुभव । तो ईश्वराचा सधर्मभाव । तेही पावे साधर्म्यविभव । ज्ञानी भक्त देहातीं. ॥ ९७ ॥ **ब्रह्मा**नदाखडता । सगुणमोक्षीं तत्त्वता । ते या ज्ञानेंचीकरूनी **कुं**तीसुता । ऐसें सुचवी. ॥ ९८ ॥ ईश्वरीमायेचा धर्म । ऐसा की अखड आपण **ब्रह्म** । माझे साधर्म्य पावले म्हणे **स**र्वोत्तम । या भावेकरूनी. ॥ ९९ ॥ ऐसी साधर्म्यता जया । **भ**गवद्रूप देह तया । म्हणूनी येथें **ध**नजया । शका उपजली. ॥ १०० ॥ कीं प्रलयीं ईश्वराचे सधर्मत्व । न उरे, ऐसे **श्रु**ती वदती तत्त्व । सर्व संहार जालिया **शुद्ध स**त्त्व । लीन **ब्र**ह्मीं जेधवां. ॥ १०१ ॥ तेव्हां ज्ञानी सगुणभक्त । जे ऐसे साधर्म्ययुक्त । प्रलयीं तेही मुक्त । न उरती सर्वथा. ॥ १०२ ॥ ईश्वरदेह नसती सर्वथा । तेथें मुक्त देहधारियाची काय कथा? । तेव्हां प्रलयकाळीं प्रलयाची व्यथा । तेही पावत असतील. ॥ १०३ ॥ प्रलयीं नाश ज्यांला । सृष्टिकाळीं उत्पत्तीही लागलीच त्यांला । मोक्ष कैसा म्हणावा जाला । ऐसियांस? ॥ १०४ ॥ या संशयाचा परिहार । **साधर्म्य**शब्दींच दावी **स**र्वेश्वर । कीं प्रलयकाळीं नसती आकार[2] । माझेही आणि अज, अव्यय, ईश्वर मी. ॥ १०५ ॥ **प**द्मनाभादि माझे आकार । सृष्टींत उत्पत्ति आणि प्रलयीं सहार । जरी पावती, तरी ते प्रकार । तेही पावती, जे पावले माझे साधर्म्य. ॥ १०६॥ **साधर्म्य**शब्दीं हा अर्थ । बोलिला परतु नेणे **पा**र्थ । यालागीं स्पष्टही बोलतो **स**मर्थ । उत्तरार्धेकरूनी. ॥ १०७ ॥

**सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ ५ ॥**

अगा! सृष्टिकाळ जाला असतांही । ते न उपजती कांहीं । प्रलय होतांही,

---

१. सन्निधान=शेजार, संबध, योग. २. आकारादि धर्मांनीयुक्त ईश्वरस्वरूपें.

होत नाहीं । व्यथा कांहीं तयांतें. ॥ १०८ ॥ कीं सृष्टिकालीं माझिया । मूर्ति प्रगटती धनंजया ! । प्रलयकाळीं त्या अवघिया । मूर्ति निर्गुणी लय पावती. ॥ १०९ ॥ तैशा प्रलयीं मुक्तांचिया मूर्ती । नसती आणि सृष्टिकाळीं प्रगटती । प्रगटती म्हणोनी, उपजती । न म्हणवे तयां मूर्तींते. ॥ ११० ॥ माझे साधर्म्य पावले । तेव्हां उदयलय मजसारखेची होऊं लागले । म्हणोनी सृष्टिकाळीं न म्हणवे उपजले । व्यथा न पावले प्रलयकाळीं. ॥ १११ ॥ प्रलयीं रूपें माझीं नसती । आणि सृष्टिकाळीं दिसती । तरी काय ती नासती? उपजती? । देह मुक्तांचे पावती लयउदय ऐसेच. ॥ ११२ ॥ प्रतिसृष्टिआदिकाळीं । ब्रह्मा उपजे नाभिकमळीं । तें रूपही न उरे केवळीं । प्रतिप्रलयानतर. ॥ ११३ ॥ प्रलयकाळीं पावे लय । तरी काय मजही व्यथा करी प्रलय? । आणि सृष्टिकाळीं मागुती होतां उदय । काय उपजतों अज मी? ॥ ११४ ॥ जन्म म्हणावा त्यांला, । कर्मानुरूप देह ज्यांला । आणि प्रलयकाळही त्यालाची बोलिला । व्यथाप्रद. ॥ ११५ ॥ विश्व माझी कल्पना । तैशाच मूर्ति माझिया नाना । परतु अविद्यावृतजना । कल्पितो कर्मानुरूप जन्ममरण. ॥ ११६ ॥ त्याला सृष्टिकाळीं उत्पत्ती । प्रलयकाळीं व्यथा होती । हे सर्व ईश्वरकल्पित, ऐसें न जाणती । अनादि अविद्येकरितां. ॥ ११७ ॥ मज नसे अविद्या । माझा उपाधि शुद्ध विद्या । स्वइच्छेकरूनी मज आद्या । नाना रूपें प्रगट होणें, लय पावणें. ॥ ११८ ॥ त्या रूपास सृष्टि होतां । न म्हणवे जन्म, आविर्भाव करितां; । व्यथा नाहीं, लय पावतां । प्रलयकाळीं. ॥ ११९ ॥ ते माझी विद्याशक्ति । पावले करितां माझी भक्ती । त्यास जाली सगुणमुक्ती । जे साधर्म्य माझें पावले. ॥ १२० ॥ मजसारिखे त्यांचे आकार । उदयलय मजसारिखे वारंवार । जैसे माझे अजाचे अवतार । देह तैसे तयांचे, कीं पावले साधर्म्य माझें. ॥ १२१ ॥ सृष्टिकाळीं मूर्ति माझिया । जैशा प्रगटती अव्यया । तैसे त्यांचे देहही धनंजया ! । सृष्टिकाळीं प्रगटती. ॥ १२२ ॥ म्हणे या भावेंकरूनी । **'सर्गेपि नोपजायंते'** म्हणोनी । कीं सृष्टिकाळही प्राप्त जाला असोनी । न उपजती, कीं साधर्म्य माझें पावले. ॥ १२३ ॥ वैकुंठ आणि ज्यांस मुक्ती । सर्वही माझ्या शुद्ध सत्त्वाच्या युक्ती । जेव्हां योगनिद्रेपासूनी माझी अभिव्यक्ती । ते समयीं प्रगटती ते सर्व. ॥ १२४ ॥ जागा होतां चतुर । चातुर्य त्याचें पावे जागर । तैसा योगनिद्रेपासूनी मी सर्वेश्वर । उठतां प्रगटती वैकुंठ आणि वैकुंठवासीही. ॥ १२५ ॥ तरी काय उपजले

---

१. प्रगटणें.

म्हणावे ते? । या भावें म्हणे **'सर्गेपि नोपजायंते'** । आणि माझ्या **यो**गनिद्रेची वेळ होते । तेव्हां तेही लय पावती. ॥ १२६ ॥ मुक्त माझ्या **सत्त्वा**च्या आकृती । माझ्या अवतारमूर्तिसारिखी लय पावती । तेव्हा व्यथित होत्या माझ्या मूर्ती । तरी तेही व्यथा पावते. ॥१२७॥ इत्यादि भाव हृदयीं धरूनी । म्हणे **'सर्गेपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च'** म्हणोनी । कीं साधर्म्य माझें पावले, हें आधीं वदोनी । मग परिहरी दोन्ही सशय. ॥ १२८ ॥ कीं सृष्टिकाळींही न उपजती । आणि प्रलयीं व्यथा न पावती । जो **वैं**कुठ **वैं**कुंठपती । तोची ऐसें बोलतो. ॥ १२९ ॥ प्रलयानतर **श्रु**ती । काहींच नव्हतें म्हणती । तेव्हां **ई**श्वराच्या नसती जैशा आकृती । तैशाच मुक्तांच्याही, ज्यांस त्याचें साधर्म्य. ॥ १३० ॥ हेंही असो ज्या **श्रु**ती । प्रलयानतर ऐशा वर्णिती । त्या तेव्हां कोठे असती? । जेव्हां प्रलयशेष निर्धर्म. ॥ १३१ ॥ तरी काय त्या **श्रु**ति प्रलयीं नाशल्या? । आणि सृष्टिकाळीं काय उपजल्या? । **ई**श्वरमूर्तीसारिख्या लय पावल्या । प्रगटल्या जैशा **ई**शमूर्ती. ॥ १३२ ॥ **वे**द अपौरुषेय अनादी । म्हणोनी तेच **वे**दवाणी बोलती **व्या**सादि । आणि तोची **वे**द, तोची **व्यास** उपपादी । की प्रलयशेषीं कांहींच नव्हतें. ॥ १३३ ॥ एवच जैशा **प**द्मनाभादि मूर्ती । प्रलयशेषीं नसती आणि श्रुती । तैसें **वैं**कुठ आणि **वैं**कुठवासीही नसती । पुनः प्रगटती त्या जैशा. ॥ १३४ ॥ ऐसे प्रलयसृष्टिकाळ किती । असख्यात होती, जाती, । तथापि सृष्टिकाळीं ते न उपजती । व्यथा न पावती प्रळयांत. ॥ १३५ ॥ ऐसें **भ**गवद्वचन । कीं ज्यास अपरोक्ष साक्षात्कारज्ञान । ज्या ज्ञानें निर्गुणोपासक जन । निर्गुण पावले. ॥ १३६ ॥ त्याच ज्ञानेंकरूनी । साधर्म्य सगुणाचें पावले, ऐसें म्हणोनी । **भ**गवत म्हणे की ज्ञानावांचुनी । निर्गुणमुक्ति, सगुणमुक्तीही, होईना. ॥ १३७ ॥ त्या ज्ञानाचे फळ । ते कैसें नव्हे अढळ? । या भावें म्हणे **मे**घनीळ । **'इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः'** ॥ १३८ ॥ याचे ज्ञानें मोक्ष निर्धर्म । याच ज्ञानें मोक्ष सधर्म । मोक्षफळ नेदी कर्म । अपरोक्षानुभवेंची अपुनरावृत्ती. ॥ १३९ ॥ ऐसें ज्ञानफळ । द्विप्रकारही अढळ । ऐसें असोनी शब्दज्ञानकुशळ । यास विपरीत बोलती. ॥ १४० ॥ जे हें **गी**तारहस्य नेणती । जे मना जडास भोक्तृत्व म्हणती । सगुणमोक्ष ते गणिती । स्वर्गादि कर्मफलासारिखा. ॥ १४१ ॥ अभाव सर्वा प्रकारांचा । **श्रु**ति बोलती ईशवाचा । तितकिया श्रवणें अभाव

साचा । सगुणमुक्ताचा मानिती. ॥ १४२ ॥ त्या संस्कारे चित्त मलिन । वांचूनीही हें भगवद्वचन । मनीं न धरिती कीं पतन । जयविजय पावले वैकुंठीं. ॥ १४३ ॥ जैसा प्रलयकाल श्रुती । वांचूनी तत्त्व त्या श्रुतींचे नेणती । पतन तैसें वाखाणिती । वैकुंठाहूनी जयविजयांतें. ॥ १४४ ॥ तरी त्याही संशयाची निवृत्ती । करी या श्लोकी जगत्पती । म्हणे कीं या ज्ञानेंची पावती । साधर्म्य माझे. ॥ १४५ ॥ तेची सृष्टि होतांही न उपजती । प्रलयीं व्यथाही तेची न पावती । जे या ज्ञानें माझी साधर्म्यगती । अर्जुना! पावले. ॥ १४६ ॥ की या ज्ञानाहीविण । भगवताचें रूप सगुण । पावती जे स्मरणनिपुण । देहावसानीं स्मरती हरीते. ॥ १४७ ॥ नसोनीही अनुभवज्ञान । अत्यत करिती सगुणध्यान । त्यास होतां देहावसान । मनी ध्येयची आठवे. ॥ १४८ ॥ सदा ज्या भावें भावित । तें देहावसानी आठवी चित्त। आणि तो तेची गति पावे निश्चित । जें देहावसानी आठवे. ॥ १४९ ॥ करूनी हरिणाचें स्मरण । भरतराजऋषी पावला मरण । तो तत्काळ जाला हरिण । ऐसे किती? ॥ १५० ॥ ऐसाच ज्या देवाचा उपासक मरे । आणि देहावसानीं त्यातें स्मरे । तो तोंची रूप पावे, जो सरे । उपासनापुण्य. ॥ १५१ ॥ याच भावें श्रीपती । सप्तमीं म्हणे ये रीती । कीं **'देवान् देवयजो यांति । मद्भक्ता यांति मामपि'.** ॥ १५२ ॥ जो तीव्र भक्त ज्याचा । आठव देहावसानीं त्यास त्याचा । या अभिप्रायें भगवंताची वाचा । नवमींही बोले हा श्लोक. ॥ १५३ ॥

नवमाध्यायश्लोक[2]—**यांति देवव्रता देवान्पितॄन् यांति पितृव्रताः ।**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोपि माम् ॥**

सिद्धांत ऐसाच म्हणोनी । स्थळस्थळीं येच रीतीकरूनी । उपासक उपास्यातें स्मरोनी । देह सोडितां पावे तयाते. ॥ १५४ ॥ अष्टमीं स्पष्ट ये रीती । म्हणे हाची विश्वपती । कीं ज्या ज्या भावातें स्मरत देह त्यजिती । पावती त्या त्याच भावातें. ॥ १५५ ॥ आणि तोची आठवे भाव । तोची आठवें देव । कीं सर्वदा घडे आठव । ज्या ज्या बऱ्या वाईटा भावाचा. १५६

अष्टमाध्यायश्लोक[3]—**यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥**

टीका याची विशद । अष्टमीं जाली प्रतिपद । बोलणें हेंची साप्रद । कीं ज्ञानावीणही भगवद्रूप पावती. ॥ १५७ ॥ नसोनीही आत्मज्ञान । अतिशयें

---

१. अ० ७, श्लो० २३. २ अ० ९, श्लो० २५. ३. अ० ८, श्लो० ६.

घडे सगुणध्यान । न नाशतांही त्याचे अज्ञान । ते भगवद्रूप पावती.॥१५८॥ ऐसे जयविजय । अमुक्तस्थळ वैकुंठनिलय । पावले, तेथें न कळता तत्त्व अद्वय । स्मरोनी देहावसानी पावती सगुणातें. ॥ १५९ ॥ या कारणे या ज्ञानेंकरूनी । जे साधर्म्य पावले, तेची, ऐसें म्हणोनी । बोलिला भगवत नेमुनी । की विना ज्ञान साधर्म्य पावती ते अन्य. ॥ १६० ॥ ते जयविजय दोघेजण। वैकुंठ पावले ज्ञानावीण । प्रमाण पद्मपुराण । येविषयीं. ॥ १६१ ॥ कथा पद्मपुराणी यापरी । की हे सहोदर दोघे भाऊ जन्मातरीं । ब्राह्मण भले, भजती हरी । स्वयें यजिती, करविती याजनें. ॥ १६२ ॥ यज्ञदक्षिणेकारणे । दोघा जालीं भाडणें । शाप दिधले तमोगुणे । परस्परे धनानिमित्त; ॥१६३ ॥ एक म्हणे, 'तू नक्र होसी' । दुसरा म्हणे तयासी । की 'तू हस्ती होऊनी पाणी पिसी । धरीन चरणीं मी तुजला.' ॥ १६४ ॥ एक गंडकीनदीतीरी । नक्र जाला, दुजा तिच्याच तीरी । हत्ती होऊनी, पाण्याभीतरीं । जळ पिता धरिला त्या नक्रे. ॥ १६५ ॥ त्या गजेंद्रे जेधवां । केला मुकुंदाचा धांवा । चक्रे मारूनी नक्र, तेधवां । सोडविला गजेंद्र. ॥ १६६ ॥ जळीं नक्रातें विदारूनी । चक्रे विदारिली मेदिनी । गंडकीमध्यें तैपासुनी । चक्रांकित शिळा जालिया. ॥ १६७ ॥ तदारभ्य त्या शिळा । पूज्य जालिया सकळा । शालिग्राममूर्ति विमळा । नानाभेदे. ॥ १६८ ॥ नक्र गजेद्र दोघे ब्राह्मण । पूर्वी भगवत्परायण । म्हणूनी करिता जाला नारायण । जयविजय द्वारपाळ वैकुंठीं. ॥ १६९ ॥ जें वैकुंठभुवन । वैकुंठअवतारीं कमलनयन । निर्मिता जाला नूतन । प्रार्थनेंकरूनी लक्ष्मीच्या. ॥ १७० ॥ ज्ञानावांचूनी भक्तजन । पावती तें वैकुंठभुवन । ते स्थळी मधुसूदन । द्वारपाळ करी तयांतें. ॥१७१॥ एक वैकुंठलोक । नगररूप उत्तमश्लोक । तो अनाद्यनत विशोक । ज्ञानी भक्तची पावती. ॥ १७२ ॥ प्रस्तुतीं ज्ञानवत । साधर्म्य पावले, म्हणे भगवत । तो वैकुंठलोक अनाद्यनंत । पुनरावृत्ति नसे जेथूनी. ॥ १७३ ॥ ज्यास पावले ज्ञानी । म्हणे भगवंत या श्लोकेंकरूनी । जे सृष्टिकाळीही न जन्मती म्हणोनी । म्हणे आणि प्रलयीं न पावती व्यथेतें. ॥ १७४ ॥ सर्वा उपनिषदांचें । हे गीतामृत सार साचें । येथें वचन हें जगन्निवासाचें । की या ज्ञानें पावले माझे साधर्म्य. ॥ १७५ ॥ जें ज्ञानाचें फळ । तें कैसें नव्हे अढळ? । तत्रापि स्वयेंची मुखकमळ । सर्वेश्वराचें बोलतसे. ॥ १७६ ॥ अश्रद्धा या गीतावचनीं । आणि श्रद्धा जयविजयांच्या पतनीं । तरी तत्त्व हें कीं ते ज्ञानहीन भक्त म्हणोनी । शापे जाले गजनक्र. ॥ १७७ ॥ हें गजेंद्रमो-

क्षण । पद्मपुराणीं सलक्षण । महाभारती तें विलक्षण । तिसरें श्रीमद्भागवतीं. ॥ १७८ ॥ ते तमोगुणी सहोदर । अन्योन्य शापें गजजलचर । तथापि भक्त म्हणोनी सर्वेश्वर । द्वारपाळ करी वैकुंठी तया. ॥१७९॥ जे ज्ञानहीनाकारणें । श्री[1]प्रार्थितां केलें नारायणें । हीं पुराणरहस्यविवरणें । न कळोनी बोलती. ॥ १८० ॥ वैकुंठनामक अवतार । त्या अवतारीं वैकुंठ नगर । निर्मिले तथीं मन्वतर । रैवतनामक मनूचे. ॥ १८१ ॥ ब्रह्मयाच्या दिवसाप्रती । चतुर्दश संख्या मनु होती । वर्षे पन्नास ये रीती । जालीं ब्रह्मयाचीं संपूर्ण. ॥ १८२ ॥ या एकावन्नावे वर्षी प्रथम दिवशी । वर्णिती पुराणीं मन्वंतरासी । त्यांत पांचविया मन्वतरीं गोष्टी ऐसी । कीं वैकुंठ निर्मिले वैकुंठे. ॥ १८३ ॥ मन्वतरे ये रीती । चतुर्दश संख्या क्रमती । तो दिवस एक म्हणती । ब्रह्मयाचा. ॥ १८४ ॥ ऐशा तीनशतां साठी दिवसांचे । वर्ष म्हणती ब्रह्मयाचे । एव आयुष्य क्रमले त्याचे । पन्नास अब्द. ॥ १८५ ॥ अर्ध आयुष्य क्रमलें । वर्ष एकावन्नावें लागले । त्यांत जें पांचवें बोलिलें । रैवत मनूचे मन्वतर. ॥ १८६ ॥ त्या रैवतनामक मन्वतरी । विकुंठापुत्र वैकुंठ हरी । श्रीप्रार्थनेंकरूनी करी । वैकुंठलोक. ॥ १८७ ॥ ऐसे पुराणें बोलती । आणि तींची ऐसें म्हणती । कीं वैकुंठ दावी श्रीपती । ब्रह्मयास पहिलेच दिवसीं तयाच्या. ॥ १८८ ॥ 'तप, तप,' म्हणोनी । अशरीरवाणी[3] पडतां कानी । नाभिपद्मींच तप करूनी । ब्रह्मा देखे पित्यातें. ॥ १८९ ॥ तेच वेळे वैकुंठभुवन । देखता जाला चतुरानन । आणि निर्मिले वैकुंठभुवन । या एकावन्नावे वर्षी प्रथम दिनीं. ॥ १९० ॥ या विरोधाचा परिहार । न कळोनी बोलती हा प्रकार । कीं जयविजय पाळिती द्वार । ते च्यवले वैकुंठापासूनी. ॥ १९१ ॥ प्रथम वर्षी प्रथम दिन । तेव्हां ब्रह्मा देखे वैकुंठभुवन । त्यास वर्षे आतां एकावन्न । या वर्षी निर्मिलें तें कैसें? ॥ १९२ ॥ जरी पुराणे अप्रमाण । तरी जयविजयपतनीं काय प्रमाण? । प्रमाणेंची तरी वैकुंठ निर्माण । कैसें वैकुंठ अवतारीं? ॥ १९३ ॥ कीं लोटलीं वर्षं[2] पन्नास । वैकुंठ देखोनी ब्रह्मयास । त्याच्या एकावन्नावे वर्षी त्याच भुवनास । निर्मिलें हें कैसें? ॥ १९४ ॥ तेव्हां वैकुंठ लोक दोनी । एक अनादि, एक नूतन। म्हणोनी च्यवले नूतनापासूनी । जयविजय. ॥ १९५ ॥ आणि अनादि वैकुंठभुवन । जे बोलिले हें गीता-वचन । की या ज्ञानेंकरूनी भक्तजन । साधर्म्य माझें पावले, हरि म्हणे. ॥ १९६ ॥ ते सृष्टिकाळीं न उपजती । जे प्रलयीं व्यथा न पावती । साधर्म्य

१. लक्ष्मीनें विनती केल्यामुळे २. वर्षें. ३. अमानुषवाणी, आकाशवाणी.

पावले ये रीती । या ज्ञानाश्रयें, म्हणे **भ**गवत. ॥ १९७ ॥ ऐसी अपुनरावृत्ती । आणि जन्मनाशरहित स्थिती । साधर्म्य ऐसें बोले **यदु**पती । हें अनादि **वै**कुठीं जाणावें. ॥ १९८ ॥ कीं हे ज्ञानाचें फल । म्हणूनी अनादि पद अढळ । आणि नूतन निर्मिले **वै**कुठ निर्मळ । ज्ञानहीनभक्तांकारणें. ॥ १९९ ॥ कीं जें सर्वदा ध्यानीं । तेंची आठवे देहावसानीं । मग तेची गति ज्ञानहीनासम्हणोनी । त्यांकारणें **वै**कुठ दुसरें निर्मिलें. ॥ २०० ॥ ज्या देवाच्या स्मृतीनें पडे देह । तेची आकृति, तोची लोक निःसंदेह, । तैसा विना ज्ञान माझा स्नेह । तेही माझ्या स्मरणें मज पावती. ॥ २०१ ॥ यालागीं बोले **यदु**पती । हे **गी**तेमध्ये ज्ञानियाची गती । **जयवि**जय पुनरावृत्ती । अमुक्तस्थळीं अज्ञानें. ॥ २०२ ॥ **गीतापु**राणें ये रीती । एकवाक्यता पावती । तत्रापि **गी**ता उपदेशी **श्री**पती । सार सर्वां **उ**पनिषदांचे. ॥ २०३ ॥ **पु**राणां सर्वांहुनी । श्रेष्ठ **भा**रत म्हणोनी । प्रसिद्ध त्यांत विशेषेकरूनी । **भ**गवद्वचनपीयूष हे **गी**ता. ॥२०४॥ येथें म्हणे **भ**गवंत । की जे या ज्ञानाचे निकट आश्रित । ते माझे साधर्म्य पावले सत । जे जन्म आणि व्यथा कालयोगें न पावती. ॥ २०५ ॥ यापुढे गोष्टी सकळा । बोलतां पावती अवकळा । कीं उगवतां भानु सगळा । गतप्रभ होती नक्षत्रे. ॥ २०६॥ **पु**राणीं जे जे विरोध । त्यांचा बरा करितां शोध । सिद्धात ऐसा म्हणूनी होय बोध । बहुजन्मपुण्येंकरूनी. ॥ २०७ ॥ जे निर्गुणची बोलती । निर्गुणोपासक म्हणविती । ते हा अभिमान वाहती । की 'निर्गुणमोक्षची मुख्य मोक्ष; ॥ २०८ ॥ सगुणमोक्ष **का**लाधीन' । म्हणती, त्यांतें **ज**गज्जीवन । निषेधी बोलतां हें वचन । कीं **'सर्गेपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च'**. ॥ २०९ ॥ सृष्टिकाळीं न उपजती । लयकाळीं व्यथा न पावती । **का**लभयापासूनी सुटती । अर्थ ऐसा. ॥ २१०॥ ऐसेंची ज्ञानी सगुणमूर्ति ध्याती । ते पापपुण्या दोहींवेगळे होती । आणि सगुणाचे साम्य पावती । **श्रु**तीही म्हणे. ॥ २११ ॥

श्रुति—**यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिं । तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरंजनं परमं साम्यमुपैति दिव्यम् ॥**

श्रुत्यर्थ मागे सांगें विशद । चतुर्थाध्यायीं प्रतिपद । प्रस्तुतीं बोले मुकुंद । हाची अर्थ या श्लोकीं. ॥ २१२ ॥ काय बोलोनी बहुत । **क**लियुगीं शब्दज्ञानीच अत्यंत । तत्रापि पांडित्यबळें म्हणविती संत । ते निर्गुणाभिमानी बुडाले. ॥ २१३ ॥ त्यांत बिरळा भावार्थी पंडित । ते दुर्लभ भक्तिमडित ।

जे ज्ञान असोनी अखंडित । सगुण भजती. ॥ २१४॥ ते हें रहस्य जाणती । निर्गुणवादी नेणती । सगुणमोक्षास म्हणती । **काल**भय. ॥ २१५ ॥ वादी दाविती **श्रु**ती । ज्या प्रलयशेषी 'कांहींच नाहीं,' म्हणती । परतु **ई**श्वरोपाधीही नाहीं ये रीती । **श्रु**तीच बोलती ते काळीं. ॥ २१६ ॥ तरी **ई**श्वराहीपरीस **काळ** । समर्थ म्हणावा महाव्याळ । एव हे गोष्टीच फटकाळ । **का**ळाचाही काळ **ई**श तो. ॥ २१७ ॥ तोची स्वयें म्हणावा **काळ** । तरी तें बोलणें फट-काळ । कीं **का**ळासही सुकाळ, दुष्काळ । **का**ळेचीकरूनि हें घडे. ॥२१८॥ अग्नितापें अग्नि मरे । कीं शीतशैत्ये शीत नुरे । कीं विषाच्या विषे विष सहरे । तरी **का**ळ बाधी **ई**श्वरातें. ॥ २१९ ॥ जरी जळामाजीं जळ बुडे । वारियानें वारा उडे । कीं काठिण्य पृथिवीचे पडे । उरावरी पृथ्वीच्या. ॥ २२० ॥ एवच **काळ** **ई**श्वर भिन्न नसती । जरी रूपे दोनी दिसती । प्रलयानतर तयाची वसती । स्वस्वरूपीं, हे तत्त्व. ॥ २२१ ॥ सृष्टिकाळीं **काळ** तो । **ई**श्वरत्वें प्रगटतो । असतो, पुन्हा लय पावतो । स्वस्वरूपीं. ॥ २२२ ॥ त्याचें साधर्म्य पावले । जे त्यासारिखे प्रगट जाले । तैसेची लय पावोनी, मागुतीं निघाले । **काळ**भय कैसें तयांला? ॥ २२३ ॥ दुःखामुळें सर्व भय । तें सृष्टिसंहारींही नसे, म्हणे **अ**व्यय । एवं **का**ळापासूनी सुटले हा निश्चय । तरी **'मोक्ष'** म्हणती या गतीतें. ॥ २२४ ॥ यालागीं साधर्म्य आपलें । तोची म्हणे जयां पावलें । त्यांस सर्वथा नाहीं झोंबले । भय **का**ळाचें सृष्टिसंहारीं. ॥२२५॥ हें बोलणें असे फार । परतु होतो ग्रथविस्तार । आतां यानंतर **श्री**कात **स**र्वेश्वर । काय बोलतो? तें ऐका. ॥ २२६ ॥ पुढे ज्ञानाचा उपदेश । जो करूं पाहे **हृ**षीकेश । महिमा तयाचा वर्णिला लेश । कीं निर्गुण, सगुण, मोक्ष दोन्ही या ज्ञानें. ॥ २२७ ॥ आणि सकळ ज्ञानांत हें ज्ञान । अत्युत्तम, म्हणूनी वचन । प्रथमारंभश्लोकीं **जग**ज्जीवन । या अध्यायांत बोलिला. ॥२२८॥ तरी काय याहून उणें । मागें ज्ञान उपदेशिलें जें आपणें? । ही शका निवारा-याकारणें । **प्र**कृतिपरतें, म्हणे, हें ज्ञान. ॥२२९ ॥ **'परं भूयः प्रवक्ष्यामि'** । या प्रथम **परं**शब्दें **जग**त्स्वामी । म्हणे, परतें जें **प्र**कृतीहूनी, तें मी । पुन्हां सांगतों. ॥ २३० ॥ 'पुन्हा' म्हणतां भाव ऐसा, कीं पूर्वी ज्ञान । उपदेशिलें त्याचेची हें व्याख्यान । कीं **गुण** **प्र**कृतीचे भिन्न भिन्न । पाहतां, ज्ञान परिपाक तेंची पावतें. ॥ २३१ ॥ तरीच पूर्वाध्यायांत । जो या **पुरु**षातें जाणे, म्हणे **भ**गवंत । आणि **प्र**कृतीसही तिच्या **गु**णांसहित । तो पुन्हा नये गर्भवासा.

॥ २३२ ॥ कीं जो साक्षी **गुणांचा** । तो स्वयें कर्ता त्यांचा । परंतु निर्णय अक्रिय **आत्मयाचा** । ऐसा जाला पूर्वाध्यायांत या श्लोकीं. ॥ २३३ ॥

पूर्वाध्यायश्लोक[1]—**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥**

कीं अनादिपण निर्गुणपण । म्हणूनी न करी, न लिपे, आत्मा आपण । कीं न करूनीही लिप्तपण । या शरीरीं **जीवनामका पुरुषातें.** ॥ २३४ ॥ एक भर्ता, एक भोक्ता, म्हणोनी । याच शरीरीं **पुरुष** दोनी । त्यांत भोक्ता लिप्त आणि भर्ता देहीं असोनी । अलिप्त, ऐसा सिद्धांत. ॥ २३५ ॥ तरी प्रारब्धफलसयोग । अकर्तेपणींही ज्ञानियास दावी भोग । जो भोक्ता, त्यास अकर्ता निःसंग । म्हणतां नये. ॥ २३६ ॥ कीं जो अनादि, निर्गुण । त्यानेंच अकर्तेपण, अलिप्तपण, । **'अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मा'** म्हणे आपण । **'न करोति न लिप्यते'** म्हणोनी. ॥ २३७ ॥ तो **आत्मा** ज्ञानी आपण । तेव्हां तया अलिप्तपण, अकर्तेपण, । आणि भोक्तृत्व तों दावीच खूण । देहावसानवरी त्यासही. ॥ २३८ ॥ अकर्तेपण पाहती सत । तोतों **चिन्मात्र पुरुष** सर्वगत । त्यासतों भोग न घडे निश्चित । तरी भोक्ता कोण? आणि जाला कैसा ? ॥ २३९ ॥ हेंही ज्ञानियांतें कळावें । म्हणूनी आतां या भावें । **क्षेत्रज्ञ**लक्षण **देवाधिदेवे** । सांगों आरभिलें दों श्लोकीं. ॥ २४० ॥ **क्षेत्रज्ञ** जीव **ईश्वरांश** । पचदशीं बोलेल ईश । **'ममैवांशो जीव'**[2] म्हणूनी सावकाश । विशद होणार हें पुढें. ॥ २४१ ॥ ते जीव **ईश्वरांश** सांचे । भोक्ते जडा देहाचे । कीं उदक नाचतां, नाचे । तदनुगुण प्रतिबिब. ॥ २४२ ॥ सर्वत्र **सर्वेश्वर** बिब । अंश त्याचे प्रतिबिंब । उपाधि उदकाचा अवलब । प्रतिबिंबरूपा अशातें. ॥ २४३ ॥ जळ असे तोंवरी जळीं । प्रतिबिंब जलयोगें डळमळी । जळ लय पावतांतों बिंबीं केवळीं । लय पावे. ॥ २४४ ॥ प्रलयीं **ब्रह्मीं** रिघावें । सृष्टिकाळीं उपाधियोगे निघावें । त्या उपाधीचीं दोनी **नांवें** । **नाना योनि** आणि **तत्त्वदेवता.** ॥ २४५ ॥ त्यांत आधीं **महत्तत्त्वादि** । मूळमायेपासूनी उपजती अनादि । त्याच्यायोगें मनुष्यादि । योनी होती उत्पन्न. ॥ २४६ ॥ दोहीं ठायीं **महत्तत्त्व** । पावलें जगत्कारणत्व । कीं **महत्तत्त्वीं** जें **शुद्ध सत्त्व** । प्रतिबिंबे **चिदंशत्व** त्या उदकरूपीं. ॥ २४७ ॥ दोहीं स्थळीं ज्याचें प्रतिबिब । **चिद्रूप** दिसे धरूनी **सत्त्वउदकाचा** अवलब । कारणां समस्तांचें कारण बिंब । तो मी, म्हणूनी आतां **भगवत** बोलेल.

---

१. अ० १३, श्लो० ३१. २. अ० १५, श्लो० ७.

॥ २४८ ॥ त्यांत नानायोनींची उत्पत्ती । तत्त्वदेवता जालिया होती । म्हणूनी आधीं जगत्पती । तत्त्वोत्पत्ति बोलावया बोले हा श्लोक. ॥ २४९ ॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

अगा! भरतवंशोत्पन्ना! । तत्त्व भोक्तया पुरुषाचें आईक अर्जुना! । आणि ज्यापासूनी तत्त्वें उपजती नाना । तें महत्तत्त्व. ॥ २५० ॥ प्रथम अव्यक्त प्रकृती । मज सर्वेश्वराचा उपाधि म्हणती श्रुती । जगत्कर्ता मी जगत्पती । सगुण त्या शुद्ध मायेकरितां ॥ २५१ ॥ तेव्हां सृष्टि करावया । इच्छा उपजली मज अद्वया । ते त्रिगुणसूत्ररूपिणी माया । नाम पावली महत्तत्त्व. ॥ २५२ ॥ त्या महत्तत्त्वीं सत्त्वांश । त्यांत प्रतिबिंबला माझा अंश । जो भोक्ता जड देहाचा चिदंश । अगा! भारता! ॥ २५३ ॥ माझा अंश मद्रूप । मी चित्स्वरूप, तैसा तोही चिद्रूप । सगुणपणींही मी अरूप । 'अपाणिपाद' ज्याला म्हणती श्रुती. ॥ २५४ ॥ **'पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः'** ऐशा श्रुती । कीं पाहतो, ऐकतो, म्हणती । आणि चक्षु, कर्ण, नसती । तें सगुणपणें वर्णिती निराकार. ॥ २५५ ॥ कीं पाहणें साक्षित्वगुण । तें न म्हणवे निर्गुण । तेव्हां तें ब्रह्म सगुण । सधर्मता मात्र मायायोगें, निर्धर्म चित्स्वरूपीं. ॥ २५६ ॥ प्रतिबिंबमात्राचें तें बिंब । व्यापक जें निरवलंब । महतत्त्वांत सत्त्वांशावलंब । प्रतिबिंबुचिदंशातें. ॥ २५७ ॥ तो चिदंशही बिंबची तों । कीं बिंब पुरुष उदकीं प्रतिबिंबतो । या भावें भगवंत म्हणतो । **'मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहं'.** ॥ २५८ ॥ महत्तत्त्वीं ब्रह्म मी । प्रतिबिंब तों जगत्स्वामी । तो अंशही मीच कीं मज आत्मारामीं । उपाधि लय पावतां, प्रवेशतो. ॥ २५९ ॥ तो मी एक म्हणोनी । महत्तत्त्व माझी योनी । कीं जो उपजतो ज्या स्थानीं । योनि त्याची तें स्थळ. ॥ २६० ॥ ऐसा अंशरूपकेरूनी । महत्तत्त्वसत्त्वांशीं प्रतिबिंबतों म्हणोनी । महत्तत्त्व माझी योनी । अगा! भारता! ॥ २६१ ॥ **'मम योनिर्महत्'** म्हणोनी । भगवंत म्हणे या भावेंकरूनी । आतां हा भावार्थ टाकूनी । त्या बिंबाचीच योनि तें म्हणावें. ॥ २६२ ॥ तरी **'मम योनिर्महत्'** येथवरी । अर्थ घडेलही ऐसा, परी । या अर्थी न योजे, जें म्हणतसे तदुपरी।**'ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहं'** ॥ २६३ ॥ **'ब्रह्म अहं तस्मिन् गर्भं दधामि'** । ऐसें म्हणतो

---

१. 'प्रथम महत्तत्त्वी त्याचें प्रतिबिंब ।' असा पाठभेद.

जगत्स्वामी । कीं त्या **महत्तत्त्वीं ब्रह्म** मी । गर्भ ठेवितों. ॥ २६४ ॥ जैसा गृहिणीच्या उदरीं । गर्भ ठेवी पति, यापरी । **महत्तत्त्वीं पार्था!** अवधारी । गर्भ ठेवितों मी **ब्रह्म.** ॥ २६५ ॥ म्हणूनी जीवत्वीं माझी योनी । **महत्तत्त्व** जीवांची जननी । हे स्पष्ट पुढलिया श्लोकीं उत्तरार्धेकरूनी । **'तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता'.** ॥ २६६ ॥ सर्वा भूतांची माता । **महत्तत्त्व,** आणि आपण पिता । ऐसें पुढलिया श्लोकी तत्त्वता । स्वयें **भगवत** बोलेल. ॥ २६७ ॥ या श्लोकी जीवांची जननी । **महत्तत्त्व,** आणि आपण पिता, म्हणोनी । हा अर्थ सुचवूनी । म्हणे **'मम योनिर्महत्'** म्हणिजे योनि माझी **महत्तत्त्व.** ॥ २६८ ॥ पुढिलिया श्लोकी म्हणेल, **कुंतीसुता!** । सर्वा योनींत मूर्ति होती बहुता । **महत्तत्त्व** त्याची माता । मी पिता बीजप्रद. ॥ २६९ ॥ **बीज** पुरुषाचे रेत । मूर्ति आकार पावते निश्चित । तैसा **चिदंश** गर्भ माझा प्रतिबिंबत । प्रतिदेहीं. ॥ २७० ॥ होतां **चिदंशाची** स्फूर्ती । होऊ लागे भलती मूर्ती । परी त्या मूर्तीत पूर्ती । चोविसा **तत्त्वांची** संपूर्ण. ॥२७१॥ **महत्तत्त्व** एक त्यांत । त्यास कारणत्व अत्यंत । त्यापासूनी या श्लोकी म्हणे भगवत । **'संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत'.** ॥ २७२ ॥ सर्वा भूतांचा संभव । म्हणिजे **अहंकारादि तत्त्वाचा** उद्भव । त्या **महत्तत्त्वापासूनी** होतो, म्हणे **देव** । परी मी जेव्हां गर्भ ठेवितों **महत्तत्त्वी.** ॥ २७३ ॥ जे जे उत्पन्न होती । त्यां त्यांस **भूत** म्हणती । ऐसी पाहतां व्याकरणरीती । **तत्त्वें** वाखाणावींची **भूतशब्दे.** ॥ २७४ ॥ **भूतें** शरीरे म्हणावीं, परी । तीं **मूर्ति-शब्दे** वेगळींच याउपरी । उत्तरश्लोकी बोलेल **हरी** । तत्त्वें म्हणावीं हीं **भूतें.** ॥ २७५ ॥ जैसी **तत्त्वांची** तैसीच **भूतांची** जननी । प्रथम **तत्त्व महतत्त्वची** म्हणूनी । आणि आपण पिता बीजप्रद, ये रीतीकरूनी । बोलतसे या प्रकरणीं हा दुजा श्लोक. ॥ २७६ ॥

**सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

सर्व योनींत **कौंतेया!** । ज्या चराचर मूर्ति उपजती या । त्या **महत्त-त्त्वापासूनी** म्हणूनिया । त्यांची योनि **ब्रह्म** महत्. ॥ २७७ ॥ **ब्रह्मशब्दे** चतुर्मुख **ब्रह्मा** । तो **महत्तत्त्वाची** प्रतिमा । **महत्तत्त्वांश बुद्धि** स्थावर-जंगमा । **ब्रह्माची** दैवत तया **बुद्धीचे.** ॥ २७८ ॥ सृष्टि **महत्तत्त्वापासुनी** । **ब्रह्माची सृष्टिकर्ता** म्हणोनी । **ब्रह्म** महत् या भावेंकरूनी । या **सृष्टिप्रसंगीं देव** म्हणे. ॥ २७९ ॥ परतु **ब्रह्मादि मूर्ती** । यांच्या ठायीं भोगादिकां स्फूर्ती ।

ज्याकरितां तो अमूर्ती । प्रतिबिंबपुरुष अश माझा. ॥ २८० ॥ तो महत्तत्वीं प्रतिबिंबला । तेव्हां त्या महत्तत्त्वाचाच चतुर्मुख जाला । क्रम ऐसाच चालत आला । सर्व योनींत ज्या मूर्ति, त्यांपर्यंत. ॥ २८१ ॥ जैसा स्त्रीच्या उदरीं । पुरुष रेतप्रवेश करी । मूर्ति उत्पन्न होती त्याउपरी । माता पिता त्या मूर्तींस तीं दोघें. ॥ २८२ ॥ चराचरीं ये रीती । चिदश जेव्हां महत्तत्त्वीं प्रवेशती । तेव्हां चराचर मूर्त्ति होती । म्हणूनी माता महत्तत्त्व, पिता भगवंत. ॥ २८३ ॥ दृष्टांत ऐसा सुचवूनी । महत्तत्त्व योनि म्हणिजे जननी । आणि बीजप्रद पिता मी म्हणोनी । म्हणे "**अहं बीजप्रदः पिता**". ॥ २८४ ॥ या श्लोकी 'अगा! कौंतेया! । म्हणूनी म्हणे कुंतीचिया तनया ! । कीं तू जैसा कुंतीचा या । पुत्र आणि बीजप्रद पित्याचाही. ॥ २८५ ॥ ऐसी सृष्टि प्रकृतिसंतती । म्हणूनी माता महत् प्रकृती । आणि पिता मी श्रीपती । हा भाव. ॥ २८६ ॥ एव पूर्वाध्यायांत बोलिला भर्ता । तो मी म्हणूनी सूचवी ते वार्ता। आणि तोची भोक्ता म्हणोनी बोलिला विश्वभर्ता । तो ऐसा बोलिला दों श्लोकीं. ॥ २८७ ॥ तो कां भोक्ता पुरुष जाला? । तरी अनादि मायानदीप्रवाह ऐसाची आला । प्रारब्धभोगीं आढळे ज्ञानियाला । सुखदुःखभोक्ता हा पुरुष. ॥ २८८ ॥ सुखदुःखभोग जेव्हां नसे । तेव्हां सर्वगत आत्माच दिसे । तो तों अनादि, निर्गुण, अनुभवें गवसे । तो अकर्ता, तो अलिप्त. ॥ २८९ ॥ '**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मा**' म्हणोनी । '**न करोति न लिप्यते**' या श्लोकेंकरूनी। बोलिला अकर्ता, अलिप्त तो, जो आत्मा ज्ञानी । पाहती सर्वदा आपला. ॥ २९० ॥ तरी भोक्ता पुरुष कवण? । श्रोता म्हणेल तरी तेंही घडविलें श्रवण । आतां प्रकृतीचें कर्तेपण । पाहतां दिसे अकर्तेपण आपलें. ॥ २९१ ॥ हेंही पूर्वाध्यायांत चक्रपाणी । म्हणे '**प्रकृत्यैव च कर्माणि । क्रियमाणानि**' वाणी । '**यः पश्यति तदात्मानमकर्तारं**' म्हणोनी बोलिला. ॥ २९२ ॥ तरी त्या प्रकृतीचे तिन्ही गुण । भिन्न भिन्न त्यांचें लक्षण । ते येथूनी बोलतो कमलेक्षण । या श्लोकापासूनी. ॥ २९३ ॥

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

अगा! सत्त्व, रज, तम, तिन्ही गुण । प्रकृतीपासूनी जाले जाण । कीं प्रकृति जड, तैसीच खूण । याही तिहीं गुणांची. ॥ २९४ ॥ आतां यांस गुण म्हणावें यावरूनी । की या देहीं जो असे 'देही' म्हणोनी । त्यातें बांधिती

---

१. अ० १३, श्लो० २९.

कर्मफल उत्पन्न करूनी । बांधणें तितकें कर्म दोराचें. ॥ २९५ ॥ दोरें पशु बांधिती । दोरास वेदभाषेनें गुण म्हणती । त्यांचीं नांवें ये रीती । सत्त्व, रज आणि तम. ॥ २९६ ॥ तो देही म्हणिजेतो । जो अहंकारें मी देह म्हणतो । कर्मफलें सुखदुःखें जाणतो । देहाभिमानयुक्त बुद्धीकरूनी. ॥ २९७ ॥ तो चिदंश, नव्हे प्रकृतीचा गुण । की 'अव्यय' तयास म्हणती निपुण । यालागीं त्या प्रकृतीपासूनी हेची जाण । सत्त्व, रज, तम, हे तिन्ही. ॥ २९८ ॥ ऐसें प्रकृतिसंभव गुणत्रय । आणि ज्यास बांधिती, तो देही अव्यय । ऐसें म्हणतो देव अद्वय । भोक्तृत्व चिदंशाचें सुचवी. ॥ २९९ ॥ मनास भोक्तृत्व कोणी । म्हणती त्यांची अप्रमाण वाणी । ऐसें सुचवी चक्रपाणी । या श्लोकीं. ॥ ३०० ॥ कीं गुण म्हणिजे दोर । सत्त्व, रज, तम, तिन्ही थोर । ज्यास बांधिती त्यास सर्वेश्वर । 'देही अव्यय' म्हणतसे. ॥ ३०१ ॥ ज्ञानें होतां बंधाचा व्यय । बिंबीं प्रतिबिंब अव्यय । मिळे, तेव्हां गुणमय । मन कैंचें? ॥ ३०२ ॥ मनही प्रकृतिगुण । सत्त्वांश म्हणती तत्त्वज्ञ निपुण । ज्यास बंध त्यास मुक्तपण । की बंधातेंची न घडे बंधमोक्ष. ॥ ३०३ ॥ एक बंध, एक बद्ध । हें तों सर्वत्रही प्रसिद्ध । गुण तिन्ही म्हणतां जालें सिद्ध । बंधची मन सत्त्वांशही. ॥ ३०४ ॥ बंधची सत्त्वांश मनही । तरीच बद्ध या वेगळा देही । मागें वर्णिला तो कांहीं । गुण नव्हे प्रकृतीचा. ॥ ३०५ ॥ बंध म्हणावें भोगातें । तोची बद्ध, जो भोगी सुखदुःखातें । तो भोगितो अधिष्ठूनी । मनातें चाटू अधिष्ठूनी रसना रस घे जैसी. ॥ ३०६[1] ॥ 'अधिष्ठाय मनश्चायं' म्हणोनी । पंचदशीं या भगवद्वाक्याहीवरूनी । भोग मनइंद्रिययोगेंकरूनी । चिदंशातें. ॥ ३०७ ॥ मन सत्त्वगुण । बंधमोक्षासही कारण । कीं बंध दोराचें ग्रंथीपण । ग्रंथि सुटतांही दोर तो. ॥ ३०८ ॥ शुद्ध सत्त्व धरूनी । जीवन्मुक्तही ज्ञानी । वर्तती सत्त्वेंचीकरूनी । बंधमोक्षही ऐसा. ॥ ३०९ ॥ एवंच मनें बंध । जोंवरी अविद्येचा संबंध । परी तें जड न लाहे भोगगंध । सुगंधपात्र नेणे सुगंधातें. ॥ ३१० ॥ इंद्रियांचसारखें साधन । सुखदुःख भोगी मन । त्यांतेंची भोक्तृत्व म्हणती ते जन । त्यांची न म्हणवे दीर्घ दृष्टी. ॥ ३११ ॥ असो आतां बोलिले जे गुण । त्यांचें वेगळें वेगळें लक्षण । बोलतो सरसीरुहेक्षण । उत्तमश्लोक या श्लोकीं. ॥ ३१२ ॥

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**

त्या तिहीं गुणांत । सत्त्व निर्मळ अत्यंत । निर्मलत्वास्तव म्हणे भग-

---

१. अ० १५, श्लो० ९.

वंत । प्रकाशक म्हणोनी. ॥ ३१३ ॥ कीं प्रकाशक एकची आत्मा । सत्त्व जड अनात्मा । तथापि प्रकाशक म्हणावें, म्हणे परमात्मा, । निर्मलत्वेंकरूनी. ॥ ३१४ ॥ प्रकाशक मुख्य अग्नीची ज्योती। तथापि तैलयुक्त ह्मणूनी निमित्ते वाती । प्रकाशक ह्मणावी ह्मणे कोणी सुमती । या न्यायें ह्मणे भगवत.॥३१५॥ कीं अंगुष्ठमात्र अग्निज्योती । अंगाररूपे दावी दीप्ती । त्या ज्योतीनें न प्रकाशती । घट, मठ, इत्यादि रचना. ॥३१६॥ तैलेयुक्त एकची वाती । तिच्यायोगें अगुष्ठमात्र दीप्ती । प्रकाशतां, संपूर्ण दिसती । घट मठ इत्यादि रचना अवधिया. ॥३१७॥ ऐसें निर्धर्म । चित्स्वरूप शुद्ध ब्रह्म । परतु सत्त्वावांचूनी तें अगम्य । प्रत्यया न ये. ॥ ३१८ ॥ आश्चर्य नाहीं याचें । कीं तें अतींद्रिय ब्रह्म साचें । काष्ठादि [१]काशा एकाविना अग्नितेजाचें । जैसें दर्शन न्व्हे दृष्टीसी. ॥ ३१९ ॥ काष्ठ, गोंवरी, माती, । [१]काशा एकाचियायोगें ज्योती । दृष्टीं दिसे, तरी न म्हणवती । तीं स्वयें प्रकाशक त्यांविना. ॥ ३२० ॥ होतां लोहपाषाणयोग । पाषाणरेणुयुक्त स्फुलिग । कीं तप्तलोहीं त्या लोहाचा संग । अग्नि ज्योति नुसती नये प्रत्यया. ॥ ३२१ ॥ त्याही पदार्थांत । तैलयुक्त म्हणूनी अत्यत । वाती प्रकाशक म्हणतो नि[२]यत । ते प्रकाशक अग्नियोगे जाणावी. ॥ ३२२ ॥ हे अनुभवशास्त्र गीता । आदिमध्यांतीं येथें एकची तत्त्वता । कीं प्रकाशक एकची आत्मसत्ता । जड तितका प्रकृतिभाग. ॥ ३२३ ॥ येथें सत्त्व प्रकाशक । जरी बोलिला जगन्नायक । तरी काय त्याचें गुणग्राहक । जडपण विसरती सत्त्वाचें. ॥ ३२४ ॥ तत्रापि निर्मलत्वास्तव । तिहीं गुणांमध्यें म्हणे माधव । प्रकाशक म्हणूनी कीं रजतमास हें वैभव । सत्त्वासारिखें असेना. ॥ ३२५ ॥ एका चित्स्वरूपाविण । जड हे तिन्ही गुण । त्यांत निर्मलत्वास्तव प्रकाशकपण । सत्त्वासी. ॥ ३२६ ॥ जैसे तमीं दीपाविण । न दिसती नेत्र, कर्ण, शिर, कर, चरण, । तत्रापि त्या सर्वांमध्यें प्रकाशकपण । नेत्रांस म्हणतां दीपयोगे जाणावें. ॥ ३२७ ॥ ते नेत्र त्या दीपदीप्तीनें जैसे । पाहती करचरणादिकां [३]सरिसे । करचरणादि दीपयोगेची तैसे । पाहों न शकती किमपिही. ॥ ३२८ ॥ दीपप्रकाशेंची प्रकाशती । त्यांत अवयवांतें नेत्र पाहती । आणि दीपही स्वप्रकाश देखती । तेच नेत्रप्रकाशें त्याच्याच. ॥ ३२९ ॥ करचरणकर्णादि इतर । न देखती पदार्थांतर । जे दीपें प्रकाशले निरतर । आणि दीपातेंही न देखती. ॥ ३३० ॥ आणि त्यांवरी तो प्रकाश । दीपाचा असे सावकाश । रजतमीं असोनिही स्वप्रकाश । चैतन्य

---

१. काहींतरी. २. नेमानें, खात्रीपूर्वक ३. लागलेच, तत्काळ.

न कळे तयांतें. ॥ ३३१ ॥ त्यांत सत्त्वगुण निर्मळ । पाहों शके तें चिन्मात्र केवळ । दीपप्रकाशेंची नेत्र विमळ । जेंवी पाहती दीपातें. ॥ ३३२ ॥ आणि चित्प्रकाशेंची जड सकळ । सत्त्व पाहे निर्मळ । नेत्र जैसे जलस्थल । दीपप्रकाशें देखती. ॥ ३३३ ॥ एवंच सत्त्व प्रकाशक । निर्मलत्वास्तव, म्हणोनी हेतुपूर्वक । बोले स्वयें श्रीवत्सांक । जड तोही सत्त्वभाव ऐसा. ॥३३४॥ तें सत्त्व अनामय । म्हणजे रजतमावेगळें चिन्मय । जरी अविद्यायोगे न कळे तें अद्वय । तरी चिन्मय तों त्या चित्स्वरूपेंकरूनी तें. ॥ ३३५ ॥ सर्प वाटे दोर, परी । दृष्टि स्पर्शली असे दोरीं । कीं दोर दृष्टीं न दिसे तोंवरी । सर्पची भासे ना. ॥ ३३६ ॥ ताटीआडूनी दिसे । सर्प त्या दोरीनें भासे । एव रज्जु स्पर्शली असे । तेची दृष्टि देखे सर्पातें. ॥ ३३७ ॥ तैसें चित्स्वरूपीं सत्त्व । स्पर्शोनी देखे भलतें जडत्व । ऐसें असोनी, न कळे तत्त्व । वायां गेलें गुरुकृपेवांचूनी. ॥ ३३८ ॥ तथापि रजतमापरतें । **अनामय** म्हणावें त्या तें । **आमय** म्हणती रोगातें । रोगरूप दुर्गुण रज, तम. ॥ ३३९ ॥ सत्त्व रजतमावेगळें ऐसें । आतां रजतमयुक्त तें कैसें । तरी तांबे, रुपे, मिसळतां जैसें । सुवर्ण शुद्धची तेंही न होय. ॥ ३४० ॥ दोहींवेगळें शुद्ध सत्त्व । त्यास दिसे आत्मतत्त्व । म्हणूनी घडे अनामयत्व । तया सत्त्वातें ॥ ३४१ ॥ अग्नियोगें वारवार । पुटीं घालूनी सोनार । वेगळे काढी सार । जें हीन अन्य गुणयोगेंकरूनी. ॥ ३४२ ॥ अन्ययोगें होतें अशुद्ध । तथापि हीनपणींही होतेंची शुद्ध । की तें अन्य निघतां स्वतःसिद्ध । शुद्धची तें. ॥ ३४३ ॥ आतां जें ऐसें सत्त्व । त्यास कैसें घडे बधकत्व । म्हणूनी बोलतो तत्त्व । या गोष्टीचें उत्तरार्धी. ॥ ३४४ ॥

उत्तरार्ध—**सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥**

अगा! हें सत्त्व सुखसंगेंकरूनी । बांधे आणि ज्ञानसंगें म्हणोनी । गोविंद म्हणे यावरूनी । तत्त्व दूरदृष्टी वदावें या गोष्टीचें. ॥ ३४५ ॥ कीं विषयसुखाचा संग । ते तों वासना, रजोगुण तिचे अंग । हा अविद्यावृत शुद्ध सत्त्वप्रसंग । रजोगुणातमोगुणावेगळा. ॥ ३४६ ॥ देहींच शुद्ध सत्त्व । देहींच याचें शुद्धत्व । देहींच अशुद्धत्व । या सत्त्वाचें. ॥ ३४७ ॥ जेची स्वयें निर्दोष । तेंची रजतमें सदोष । या श्लोकीं बधकत्वाचा घोष । शुद्ध सत्त्वाचा. ॥ ३४८ ॥ तें सुखसगे बांधतें । म्हणूनी बोलिले भगवते । कीं नुसते सुखची त्यातें । पाहिजे सदा. ॥ ३४९ ॥ आपणास व्हावें सुख । आणि न व्हावें दुःख ।

१. ताटी—बांबूंचें सलदें किंवा फुलझाडाची राग. २. मुशीत.

सत्त्वाचें ओळखती सुख । संत ऐसें. ॥ ३५० ॥ ते न जाणे सुख अनित्य । अथवा न जाणे नित्य । सुख व्हावें अगत्य । हें सत्त्ववृत्ती. ॥ ३५१ ॥ सुखाचें रूप नेणे । आणि सुख तों हो[1] म्हणे । की गुरुकृपें स्वसुख बाणे । तेंची रजतमयोगें विषयरूप. ॥ ३५२ ॥ सत्त्व नुसतें सुखापेक्षारूप । की सुखची जीवन त्याचें चित्स्वरूप । परतु हरिगुरुभक्तिवांचूनी अरूप । आणि विपयरूप न कळे रजतमावांचूनी. ॥ ३५३ ॥ आत्माच उभयत्र । प्रतिबिंबयुक्त जळ तैसेंची मूत्र । परी भले स्वमुख पवित्र । त्या अपवित्रीं न पाहती. ॥ ३५४ ॥ असो, तो वेगळा प्रसंग । प्रस्तुतीं बोले श्रीरग । की बध करितो सुखसंग । शुद्ध सत्त्वाचा. ॥ ३५५ ॥ कीं सुख आत्माच साचा । प्रिय आत्माची त्यास त्याचा । परी अविद्यायोगे सत्त्वाचा । जाला सुखसंग बंधक ऐसाही. ॥३५६॥ हा सुखसंग या लोकीं । झांकला असे यालागीं कीं । वेसन विषयवासनेची नाकीं । पडिली इच्या. ॥ ३५७ ॥ त्या वासनेंत हे मिसळली । म्हणोनी लोकांस नाहीं कळली । परी ते सत्त्ववृत्ति असे वळली । सुखापेक्षेचकरितां. ॥ ३५८ ॥ विषयवासनायोगें । बंध म्हणावा सुखसंगे । तरी रजतमप्रसगे । तें घडे. ॥ ३५९ ॥ रज रागात्मक । म्हणोनी या पुढेची श्लोक । आणि तें अनामय म्हणोनी उत्तमश्लोक । शुद्धत्व याचें दाखवी. ॥ ३६० ॥ एवं विषयवासनायोगें । सत्त्व बध करी सुखसगें । या अर्थी श्रीरगे । बोलिले नाहीं. ॥ ३६१ ॥ उगीच जे सुखापेक्षा । नेणे नित्यानित्य उभय पक्षा । त्याही सुखसंगा मुमुक्षा । *नित्यसुखापेक्षा छेदिते. ॥ ३६२ ॥ ते सुखापेक्षेकरूनी । सत्त्व बध करी म्हणोनी । जगन्निवासें या वचनी । बोलिलें ऐसें. ॥ ३६३ ॥ येथें शका कीं सत्त्व जड गुण । त्यास न घडे भोक्तेपण । आणि चैतन्य निर्धर्मलक्षण । सुखापेक्षा जडा केंवी घडे ? ॥ ३६४ ॥ याचें ऐसें समाधान । कीं देहीं आत्मत्वाचा अभिमान । तों 'मज सुख हो,' म्हणे हें अज्ञान । परी सुख चिदात्मयाचकारणें पाहिजे. ॥ ३६५ ॥ तें सत्त्व अचेतन । हें सत्य परी होतें सचेतन । लोखड करी नर्तन । सन्निधानें चुंबकाच्या. ॥ ३६६ ॥ द्रव्य मादक अचेतन । पुरुष त्यातें भक्षी सचेतन । द्रव्यविकार नर्तन । तेव्हां पाहावें. ॥ ३६७ ॥ सचेतन नर नव्हे ते विकार । अचेतन तेही न दावी प्रकार । योग दोहींचा होता, व्यवहार । सकळही चालती. ॥ ३६८ ॥ चैतन्य निर्विकार । तेथें प्रकृतीचे विकार । जैसे नानातरगाकार । सागरी होती. ॥ ३६९ ॥ तरंगीं तरगाकार । तथापि जळ निर्विकार । तैसे सत्त्वादि

---

१. होवो.

वृत्तिव्यवहार । चित्स्वरूपीं. ॥ ३७० ॥ सुख व्हावे ऐसी लहरी । भिन्न कैची चित्सागरीं[२] । चित्समुद्र सत्ताच खरी । भास मिथ्या तरंगांचा. ॥ ३७१ ॥ चिदात्मयाची प्रीती । तेची शुद्ध सत्त्ववृत्ती । त्या वेगळी तत्त्वतां ते असती । तरी अपेक्षिती सुख त्या वेगळेपणाकारणें. ॥ ३७२ ॥ प्रीति सर्वांस साची । आपल्या प्रकाशकाची । आणि ज्या त्यास आत्मत्वेंची आवडी त्याची । त्यास वाटे स्वसुख, जें आढळे होतां तयातें. ॥ ३७३ ॥ एव ज्या चित्प्रकाशे ते जाणे । त्यातेंची आपण तें म्हणे । त्यास सुख इच्छितो हेंही नेणे । तेंची आपण म्हणे अविद्येकरूनी. ॥ ३७४ ॥ शुद्धा सत्त्वासही सुखसंग । तो या भावे वदे श्रीरंग । आतां ज्ञानसंगाचा प्रसंग । तो ऐसा. ॥ ३७५ ॥ की ज्ञान वस्तुतः निर्गुण । त्यावरी तदाश्रित तिन्ही गुण । अलंकार आकारीं जैसें सुवर्ण । ज्ञान शुद्धगुण वृत्तींत ये रीती. ॥ ३७६ ॥ कुंडली कुंडलाकार । मुकुटीं मुकुटानुसार । परी त्या असारीं सार । हेमची तें. ॥ ३७७ ॥ त्या सुवर्णाविण । न कळे त्या आकाराची खूण । जडीं ज्ञान ऐसें देखती निपुण । ते मोक्षातें पावती.॰ ॥ ३७८ ॥ जे सत्त्व अविद्यावृत । त्यास जड अलंकार सत्य वाटती निश्चित । चैतन्य सोनें प्रकाशक, त्याचे त्यांत । तें न दिसे, दिसोनिही. ॥ ३७९ ॥ ऐसें जे विषयज्ञान । तें केवळ अज्ञान । तें ज्ञानबंधनसाधन । संग त्याचा सत्त्वातें. ॥ ३८० ॥ जडीं चिद्रूप दिसे । बंध तो तों तुटतसे । ग्रंथि तों तों बळकट बसे । जों जों जड म्हणावें चित्स्वरूप. ॥ ३८१ ॥ जडीं कळे चैतन्य । या ज्ञानाचा संग धन्य । जडत्व जाणणें जघन्य[१] । बंधसंगे त्या ज्ञानाच्या. ॥ ३८२ ॥ की जे तें वाटे कळावें । त्याचीं जाणे रूपें, नावें, । तें मिथ्या सत्यत्वभावे । जाणे, त्यानें बंध होय. ॥ ३८३॥ ज्ञानस्वरूप आत्मा निर्गुण । त्याची ज्ञानशक्ति सत्त्वगुण । विषयज्ञानें बंधकपण। मोक्ष निर्विषयज्ञानेंकरूनी. ॥ ३८४ ॥ सुखसंगे ज्ञानसंगे । सत्त्व बांधे या-प्रसंगें । म्हणूनी बोलिलें श्रीरंगे । अर्थ संक्षेप ऐसा तयाचा. ॥ ३८५ ॥ पुढिलिया श्लोकी रजप्रसिद्धी । तेथें म्हणेल की **'विद्धि'** । **'विद्धि'** म्हणजे 'जाण', कीं बुद्धी । तुझी शाहाणी होय. ॥ ३८६ ॥ हे गुण म्हणजे बांधणार दोर । अनर्थ याचकरितां थोर । जैसे आप्त वाटती समागमीं चोर । सर्वस्व हरिती. ॥ ३८७ ॥ जरी त्याचे वर्म होय विदित । तरी कां फांसां पडे पंडित । त्यांत असोनीही अखंडित । न विसंबे ज्ञानशस्त्रातें. ॥ ३८८ ॥ ते जपती याला । तों हा जपों लागला त्यांला । त्यांच्या फांसां पडेना ऐसा जाला।

---

१. नीच, कनिष्ठ. २. पाशात.

तेव्हां याणें जिंकिले. ॥ ३८९ ॥ 'अगा! अनघा!' म्हणूनी । या श्लोकी या नांवेंकरूनी । आळवी कीं या तिहीं पापरूपापासुनी । सुटलास या श्रवणें, अर्जुना! ॥ ३९० ॥ **अघ** म्हणजे पाप । **अनघ** म्हणजे निष्पाप । म्हणे **जगद्गुरु** मायबाप । कीं जालासी निष्पाप या श्रवणें. ॥ ३९१ ॥ ऐसा गुणत्रयाचा । विभाग बोले देवाची वाचा । त्यांत स्वभाव बोलिला सत्त्वाचा । रजःस्वभाव बोलतो या श्लोकीं. ॥ ३९२ ॥

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥**

अगा! **कुंतीसुता**! । **रजो**गुण आईक आतां । तो रागात्मक जाण तत्त्वता । विषयप्रीति स्वरूप त्या रजोगुणाचे. ॥ ३९३ ॥ प्रीतीस **राग** म्हणती। ते **भग**वत्प्रीति अथवा विषयप्रीती । परी रजोगुण सांगतो श्रीपती । तो विषयवासनारूप. ॥ ३९४ ॥ इद्रियें रजोगुणाच्या वृत्ती । इद्रियांस विषयांची प्रीती । अत एव विषयवासनास्वरूप म्हणती । रजोगुणाचें. ॥ ३९५ ॥ यालागीं रजोगुण । अर्जुना! **रागात्मक** जाण । बोले सर्वज्ञ सुजाण । ऐसे की विषयप्रीतिस्वरूप जो. ३९६ ॥ याकारणें लैक्षणांतर । त्याचें सांगतो सर्वेश्वर । कीं रागात्मकत्व त्याचें चतुर । त्यावरूनीही समजती. ॥ ३९७ ॥ कीं त्यापासून तृष्णा उपजते । जे विषयवासना बोलिजेते । की ज्याची प्रीति त्याचीच होते । भोगवासना. ॥ ३९८ ॥ तरी रजोरूप इंद्रियवृत्ती । त्यास आपल्या विषयांची प्रीती । म्हणूनी त्यास रागात्मक म्हणती । तरीच त्यापासूनी उद्भव विषयतृष्णेचा. ॥ ३९९ ॥ ते वासना सकळ भोगांची । परतु दुर्लभ वाटे पदार्थ, त्याची । अपेक्षा सद्य उपजेना की सुरांगनांची । भोगापेक्षा नसे भलतियांतें. ॥ ४०० ॥ इंद्रपदइच्छा नसे । तेही अनायासें गवसे । तरी 'तें न लगे' म्हणे, ऐसा न दिसे । विषयासक्तांत कोणीही. ॥ ४०१ ॥ एव विषयमात्राची वासना । पाहतां असे सर्वां जना । परंतु दुर्लभ विषय आठवेना । विषय लभ्य होयसा आठवे. ॥ ४०२ ॥ ऐसी विषयांची आठवण । त्याचा भोग इच्छी अतःकरण । त्या स्मरणाचे नांव **नारायण** । **संग** म्हणे या श्लोकी. ॥ ४०३ ॥ एव उगीच भोगेच्छा वासना । सद्य भोगेच्छा तो संग म्हणिजे कामना । दोंहीचाही अगा! **कुंतीनंदना**! । उद्भव रजोगुणापासूनी. ॥ ४०४ ॥ की तृष्णेचा उद्भव जैसा । सगाचाही उद्भव तैसा। रजोगुणापासूनी ऐसा । **"तृष्णासंगसमुद्भवम्"** या चरणाचा हा

१ दुसरें लक्षण, दुसरी खूण

अर्थ. ॥ ४०५ ॥ ऐसें रजोगुणाचें लक्षण । बोलोनी त्याचें बंधकपण । सांगतसे भगवंत आपण । की कर्मसगे बांधितो जीवाते. ॥ ४०६ ॥ ज्यापासूनी वासना । आणि सग तत्काळ भोगाची कामना । तो क्रियाशक्ति अगा ! अर्जुना! । कर्मे करवितो. ॥ ४०७ ॥ उगीच विषयाची वासना । तोंवरी उपजवी कामना । तेव्हां कर्मे कोण त्याविना । दुसरा उपजवी? ॥ ४०८ ॥ ज्या भोगाची कामना । साधनक्रिया त्याचीच मना । आठवे आणि कर्माची रचना । जन करी. ॥ ४०९ ॥ त्या कर्मे होय बध । हा रजोगुणाचा सबध । जाण अर्जुना! की उपजत अध । जैसा पुरुष शास्त्रश्रवणावांचुनी. ॥ ४१०॥ जो गुणाते जाणे । त्यास गुणप्रकाशकाची खूण बाणे । ऐशा श्रवणेंची शाहणे । पक्क ज्ञानी जाले सर्वेही. ॥ ४११ ॥ येथें 'कौंतेया!' म्हणोनी । अर्जुनातें या नामेंकरूनी । आळवी कीं यावरूनी । बध समज तू कर्माचा. ॥ ४१२ ॥ कीं कर्म भोगाचसाटीं । तू जन्मलास कुंतीचिया पोटीं । हे कर्म अगा! किरीटी!। जन्मांतरीं रजोगुणेंची करविलें. ॥ ४१३ ॥ आतां तमाचे लक्षण । आणि त्याचें बधकपण । सांगतो अनंत कल्याणगुण । श्रीकृष्ण या श्लोकीं.॥४१४॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

तम तों अज्ञानापासुनी । उत्पन्न जाले म्हणोनी । गहन भावेंकरूनी । म्हणे देव. ॥ ४१५ ॥ भाव ऐसा कीं सत्त्वगुण । ज्ञान जालियाही निपुण । न टाकिती की मिश्रपण । गेलें रजतमाचें. ॥ ४१६ ॥ लें स्वरूपातें असे स्पर्शले । स्वरूप कळलें अथवा नाहीं जरी कळलें । परतु रजसहित तम गेलें । ज्ञान बिबलें जेधवां. ॥ ४१७ ॥ रजतम निःशेप नासे । सत्त्व प्रकाशक सत्त्वीं प्रवेशे । ज्ञान परिपाकदशे । आलें म्हणावे तेधवां. ॥ ४१८ ॥ सत्त्व ईश्वरोपाधीचा अश । रजतमयोगे त्याचा स्मृतिभ्रश । त्यांवेगळें होतां विध्वंस । सत्त्वची करी अविद्येचा. ॥ ४१९ ॥ होतां सत्त्व निर्गुणमय । नाशती हे गुणद्वय । यालागीं अज्ञान रजतमची ऐसा निश्चय । सत्त्व ज्ञानमय लेखिलें. ॥ ४२० ॥ सर्वथा अज्ञानमय । रजतम गुणद्वय । प्रस्तुतीं तमोगुणप्रसंगीं निर्णय । रजाचाही. ॥ ४२१ ॥ कीं तमोगुण द्रव्यशक्ती । विषयरूपें त्याची अभिव्यक्ती । पचभूतें शब्दादिगुणही व्यक्ती । तमोगुणाच्या. ॥ ४२२ ॥ रज्जूवरी भुजगस्फूर्ती । स्वरूपीं ऐशा या तमाच्या मूर्ती[1] । परी इंद्रियवृत्तीविना न दिसती । सर्वथा. ॥ ४२३ ॥ आणि चित्तबुद्धि मना-

---

१. मूर्ती.

हीविण । विषय नेणती इंद्रियगण । त्या इंद्रियांवांचूनी खूण । न कळे दृश्यां विषयांची. ॥ ४२४ ॥ दृष्टांतमुखे सुमती । अर्थ याचा समजती । म्हणोनी ते रीती । वदावी येथें. ॥ ४२५ ॥ ब्रह्मीं तामस विषय ऐसे । कीं दोरावरी सर्प वसे । चैतन्य रज्जूविना न गवसे । विषयसर्प कोणाही. ॥ ४२६ ॥ आणि दोरीं दृष्टि स्पर्शली असे । परंतु रज्जु न कळतां, सर्प भासे । तोंवरी दिसे, जों दृष्टींत वसे । भ्रम, जो अज्ञानें रज्जूचा. ॥ ४२७ ॥ मिथ्या सर्प विषय आणि भूतें । हीं तामसें रजोगुणसमुद्भूतें । कीं रजोगुण इंद्रियें तयातें। दिसती दृष्टिभ्रमातें सर्प जैसा. ॥ ४२८ ॥ विषय आणि भूतें तामसें । दृष्टिभ्रम इंद्रियें राजसें । दृष्टिसत्त्व या तिहीं गुणीं स्वरूप ऐसें । कीं दोर दृष्टींत दृष्टिभ्रमांत सर्पांतही. ॥ ४२९ ॥ दृष्टींत दोरची असे । दृष्टिभ्रमीं सर्परूपेंही तोची वसे । आणि मिथ्या सर्प दिसे । त्यांतही असे तो दोर. ॥ ४३० ॥ त्यांत दृष्टीस दोर कळे । तेव्हां सर्प दृष्टीतें न आढळे । दृष्टिभ्रम दृष्टींत खेळे । तोंचीवरी भासे तो सर्प. ॥ ४३१ ॥ तेव्हां दृष्टिभ्रमाचपासूनी । म्हणावें सर्प जाला म्हणोनी । आणि भ्रमरूपेंचीकरूनी । दृष्टींत जाणावें अज्ञान रज्जूचें. ॥ ४३२ ॥ कीं दोराच्या अज्ञानाविण । दृष्टींत न उपजे भ्रमण । भ्रमावांचूनी न कळे खूण । मिथ्या सर्पाची. ॥ ४३३ ॥ रज्जु प्रस्तुतीं ब्रह्म । सत्त्व दृष्टि आणि रज इंद्रियभ्रम । दृश्य विश्वसर्प तम । इंद्रियदृष्टिभ्रमरूपानेंची भासे. ॥ ४३४ ॥ तम ऐसें अज्ञानापासूनी जालें । ह्मणतां रजोगुणास अज्ञानपण आलें । सत्त्वासही अज्ञान, परी तें प्रगटलें । रजोगुणरूपे तमाते उपजवी. ॥ ४३५ ॥ दृष्टि रज्जु जाणोनी पाहे । भ्रम तेव्हां कैंवी राहे? । भ्रम जातां न साहे । सर्पत्वातें रज्जु तो. ॥ ४३६ ॥ ब्रह्म जाणोनी सत्त्व पावे । इंद्रियभ्रम तेव्हां न राहे । भ्रम जातां न साहे । दृश्यपणाते परब्रह्म. ॥ ४३७ ॥ एवच भ्रम दृष्टीचा निरसे । सर्प तेव्हां न भासे । परंतु दृष्टी तोची रज्जु दिसे । सर्पपणींही जो होताच दृष्टींत. ॥ ४३८ ॥ ऐसा जडभ्रम निरसे । दृश्य तम तेव्हां जडत्वें न भासे । तथापि सत्त्वासि तेंची ब्रह्म दिसे । दृश्यपणींही जे स्फुरत होतें सत्त्वांत. ॥ ४३९ ॥ म्हणूनी सत्त्व वेगळें ठेवुनी । रज लेखिलें अज्ञान म्हणोनी । आणि त्यास गोचर तें त्याचपासूनी । तम दृश्यरूप उपजलें हरि म्हणे. ॥ ४४० ॥ तम म्हणतां अज्ञानजनित । अनुभव इतका सुचवी भगवंत । भगवत्कृपापात्र संत । तेच तात्पर्य ऐसें समजती. ॥४४१॥ अज्ञान रज अविद्याभ्रम । त्यास इंद्रियरूपे दिसे दृश्य तम । तें मिथ्या सर्प आणि रज्जु ब्रह्म । तत्त्व ऐसें सुचविलें. ॥ ४४२ ॥ ऐसें

अज्ञानापासूनी जालें । **त**म म्हणूनी **दे**वें बोलिलें । तात्पर्य त्याचें निघत आलें । ये रीतीकरूनी. ॥ ४४३ ॥ आतां त्याचें लक्षण । बोलतो **क**मले-क्षण । कीं मोह करी हा **त**मोगुण । देहधारिया **चि**दशातें. ॥ ४४४ ॥ **क्षे**त्रज्ञ **चि**दश देहधारी । त्यास **त**म मोह करी । म्हणतां, तो प्रतिबिंबबुद्धि वारी । त्यास मोह म्हणिजे तीस मोह. ॥ ४४५ ॥ प्रतिबिंब हालविलें । म्हणतां, उदकची या [१]बोलें । हालविलें, ऐसें कळों आलें । तयांते, जे प्रतिबिंबत्व त्याचें जाणती. ॥ ४४६ ॥ जों डळमळी जळ । तोंवरी प्रतिबिंबाची डळमळ । बुद्धि-मोहें **चि**दश केवळ । मोह तो, ऐसें जाणावें. ॥ ४४७ ॥ **मो**ह म्हणिजे अविवेक । दृश्याचकरितां बुडाला विवेक । जड देह, मी **चै**तन्य, हा व्यति-रेक । न सुचे देहात्मतेंकरूनी. ॥ ४४८ ॥ तो देहही **त**मोगुण । मोहें **आ**-त्मत्वाचीच दावी खूण । मृत शरीरें देखोनीही, 'आपण । देह' म्हणे भल-ताही. ॥ ४४९ ॥ 'देह मी' म्हणे । तरी शवास शव कां नेणे ? । देह आपण नव्हे, ऐसें शाहणे । जाणती आणि मोहती. ॥ ४५० ॥ ऐसा मोह देहकृत । तोची **आ**त्मा वाटे निश्चित । तत्संबंधी आपलीं वाटती अत्यंत । तेही देह त्या **त**माचे. ॥ ४५१ ॥ विषय खरे वाटती । प्राणापरीस आवडती । तेही **त**मची ये रीती । मोह त्यांचा वर्णितां अपार. ॥ ४५२ ॥ सर्वांही देहधारियांस । मोह करी **त**माचा विलास । देखोनी दृश्य तामस । सर्व मोहेल. ॥ ४५३ ॥ **त**म हें ऐसें मोहन । म्हणूनी म्हणे **गो**पीमनमोहन । करूनी उपनिषदांधेनूचें दोहन । तत्त्वामृत **गो**पाळ दुहितसे. ॥ ४५४ ॥ लक्षण सांगोनी ऐसें । आतां बंधकत्व त्याचें कैसें ? । तरी प्रमादें, आळसें । आणि निद्रेंकरूनी. ॥ ४५५ ॥ स्वहितविषयीं असावधपण । तो **प्रमाद त**मोगुण । सावध होऊनीही न करी हिताचरण । **आळस** म्हणावें तयाला. ४५६ ॥ **निद्रा** चित्ताचा लय । चित्त होय **त**मोमय । हा **त**मोगुणची ऐसा निश्चय । बंध इत्यादिरूपें **त**म करी ॥ ४५७ ॥ या श्लोकीं अगा ! **भा**रता ! । म्हणूनी म्हणे **पां**डुसुता । कीं **भ**रतकु-लोत्पन्न देहची हा तत्त्वता । तू न होसी तो देह ॥ ४५८ ॥ ऐसें असोनीही निश्चित । म्हणविसी मी **भा**रत । हाही मोह अत्यंत । **त**मोगुणाचा. ॥४५९॥ आतां हा देहाभिमान । टाकूनी पावें समाधान । की जोंपर्यंत नव्हते हें ज्ञान । **त**मोगुणें मोहिलें तुज ऐसें. ॥ ४६० ॥ आतां ऐसें तूं जाण । **आ**त्मा ओळखूनी होईं तूं सुजाण । '**भा**रता !' म्हणतां **ना**रायण । बोधी ऐसें **न**रातें.

---

१. भाषणानें, शब्दांनी.

॥ ४६१ ॥ सत्त्वादि गुण तिन्ही । सांगितले ते ऐसें म्हणोनी । आतां त्यांच्या उत्कर्षावरूनी । कार्ये त्यांचीं या श्लोकीं बोलतसे. ॥ ४६२ ॥

**सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥**

सुखाचे ठायीं अत्यंत । सत्त्व उत्कर्षे असे वर्तत । कर्माचे ठायीं बलवत । रजोगुण उत्कर्षे वर्ततो. ॥ ४६३ ॥ असावधपणें तम । उत्कर्षें वर्ते परम । परतु तेची जडभ्रम । म्हणोनी पूर्वश्लोकी बोलिलों. ॥ ४६४ ॥ यालागीं अगा! भारता! । ज्ञान जें सर्वात्मता । त्यातें आच्छादूनी पांडुसुता! । उत्कर्षें वर्ते तमोगुण. ॥ ४६५ ॥ अर्थची ऐसा जाला । परंतु प्रत्यया न आला । म्हणोनी श्रोतयांला । विशद उमजे ऐसें बोलावें. ॥ ४६६ ॥ सुखसंगें बांधे सत्त्व । म्हणोनी सत्त्वाचें बधकत्व । मागें बोलिलें हें तत्त्व । सत्त्वगुणाचें. ॥ ४६७ ॥ तरी जेव्हां सुखाचा भोगकाळ । तेव्हां रजतमकार्यें फटकाळ । वाटती, की विटाळ । न सोसे तेव्हां कर्माचा. ॥ ४६८ ॥ कीं अगत्य हीं कर्मे नाना । सुखसंभोगीं न आठवती मना । आळस न ये, निद्रा ये ना । भोगितां सुखातें. ॥ ४६९ ॥ सुखाचेही प्रकार दोनी । विषयरूप एक, दुसरा निर्विषय, म्हणोनी । त्यांत विषयरूप मिश्र सत्त्वयोगेंकरूनी । शुद्ध सत्त्वें निर्विषय. ॥ ४७० ॥ इद्रियें रज, विषय तम । या दोहींचा संगम । त्याही सुखीं उत्कर्ष परम । सत्त्वाचा. ॥ ४७१ ॥ की रजें क्रियाशक्ती । परतु सुखकाळीं न उपजे कर्मी प्रसक्ती । नये निद्रा, नये आळस, जों भुक्ति । गोड विषयसुखाची वाटते. ॥ ४७२ ॥ मुख्य कार्य रजतमाचे ये रीती । सुखकाळीं त्यांचे ठायीं नव्हे प्रवृत्ती । जरी इंद्रियें विषय रजतमरूप असती । ते उपयोगी वाटती सुखार्थ. ॥ ४७३ ॥ विषयाकार तम म्हणोनी । तम असे, रज इद्रियेंही असोनी । सत्त्व या दोहींहुनी । सुखकाळीं वर्ते उत्कर्षे. ॥ ४७४ ॥ हें मिश्र-सत्त्वाचें उत्कृष्टपण । विषयसुखा देखती निपुण । सुख विषयांइंद्रियांपलीकडे निर्गुण । तेथें स्वयेंची उत्कर्षें तें वर्ते. ॥ ४७५ ॥ चित्त जेथें चिन्मय । स्फुरे स्वात्माच अद्वय । तें चित्तची सत्त्व, जेथें गुणद्वय । लेश नुरती त्या सुखीं. ॥ ४७६ ॥ एव सुखमात्र । सत्त्वची जाणे पवित्र । दीपप्रकाशेची दीप नेत्र । देखती, ऐसें सत्त्वरूपें स्वरूप तें पाहे. ॥ ४७७ ॥ आतां विश्व भगवद्रूप । जडा नगीं कनक चित्स्वरूप । तें सत्त्वची पाहे रूपीं अरूप । थिजलें, विघरलें, तूप भिन्न नसे. ॥ ४७८ ॥ या अनुभवीं सत्त्व । गिळूनी रजतमजडत्व । इद्रियां दृश्यां तरंगांत तत्त्व । चैतन्य सिधूचें तें देखे. ॥ ४७९ ॥ एवं सुखानु-

भव । निर्विषय अथवा विषयसंभव । सुख कोणी, तरी होतें वैभव । सत्त्वगुणाचें सर्वथा. ॥ ४८० ॥ आतां क्रियाशक्ति रजोगुण । त्याचें कर्मी उत्कृष्टपण । सत्त्वतमाहूनी तो आपण । कर्मी उत्कर्षे वर्तती. ॥ ४८१ ॥ की तृष्णा कामनावृत्ति रज । कर्म कामनामूळे घडे सहज । हें मागे अधोक्षज । स्वयें बोलिला. ॥ ४८२ ॥ ज्या गोष्टीची कामना । प्रवृत्ति त्या कर्मींच उपजे जना । त्या कर्मी रजोगुणा एकाविना । न दिसे सत्त्वतमाचा उत्कर्ष. ॥ ४८३ ॥ सुखसंगे ज्ञानसंगें । सत्त्व बांधे हें श्रीरगे । मागे बोलिले प्रसगे । आणि सुखीं उत्कर्ष सत्त्वाचा या श्लोकीं. ॥ ४८४ ॥ तरी महत्कार्यास जातां । त्वरा मिष्टान्न जेवितां । छायेस आस्तरणी समीप कांता असतां । टाकूनी पायीं उष्णांत एकाकी धांवतो. ॥ ४८५ ॥ ऐसा कर्मी सुखत्याग । इत्यादि सत्त्वाच्या उपेक्षेचा भाग । आळस दवडी निद्रावियोग । सावधपणें दवडी प्रमादही तमाचा. ॥ ४८६ ॥ ऐसें कर्मी रज प्रबळ । क्षीण सत्त्वाचे तमाचें बळ । आतां तम जेव्हां तुबळ । उत्कर्ष तेव्हां नसे त्या दोहींचा. ॥ ४८७ ॥ प्रमाद, निद्रा, आळस, । तेव्हां सुखसग, कर्मसग, कैचा मनास? । हेही सर्वां ठाउकेंची यास । ग्रथ किमर्थ वाढवावा? ॥ ४८८ ॥ परतु ज्ञानास आच्छादूनी । प्रमादीं तम उत्कर्षेंकरूनी । वर्ततसे म्हणोनी । भगवत म्हणे हें ऐसें. ॥ ४८९ ॥ की प्रमाद म्हणजे असावधपण । त्या सवडींत तमोगुण । ज्ञान आच्छादूनी आपण । उत्कर्षे वर्ततसे. ॥ ४९० ॥ ज्ञानशब्दे ज्ञानानुभव । तें एकची दों प्रकारें वैभव । व्यतिरेक, अन्वय, दोन्ही भाँव । अनुभवाचे. ॥ ४९१ ॥ मायांश नाठवे कांहीं । आत्मप्रत्ययाविण किमपि नाहीं । त्या आत्मप्रत्ययांतही । अवधान चुकतां ये झोंप. ॥ ४९२ ॥ ऐसें चुके अवधान। तो प्रमाद; जों अतःकरण असावधान । चित्तास आत्मप्रत्ययव्यवधान । तोंची भंग समाधीचा. ॥ ४९३ ॥ तेलाची धार जैसी । आत्मप्रत्ययांत वृत्ति ऐसी । ते प्रतीति चळतां कांहींसी । निद्रा लागे, कीं तेव्हां उठे कल्पना. ॥ ४९४ ॥ आत्मप्रतीतीचें चलन । तें प्रमादाचे लक्षण । त्या प्रमादीं तमोगुण । उत्कर्षे वर्ते दोंपरी. ॥ ४९५ ॥ निद्रा लागे तो लय । सत्त्व, रज, दोघे तमोमय । अथवा कल्पना उत्पन्न होय । दृश्य आठवे तम तेंही. ॥ ४९६ ॥ निर्विकल्पज्ञानानुभव । प्रमादीं झांकूनी वैभव । तम दावी ऐसें, कीं निद्रा, कल्पना, तांडव । अवघे तमाचे. ॥ ४९७ ॥ आतां सविकल्पज्ञान । जडपट चैतन्यतंतु ऐसें ध्यान । तेथें ततुविस्मृतिव्यवधान । प्रमाद जाणावा. ॥ ४९८ ॥ नानामूर्तींचा चित्रपट । तंतुविस्मृतीनें पाहतां निपट । स्फुरे नानामूर्तींची खटपट ।

तैसी विस्मृति जडीं अधिष्ठानाची. ॥ ४९९ ॥ अधिष्ठान कारण उपादान। सोनें नगीं जैसें वर्तमान । त्याच्या विस्मृतीचें व्यवधान । जड दर्शनी प्रमाद जाणावा ॥ ५०० ॥ स्वयें त्या प्रमादीं तम । जड दिसे स्थावरजंगम । त्याहूनी उत्कर्ष परम । कोण वर्णावा तमाचा ? ॥५०१॥ कनकघटाचे तुकडे । तें सोनेंची कीं रोकडें । खापरें म्हणूनी त्याकडे । पाहणें कळस अभाग्याचा ! ॥ ५०२ ॥ असोनी ऐसा अनुभव । जडीं धरी जडची भाव । तो राजाच परी पूर्वस्वभाव । भिक्षा मागवी त्या हातीं. ॥५०३॥ हस्तगत जाला पुरुषार्थ । प्रमाद तेथेंही करी अनर्थ । झांकूनी सत्त्वातें, करी समर्थ । तमोगुणातें. ॥ ५०४ ॥ ऐसें ज्ञानातें झांकुनी । तम प्रमादीं उत्कर्षे वर्ते म्हणोनी । उत्कर्ष या श्लोकेंकरूनी । गुणत्रयाचा वर्णिला. ॥ ५०५ ॥ तिघांत एकाचा उत्कर्ष । म्हणतां, इतरा दोघांचा अपकर्ष । तेव्हां चित्तास त्याचा सन्निकर्ष । उत्कर्ष जेव्हां जयाचा. ॥ ५०६ ॥ अर्थ ऐसा सिद्ध जाला । यावरूनी कीं याच बोला । उत्तरश्लोकीं देव बोलिला । तो वाखाणावा आतां हा श्लोक. ॥ ५०७ ॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**
**रजः सत्त्वं तमश्चैव समः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥**

अगा ! भारता ! गुणद्वय । रज आणि तम यांचा अपजय । करूनी, सत्त्व प्रबळे; या नांवें जय । पूर्वश्लोकीं बोलिलों सत्त्वाचा. ॥ ५०८ ॥ होतां शास्त्रसत्संग । शांति, मुमुक्षा, धरी अंतरंग । निर्विषया अतींद्रियाचा प्रसंग । क्षीण बल तेव्हां रजतमाचें. ॥ ५०९ ॥ ऐसाच रजोगुण । सत्त्व तम दोघे बलक्षीण । करूनी, उत्कर्षे वर्ते आपण । संगें विषयासक्तांच्या. ॥ ५१० ॥ संग विषयासक्ताचा । कानीं पडतांच त्यांची वाचा । दृष्टि पडतां विलास त्यांचा । पुरुष वर्ते तदनुरूप. ॥ ५११ ॥ विषयभोगची पुरुषार्थ । धनमानची परम अर्थ । या निश्चयें केला अनर्थ । स्वहितविस्मृति पाडिली, जाणावें. ॥ ५१२ ॥ तेव्हां कैची शांती ? । कैची मुमुक्षा ? कैची क्षांती ? । पडिली जेव्हां येऊनी भ्रांती । रजोगुणाची एकसरें. ॥ ५१३ ॥ सत्संग, शास्त्रश्रवण, । यांची कैची आठवण ? । इत्यादि करी क्षीण । रजोगुण बळ सत्त्वाचें. ॥ ५१४ ॥ तैसेंची तमोगुणाचें मोडी बळ । रजोगुण होतां प्रबळ । विषयभोगसाधनीं पळ । येऊं नेदी प्रमाद, आलस्य, निद्रादि. ॥ ५१५ ॥ भोगीं आणि भोगसाधनीं । नव्हे असावध मनीं । झोंप येऊं नेदी नयनीं । आळस मोडी देहाचा. ॥ ५१६ ॥ क्रोध तम दारुण । भोगीं, साधनीं, उठों नेदी रजोगुण । क्षमा दाखवी पूर्ण । सत्त्व वश आपणातें करूनी. ॥ ५१७ ॥ क्षमा सत्त्वाचें

लक्षण । भोगार्थ धरी त्यातें रजोगुण । भोगनिमित्त तम ऐसें दारुण । क्षीण केलें निज बळें. ॥ ५१८ ॥ असो आतां तमोगुण । सत्त्वरजोबळ करी क्षीण । जेव्हां, क्षोभे तेव्हां तोची आपण । वर्त्ते उत्कर्षेंकरूनी. ॥ ५१९ ॥ क्रोध उठे जेधवां । सुखापेक्षाही टाकी तेधवां । अविवेक घेऊं लागे धांवा । विवेक शांति तेव्हां कैची सात्विक? ॥ ५२० ॥ झोंप दाटली नयनीं । न पाहे पुढें उभी कामिनी । तरुणी समीप शयनीं । भोगेच्छा आच्छादिली निद्रेनें.॥५२१॥ भोग नाठवी वृत्ती । न घडे भोगसाधनीं प्रवृत्ती । रजोगुणातें जिके ये रीती । तमोगुण निद्राआलस्यकोपे, प्रमादें. ॥ ५२२ ॥ ऐसा सत्त्वरजांचा अपजय । तम करी, तेव्हां त्याचा जय । ऐसें स्वदेहीं, परदेहीं, पाहतां अद्वय । अक्रिय, अलिप्त, आत्मा आढळे. ॥ ५२३ ॥ याकारणें गुणवृत्ती । जाणोनी ऐशा सुमती । गुणातीत आत्मा पाहोत ये रीती । भाव भगवद्गीतेचा. ॥ ५२४ ॥ या श्लोकीं 'अगा! भारता!' । कृष्ण म्हणे कुंतीसुता । कीं तुझ्या उत्कर्षें अपकर्षे तत्त्वता । भारतां अवघियांचाही. ॥ ५२५ ॥ कीं भरतकुळीं उपजले बहुत । परंतु तूंची धन्य कुंतीचा सुत । जो हें अनुभवशास्त्र अद्भुत । श्रवण करिसी मुखें आपल्या. ॥ ५२६ ॥ भाग्य अर्जुनाचें देखोनी । म्हणे धन्य या भरतवंशीं तू म्हणूनी । 'अगा! भारता!' म्हणे धरूनी । अंतरीं ऐसा अभिप्राय. ॥ ५२७ ॥ आतां कोण कोण लक्षण । देखतां, वृद्धि पावला कोण गुण? । हें बोले श्रीकृष्ण । त्यांत सत्त्वलक्षण या श्लोकीं. ॥ ५२८ ॥

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्यत ॥ ११ ॥**

अगा! अर्जुना! या शरीरीं । प्रकाश उपजे सर्वद्वारीं । आणि ज्ञान जेव्हां अंतरीं । सत्त्व वाढलें तेव्हां जाणावें. ॥५२९॥ श्लोकाचा इतकाच अर्थ । परंतु विशद होतां, कळे परमार्थ । कीं सत्त्वही प्रकृतीचाच पदार्थ । सत्त्व निर्मल तिहीं गुणीं. ॥ ५३० ॥ तत्त्व ऐसें म्हणोनी । "तत्र सत्त्वं निर्मलत्त्वात्प्रकाशकमनामयम्" या श्लोकेंकरूनी । बोलिलें मागें कीं रजतमांहुनी । निर्मळपणें प्रकाशक सत्त्वगुण. ॥ ५३१ ॥ एकची तत्त्वता प्रकाश । जो म्हणावा चित्प्रकाश । परंतु सत्त्वयोगें सावकाश । प्रतीति त्याची. ॥ ५३२ ॥ त्या प्रत्ययेंकरूनी । सर्व प्रत्यय म्हणोनी । सत्त्व त्यां रजतमांहुनी । प्रकाशरूप. ॥ ५३३ ॥ त्या सत्त्वाचा अपजय । करिती जेव्हां गुणद्वय । कर्मी, भोगीं, आळसीं, क्रोधीं, तन्मय । सत्त्व होतें. ॥ ५३४ ॥ तें

१. मागें, श्लो० ६.

होतां असावधान । न उपजे विषयवृत्तीचें ज्ञान । सर्वां इंद्रियद्वारीं कीं मन । कर्मीं, भोगीं, आळसीं, निद्रेत, बुडतसे. ॥५३५॥ जेव्हां रजतमांचा हा क्षोभ नसे । तेव्हां सत्त्व सावध असे । सर्वां विषयाचे ज्ञान दिसे । सर्वेंद्रियद्वारा पुरुषातें. ॥ ५३६ ॥ तीं इंद्रियेंची द्वारें । तीं सावधान या प्रकारें । कीं आपलाल्या विषयांचें बरे । ग्रहण तयाला. ॥ ५३७ ॥ तो सर्वद्वारीं प्रकाश । कीं सत्त्व आत्मप्रकाशें सावकाश । जेव्हां इद्रियें जाणती प्रवेश । स्वस्वविषयांचा. ॥ ५३८ ॥ ऐसा प्रकाश सर्वां द्वारीं । जेव्हां दिसे या प्रकारीं । तेव्हां जाणावें यापरी । कीं सत्त्व वाढलें ये वेळे. ॥ ५३९ ॥ हें मिश्र सत्त्वाचें लक्षण । कीं रजतमांचें मिश्रपण । रज इद्रियें, विषय तमोगुण । वस्तुप्रकाशें प्रकाश सत्त्वाचा ॥ ५४० ॥ आतां शुद्ध सत्त्व जाणावें तेधवा । कीं ज्ञानाचा अनुभव जेधवां । सत्त्वेंकरूनी जेव्हां मानवां । ब्रम्हची दिसे. ॥ ५४१ ॥ हा निर्विशेष सुखसमाधी । तेव्हां सत्त्व निमग्न आत्मबोधीं । सर्वात्मबोधीं तो, जैसें प्रबोधीं । आठवे स्वप्न. ॥ ५४२ ॥ स्वप्नकल्पना करी मन । मनची त्या स्वप्नांतील नयन । तेंची मन जागरीं करी चिंतन । स्वप्नदृष्टिदृश्य स्वप्नसृष्टीचें. ॥ ५४३ ॥ तैसें रजतमातें स्वप्नदृष्टी । जें पाहत होतें रजतमसृष्टी । तेंची सत्त्व पावलें पुष्टी । ब्रह्मरूप पाहतां प्रपचातें. ॥ ५४४ ॥ परतु अविद्या कर्माचा देह । ब्रह्म कळलें जरी सर्व निःसदेह । टाकूनीही जडात्मता स्नेह । इद्रियद्वारा देखे दृश्यातें. ॥ ५४५ ॥ परतु जालें जागृत । ब्रह्मची सत्य कळलें निश्चित । स्वप्नदृष्टी स्वप्न जागृत । आठवी तैसें जग देखे. ॥ ५४६ ॥ ऐसें रजतमोरूप । जडजग देखे विश्वरूप । त्या जडतरगीं चित्स्वरूप । आत्मसिंधूची अवलोकी. ॥ ५४७ ॥ स्वप्न जग नाहींच निश्चित। जरी आठवी जागृत । तैसे रजतम नसतीच अत्यत । शुद्धसत्त्व जरी अवलोकी. ॥ ५४८ ॥ तोची आत्मा, तेंची मन । स्वप्नीं जागरीं समान । तोची आत्मा मन मिळतां, चिंतन । जागरीं घडे स्वप्नाचें. ॥ ५४९ ॥ तैसें तेंची सत्त्व तोची आत्माही । अविद्येंत विद्येंतही तया अन्यत्व नाहीं । परी स्वप्नदृष्टी स्वप्न दिसे, तें कांहीं । नाहींच, तैसें अनुभवीं न दिसती रजतम. ॥ ५५० ॥ तेव्हां तें शुद्ध सत्त्व । की रजतमें नसे मिश्रत्व । दिसतां रजतमासही ब्रह्मत्व । सर्वात्मबोधीं. ॥ ५५१ ॥ ऐसा द्विविधही अनुभव । शुद्ध सत्त्वाचेंची वैभव । म्हणोनी म्हणे माधव । कीं ज्ञान जेव्हां, तेव्हां सत्त्ववृद्धि जाणावी. ॥ ५५२ ॥ हे शुद्ध सत्त्वाची वृद्धी । अन्यथा पूर्वार्धींची या ज्ञानशब्दाची सिद्धी । कीं सर्व विषय जाणे बुद्धी । सर्व द्वारीं तोची प्रकाश. ॥ ५५३ ॥ प्रकाशशब्दें

विषयज्ञान । बोलिलेंची पुन्हा कां हें वचन । तेव्हां **ज्ञान**शब्दें जगज्जीवन । अनुभवची बोले. ॥ ५५४ ॥ आणि **यदा** म्हणजे ज्ञान जेव्हां । **तदा** म्हणजे तें ज्ञान जेव्हां तेधवां । **सत्त्व** वाढलें जाणावें **पांडवा**! । कीं अनुभवस्मृति जेव्हां, तेव्हां शुद्ध सत्त्व. ॥ ५५५ ॥ दोंपरी तो अनुभव । दोहीं स्थळीं शुद्ध **सत्त्वा**चेंची वैभव । मिश्र **सत्त्व**वृद्धीचा भाव । पूर्वार्धें बोलिला. ॥ ५५६ ॥ आतां **र**जोगुण । त्याच्या वृद्धीची हे खूण । म्हणोनी सर्वज्ञ **ना**रायण । बोलतसे हा श्लोक. ॥ ५५७ ॥

**लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

**भ**रतकुलश्रेष्ठा! **पांडवा**! । वृद्धि **र**जोगुणाची जेधवां । लोभ उत्पन्न होतो तेधवां । धनादिकांचा. ॥ ५५८ ॥ धनधान्यादि नाना लाभ । होत असतांही अत्यत लोभ । सोस म्हणवा तोची क्षोभ । **र**जोगुणाचा. ॥ ५५९ ॥ **कु**बेराचें सांपडे वित्त । तृप्त नव्हे तरी चित्त । आणखी मिळवाया निमित्त । करी प्रवृत्ती. ॥ ५६० ॥ कर्म एक करितो । कर्म दुसरे आरभितो । फळ एकाचें सापडे, तों । आरभितो आणखी. ॥ ५६१ ॥ व्यग्र सर्वदा चित्त । मिळालें अथवा न मिळे जरी वित्त । धनरक्षणाहीनिमित्त । व्यग्र सदा. ॥ ५६२ ॥ विश्वास कोणाचा नसे । सर्वदा घाबिरा दिसे । आणि ध्यानीं मनीं वसे । स्पृहा सदा. ॥ ५६३॥ येथें '**भ**रतर्षभा!' या नांवेकरूनी । 'अगा! **भ**रतकुलश्रेष्ठा!' म्हणोनी । आळवी गहन भावेंकरूनी । **दे**वाधिदेव. ॥ ५६४ ॥ कीं **दु**र्योधनादि दुष्ट । **र**जोगुणेंची केले भ्रष्ट । **भ**रतवशीं तूंची श्रेष्ठ । कीं हें श्रवण याही काळीं तुज होतें. ॥ ५६५ ॥ लोभ राज्याचा चित्तीं । कपटद्यूतादिकीं प्रवृत्ती । शम, चित्ताचें समाधान आणि निवृत्ती,। ज्यांस स्वप्नींही दुर्लभ.॥५६६॥ स्पृहा विजय पावायाची मनीं । हा **र**जोगुण क्षोभेंचीकरूनी । त्या **भा**रतांत तूं उत्पन्न होउनी । हें श्रवण करिसी, धन्य तू. ॥ ५६७ ॥ '**भ**रतर्षभा' म्हणोनी । येथें या भावेंकरूनी । आळविलें, आतां येथूनी । वृद्धि **त**माची बोलतो या श्लोकीं. ॥ ५६८ ॥

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥**

इंद्रियांची सावधानता । ते तों **स**त्त्वाची प्रकाशता । मागें सांगितली **पांडु**सुता! । तद्विपरीत हे **त**मोवृद्धी. ॥ ५६९ ॥ स्वीकार घडे विषयांचा । तो प्रकाश इंद्रियांमनाचा । विपरीत भाव त्याचा । **अप्रकाश**. ॥ ५७० ॥

शब्दची कानीं न पडे । क्रोधें, आळसें, ऐसेंही घडे । आयकोनीही ठायीं न पडे । अर्थ, भावार्थ, शब्दाचा. ॥ ५७१ ॥ अप्रकाश ये रीती । **त**मोवृद्धींत सांगे **श्री**पती । आणि म्हणे **अप्रवृत्ती** । जेथें अप्रकाश, तेथें प्रवृत्तीही केवीं घडे? ॥ ५७२ ॥ इद्रियवृद सावधान । मनबुद्धीचें समाधान । कृत्याकृत्याचें ज्ञान । तरी घडे प्रवृत्तीही. ॥ ५७३ ॥ मनइद्रियांचा प्रकाश नसे । प्रवृत्तीचा मार्ग न दिसे । प्रमाद अतिशयें उल्लसे । वृद्धि होता **त**माची. ॥५७४॥ **प्रमाद** ह्मणजे असावधपण । आणि मोह जेव्हा वाढे तमोगुण । **मोह** अविवेकलक्षण । होतो **त**मोगुण वाढता. ॥ ५७५ ॥ तूं **कुरु**कुलनदन । म्हणूनी म्हणे **म**धुसूदन । की **कुरु**कुलास आनदवर्धन । तू **अर्जुन स**त्त्वगुणी यावरूनी. ॥ ५७६ ॥ कीं सुखकारक तिही गुणीं **स**त्त्व । ऐसें **कुरु**कुळीं तुझे महत्त्व । यालागीं **कुरु**कुलनदनत्व । **अर्जुना**! तूतें. ॥ ५७७ ॥ या भावें **अर्जुना** । म्हणे, अगा! **कुरु**नदना! । **स**त्त्वयोगे आनद जना । तैसा तूं **कुरु**कुलातें. ॥ ५७८ ॥ आता देहावसानीं । कोणा गुणाच्या वृद्धीकरूनी । कोण गति होते? म्हणोनी । **अर्जुन** पुसे, तों सत्त्वफळ बोलतो या श्लोके. ॥ ५७९ ॥

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

अगा! सत्त्व असतां वाढलें । शरीर ज्याचें पडिले । त्या जीवास पावणें घडलें । लोकां उत्तमविदाचिया. ॥ ५८० ॥ तत्त्व[1] उत्तम जाणती । आणि शिथिल अभ्यासीं मती । ऐसेही **ब्रह्म**रंध्र भेदूनी जाती । ज्ञानी हटयोगी **ब्रह्म**लोका. ॥ ५८१ ॥ अध्याय वाखाणिला अष्टम[2] । तेथें बोलिला हा क्रम । ज्ञानी अपक्क आणि हटयोगी उत्तम । ते **ब्रह्म**लोकातें पावती. ॥ ५८२ ॥ अभ्यासें ज्ञान दृढ होतें । **ब्रह्म**लोकींच मग तयातें । मोक्ष **ब्रह्म**यासांगातें । की अपक्क, तरी तत्त्व उत्तम जाणती. ॥ ५८३ ॥ ते उत्तमविद सुज्ञ लोक । अपक्क तरी पावती **स**त्यलोक । अभ्यासें योग बाणतां अशोक । परम पद ते पावती. ॥ ५८४ ॥ आतां येथें प्रस्तुतीं । अमला उत्तमविदांच्या लोकाप्रती । ज्यास पावे म्हणे **श्री**पती । हा न जाणे उत्तमा तत्त्वातें. ॥ ५८५ ॥ परी उत्तमविदांच्या लोकांप्रती । पावतो जेथूनी ते न परतती । हा परततो, तथापि ते गती । पावतो मरतां सत्त्ववृद्धींत. ॥ ५८६ ॥ आतां रजोगुण वृद्धींत मेला । आणि तमोवृद्धींत देह टाकूनी गेला । दोघांचीही गति का ऐसिया बोला । बोलतसे या श्लोकीं. ॥ ५८७ ॥

---

१. 'सत्त्व' असा पाठभेद. २. अ० ८, श्लो० ७-१५.

पूर्वार्ध—**रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।**

रजोवृद्धि असतां मरतो । तो कर्मसंगिया पुरुषांत उपजतो । जो स्वर्गकाम, यजूनी जातो । स्वर्गाप्रती. ॥ ५८८ ॥ सत्त्ववृद्धींत मेला । आणि उत्तमविदांच्या लोकांस गेला । म्हणूनी जो पूर्वश्लोकीं बोलिला । तो मुमुक्षु शुद्धचित्त. ॥ ५८९ ॥ ज्ञान नाहीं जाले । आणि सत्त्वशुद्धीतें पावले । क्षीणत्व अत्यंत आलें । रजतमातें; ॥ ५९० ॥ त्यांसी ब्रह्मलोक बोलिला । पुढेंही बोलेल याच बोला । की ऊर्ध्व लोक त्यांला । जे सत्त्वस्थ. ॥ ५९१ ॥ **'ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था'** या श्लोकेंकरूनी । **'मध्ये तिष्ठंति राजसा'** म्हणोनी । जवळीच हा श्लोक त्यावरूनी । येथें ऐसा अर्थ बोलावा अगत्य. ॥ ५९२ ॥ की कर्मसंगी मनुष्य । त्यांत उपजेल ऐसें भविष्य । त्याचेंची जो सरतां आयुष्य । स्वर्गकाम रजोवृद्धींत पावतो स्वर्गातें. ॥ ५९३ ॥ अन्यथा रजोगुणीं मरे । आणि पुन्हा मनुष्यजन्मातें फिरे । तरी साधारण सकळही ऐसेंची खरे । की विषयासक्तीनें देह सोडिती. ॥ ५९४ ॥ मनुष्यदेहाउपरी । मनुष्यदेह हे गोष्टी दुरी । साधारण रजोवृद्धींत तरी । भलता मरतसे. ॥ ५९५ ॥ नरकास जातां मूढयोनी । अधोगति तामसातें म्हणूनी । ते पावती मूढयोनी । त्यांची अधोगति याच प्रस्तुतीं **भ**गवत बोलेल. ॥ ५९६ ॥ **'जघन्यगुणवृत्तिस्था। अधोगच्छंति तामसा'** ऐसें सर्वथा । श्रीकृष्ण बोलेल **पार्था** । **'ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था'** या श्लोकेंकरूनी. ॥ ५९७ ॥ अधोगति नरक तामसांतें । मूढयोनि या श्लोकीं बोलिली त्यांतें । आणि जन्म सांगे राजसांतें । कर्मसंगी मनुष्य त्यामाजी ॥ ५९८ ॥ एवच स्वर्गकामनापर । तो हा विशिष्टराजस नर । अन्यथा विषयासक्त खर । तो मनुष्यजन्म केंवी पावे? ॥ ५९९ ॥ यालागीं रजोवृद्धि साधारण । तेची तमोवृद्धीस कारण । ते वाढतां तमोगुण । रजोगुणींच नरक मूढयोनि पावती. ॥ ६०० ॥ यालागीं जो सत्त्ववृद्धींत मेला । आणि उत्तमविदांचिया अमल लोकांतें पावला । तो जाणावा उपजला । ज्ञाननिष्ठां मनुष्यांत. ॥ ६०१ ॥ यावरूनी की रजोवृद्धींत मृत । स्वर्गकाम तैशाच्याच कुळीं उपजत । मग तो दु:सगें पावो नरकपात । परी पूर्वसस्कारें कर्मासक्तांत उपजतो. ॥ ६०२ ॥ परतु राजस कर्मासक्तांत तो जैसा । सात्त्विक शुद्धचित्त मुमुक्षु जनीं तैसा । उपजतो म्हणूनी भावार्थ ऐसा । सुचवी **भ**गवत. ॥ ६०३ ॥ कीं साधारण राजस । तोची म्हणावा तामस । म्हणोनी तमोवृद्धींत मृत म्हणतां **श्री**निवास । **हें तथा**शब्दे सुचवितो उत्तरार्धी. ॥ ६०४ ॥

---

१. अ० १४, श्लो० १८.

उत्तरार्ध—**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

जेथें **तथा**शब्द असे । त्या शब्दींच **यथा**शब्दही वसे । **वेदीं पुराणीं** प्रसंगोपात्त ऐसे । अर्थ सर्वत्र बोलती. ॥ ६०५ ॥ **तथा** म्हणिजे तैसा । कीं रजोवृद्धींत मृत बोलिला जैसा। तैसा होऊनीही तमोवृद्धीचा वेळसा । त्या काळीं मरे, तो उपजे मूढयोनींत. ॥ ६०६ ॥ कीं साधारण राजस । क्रुद्ध विषयासक्त तोची तामस । परंतु स्वर्गकाम यजूनी स्वर्गास । पावोनी कर्मठांचमध्यें उपजतो. ॥ ६०७ ॥ तो स्वर्गास गेला । कर्मठांमाजी उपजला । तैसाच राजस मेला । तमोवृद्धींत. ॥ ६०८ ॥ तो नरक नाना भोगूनी । पावे अतीं मूढयोनी । स्वर्गकामही तैसा, परंतु तो याग करूनी । स्वर्ग भोगूनी उपजे कर्मसगियांत. ॥ ६०९ ॥ मग सत्सगे होय निष्काम । अथवा कर्मसगिसगे सकाम । अथवा साधारणसगें अधम । नरक भोगूनी पावे मूढयोनीतें. ॥ ६१० ॥ परतु पूर्व-संस्कारेंकरूनी । कर्मसगियांत उपजे म्हणोनी । बोलतां सुचवी यावरूनी । कीं ज्ञानियांमध्यें उपजे सात्त्विक. ॥ ६११ ॥ **'शुचीनां श्रीमतां गेहे'** या श्लोकेकरूनी । अथवा **'योगिनामेव कुले'** म्हणोनी । योगभ्रष्टजन्म बोलिला यावरूनी । शुद्धसत्त्व मुमुक्षु उपजे ज्ञानियांत. ॥ ६१२ ॥ की जिज्ञासु शुद्धसत्त्व जाला । आणि ज्ञान न होतां मेला । तो उत्तमविदांच्याच लोकांस गेला । तेव्हां उपजेलही उत्तमविदांत. ॥ ६१३ ॥ कीं सत्त्वप्रधान कर्मफल । **पर**ब्रह्मची केवळ । आतां हेही गोष्टी निवळ । बोलतो यापुढेंची या श्लोकीं. ॥ ६१४ ॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥**

कर्म जें सत्त्वकृत । तें बरे केले म्हणावें **सुकृत** । त्याचें फळ नव्हे प्राकृत । निर्मळ सात्त्विक फळ बोलती. ॥ ६१५ ॥ रजतमांचा नाहीं मळ । तें परब्र-ह्मची निर्मळ । कीं रज इद्रियें, तम विषय सकळ, । तें अतीद्रिय निर्विषय स्वयें. ॥ ६१६ ॥ जरी रजतमांपलीकडे । तरी शुद्धसत्त्वातें ठायीं पडे । सत्त्वेंची सर्वात्मताही सांपडे । यालागीं फळही निर्मळ आणि सात्त्विक. ॥६१७॥ सात्त्विक कर्माचें फळ । सात्त्विकची आणि निर्मळ । की सत्त्वेंकरूनी अनुभव केवळ । निर्मळ रजतमातीत म्हणोनी. ॥ ६१८ ॥ **'सत्त्वात्संजायते ज्ञानं'** म्हणोनी । **भ**गवंतही ऐसें स्वमुखेंकरूनी । बोले **गी**ताकार की त्यावरूनी । टीकाकारीं वाखाणावें पूर्वापार ग्रंथातें. ॥ ६१९ ॥ आता रजोगुणाचें कर्मफळ ।

१. फांसा, बधन. २. अ० ६, श्लो० ४१. ३ पुढील श्लोक पहा.

त्यांत एक लौकिक, एक वेदमूळ, । फळ दोहींचें मेघनीळ । तृतीय चरणीं बोलतसे. ॥ ६२० ॥

तृतीयच०—**रजसस्तु फलं दुःखम् ॥**

रजाचें फळ तों दुःख । ऐसें म्हणे पूर्णेंदुमुख । कीं स्वर्गादि वेदोक्त सुख । दुःखची अवघें. ॥ ६२१ ॥ रजाचें फल तों दुःख म्हणोनी । **'रजसस्तु'** म्हणोनी या **'तु'** शब्देंकरूनी । रजाचें तों फल दुःख म्हणे यावरूनी । स्वर्गादि सुखें दुःखची म्हणतसे. ॥ ६२२ ॥ ऐसें सुचवी सर्वेश्वर । कीं जें फळ नश्वर । त्याचे आदिमध्यअंतीं तो नर । दुःखची पावतो. ॥ ६२३ ॥ जों जों बहुत सुख । तों तों बहुत दुःख । अत एव काम्य सुखाचें मुख । मुमुक्षु सर्वथा न पाहती. ॥ ६२४ ॥ कर्म नव्हतां सांग । उणें पडतां कांहीं अंग । होणार कर्मफलभंग । हा धोका आधीं कर्म करितां. ॥ ६२५ ॥ सांगही कदाचित् घडे । तरी फलनाशाची चिंता पडे । नाशसमयीं तो रडे । ऊर फुटे आठवितां. ॥ ६२६ ॥ विमानारूढ होउनी । संगे देवांचिया कामिनी । क्रीडे नंदनादि वनीं । परी मनीं धोका काळ सरतां सावधि. ॥ ६२७ ॥ खांदियावरी शूळ । तो चोर खाय खोबरें गूळ । सुख नियत काळाचें दुःखमूळ । आदिमध्यें ये रीती. ॥ ६२८ ॥ पूर पुण्याचा ओसरे । काळ नियत अवधीचा सरे । ते क्षणींच तो घसरे । तें दुःख त्याचें वदे कवण? ॥ ६२९ ॥ ते देवांगनांचे भोग । नाना क्रीडा विलासयोग । क्षणांत तितकियांचाही वियोग । दुःखची होय सुख अवघे. ॥ ६३० ॥ रजाचें तों फळ । दुःख म्हणे घननीळ । त्याचा अर्थ निवळ । ये रीती. ॥ ६३१ ॥ आतां तमाचें फळ अज्ञान । कीं पश्वादि योनींत कैचें ज्ञान? । तो मनुष्य जाला, तरी पशूसमान । सत्संगेंही नव्हे अधिकारी ज्ञानाचा. ॥६३२॥ वारवार मूढयोनी । भोगितां नरदेहही पावोनी । सत्संगेंहीकरूनी । मुमुक्षा न उपजे. ॥ ६३३ ॥ तोही पशुच लेखावा । पशु मनुष्याकारें देखावा । त्याचे ठायीं ओळखावा । महिमा तमोगुणकर्माचा ये रीती. ॥ ६३४ ॥ अज्ञान तों आयतेंची सकळ । आतां तमाच्या कर्माचें कोण फळ? । अज्ञानफळ म्हणे मेघनीळ । तें ऐसें. ॥ ६३५ ॥ आतां हेंची विशद । कळावें म्हणोनी गोविंद । बोलेल सुचवूनी प्रतिपद । पूर्वश्लोक या श्लोकीं. ॥ ६३६ ॥

**सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥**

सत्त्वाच्या हेतूस्तव । होतें ज्ञानवैभव । रजाच्या हेतूस्तव उद्भव । लोभाचा.

॥ ६३७ ॥ हेतु जितके तमाचे । ते निर्माणकर्ते प्रमादमोहाचे । आणि अज्ञान ऐसें स्ववाचे । **गी**ताकारही बोलतो. ॥ ६३८ ॥ पूर्वश्लोकीं सात्त्विक निर्मळ । बोलिलें सात्त्विक कर्मफळ । कीं ज्ञान सत्त्वशुद्धमूळ । सात्त्विककर्में सत्त्वशुद्धी. ॥ ६३९ ॥ निष्काम **ई**श्वरार्पित । तें सात्त्विककर्म निश्चित । कीं कर्म सात्त्विक आणि अच्युत । शुद्ध सत्त्वोपाधि अर्पी तयातें. ॥ ६४० ॥ ज्या कर्मीं कर्म-कामना । तेथें रजतमवृत्तीच दिसती मना । कीं इद्रियें रजतमविषयाविना । कामनाच न घडे. ॥ ६४१ ॥ ज्या कर्मीं नाहीं फळ । तेथें सत्त्वची केवळ । कीं रजतमाचे मळ । न स्पर्शले. ॥६४२॥ ऐसेंही करी । आणि **ई**श्वरीं न अर्पी जरी । ते बधकची फळभोग जरी । तरी बध म्हणावा. ॥६४३॥ इद्रियें विपयरूप कर्म । **ई**श्वरीं अर्पितांच तें **स**गुण **ब्र**ह्म । फळ नाशी, वैद्य उत्तम । जेंवी रसराज करी बचनागाचा. ॥६४४॥ म्हणोनी तिसरिया अध्यायीं **क**मलनेत्र । बधक म्हणे कर्ममात्र। **'य**[1]**ज्ञार्थात्कर्मणोन्यत्र'** । या श्लोकीं. ॥ ६४५ ॥ एक **यज्ञ विष्णु**, तद-र्पित । बधक नव्हे निश्चित । निष्कामही असे बध निर्मित । न समर्पितां **वि**ष्णूतें. ॥ ६४६ ॥ एवंच बध न घडे कर्में जया । मोक्ष उपजे कर्में तया । कीं अर्पिलें मुक्तिधनाचिया दातया । **यज्ञ**नामका **विष्णू**तें. ॥ ६४७ ॥ यालागीं सात्त्विका कर्माचें फळ । सात्त्विक आणि निर्मळ । तें तों ज्ञान केवळ । नव्हे, न अर्पितां **वि**ष्णूतें. ॥ ६४८ ॥ तांदूळ साळीचे होती । त्याच तांदुळातें मनुज भक्षिती । हें एकदा जे ऐकती, ते कांडूनीच भक्षिती । भक्षा म्हणतां साळीतें ॥ ६४९ ॥ तैसें एकत्र । बोलिला स्वये **क**मळनेत्र । कीं **'यज्ञार्थात्कर्मणोन्यत्र । लोकोयं कर्मबंधनः'** ॥ ६५० ॥ ऐसेंची [2]चतुर्थीं, प[3]चमीं । आणि ऐसेंची [4]नवमीं । स्पष्ट बोले मोक्षदाता **स्वा**मी । कीं मोक्ष कर्म मज समर्पितां. ॥ ६५१ ॥ एवंच ज्या सात्त्विक कर्माचें फळ । सात्त्विक आणि निर्मळ । तें ऐसें म्हणूनी **मे**घश्यामल । या श्लोकीं **'सत्त्वा-त्संजायते ज्ञानं'** म्हणतसे. ॥ ६५२ ॥ फळ पूर्वश्लोकीं । राजस कर्माचें बोलिलें की । सुखही दुःखची परलोकीं । या श्लोकीं लोभ म्हणे रजास्तव. ॥ ६५३ ॥ **लोभ** म्हणजे धनादि अर्थ । जे अपेक्षावे सुखार्थ । मिळत असतांही ते पदार्थ । अधिक तृष्णा लोभ तो. ॥ ६५४ ॥ जों प्राप्त जालि-याचें होय सुख । तों लोभ उपजे कीं मिळो आणिक । भोजनीं तृप्ति नव्हतां दुःख । सुखही मिष्टान्नजनित ये रीती. ॥ ६५५ ॥ ऐसें रजोगुणाचें कर्म-

---

१. अ० ३, श्लो० ९. २. अ० ४, श्लो० २३–२४. ३. अ० ५, श्लो० १०,१२ इत्यादि.
४. अ० ९, श्लो० २७–३४.

फळ । पूर्वश्लोकींही बोलिला घननीळ । की सुखही दुःखमूळ । ज्यास सुख होऊनीही तृप्ति नसे. ॥ ६५६ ॥ आणि फळ तमाचे । दोहीं श्लोकीं अज्ञानची साचे । परी या श्लोकीं अज्ञानाचें । कारणही दोंपरी बोलतसे. ॥६५७॥ कीं प्रमाद मोह दोनी । तमाच्या हेतूस्तव म्हणूनी । त्या दोहींच्या हेतूकरूनी । सत्सगेही नव्हे अधिकारीही ज्ञानाचा. ॥ ६५८ ॥ जो राजस काम्यें करितो । तो कर्मी सावधान असतो । सत्सगेंकरूनी तो । क्षण न लगे होतां निष्काम. ॥ ६५९ ॥ निष्काम होतां अतःकरण । धांवोनी धरी सतचरण । त्याच्या प्रसादे चुके जन्ममरण । ज्ञानोपदेशें तयाच्या. ॥ ६६० ॥ तैसा नव्हे तमोगुणी । प्रमाद भरला अतःकरणीं । स्वहिताच्या असावधपणीं । निवृत्तिमार्गची नावडे. ॥ ६६१ ॥ प्रमादे ऐसा असावधान । आणि मोहेंकरूनी विषयध्यान । या दों गोष्टींकरूनी अज्ञान । ह्मणजे ज्ञान व्हावें हेंही ज्ञान उपजेना. ॥६६२॥ अतएव सात्त्विक राजस । बरे कीं जरी नव्हे ज्ञान त्यास । तरी गति यथायोग्य, परी यास । नरकची ऐसें नरकांतक म्हणतो या श्लोकीं. ॥ ६६३ ॥

**ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥ १८ ॥**

जे सत्त्वगुणाच्या ठायीं स्थिर । ते ऊर्ध्व उच्च गति पावती नर । ते ऊर्ध्वलोक मागें बोलिला सर्वेश्वर । उत्तमविदांचे म्हणूनी. ॥ ६६४ ॥ जनतपसत्यलोक । हे म्हणावे ऊर्ध्वलोक । स्वर्गलोक मध्यलोक । जे भूलोकीं कर्मकर्ते तयांतें. ॥ ६६५ ॥ प्रस्तुतीं सत्त्वस्थ जन । ऊर्ध्वलोंका जाती म्हणे भवभजन । आणि राजस करिती स्वर्गार्थ यजन । ते मध्यलोकीं स्वर्गी राहती. ॥ ६६६ ॥ या दोंही गुणांच्या वृत्ती । अधम न म्हणूनी विश्वपती । जघन्यगुणवृत्तिस्थ अधोगती । तमोगुणी पावती, म्हणतसे. ॥ ६६७ ॥ सात्त्विक तों उत्तमची धन्य । राजसही न म्हणे अमान्य । कीं सात्त्विकाच्या संगे तेही होती मान्य । परी जघन्य तमोगुणीं. ॥ ६६८ ॥ जघन्य निंद्य अवलक्षण । तिहींमध्यें तमोगुण । क्रोध, हिंसा, आळस, स्वहितीं असावधपण । वृत्ति त्याच्या. ॥ ६६९ ॥ इत्यादि वृत्तींत । जे रंगले अत्यंत । त्या तामसांतें म्हणे भगवंत । अधोगति पावती म्हणोनी. ॥ ६७० ॥ ऐसे गुणत्रयाचे सांगतां बंध । प्रसंगें क्षय, वृद्धि, गति, योनिसबंध । त्यांचे वर्णितां गीताप्रबध । येथवरी आला. ॥ ६७१ ॥ प्रयोजन या उपदेशाचें । हेंची कीं कर्तृत्व अवघें गुणाचें । पाहतां, पाहावें आत्मयाचें । अक्रियत्व. ॥ ६७२ ॥ त्रयोदशीं कर्त्री प्रकृती । पाहे तोची पावे अक्रियत्वस्थिती । म्हणूनी बोलिला श्रीपती । तदर्थ

हा प्रवर्तला अध्याय. ॥ ६७३ ॥ म्हणूनी गुणवृत्ती । प्रसंगें त्यांच्या जाती । जन्मांतर आणि परलोकगती । गुण ऐसे येथवरी वर्णिले. ॥ ६७४ ॥ आतां ज्याकारणें हे प्रकार । ज्याकारणे हे विचार । ज्याकारणें ग्रथविस्तार । तें अक्रियत्व फलसहित बोलतो या श्लोकी. ॥ ६७५ ॥

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥**

या गुणांवेगळा कोणी इतर । कर्ता नाहीं, ऐसा जेव्हां द्रष्टा नर । पाहतो, तेव्हां गुणापरता परात्पर । त्यातें जाणतो. ॥ ६७६ ॥ जेव्हां ऐसें जाणतो । तेव्हां मद्भावातें पावतो । सारूप्य भाव माझा पुरुष तो । पावतो तेव्हां, अर्थ ऐसा. ॥ ६७७ ॥ ज्ञान जालियावरी । ज्ञानी अकर्त्रात्मता आपली बरी । ऐसी पाहे, तेव्हां म्हणे हरी । भाव माझा पावतो. ॥ ६७८ ॥ **मद्भाव**शब्दे निर्गुण । माझा भाव म्हणतो सगुण । कोणी वाखाणिती जे निपुण । सगुणमोक्ष निर्गुणपर लाविती. ॥ ६७९ ॥ ऐसें तरी तो न घडे अर्थ । ये रीती या श्लोकी समर्थ । बोलत असतां स्वये, ते व्यर्थ॰। निर्गुणाभिमानातें दाविती. ॥ ६८० ॥ पूर्वार्धीं '**पश्यति**' । तृतीय चरणीं '**वेत्ति**' । चतुर्थ चरणी '**अधिगच्छति**' । याउपरि व्यर्थ कल्पना निर्गुणप्राप्तीची. ॥ ६८१ ॥ '**पश्यति**' म्हणिजे पाहतो । कीं गुणकदबची कर्मे करितो । तेव्हां '**वेत्ति**' म्हणिजे जाणतो । जो गुणापरता तयातें. ॥ ६८२ ॥ तेव्हां '**मद्भावं सोधिगच्छति**' । म्हणजे माझ्या भावातें तो पावतो म्हणे **श्री**पती । तो निर्गुणभाव म्हणतो तृतीयचरणीं '**वेत्ति**'। म्हणजे जाणतो गुणापरत्या आत्मयातें. ॥६८३॥ तोची गुणापरता निर्गुण । त्यातें जाणतो तो निपुण । जो '**पश्यति**' म्हणजे पाहतो खूण । कर्मं करिती गुणची म्हणोनी. ॥ ६८४ ॥ त्रिगुणाकडे पाहतो म्हणजे '**पश्यति**' । तेव्हां निर्गुणातें जाणतो म्हणजे '**वेत्ति**' । त्या निर्गुणातें तों तेची म्हणावे जाणती । जे निर्गुण आपण, ऐसें समजले. ॥ ६८५ ॥ आतां '**मद्भावं सोधिगच्छति**' । म्हणूनी म्हणे **श्री**पती । तरी निर्गुण होऊनी निर्गुणाप्रती । पावतो, तेव्हां काय निर्गुण दोनी लेखावे? ॥ ६८६ ॥ येथें क्लिष्ट कल्पना । करू शकती आणिकी नाना । खटपट तेही येते मना । जरी सगुणमोक्ष बोलिला नसता या ज्ञानें. ॥ ६८७ ॥ आरभीं दुसरिया श्लोकीं । उत्तमश्लोक बोलिला कीं । या ज्ञानाच्याच आश्रयें सुज्ञ लोकीं । साधर्म्य माझे साधिले. ॥ ६८८ ॥ तरी कर्तृत्व पाहे गुणाचें । ज्ञान तेव्हां गुणापरतें निर्गुणाचें । तो मद्भाव पावतो म्हणिजे सगुणाचे । साधर्म्य पावतो पूर्वोक्त.

॥ ६८९ ॥ अर्थ अनायासें सिद्ध असतां । क्लिष्ट कल्पना कां आतां? । मान्य मोक्ष सगुणची सतां । की आनदानुभव मोक्षांतही. ॥ ६९० ॥ असो तें या श्लोकी मथितार्थ । हाची की निर्गुण ज्ञानेंची सगुण पुरुषार्थ । बहुधा ऐसेंची बोलतो समर्थ । भगवत या गीतेमध्यें. ॥ ६९१ ॥ आतां मद्भाव पावतो म्हणोनी । बोलिला की प्रारब्धेकरूनी । देह आहे तों गुणातीत होउनी । देह सोडितां पावतो मद्भाव. ॥ ६९२ ॥ तरी जो असे तें शरीर । तोंवरी तो गुणातीत धीर । कैसा वर्तें? म्हणूनी पांडवप्रवीर । पुसे, तों स्वयें बोलतो हा श्लोक. ॥ ६९३ ॥

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥**

या गुणत्रयातें अतिक्रमूनी । जे गुण उपजती देहापासूनी । जन्ममृत्युजरादुःखापासूनी सुटोनी । तो जीवन्मुक्त अमृत अनुभवितो. ॥ ६९४ ॥ अर्थ ऐसा श्लोकाचा । परी विशद बोलतां हे देवाची वाचा । अर्थ दुसरिया चरणाचा । संदेह थोर उपजवी. ॥ ६९५ ॥ त्याचा करूनी परिहार । मग गीताकारची टीकाकार । बोलेल अनुभवप्रकार । गुणातीता लक्षणाचा. ॥ ६९६ ॥ देही देहसमुद्भवातें । अतिक्रमितो तिहीं गुणांतें । दुसरिया चरणें भगवतें । बोलिले ऐसें. ॥ ६९७ ॥ तरी देहापासूनी उद्भव गुणांचा । आधीं हा अर्थ न दिसे साचा । कीं गुणापासूनी देहाचा । उद्भव वदावा, म्हणोनी हें विपरीत. ॥ ६९८ ॥ याच भयेकरूनी । देह उपजला ज्या गुणापासूनी । ते गुण म्हणोनी अर्थ ऐसा व्याख्यानी । बोलती कितीएक. ॥ ६९९ ॥ हें पद एक, शब्द दोनी । अर्थ करावा समासेंकरूनी । त्यांत देह उद्भवला ज्या गुणापासूनी । ते गुण म्हणोनी हा समास एक. ॥ ७०० ॥ तरी हा समास अगत्याकारणें । बोलावा म्हणती व्याकरणें । मुख्य ऐसा समास करणें । कीं देहापासूनी गुण उद्भवती. ॥ ७०१ ॥ समास हा उत्तम परी । अर्थ बाधित नव्हे जरी । देहापासूनी गुण म्हणतां वैखरी । विपरीत दिसते. ॥ ७०२ ॥ माता पुत्रापासूनी कैसी? । उपजे शका या अर्थी ऐसी । तरी पुढें गोष्टी चालते कैसी? । जों हे शका निवारेना. ॥ ७०३ ॥ तरी हा जीवन्मुक्तिप्रसंग । येथें बोलतो श्रीरग । प्रकृतिवेगळा जाला अनुभवी त्याचें अग । उरलें प्रारब्धभोगाचकारणें. ॥ ७०४ ॥ ते भोग जे जे रीती । जेव्हां जेव्हां प्राप्त होती । तेव्हां तेव्हा तैशा वृत्ती । देहाचपासूनी उठती अवघिया. ॥ ७०५ ॥ बीजापासूनी वृक्ष जैसा । गुणापासूनी देह तैसा । पुन्हा वृक्षापासूनी बीजें होतीं, हा

भरंवसा । बीज पेरितांही असतसे. ॥ ७०६ ॥ जागृतास स्वप्नस्मृती । प्रपंच ज्ञानियातें ये रीती । तथापि भोग प्राप्त होती । खरेसेच वाटती भोगितां. ॥ ७०७ ॥ कर्म सत्य, मी कर्ता साच । अज्ञदशेत भाव ऐसाच । फलपाक त्याचा तैसाच । की भोग सत्य, मी भोक्ता सत्य, हें वाटे. ॥ ७०८ ॥ कर्म-कर्ता नर । परी प्रारब्धरांधा करी सर्वेश्वर । त्याची शक्ति त्या प्रारब्धीं दुस्तर । भोग भोगवीच कर्त्यातें. ॥ ७०९ ॥ गुणातीत जाला ज्ञानी । सुटला प्रकृती-पासूनी । परंतु देहप्रारब्धाचा म्हणोनी । उपजवी भोग. ॥ ७१० ॥ फलें वृक्षास येती । त्यांत बीजे तीं ज्यांपासूनी वृक्षोत्पत्ती । तैसे देहीं भोग उपजती । त्यांत गुण तीनी ज्यांपासूनी देह. ॥७११॥ जो गुणातीत जाला । गुणची आधीं कैंचे तया? कीं हे त्याला । तथापि गुणद्रष्टा बोलिला । प्रारब्धशरीर असे म्हणोनी. ॥७१२॥ तेव्हां जे भोग उत्पन्न होती । तेच गुण जाणावे उपजती । या भावें म्हणे श्रीपती । कीं देहसमुद्भवां गुणांतें अतिक्रमितो. ॥७१३॥ त्याच्या मतें देह नाहीं । कीं प्रतिमा धातूवेगळी न असे कांहीं । तथापि प्रारब्धभोगार्थ आहे, तों देही । म्हणावें याला. ॥७१४॥ म्हणोनी म्हणे देव । की देही हे तिन्ही देहसमुद्भव । गुण अतिक्रमूनी अनुभव । अमृताचा घेतसे. ॥ ७१५ ॥ चैतन्यरज्जु कळला अमृत । त्रिगुण सर्प तेव्हां मृत । तें **अमृत** अनुभवी म्हणोनी वचनामृत । मेघश्याम येथें वर्षला. ॥ ७१६ ॥ चैतन्य पाहे जड जगीं । सोनेंची नुसतें जैसें नगीं । परतु प्रारब्धभोग प्रसगीं । अलिप्तपणें अतिक्रमी या तिहीं गुणातें. ॥ ७१७ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गध । श्रोत्रादि इद्रियांस यांचा संबध । न लागे आपणास गध । विषयग्रहणकर्माचा. ॥ ७१८ ॥ त्यास मन, बुद्धि, चित्त । होतीं भोगीं निमित्त । तरी तींही नव्हतींच निजात्मवित्त । त्या सत्त्व-वृत्ती, आत्मा त्यांपरता. ॥ ७१९ ॥ कळतां चिदात्मसत्ता । जैसा सर्प न दिसे रज्जु कळतां । अहकारसर्प न दिसे तैसा देखता । आत्मवस्तूतें. ॥ ७२० ॥ तथापि भोगाचे प्रकार । उपजविती अहकार । मी क्षुधित, मी तृप्त, हाही पूर्वसंस्कार । म्हणोनी साक्षी पाहे निराळा. ॥ ७२१ ॥ की तरूस वारा हालवी । तैसी अहकारातें अविद्या चाळवी । वारा राहतां, डोलवी । वृक्षासी डोल त्या वृक्षाचा. ॥७२२॥ तैसी अविद्या जाऊनी । प्रारब्धयोगेंकरूनी । अहकारादि संस्कार देहाचपासूनी । उठताही, द्रष्टा त्यांचा वेगळा. ॥ ७२३ ॥ आत्मा सर्वत्र चित्प्रकाश । सर्वत्र जैसा आकाश । घट फिरतां त्यात तोची अव-काश । देह फिरतां देहीं साक्षी द्रष्टा ये रीती. ॥ ७२४ ॥ ऐसा अनुभव जीकरितां । आपण त्याही बुद्धीपरता । जीभ बोलवी कीं मी निःशब्द तत्त्वतां ।

जिभेनेंची चालक जिभेचा जेंवी म्हणे. ॥ ७२५ ॥ न घडे जिभेवीण बोलणें। परतु तीकरूनी बोले आपलें अबोलणें। ऐसें अकर्त्तेपण न कळे बुद्धीविणें। तरी तीपरता आपण ऐसें जाणतो. ॥ ७२६ ॥ ऐसा तिहीं गुणांचा द्रष्टा। त्यापरता भगवत म्हणे उपदेष्टा। त्या विस्तारे गोष्टी बोलतां इष्टा। ग्रथ वाढेल बहु फार. ॥ ७२७ ॥ आतां पुढील अनुसंधान। हें गुणातीतलक्षण-ज्ञान। विशद जाणोनी याचे अनुष्ठान। करावें म्हणोनी अर्जुन पुसतसे ॥७२८॥

**कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥**

अर्जुन म्हणे जी! प्रभु! समर्था!। जो पावला या गुणातीता पुरुषार्था। तो कोण कोण चिन्ह समजोनी अनर्था। त्रिगुणकदबा अतिक्रमूनी वर्ततसे? ॥ ७२९ ॥ खूण सत्त्वाची कवण?। कोण रजोगुणाची खूण?। कोण तमोगुणाची ओळखण?। कैसें ओळखोनी अतिक्रमी त्यातें? ॥७३०॥ आणि आचरतो कोण आचार?। आणि कैसा अतिक्रम? याचा विचार। न करितां परस्पर सचार। प्रभुजी! वेगळे वेगळें बोलावें. ॥ ७३१ ॥ नारायणातें नर। प्रश्न ऐसा करी चतुर। तो ऐकोनी सर्वेश्वर। उत्तर देतो श्रीभगवान्. ॥ ७३२ ॥

श्रीभगवानुवाच। पूर्वार्ध—**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव।**

म्हणे भगवत षड्गुण। अगा! ज्या लक्षणीं तिन्ही गुण। अतिक्रमूनी वर्ते निपुण। तीं चिन्हें प्रकाश, प्रवृत्ति, मोह, जाणावीं. ॥ ७३३ ॥ अर्थ ऐसा कीं प्रकाशलक्षण। पाहतां, समजे सत्त्व गुण। त्या प्रकाशीं, स्वप्रकाश आपण। त्यापरता. ॥ ७३४ ॥ जो सत्त्वातें अतिक्रमितो। तोची कीं सत्त्वप्रकाशातें जाणतो। त्याच्या ज्ञानप्रकाशावांचूनी प्रकाशही तो। प्रकाश ऐसा अनुभव. ॥ ७३५ ॥ श्रोत्रादि इंद्रियवृत्ती। शब्दादि विषय घेती। हीं इंद्रियें विषयही कळती। सत्त्वयोगे, या नावें प्रकाश सत्त्वाचा. ॥ ७३६ ॥ चित्प्रकाश आत्मा केवळ। परी तो निर्धर्म निष्कळ। त्याच्या योगें सत्त्व निर्मळ। प्रकाशी वृत्ति रजतमाच्या. ॥ ७३७ ॥ चैतन्यची सर्व जाणावें। परी निर्धर्म जाणते कैसें म्हणावें?। सत्त्व याकारणें गणावें। प्रकाशरूप म्हणोनी. ॥ ७३८ ॥ दीपतेजें देह सकळ। प्रकाशतो, परतु लोचन निर्मळ। त्याते जे देखती पुष्कळ। शरीर अवघें. ॥ ७३९ ॥ ते नेत्र उघडे नसती। अवयव कोणास तेव्हां दिसती?। तेजाची तों असे वसती। देहीं अवघिया. ॥७४०॥ विषयांत आणि इंद्रियद्वारीं। आत्मा असेची याप्रकारीं। परतु सत्त्वाविणें कोणेही परी। न उपजे प्रत्यय. ॥ ७४१ ॥ सर्वगत आत्मयाचा प्रत्यय।

नव्हे, न कळे विषय इंद्रिय । सत्त्व होतां चिन्मय । आत्मप्रत्ययें सर्व कळती. ॥ ७४२ ॥ दीपप्रकाशें नेत्र दीपातें. । पाहती आणि त्या प्रकाशें पदार्थांतें । पाहती तेच, परी स्वयें नेत्रांते । अंधकारीं कांहीं दिसेना. ॥ ७४३ ॥ प्रकाश असोनी सर्वत्र । जों न पाहती नेत्र । तोंवरी पदार्थमात्र । कोण म्हणे आहेसा ? ॥ ७४४ ॥ जें प्रत्यया ये जेधवां । तें प्रकाशले म्हणावे तेधवां । दीप प्रकाशयुक्तही अवयवां । कोण पाहे विना नेत्र ? ॥७४५॥ दीप प्रकाशेच दिसती परी । नेत्र पाहती त्यातें जरी । नेत्रांसही कां हो तरी । न म्हणावें प्रकाशक तयांतें ? ॥ ७४६ ॥ ऐसा आत्मा सर्वत्र वसे । परतु प्रत्यय सत्त्वयोगेची येतसे । ऐसें असोनी कैसें । निपुण म्हणती प्रकाशक सत्त्वाते ? ॥ ७४७ ॥ परंतु दीपाची ज्योती । स्वयें ते नेत्र नव्हती । दीपज्योति त्यापरती । पाहतां नेत्रांस तेजें अतिक्रमिलें. ॥ ७४८ ॥ ऐसा सत्त्वप्रकाश । अतिक्रमूनी आहे चित्प्रकाश । सत्त्वप्रकाशातें सावकाश । गुणातीत ऐसा अतिक्रमितो. ॥७४९॥ दृष्टातीं सर्व साम्य येना । हें न कळोनी येथें जना । संदेह वाटेल मना । कीं नेत्र सचेतन, अचेतन तेज. ॥ ७५० ॥ तरी आत्मा दीपांतही असे । सागर तरगीं जैसा वसे । जळावांचूनी लहरी न गवसे । विना चैतन्य तैसा दीपप्रकाशही. ॥ ७५१ ॥ भोक्ताची प्रतिदेहीं वेगळा । व्यापके व्यापिला प्रपंच सगळा । प्रकाशूनी पट ततूनिराळा । तैसें सर्वत्र आणि देहीं चैतन्य. ॥ ७५२ ॥ तोची नेत्रींही व्यापक । त्याकरितां चित्त, बुद्धि, मन, वृत्ति अनेक । या देहीं भोगची एक । त्यास नसे, असे प्रतिबिंबअशातें. ॥ ७५३ ॥ हें पूर्वीही निरूपण । जाले, परी स्वप्रकाशपण । ज्ञणी सत्त्वास मानी अतःकरण । श्रोतयांचें म्हणूनी वर्णिले मागुती. ॥ ७५४ ॥ असो या खटपटीवीण । येथें खोळबलें काय कारण ? । स्वप्रकाश आत्मा, परप्रकाश गुण । तथापि सत्त्वप्रकाश ये रीती. ॥७५५॥ इतकेंची करणें सिद्ध । त्यास दृष्टांत प्रत्यक्ष प्रसिद्ध । दीपासारिखा आत्मा स्वप्रकाश शुद्ध । सत्त्व परप्रकाश नेत्रांसारिखे. ॥ ७५६॥ तथापि प्रकाशपण । नेत्रांसी घडतें, ऐसा सत्त्वगुण । त्याही प्रकाशातें निपुण । अतिक्रमितो ऐसा, हें प्रस्तुतीं. ॥ ७५७ ॥ आतां रजोगुण क्रियाशक्ती । क्रियारूपची सर्व प्रवृत्ती । ते प्रवृत्ति रजोगुणाची वृत्ती । आत्मा नव्हे. ॥ ७५८ ॥ इंद्रियें विषय घेती । विषय इंद्रियांस गोचर होती । आपण अक्रिय ऐसी स्थिती । हें अतिक्रमणें रजाचें. ॥ ७५९ ॥ या तिहीं गुणांच्या वृत्ती । अनेक मागें बोलिला जगत्पती । त्यांत या मुख्यवृत्ति बोलतां रीती । सुचवी अवघिया पूर्वोक्त. ॥ ७६० ॥ आतां तमोवृत्तिलक्षण । मोहप्रधान तमोगुण । **मोह**

म्हणजे अविवेकपण । अतिक्रमूनी वर्ततो मोहातें. ॥ ७६१ ॥ आपण नव्हे शरीर । अनुसंधानें या असूनीही धीर ।[१] प्रारब्धभोगीं पूर्वसंस्कार । उपजे मी सुखी, दुःखी, म्हणोनी. ॥ ७६२ ॥ सुखदुःखभोग तेव्हां । मी सुखी, मी दुःखी, वाटे जेव्हां । परतु हाही प्रत्यय तयां सदैवां । न करी मोह. ॥ ७६३ ॥ भोग जया चिदंशातें । अनादि देहात्मता तयातें । त्यास घेऊनी कर्मातें । मन, बुद्धि, इंद्रियें, आचरलीं. ॥ ७६४ ॥ जन्मांतरीं कर्में ऐसीं केलीं । तीं ज्ञान जालियाही भोगावीं लागलीं । संचितें ज्ञानानळें जळोनी गेलीं । प्रारब्ध-फळ भोगणें त्यांतील. ॥ ७६५ ॥ जेव्हां जीवोपाधी । व्यापकातें ध्याती बुद्धी । तेव्हां एकत्वसिद्धी । बिंबी तया प्रतिबिंबातें. ॥ ७६६ ॥ कीं ज्या जळीं प्रति-बिंब । त्या प्रतिबिंबास तेंची अवलब । परी त्या जळास सांपडे बिंब । तेव्हां बिंब असे, प्रतिबिंब तें असेना. ॥ ७६७ ॥ खोल सागराची दरी । वृक्ष असे तिच्या तीरीं । भरतें येतां वृक्षरूप बुडे नीरीं । तेव्हां नसे प्रतिबिंब उदकांत. ॥ ७६८ ॥ भूमीचवरी जळ । दरडी भूमीच केवळ । परतु प्रतिबिंब दरडीचें डळमळ । जळ डळमळितां करितसे. ॥ ७६९ ॥ नदीस पूर येतां । दरडीवरी उदक जातां । जळीं बिंबची दिसे पाहतां । प्रतिबिंब दरडीचें दिसेना. ॥ ७७० ॥ बुद्धि पाहे व्यापकातें । तेव्हां न देखे प्रतिबिंबातें । तथापि भोग-काळीं तयातें । प्रगट करूनी भोग भोगवी प्रारब्ध. ॥ ७७१ ॥ सारखींच चैतन्यें दोनी । व्यापक पाहे अनुभवी ज्ञानी । त्या व्यापका भोग जाला म्हणोनी । प्रत्यय उपजे, हा मोह. ॥ ७७२ ॥ परी जो गुणातीत । तो हें रहस्य जाणे बुद्धिमत । आपण अलिप्त अत्यत । हा भोग म्हणे माझिया अंशातें. ॥ ७७३ ॥ शरीरास भोग घडे । तो भोग चैतन्यावरी पडे । तेव्हां बुद्धी-करूनि प्रतिबिंबाकडे । पाहे, राहे अलिप्त आपण. ॥ ७७४ ॥ यावेगळा मोह ऐसिया । न म्हणवे गुणातीता ज्ञानिया । मोहें मोहोनी मग अतिक्रमी तया । गुणातीतास मोह ऐसा न म्हणवे. ॥ ७७५ ॥ आणि मोह बुद्धीस नाहीं स्पर्शला । तो कैंवी म्हणवे उल्लंघिला ? । मोह बुद्धीस झोंबला । तो गुणा-तीत म्हणवेना. ॥ ७७६ ॥ भोगीं उपजे प्रत्यय । तो प्रत्यय अहंप्रत्ययमय । मी सुखी, दुःखी, ऐसा निश्चय । जों न उपजे, तों न म्हणवे भोग तो. ॥ ७७७ ॥ हा गुणातीत ज्ञानी । असे अहंतेवेगळा होउनी । आणि मी सुखी, दुःखी, म्हणोनी । प्रत्यय उपजेच प्रारब्धें. ॥ ७७८ ॥ आणि आत्मा व्यापक सर्वत्र साचा । तो अहंकारापलिकडे ज्ञानियाचा । आणि मी सुखी, दुःखी, या

१. 'तरी' असा पाठ आढळतो

प्रत्ययाचा । सर्वथा उदय होय भोगकाळीं. ॥ ७७९॥ त्या प्रत्ययें मोह केला । तो मोह असतांच गेला । की प्रारब्धभोग ज्या कर्माचा जाला । त्या कर्माच्या उद्भवानुरूप तो भोग. ॥ ७८० ॥ प्रतिबिंबांश आणि अहंपण । मिळोनी जाले कर्माचरण । त्या दोघांवांचूनी कवण । भोक्ता म्हणावा त्या फलाचा? ॥ ७८१ ॥ 'मी भोक्ता' हा प्रत्यय । मोहरूप असतां, ऐसा निश्चय । हाणोनी, मोह लघूनी, तो अलिप्त अद्वय । आत्मा आपला स्मरतसे. ॥ ७८२ ॥ आणि ज्या बुद्धीनें कळले ऐसें स्ववैभव । तिच्या योगेची भोगाचा अनुभव । दोहीं चैतन्यांचा एक भाव । सुखदुःख वाटे आत्मया. ॥ ७८३ ॥ व्यापक आत्मा आपण । हें ज्ञानियास नित्य स्फुरण । भोग तो न घडे चैतन्याविण । भोग आत्मयातेंची तो वाटे. ॥ ७८४ ॥ तो आत्मा ज्ञानी आपण । भोक्तया कैचें अलिप्तपण? । तथापि तो विचक्षण । त्या मोहांतही वर्ते, लघूनी त्याच मोहाते. ॥ ७८५ ॥ भोक्ता आपणची ऐसा । प्रत्यय नव्हे मोह कैसा? । त्याही प्रतीतीमध्यें बुद्धींत ठसा । कीं व्यापकपणीं हें नसे. ॥ ७८६ ॥ ऐशा प्रकाशातें । प्रवृत्तीतें, मोहाते । उल्लघूनी गुणत्रयातें । ऐसा वर्ते जाणावा. ॥ ७८७ ॥ कैसीं गुणांचीं चिन्हें समजोनी । त्यांतें अतिक्रमूनी वर्ते ज्ञानी? । हा प्रश्न, तरी ऐसीं लिंगे अतिक्रमी म्हणोनी । पूर्वार्धेंकरूनी उत्तर दिधलें. ॥ ७८८ ॥ आतां कोण आचार । आचरतां, अतिक्रमी हे गुणविकार? । प्रश्न पार्थाचा एतत्प्रकार । उत्तर त्याचें देतो उत्तरार्धेंकरूनी. ॥ ७८९ ॥

उत्तरार्ध—**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥**

न करी प्रवृत्त कर्माचा द्वेष । ठेवूनी त्या कर्मी दोष । अथवा करूं न पाहे निर्दोष । निवृत्त कर्में. ॥ ७९० ॥ कीं प्रारब्धभोग अनिवार । प्राप्त होतां तदनुसार । प्रवृत्तां कर्मीं लोकांसारिखा प्रकार । दिसे त्याच्या प्रवृत्तीचा. ॥ ७९१ ॥ तरी मी विरक्त, निष्काम । आत्मनिष्ठ, आत्माराम । मज कां हें विषयभोगाचें काम? । द्वेष ऐसा न करी प्रवृत्तां कर्माचा. ॥ ७९२ ॥ न करावा विषयांचा स्वीकार । हा निवृत्तिमार्गाचा प्रकार । या कर्माचीही अपेक्षा तो निर्विकार । न करी कधीं. ॥ ७९३ ॥ प्रवृत्ति आणि निवृत्ती । दोन्ही तरगा जडा वृत्ती । त्यांत चित्सिंधु आपणची, ऐसा चित्तीं । अनुभव जयाच्या; ॥ ७९४ ॥ काय त्यानें सोडावें? । आणि काय त्यानें मांडावें? । जो गुणातीत, त्यानें ओलांडावें । भवसमुद्राते कवणिया? ॥ ७९५ ॥ प्रवृत्तिमृगजळीं बुडे । तरी निवृत्तिनावेची अपेक्षा पडे । हा गुणातीत म्हणूनी सम दोहींकडे । प्रवृत्ति निवृत्ति तो स्वयें. ॥ ७९६ ॥ काय त्याचा आचार? । म्हणूनी अ-

र्जुनप्रश्न एतत्प्रकार । त्यास हें उत्तर कीं तो निर्विकार । कांहींच न करी. ॥ ७९७ ॥ **आचार** म्हणिजे आचरण । ते त्याचें ऐसें म्हणे **विश्वशरण** । कीं आचरण ज्याकरितां गुणाचें अतिक्रमण । हेंची आचरण त्या गुणातीताचे. ॥ ७९८ ॥ गुणबद्ध इच्छी प्रवृत्ती । तो दूषी निवृत्ती । गुणमोक्ष इच्छी त्याची वृत्ती । प्रवृत्ति दूषी, अपेक्षी निवृत्तीते. ॥ ७९९ ॥ या पदवीचा नसे । तो प्रवृत्त अथवा निवृत्त दिसे । जो अतिक्रमूनी गुण उल्लसे । तो दोहींत एकही अपेक्षीना. ॥ ८०० ॥ आणि प्रारब्धे प्रवृत्तींत पडे । तरी पश्चात्तापीं तो न बुडे । निवृत्त असोनी तिकडे । न पाहे अभिलाषेंकरूनी. ॥ ८०१ ॥ ऐसा त्याचा महिमा । बहुत बोलावा, ऐसें वाटे **सर्वोत्तमा** । परतु नाडळे सीमा । म्हणूनी अल्पा शब्दीं बहुत सुचवी. ॥ ८०२ ॥ ते वर्णिता अपार । थोडेंची वाटे बोलतांही फार । यालागीं वदूनी **गीताकार** । संगति वदों उत्तर श्लोकांची. ॥ ८०३ ॥ **देवें** गुणातीत वर्णिला । तो **अर्जुनें** आइकिला । म्हणे गुणातीत जाला । परी द्रष्टा गुणाते जाणतो. ॥ ८०४ ॥ पुत्रदारादि सर्वही जाणे । तोही काय 'तें आपण' म्हणे? । तथापि 'माझीं' म्हणोनी ममता बाणे । असेल तैसा गुणातीत. ॥ ८०५ ॥ स्त्रीपुत्रांचे वेगळेपण । समजोनीही आपण । धांवे तदर्थ कीं आपलीं म्हणोनी खूण । जाणे तयांची. ॥ ८०६ ॥ तैसा गुणांस जाणे । जरी भिन्नत्त्व, साक्षित्त्व, बाणे । आणि 'मी कर्ता' न म्हणे । तरी ममता गुणांची असेल. ॥ ८०७ ॥ ऐसा मनीं **अर्जुन** । साशक होतां, ते मन । जाणे साक्षी **जगज्जीवन** । तत्परिहारार्थ बोलतसे हा श्लोक. ॥ ८०८ ॥

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तंत इत्येवं योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥**

अगा! कोणी उदासीन जैसा असे । तैसा गुणीं द्रष्टा होऊनी वसे । परतु त्या गुणाच्या फांशांत न गवसे । म्हणूनी न चळे त्या गुणवृत्तींकरूनी. ॥ ८०९ ॥ कीं ज्याची गेली **अहता** । त्यासी कैची ममता? । जडा**चै**तन्याची ग्रंथि तत्त्वता । **अहकार**. ॥ ८१० ॥ स्त्रीपुत्रादि वेगळीं । परी **अहकारें** केलीं जीवाआगळीं । 'देह मी' म्हणतां त्याचींच सगळीं । तीं आपलीं वाटती तयाते. ॥ ८११ ॥ ज्याचा गेला अहकार । कां त्यास वाटती ऐसे गुणविकार? । उदासीनास जन नानाप्रकार । दिसती तैसे गुण पाहे. ॥ ८१२ ॥ नव्हे शत्रु, नव्हे मित्र । उगाची दृष्टि देखतो मात्र । ते लोक त्यास ममतापात्र । न वाटवी, उदासीन म्हणोनी. ॥ ८१३ ॥ असोनीही **अहता**

जना। त्यांत ममता न वाटे उदासीना। या निरहकारिया ग्रंथिहीना। काय चाळूं शकती गुण ? ॥ ८१४ ॥ ज्यास गृहिणीगृहादिकांची प्रीती। ती त्यास आपणाकारणें चाळू शकती। ज्यास नसे प्रीति अथवा अप्रीती । त्या पारखिया उदासीनास कोण चाळील? ॥ ८१५ ॥ अथवा ते जरी न चाळिती। तरी ज्यास ज्यांची प्रीती । तो त्यांकारणें दिनराती । चहूकडे फिरतसे. ॥ ८१६ ॥ हा न चळे गुणवृत्तींकरूनी। अथवा न चळे स्वयें ते गुण माझे म्हणोनी। आहेत गुण मिथ्या इतकेची जाणोनी । असे जैसा कोणी उदासीन. ॥ ८१७ ॥ एवच एकही घडी । गुणातीतत्त्व तो न सोडी। स्वस्वरूपाची निःसीम गोडी। ओढी गुणांची असेना. ॥ ८१८ ॥ गुण करू न शकती चचळ। अथवा गुणाकारणे चळेना अचळ । असे द्रष्टा होऊनी केवळ। उदासीनासारिखा. ॥ ८१९ ॥ ऐसी अर्जुनाची शका। हरिली नमू त्या शेषपर्यंका । आता स्मरोनी त्या श्रीवत्सांका । बोलों संगति उत्तरश्लोकाची. ॥ ८२० ॥ अर्जुनप्रश्नानुसार। गुणांचीं लिगे गुणानुसार। प्रकाश, प्रवृत्ति, मोह, हे तिन्ही प्रकार। सांगितले. ॥ ८२१ ॥ "हीं गुणाचीं लिंगें। अतिक्रमितो तत्प्रसंगें। ऐसे बोलोनी श्रीरगे । '**किमाचारः?**' याही प्रश्नाचें दिधलें उत्तर. ॥ ८२२ ॥ तों देखिले संदेहाचें स्थळ। तो या श्लोकी हरिला समूळ। की उदासीनासारिखा केवळ । तो असे. ॥ ८२३ ॥ आतां '**कथं**' म्हणोनी। प्रश्न की कोणे रीतीकरूनी। या त्रिगुणांतें वर्ततो अतिक्रमूनी?। तरी ऐसा म्हणतसे दों श्लोकीं उत्तमश्लोक. ॥ ८२४ ॥

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

आतां गुणातें ये रीती। उल्लघितो तो सुमती। की दुःखें, सुखें, सम वाटती। कीं तो स्वस्थ. ॥ ८२५ ॥ **स्वस्थ** म्हणिजे स्वस्वरूपीं स्थिर। त्या निजसुखापुढें तो धीर। दुःखी, सुखी, होतां शरीर। सम उभयत्र तो असे. ॥ ८२६ ॥ चिदश भोक्ता होता अविद्याध। त्याचा तुटला त्रिगुणबध। उरला प्रारब्धभोगसंबंध। तो कैसातरी सारावा. ॥ ८२७ ॥ दुःखे पापाचे फळ सरे। सुखे पुण्याचें फळ ओसरे। भोग दोन्ही होता, न अतरे। गुणातीतत्व काहीं तयाचें. ॥ ८२८ ॥ दुःखी होय उद्विग्न। सुखीं होय मनीं मग्न। ते क्षणींच लागे लग्न। तिहीं गुणाच्या वृत्तींसीं. ॥ ८२९ ॥ दुःख भोगूनी कर्मफळ। नव्हे भोगीं

चचळ । सुख भोगितां स्पृहा अमगळ । शिवों नेदी. ॥ ८३० ॥ उद्विग्नता दुःखीं । आणि स्पृहा सुखीं ।तो पडला जाणावा मुखीं। गुणत्रयाच्या. ॥८३१॥ दुःखभोगीं दुःख जाणे । सुख भोगितां सुख बाणे । तथापि 'मी दुःखी, सुखी' न म्हणे । कीं व्यापकी अनुभवी आत्मता. ॥ ८३२ ॥ दीप, दिवटी अथवा रवी । दृष्टितेजें प्रकाशे बरवी । तोची आत्मा जो बुद्धीस चेतवी । बिब अथवा प्रतिबिब. ॥ ८३३ ॥ चैतन्य आत्मा वाटे । त्यांत भोक्ता देहींच दाटे । ज्यांत ब्रह्मांडकोटीच साटे । गुणातीत अनुभवी आत्मत्वें तयातें. ॥ ८३४ ॥ ज्यास तो आत्मा वाटला । भोक्ता आत्मा हा भाव तुटला । त्याच्या भोक्तेपणाचा फासा सुटला । सुखदुःख भोगूनीही तो स्वस्थ. ॥ ८३५॥ दुःखकाळीं जाणे दुःख । सुखभोगकाळीं जाणे सुख । तथापि आपण विश्वतोमुख । भोग चिदंशातें तो म्हणे. ॥ ८३६ ॥ दुःख वाटे मागुतीं । कीं प्रारब्धाची ऐसीच गती । परतु तेव्हां घाबिरा नव्हे ये रीती । कीं क्षत लागतां शूर जैसा. ॥ ८३७ ॥ तरीच येथें यदुवीर । त्या गुणातीतास म्हणतो धीर । की वर्तवूनी दुःखी शरीर । घाबिरा नव्हे सर्वथा. ॥ ८३८ ॥ घायें जर्जर शरीर । दुःखी होउनी घाबिरा नव्हे रणधीर । हा तों अनुभवी ज्ञानगभीर । नवल काय जरी घाबिरा होईना? ॥ ८३९ ॥ परंतु ज्ञानियांस । दुःख नाहींच म्हणती तयांस । ठाउके नाही कीं आयास । नेणे वांज व्यालीचे. ॥ ८४० ॥ परतु विचारितां बरें । ज्ञानियांस दुःख नाहीं खरे । की भोक्तयाचें एकसरें । आत्मत्व त्याला वाटेना. ॥ ८४१ ॥ परतु ज्या देहीं ज्ञान" । ज्या देहीं हें समाधान । भोगकाळीं सन्निधान । प्रतिबिबाचे होतें त्या देहीं. ॥ ८४२ ॥ अनुभवीं मिळे जे बुद्धी । तिच्याच योगे भोगसिद्धी । परंतु भोक्ता तो, ज्याची प्रसिद्धी । अशपुरुष क्षेत्रज्ञ म्हणोनी या गीतेंत. ॥ ८४३ ॥ चैतन्ये दोन्ही सारखीं । आणि बुद्धि उभयत्रही नव्हे पारिखी । तथापि आत्मरत्नाचे पारखी । ते जाणती दोन्ही चैतन्यें. ॥ ८४४ ॥ भोग ऐसा अंगीकारूनी । सर्वगत आत्मा अनुभवी म्हणोनी । भोग न घडे यावरूनी । हें संमत. ॥ ८४५ ॥

प्रस्तुतीं '**समदुःखसुखः**' म्हणोनी । म्हणे भगवत आपल्या मुखेंकरूनी । तरी काय सम तीं दोन्ही जाणोनी । कीं कळत नसतां सम म्हणावा? ॥८४६॥ एकाचें नांव देवदत्त । एकाचें विष्णुदत्त । त्या दोघांस नेणे यज्ञदत्त । परी दोघेही सम तयाला. ॥ ८४७ ॥ जो बोले ऐसा बोल । तो आणि त्याचा बोलही फोल । भगवद्वाक्य अति सखोल । अर्थ ऐसा घडेना. ॥ ८४८ ॥ जाणावें दोघांसही प्रथम । तेव्हांच व्हावें सम । समदुःखसुख म्हणे पुरुषोत्तम।

कीं दुःख सुख जाणोनी सम तो. ॥ ८४९ ॥ आतां पूर्वीं जाणत होता । म्हणूनी दुःखसुखसमता । तरी जे मेले दोघे तत्त्वता । सम वाटती ते हेंही अयुक्त. ॥ ८५० ॥ एवच दुःखीं नव्हे उद्विग्न । आणि सुखी नव्हे स्पृहामग्न । देह असतांच त्याचें भग्न । लिंगशरीर जाणावें. ॥ ८५१ ॥ दुःखसुखसमता ये रीती । मागे स्वमुखे बोलिला श्रीपती । ती वचनें येथे धरावी किती? । द्वितीयाध्यायांत हें श्लोकार्ध. ॥ ८५२ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**

अर्थ मागेची जाला । प्रस्तुतीं प्रसंग हाची आला । कीं प्रारब्धभोग न चुके ज्ञानियाला । स्थितप्रज्ञासही. ॥ ८५३ ॥ परतु उद्विग्न नव्हे दुःखीं । स्पृहा धरीना सुखी । की ऐसेच हो आणिखी । हें भोगावाचुनी न घडे सर्वथा. ॥ ८५४ ॥ असो ते, आतां प्रस्तुतीं । सम दुःख सुख म्हणे श्रीपती । त्या समत्वास हेतु बोले ये रीती । कीं तो स्वस्थ. ॥ ८५५ ॥ स्वये जे सत्स्वरूप आहे । तेथेंची जो स्थिर राहे । त्या सुखाच्या अनुभवे पाहे । प्रारब्धक्षयरूपे सम दोन्ही. ॥ ८५६ ॥ ज्यास पाहिजे सुख । तो सर्वथा॰ देखे स्पृहेचें मुख । वृत्ति होता विषयाभिमुख । धन अपेक्षी. ॥ ८५७ ॥ सुखस्पृहा नाहीं जया । भेडा, धोंडा, कनक, सारिखे तया । तिनीही विकार या । मृत्तिकेचे. ॥८५८॥ त्यात कांचनेंकरूनी । विषयसुख साधे म्हणोनी । स्पृहा सुवर्णाची धरूनी । मेळविती जन. ॥ ८५९ ॥ मार्गी जातां गुजभरी । सोने दृष्टी पडे जरी । दुर्गंधामधूनीही परी । धरी हातें. ॥ ८६० ॥ आणि मातीचा भेडा । अथवा एक धोंडा । दृष्टी पडे उघडा । कोणही न उचली. ॥ ८६१ ॥ की भेंडा, धोंडा, किमर्थ? । त्याणें न मिळती भोगाचे पदार्थ । एवच सर्वेही सुखार्थ । आणि दुःखपरिहारार्थ पाहिजे. ॥ ८६२ ॥ हा प्रस्तुतीं गुणातीत । दुःखीं सुखीं सम अत्यत । त्यास सम म्हणे भगवत । भेडा, धोंडा, सुवर्णही. ॥८६३॥ ऐसेंची प्रिय अप्रिय । दोन्ही तुल्य, ऐसा निश्चय । तैसेची निंदा, स्तुति, हें द्वय । सम ज्याला. ॥ ८६४ ॥ कीं सुख पाहिजे जया । तो धावे देखतां पदार्था प्रिया । पळे देखोनी अप्रिया । दुःखनिंदेनें, सुखस्तुतीनें. ॥ ८६५ ॥ दुःखसुख सम जया । पूर्वी प्रिय अप्रिय जी तया । तीं तुल्य वाटती धनंजया! । होता गुणातीत, हा अर्थ. ॥ ८६६ ॥ पूर्वी स्तुति आवडे । निंदितां दुःखीं बुडे । त्यास जेव्हां गुणातीतत्त्व घडे । मग निंदा आणि स्तुति तुल्य. ॥ ८६७ ॥ ऐसाच मान अपमान । दोन्ही ज्याला समान । कीं जडा देहाचा अभिमान ।

१. अ० २, श्लो० ५६.

गुणातीता असेना. ॥ ८६८ ॥ स्वप्नीं कोणी निंदिती । स्वप्नीं कोणी वंदिती । जागृतास दोन्ही आठवती । परी सुख दुःख उपजेना. ॥ ८६९॥ स्वप्नीं कोणी देती मान । स्वप्नीं कोणी अपमान । जागरीं दोन्ही वाटती समान । गुणातीतास ये रीती. ॥ ८७० ॥ स्वप्नदृष्टी हेंची मन । मनची जागरीं करी चिंतन । तैसे मिथ्या शरीर, लटिके नयन । त्या नयनीच तें जगीं देखतो. ॥ ८७१ ॥ प्रारब्ध असे जोंवरी । देह जीवत तोंवरी । स्वप्नदृष्टीकरूनी करी । दर्शन स्वप्नींच्या जनाचे. ॥ ८७२ ॥ जागरीं स्वप्न न असे । परी स्वप्नदृष्टीं मन त्या दृष्टीं दिसे । तैसें स्वस्वरूपीं विश्व न गवसे । देह जिता, तों दिसे देह दृष्टीतें. ॥ ८७३ ॥ कैची निंदा? कैची स्तुती? । अवघी मिथ्या उत्पत्ती । मान अपमान कोठे असती? । समूळ मिथ्या हे स्वप्न. ॥ ८७४॥ कैचा मित्र? कैचा अरी? । अवघी माया, अवघा हरी । नाना सोंगे नाट्य करी । माया म्हणतांही ते लाजे. ॥ ८७५ ॥ कैची सुवर्णाची शक्ती? । अवघे सोनेंची सोनियाचिया व्यक्ती । शेवटीं राहती याही युक्ती । वासुदेव अवघा आपण. ॥८७६॥ यालागीं शत्रु मित्र दोन्ही पक्ष । सम देखे गुणातीत दक्ष । आणि म्हणे अंबुजाक्ष । सर्वारंभपरित्यागी म्हणोनी. ॥ ८७७ ॥ कांहीं अपेक्षावें पडे । तरी कांहीं एक आरंभ घडे । सर्वारंभाचे मूळ उपडे । अपेक्षाची टाकितां सुखाची. ॥ ८७८ ॥ म्हणे येथें भगवंत । की जो ऐसा, तो गुणातीत । बोलिजेतो निश्चित । अगा! अर्जुना! ॥ ८७९ ॥ गुणातीताचीं हीं लक्षणें । वर्णिलीं ऐसीं कमलेक्षणें । तीं पार्थे विचक्षणे । एकाग्र मनें ऐकिलीं. ॥ ८८० ॥ गोड मानूनी लाळ घोटी । परंतु विव्हळ अत्यंत पोटीं । मनीं ऐसें म्हणे किरीटी । कीं हे सिद्धि अतिकठिण. ॥ ८८१ ॥ ज्ञान जालें परी । कैसी धारे स्थिति हे बरी? । हा भाव जाणोनी हरी । स्वभक्तीनें घडेल म्हणतो या श्लोकीं. ८८२

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥**

अगा! मातेंही ज्ञानी । जरी अव्यभिचारभक्तियोगेकरूनी । सेवी, तरी तो या गुणांतें अतिक्रमूनी । योग्य होय सगुण ब्रह्म व्हावया. ॥ ८८३ ॥ ज्ञानी आणि हरिभक्त । ज्ञान ज्याचें भक्तियुक्त । तो होऊनी जीवन्मुक्त । अतीं सगुणमुक्ति पावे, अर्थ ऐसा. ॥ ८८४ ॥ कीं ज्ञान जालियावरी । सर्वत्र निर्गुण पाहे, परी । नाना सोंगे घेऊनी हरी । नाट्य करी विश्वरूपें, हें नेणे; ॥ ८८५ ॥ तो अव्यक्तोपासनापर । बहुत कष्टेकरूनी नर । कदाचित् पावे

निरंतर । गुणातीतत्व ये रीती. ॥ ८८६ ॥ हें द्वादशीं **सर्वेश्वरें** । बोलिलें आणि आदरें । भक्तप्रसंग बोलिजेला **दामोदरें** । की त्यांचा उद्धर्ता होतों स्वयें मी. ॥ ८८७ ॥ तरी तें ज्ञानही न कोणी म्हणती । म्हणोनी युक्ततम म्हणे **श्री**पती । प्रश्न **पार्था**चाही ये रीती । कीं योगवित्तम कोण दों पक्षांत? ॥ ८८८ ॥ तरी ज्ञान जालियाचवरी । त्यांस क्लेश म्हणे **हरी** । सिद्धियोगाची पावती बरी । क्लेश अधिकतर तयातें. ॥ ८८९ ॥ त्यांस क्लेश अधिक । जे नुसते निर्गुणोपासक । ज्ञानी आणि निज सेवक । त्यांस योगसिद्धिदाता मी म्हणे. ॥ ८९० ॥ म्हणोनी त्यांस क्लेश अधिकतर । तेव्हां यांस **थोडे** ज्ञानीं सगुणपर । ते सिद्धि हेच, जें **सर्वेश्वर** । गुणातीतत्व या प्रस्तुतीं बोलतो. ॥ ८९१ ॥ म्हणोनी मातें सेवितो म्हणावे । तेथें मातेंही सेवितो म्हणे गूढभावें । **'मां च'** म्हणोनियां **च**कारे **दे**वें । सुचविली ज्ञानपूर्वक स्वभक्ती. ॥ ८८२ ॥ की ज्ञानदृष्टीकरूनी । आपण **आत्मा** गुणातीत म्हणोनी । पाहतों तेची आत्मा जनीं वनीं । सगुण म्हणोनी विश्वरूपे जरी पाहे. ॥ ८९३ ॥ तरी तेंच विश्वात्मक ज्ञान । तेथेंची माझे सगुणध्यान । ये रीती मातेंही सेवी, तरी तो मजसमान । व्हावया योग्य होय गुणातीत म्हणोनी. ॥ ८९४ ॥ होऊनी गुणातीत । **ब्रह्म** व्हावया योग्य होतो निश्चित । म्हणूनी म्हणे **भग**वत । हें तरीच घडे, की ज्ञानयुक्त भक्ति असे. ॥ ८९५ ॥ ज्ञानेंची गुणातीतपण । जो गुणातीत तो निर्गुण जालाची आपण । त्यासही म्हणे **नारा**यण । कीं **'ब्रह्मभूयाय कल्पते'**. ॥ ८९६ ॥ **'ब्रह्मभूयाय कल्पते'** । म्हणिजे **ब्रह्म** व्हावया योग्य होतो, ते । गुण अतिक्रमूनी, ते योग्यता होते । म्हणे **भ**गवत. ॥ ८९७ ॥ अतिक्रमिता गुण । जाला गुणातीत निर्गुण । आतां **ब्रह्म** व्हावया योग्यपण । हें घडेना. ॥ ८९८ ॥ **ब्रह्म** होऊनी **ब्रह्म** व्हावया । योग्य होतो **ध**नंजया! ।[1]ठाव न दिसे गोष्टीस या । सगुण **ब्रह्म** व्हावया न म्हणतां. ॥ ८९९ ॥ आतां **आत्म**त्व कळलें । परी चित्त **चि**न्मयीं नाहीं वळलें । या भावे बोलिले **ब्रह्म** व्हावया योग्य होतो. ॥ ९०० ॥ ऐसा अर्थ मानावा जरी । तरी गुणातीत होऊनी योग्य होतो म्हणे **हरी** । गुणातीत जाला, त्याउपरी । ज्ञानपरिपाकची तो जाला. ॥ ९०१ ॥ एवंच इत्यादि कल्पना । न येती निरभिमानियाचिया मना । तेव्हां सगुण ब्रह्म व्हावया जना । हें ज्ञान आणि सगुणभक्तिसाधन हाची अर्थ. ॥ ९०२ ॥ अध्यायारंभीं दुसरा श्लोक । येचीविषयीं बोलिला **उत्तमश्लोक** । तोची अर्था-

१ अ० १२, श्लो० २–८

वलोक । या श्लोकीं शेवटीं दाखवी. ॥ ९०३ ॥ करूनियां ज्ञानाचा आश्रय । साधर्म्य माझे पावले म्हणे आरभीं अव्यय । तरी सगुणसाधर्म्यप्राप्ति निश्चय । सगुणभक्तीनें. ॥ ९०४ ॥ निर्गुणोपासकां निर्गुण । सगुणोपासकां मोक्ष सगुण । परी मोक्ष नव्हे ज्ञानाविण । सिद्धांत ऐसा. ॥ ९०५ ॥ ज्ञान नसतां भक्ति करी । तोही सारूप्यमात्र पावे, परी । अमुक्त स्थळाहुनी तरी । च्यवे जयविजयांसारिखा. ॥ ९०६ ॥ म्हणूनी या ज्ञानाचे आश्रित । ते सृष्टिकाळींही न जन्मती म्हणे अच्युत । आणि व्यथा न पावती निश्चित । प्रलयीं म्हणे. ॥ ९०७ ॥ तें साधर्म्य पावावया । गुण अतिक्रमूनी धनंजया ! । योग्य होतो, म्हणूनियां । प्रस्तुतीं या श्लोकीं बोलतो. ॥ ९०८ ॥ अतिक्रमूनी गुण । योग्य होतो हें ज्ञानपरिपाकलक्षण । ऐसें स्वभक्तीचें महत्त्व कमलेक्षण । सुचवूनी फळ सगुणमोक्ष बोलिला. ॥ ९०९ ॥ कीं सगुणभक्ति जया । फळ पुरुषार्थ तोची तया । जे उपासिती निर्गुणा नुसतिया । ते निर्गुणमोक्षची पावती. ॥ ९१० ॥ अर्थ ऐसा अबाधित । टाकूनी निर्गुणवादी पंडित । निर्गुण ब्रह्म व्हावया योग्य होतो निश्चित । वाखाणिती साभिमान ये रीती. ॥ ९११ ॥ याचा पूर्वापर विचार । करितां, ते वेडेचार । अर्थ न करिती यथाप्रकार । कळोनी मतानुरूपची बोलती. ॥ ९१२ ॥ असो ते जे ज्ञानयुक्त । आणि अव्यभिचारभक्तीनें सेविती भक्त । ते होऊनी येथें जीवन्मुक्त । योग्य होती साधर्म्याकारणें. ॥ ९१३ ॥ ऐसा समजोनी अर्थ । देवाकडे पाहे पार्थ । तों परम पुरुषार्थ । कृष्णची दिसे. ॥ ९१४ ॥ त्याचा समजोनी भक्तिभाव । संतोषला अशेष देवांचा राव । आणि आपला सर्वोत्कृष्ट स्वभाव । बोलों आरभिला या श्लोकीं. ॥ ९१५ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥**

ब्रह्म वेद, याची प्रतिष्ठा । अमृत मोक्ष, अव्यय यांचीही प्रतिष्ठा । शाश्वत धर्म आणि एकांतसुख यांचीही प्रतिष्ठा । मीची जाण. ॥ ९१६ ॥ प्रकर्षे जे जयाची स्थिती । ते त्याची प्रतिष्ठा म्हणती । तरी वेद जें जें फळ सांगती । मजपासूनी तें सर्व. ॥ ९१७ ॥ जे जे वेदोक्त रीती । जें जें सकाम निष्काम करिती । ते तें फळ मजपासूनी पावती । तेच प्रकृष्टस्थिति वेदाची मी स्वयें. ॥ ९१८ ॥ मजकरितां वेद सकळ । अर्जुना होती सफळ । तेव्हां त्यांची प्रतिष्ठा केवळ । मजवांचूनी कैंवी घडे ? ॥ ९१९ ॥ तैसेंची अमृत मोक्ष केवळ । जें निर्गुणोपासनेचें फळ । माझ्या भजनेंची पावती सकळ । मग

निर्गुण धरूनी सगुण जरी सोडिती. ॥ ९२० ॥ माझ्या प्रसादाविण । कोणें ओळखिला आत्मा निर्गुण? । याळागी मीची सगुण । प्रतिष्ठा निर्गुण मोक्षाची. ॥ ९२१ ॥ येथें **'अमृतस्य'** म्हणोनी । या एकाची पदेकरूनी । निर्गुणमोक्षप्रतिष्ठा मी ऐसें बोलोनी । त्यापुढेंची म्हणतो कीं **'अव्ययस्य च'.** ॥ ९२२ ॥ की होतो प्रळय । तोची सर्वांचाही व्यय । त्या व्ययातही अव्यय । साधर्म्य माझे. ॥ ९२३ ॥ त्याची प्रतिष्ठा ये रीती । तें मीच वैकुठ वैकुठपती । आरभीं दोनी मोक्ष पार्था तुजप्रती । वदलों त्या दोहींचीही मी प्रतिष्ठा. ॥ ९२४ ॥ प्रथम श्लोकीं मोक्ष निर्गुण । द्वितीयांत मोक्ष सगुण । त्याची बोलिलो खूण । कीं **'सर्गेपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च'.** ॥ ९२५ ॥ प्रलयव्यथा तयांला । कीं व्यय बोलावा तेव्हां जयांला । व्यय नाहीं म्हणूनी तुजला । बोलिलों कीं प्रलयव्यथा ते न पावती. ॥ ९२६ ॥ ज्यास निर्गुणमोक्षफळ । तें कैचें निर्गुणची असे निष्कळ? । त्याच्या बद्धावस्थेंत होतें केवळ । तेंची असे. ॥ ९२७ ॥ जेथें नसे आत्मप्रत्यय । तेथें कोणें जाणावे उदयलय? । ज्ञान उदयलयमय । तेंची परी प्रत्यय, धर्म तेंही.॥९२८॥ उदयलयवार्ताच नसे । तेथें व्यय कवणा दिसे? । उदयलय कळें तेथें वसे । प्रत्यय उदयाचा, लयाचाही. ॥ ९२९ ॥ कळोनीही व्ययाची खूण । अव्ययपणें मोक्ष सगुण । जे पावती ज्ञानी भक्त निपुण । त्या अमृताचीही मी प्रतिष्ठा. ॥ ९३० ॥ **'अव्ययस्य च'** म्हणोनी । या चकारेंकरूनी । बोले दोनी मोक्ष सुचवूनी । जे अध्यायारभीं बोलिले. ॥ ९३१ ॥ अतएव जे आचरतां भागवतधर्म । मोक्ष पाविजे शाश्वत सधर्म । तो म्हणावा **शाश्वत धर्म** । प्रतिष्ठा त्याचीही मी म्हणे. ॥ ९३२ ॥ ज्याणें भागवतधर्म केला । तो सगुण मोक्षास गेला । तो धर्मही सांगातेंची नेला । कीं शुद्धसत्त्वेंची सारूप्य. ॥ ९३३ ॥ याच शुद्धसत्त्वेंकरूनी । सर्व वासुदेव म्हणोनी । या अनुभवें प्रारब्ध सारूनी । तें सत्त्व पावले सारूप्य. ॥ ९३४ ॥ तो तेथेंही तोची अनुभव । अखडानदवैभव । निर्गुणमोक्षासारिखा अभाव । नव्हे अनुभवाचा. ॥९३५॥ तो अनुभव शाश्वत । तेव्हां भागवतधर्म शाश्वत निश्चित । त्याचीही प्रतिष्ठा म्हणे भगवंत । मीच म्हणोनी. ॥ ९३६ ॥ आता **एकांतिक सुख** अत्यंत । जेथें एका स्वरूपीं सकळां वृत्तींचा अत । त्याचीही प्रतिष्ठा म्हणे भगवत । मीची म्हणोनी. ॥ ९३७ ॥ कीं अखड निर्गुणानुभव । हेंची सगुणाचे वैभव । म्हणूनी मीची देवाधिदेव । प्रतिष्ठा त्याही सुखाची. ॥ ९३८ ॥ विद्येचा विलास जितका । सगुणविद्योपाधीच तितका । तेव्हां निर्विशेषसमाधिप्रतिष्ठा

त्या एका । **शें**षपर्यंकावीण दुजा **असे** कवण ? ॥ ९३९ ॥ एवंच मजवांचूनी कांहीं । जाण **अर्जु**ना ! कीं नाहीं । निर्गुण, सगुण, त्रिगुणही, । मींच अवघा. ॥ ९४० ॥ परतु मोक्षप्रसंगावरूनी । मोक्ष आणि साधनमोक्षप्रतिष्ठा म्हणोनी । बोलिलों, परतु माझ्या सत्तेकरूनी । जें स्फुरे त्याची प्रतिष्ठा मी स्वयें. ॥ ९४१ ॥ हा भाव **दे**व । उत्तराध्यायांत **दे**वाधिदेव । दाखवील जेथें स्वयमेव । प्रपच अश्वत्थरूप वर्णील आपणातें. ॥ ९४२ ॥ ऐसा अध्याय चर्तुदश । जेथें गुणातीत उपदेश । त्याची टीका तोची **हृ**षीकेश । करी ऐसी. ॥ ९४३ ॥ **वे**दाची प्रतिष्ठा जो स्वयें । तोची **गी**तारूपे निश्चयें । हे टीका त्याच **वि**श्वमयें । केली, प्रतिष्ठा इचीही तोची **गो**विद. ॥ ९४४ ॥ तोची **गी**ता, तोची **टी**का । तोची यथार्थ हे **यथार्थदीपिका** । विश्वात्मभावें त्याच **शे**षपर्यंका । शरण दास त्याचा **वामन**. ॥ ९४५ ॥ **वामन** तोची **पु**रुषोत्तम । दिसे वामन, असे **त्रि**विक्रम । तोची सर्व आक्रमविक्रम । **वामन** म्हणे. ॥ ९४६ ॥ **टी**का अर्पितां चरणावरी । हृदयीं उचलूनी ठेवी **ह**री । म्हणे त्यातेंची **गी**ता कळेल बरी । जो हे **टी**का पुनःपुन्हा पाहेल. ॥ ९४७ ॥